- **श्रीगोंदवलेकर महाराज यांच्या हृद्य आठवणी**

संग्राहक : ल. ग. (बापूसाहेब) मराठे
प्रस्तावना : प्रा. के. वि. बेलसरे
किमत ८ रुपये

- **सार्थ श्रीविष्णु सहस्रनाम**

नामाचा समास – श्रीराम पाठ संग्रह
संपादक : श्रीराम भक्त
किमत २.५०

- **मनोबोध प्रकाश**

श्रीसमर्थांचे सार्थ व सटीप मनाचे श्लोक
संपादक : प. ग. गद्रे गुरुजी
किमत ५.५० रुपये

- **प्रवचन पारिजात**

श्रीगोंदवलेकर महाराज यांची प्रवचनें या मराठी ग्रंथाचा श्री. ब्रजमोहन दीक्षित यांनी केलेला हिंदी अनुवाद.
किमत २५ रुपये.

**यशवंत प्रकाशन : पुणे ३०.**

ॐ

विश्व हिंदु परिषद
एकात्मता यज्ञ
(नगर शाखा)

सस्नेह भेंट

दिनाङ्क - १३-१२-८३

॥ श्रीराम प्रसन्न ॥

श्रीसमर्थ सद्‌गुरु ब्रह्मचैतन्य श्रीगोंदवलेकर महाराज यांचीं

# 卐 प्र व च नें 卐

[ आवृत्ति ५ वी ]



* संग्राहक : गो. सी. गोखले
* प्रस्तावना : प्रा. के. वि. बेलसरे

卐 卐 卐 卐

मूल्य : पंचवीस रुपये


**************************************************************

य श वं त प्र का श न, स दा शि व पे ठ हौ दा ज व ळ, पु णें ३०.

**************************************************************

॥ प्रवचनें ॥

* आवृत्ति पहिली : १९६६ प्रति- ४०००
* आवृत्ति दुसरी : १९६८ प्रति- ५०००
* आवृत्ति तिसरी : १९७२ प्रति- ७०००
* आवृत्ति चौथी : १९७६ प्रति-१३०००
* आवृत्ति पांचवी : १९८१ प्रति-१६०००

एकूण प्रति- ४५०००

卐

श्रीसमर्थ सद्गुरु ब्रह्मचैतन्य
श्रीगोंदवलेकरमहाराज यांचीं प्रवचनें



* प्रकाशक : अ. स. वैद्य, यशवंत प्रकाशन
सदाशिव पेठ हौदाजवळ, पुणें ३०.

* मुद्रक : मा. प. तळेकर,
श्री दत्त मुद्रणालय,
३३५ शनिवार पेठ, पुणें ३०

* चित्रकार : जि. भि. दीक्षित

* मुखपृष्ठ व आंतील चित्रें छपाई : रविराज प्रिंटरी, पुणें.

# प्रस्तावना

श्रीब्रह्मचैतन्यमहाराज गोंदवलेकर यांच्या प्रवचनांच्या संग्रहास प्रस्तावना लिहिण्यास मला मनापासून आनंद वाटतो. व्याख्यान आणि प्रवचन यामध्यें मोठा महत्त्वाचा फरक असतो. तो असा कीं, व्याख्यानामध्यें विद्वत्तेचें प्रदर्शन असतें, तर प्रवचनामध्यें आत्मज्ञानाचें दर्शन घडतें. व्याख्यान उत्तम झालें तरी व्याख्यात्याचें खाजगी जीवन कसें आहे इकडे लोक फारसें लक्ष देत नाहींत. आपला विषय तो कसा मांडतो याकडेच श्रोत्यांचें लक्ष असतें. याच्या उलट प्रवचनकाराचें खाजगी जीवन कसें आहे, तो जें सांगतो त्यामध्यें त्याच्या जीवनाचें प्रतिबिंब पडतें किंवा नाहीं, याकडे श्रोत्यांचें लक्ष असतें. श्रीब्रह्मचैतन्यमहाराजांच्या प्रवचनांचें हेंच मोठें वैशिष्ट्य आहे कीं, आपल्या जीवनांत जसे ते वागले तसेच ते बोलले. आपण जें आचरण करतों तेवढेंच लोकांना सांगण्याचा आपल्याला अधिकार आहे असें ते नेहमीं म्हणत. म्हणून या ग्रंथांतील प्रवचनांच्या मागें प्रत्यक्ष आचरणाचा मजबूत पाया आहे हें वाचकांनीं ध्यानांत ठेवावें. ज्यांचें बोलणें आणि वागणें एकरूप असतें त्यांनाच संत म्हणतात. संतांचें जीवन भव्य असतें, उदात्त असतें, तसेंच भगवंताच्या प्रेमानें भरलेलें असतें; पण या सर्वांचें मूळ आत्मसाक्षात्कारामध्यें असतें, म्हणून तो साक्षात्कार कसा करून घ्यावा हा एकच विषय संतांच्या प्रवचनांत सांपडतो. अर्थात् या ग्रंथांत संग्रहित केलेल्या प्रवचनांमध्यें आत्मसाक्षात्काराची सर्वांगीण शिकवण आढळते. सर्वांगीण म्हणण्याचा हेतु हा कीं, मानवी जीवनाच्या सर्व अवस्थांमध्यें, म्हणजे सामान्य माणसाच्या प्रपंचामध्येंदेखील, आत्मज्ञानाचें साधन यथासांग आचरतां आलें पाहिजे असा श्रीमहाराजांचा आग्रह आहे. आत्मसाक्षात्कार होण्यासाठीं अनेकांनीं अनेक साधनें सांगितलीं. त्या सर्वांमध्यें भगवंताच्या अस्तित्वाची जाणीव अखंडपणें टिकविणें हें सर्वोत्तम साधन होय, असें श्रीमहाराजांचें स्पष्ट मत आहे. भगवंत आहे, तो माझ्याजवळ आहे, अगदीं माझ्या हृदयांत आहे, अशी जाणीव मनामध्यें टिकण्यास भगवंताचें सूक्ष्म चिंतन अवश्य आहे. असें सूक्ष्म चिंतन अर्थरूप असतें. त्या अर्थाचें वाहक म्हणजे भगवंताचें नाम होय. या दृष्टीनें भगवंताच्या नामस्मरणांतून भगवंताचा भाव निर्माण होतो. एकदां भाव निर्माण झाला कीं सर्व प्रकारचे वाद, मतें व मतांतरें आपोआप लय पावतात. नाम श्रेष्ठ कां ? तर तें सगुण आहे तसेंच निर्गुण आहे, सूक्ष्म आहे तसेंच स्थूल आहे, ज्ञान्याला चालतें तसेंच अज्ञान्याला लागू पडतें, संन्याशाला समाधान देतें तसेंच प्रापंचिकाला तारतें, इतकेंच नव्हे तर अगदी हीनदीन व्यक्तींपासून ते श्रेष्ठ व्यक्तींपर्यंत सर्वांना मायेच्या जाळ्यांतून बाहेर काढणारें नाम हें एकच साधन आहे. लग्न झाल्यानंतर बऱ्याच दिवसांनीं गर्भार राहिलेली स्त्री आपल्या गर्भाला अति काळजीपूर्वक जपते, तसें श्रीसद्गुरूंनीं दिलेल्या नामाचें जतन केल्यास याच जन्मामध्यें भगवंताचें सान्निध्य खात्रीनें अनुभवास येतें, असें श्रीमहाराजांचें प्रतिज्ञापूर्वक सांगणें आहे.

श्रीमहाराज लौकिकदृष्ट्या ग्रंथ पढलेले नव्हते, म्हणून त्यांची भाषा ओबडधोबड वाटते. पण तिच्यामध्यें एका थोर नामसिद्ध स्थितप्रज्ञानें आपल्या आत्मसाक्षात्काराचें सार ओतलेलें आहे. प्रवचनांची वाणी भगवंताच्या प्रेमानें रसरसलेली असली तरी तिचें तेज शांतता व समाधान देतें. सर्व प्रवचनांचें मूळ भगवत्प्रेरणेंत असलें तरी प्रसंगोपात्त लौकिक परिस्थितीचें व व्यवहाराचें विवेचन मधून मधून डोकावतें. वास्तविक श्रीमहाराजांनीं मोठा लोकसंग्रह केल्यामुळें त्यांच्या नजरेंतून व्यवहाराची कोणतीहि बाजू सुटलेली नाहीं. परंतु व्यवहार सांगतांना देखील त्यांचें अंतिम लक्ष भगवंताकडे, म्हणजे जीवनाच्या शाश्वत तत्त्वाकडे होतें. देहाहून आपण भिन्न आहोंत, आपण भगवत्स्वरूप आहोंत, हें ओळखणें म्हणजे जीवन सफल होणें,

अशी त्यांची ठाम भूमिका असल्यामुळें प्रत्येकानें आपला प्रपंच व त्यांतील सर्व कर्में भगवंताच्या पार्श्वभूमीवर करावींत असें ते वारंवार सांगत. देहपूजेला जीवनसर्वस्व मानणाऱ्या विसाव्या शतकांतील सुशिक्षितांना आत्मज्ञानाच्या भूमिकेवर उचलून उभें करण्याचा प्रचंड खटाटोप त्यांनी जन्मभर केला. मानवी देहाला जीवनांत मोठें महत्त्व आहे, पण तें भगवंताचें साधन म्हणून आहे, ही दृष्टि ठेवून देहाला चांगलें खावप्यायला घालावें, त्याला सुखोपभोग द्यावे, त्याला बलवान् ठेवावें, पण केवळ तेवढेंच करण्यासाठीं जगणें, म्हणजे भगवंताला विसरून जगणें, हें पाप आहे असें श्रीमहाराजांचें सांगणें आहे.

श्रीमहाराजांचें व्यक्तिमत्त्व अनन्यसामान्य होतें, म्हणून त्यांचें बोलणें सगळें एकदम कळणें अशक्य आहे. जो साधन करील त्याला मात्र त्यांच्या वाणींतून आपोआप प्रकाश मिळेल. या जगांत एका भगवंताशिवाय सर्वस्वीं नवीन असें काय आहे ? त्या भगवंताच्या नामाचें चिंतन हजारों भक्तांनी करून सुद्धां तो पुन्हा नवीन व ताजा आहे. अर्थात् भगवंताचें नाम जितकें जुन्यांत जुनें तितकेंच तें नवीनांत नवीन आहे. त्या नामाचें महत्त्व सांगतांना श्रीमहाराजांच्या अक्षराअक्षरांतून भगवंताचा भाव निथळूं लागतो, आणि ऐकणाऱ्याला किती सांगूं आणि किती नको असें त्यांना होऊन जातें. विश्वांतील जीवनांत ओतप्रोत भरलेला भगवंत मनुष्यमात्रानें नामस्मरणानें पाहावा व आपलें जीवन आनंदमय बनवून टाकावें, असा श्रीमहाराजांचा अट्टाहास आहे. श्रीमहाराजांच्या अंगीं द्रष्टेपण होतें. चालू काळाला तसेंच पुढें येणाऱ्या काळाला, आपल्या विशाल दृष्टीनें ओळखून आत्मज्ञानाचें साधन सांगणारा पुरुष द्रष्टा ठरतो. तें साधन म्हणजे नाम होय. नाम स्वयंभू आहे, शक्तिरूप आहे; त्यामध्यें भगवंताची दिव्य शक्ति साठवलेली असल्यानें नामानें वासना जिंकता येते. नामामध्यें गुरुकृपा व भगवत्कृपा यांचा समावेश होतो. नाम निश्चयानें घ्यावें पण प्रेमानें घ्यावें; नियमानें घ्यावें पण मनापासून घ्यावें; उत्साहानें घ्यावें पण चिकाटीनें घ्यावें. नामाला नीतीची, सदाचरणाची व कर्तव्याची जोड द्यावी. असा धीर धरून नामाचा अभ्यास करणाऱ्यास आज ना उद्यां साक्षात्कार झाल्याशिवाय राहणार नाहीं, असा श्रीमहाराजांचा आशीर्वाद आहे.

श्री. गोखले स्वतः साधक वृत्तीचे आहेत. त्यांनीं अत्यंत परिश्रम घेऊन श्रीमहाराजांच्या प्रवचनांचा हा संग्रह लोकांसमोर ठेवला आहे. त्यामुळें साधकांची फार सोय होईल यांत शंका नाहीं. या पुण्यकर्मानें त्यांचें चित्त नामांत अधिकाधिक रंगून जावो हीच माझी श्रीसद्गुरुचरणीं प्रार्थना आहे.

श्री. अनंतराव वैद्य यांनीं मोठ्या धडाडीनें सध्याच्या महागाईच्या काळांत एवढा ग्रंथ छापण्याचें अंगावर घेऊन तें कार्य सर्वतोपरी उत्तम रीतीनें पार पाडलें याबद्दल ते खरोखरच सर्व वाचकांच्या स्तुतीला पात्र आहेत. त्यांच्या धंद्यांत त्यांना मनाप्रमाणें यश मिळो हीच माझी भगवंताजवळ प्रार्थना आहे.

कृष्णबाग, मालाड
मुंबई, ता. १२–११–६६

के. वि. बेलसरे

॥ श्रीराम ॥

# निवेदन

श्रीमहाराजांच्या अनेक भक्तांनीं निरनिराळ्या वेळीं श्रीमहाराज सांगत असतांना लिहून घेतलेली पुष्कळशीं निरूपणें पाहण्याचा लाभ मला मिळाला व या सर्व निरूपणांचा संग्रह आपल्याजवळ असावा असें वाटूं लागलें.

पुढें कांही दिवसांनीं असें मनांत येऊं लागलें कीं, श्रीमहाराजांचीं निरूपणें आपल्याजवळ लिहिलेलीं तरी असावींत; केव्हांहि वाचण्यास उपयोगी पडतील. शिवाय श्रीमहाराजांचें अमृततुल्य निरूपण वाचीत असतांना त्यांच्या संगतींतच असल्याचा लाभ मिळेल असें वाटूं लागलें. दुसरी गोष्ट म्हणजे श्रीमहाराजांनीं वेळोवेळीं सांगितलेल्या सूचना आचरणांत आणतांना त्यांच्या या निरूपणांच्या वाचनानें अनायासें मार्गदर्शन होईल, व शंकांचें निरसन होऊन श्रद्धेला आणखी बळकटी होईल, अशा तऱ्हेच्या विचारांची मनांत नेहमी गर्दी होऊं लागली. ही सर्व निरूपणें आपण संग्रहित केलीं तर त्यांत वावगें होणार नाहीं, झालाच तर उलट आपला फायदाच होईल, हें जाणून श्रीमहाराजांच्या निरूपणांचें संकलन करण्याचें मीं ठरवलें.

मग ती. तात्यासाहेब केतकर, ती. द. गो. जोशी, ती. दत्तोपंत काशीकर, यांच्याकडे असलेल्या श्रीमहाराजांच्या निरूपणांच्या तीस-पस्तीस वर्षांपूर्वीच्या चोपड्या मिळाल्या. कै. मनोहर व कै. साने यांनीं हीं निरूपणें श्रीमहाराज सांगत असतांना लिहून घेतलेलीं होतीं. त्याशिवाय इतर अनेक भक्तांनीं प्रयत्नानें लिहून घेतलेली निरूपणेंहि मिळालीं. ती. केशवराव बेलसरे यांनीं लिहिलेल्या श्रीमहाराजांच्या चरित्रग्रंथाचा व श्रीब्रह्म-चैतन्यगीतेचाहि अतिशय उपयोग झाला. खरोखर, सर्वांच्या परिश्रमानेंच या निरूपणाच्या पुस्तकाला हा आकार प्राप्त झाला आहे यांत शंका नाहीं. अशा प्रकारें श्रीमहाराजांच्या निरूपणांचा व त्यांच्या काव्यमय पत्रांचा बराचसा संग्रह झाल्यावर पुढें कांहीं दिवसांनीं श्री. भगवंतराव जामखेडकर यांच्याकडे एकादशीच्या भजनाच्या निमित्तानें आम्ही सर्व जमलों असतांना त्यांच्याकडे लहान डिक्शनरीच्या आकाराएवढें असलेलें बायबल बघायला मिळालें, व त्यामध्यें दर दिवशीं वाचण्याचा मजकूर कसा असतो हें पाहावयाला मिळालें. त्यावरून श्रीमहाराजांचीं आपल्याजवळ संग्रहित असलेलीं निरूपणें रोजच्या रोज वाचण्यासाठीं अशीं लिहावींत, ही कल्पना सुचली. ती. तात्यासाहेबांना व ती. पंडितरावांना (वडिलांना) ही कल्पना सांगितल्यावर, त्यांनाहि ती फारच आवडली; व मग त्यांच्याच प्रोत्साहनावरून हीं संग्रहित केलेलीं श्रीमहाराजांचीं निरूपणें रोजच्या रोज वाचण्याच्या दृष्टीनें लिहिण्याचें काम चालू झालें. श्रीमहाराजांच्या कृपेमुळेच हें काम माझ्या हातून पार पडलें.

अशा रीतीने ३६६ दिवसांचीं (लीप वर्षाचें धरून) निरूपणें लिहून झाल्यावर रोजच्या रोज एक याप्रमाणें आम्हीं तीं वाचूं लागलों. त्यानंतर कांहीं दिवसांनीं ती. तात्यासाहेबांनीं, हा रोजच्या रोज वाचण्याचा मजकूर पुस्तकाच्या एका पानांत बसत असल्यास पाहावें, असें सांगितलें. त्याप्रमाणें यशवंत प्रकाशनचे श्री. अनंतराव वैद्य यांना "तसें शक्य होईल का?" असें विचारतां त्यांनीं तसें सहज होऊं शकेल असें सांगितलें, आणि मग सर्वांच्या इच्छेनुसार श्रीमहाराजांच्या निरूपणाचें पुस्तक छापण्याचें ठरलें. ती. केशवराव बेलसरे यांनीं प्रत्येक निरूपणाला योग्य शीर्षक देऊन पद्धतशीरपणें मांडण्याचें सुचविलें; त्याप्रमाणें यथामति प्रयत्न केला आहे. श्री. प्र. ना. वटीकर यांची या कामीं बरीच मदत झाली.

खरोखर सर्वांच्या आशीर्वादामुळे श्रीमहाराजांच्या निरूपणाचा एक अंशभाग आज पुस्तकरूपानें तयार झाला आहे.

श्रीमहाराजांच्या निरूपणाचें मुख्य अधिष्ठान नामच आहे. त्यांनी प्रत्येक निरूपणात नामाचीच महति गाऊन नामच सदासर्वकाळ घेण्यास सांगितलें. बरोबरच आहे, जन्मभर नामाचाच ह्व्यास ज्यांनीं धरला,

नामाच्याच सहवासात राहून ज्यांनीं आपलें जीवन नाममय बनविलें, नामाच्याच प्रसाराकरितां ज्यांचा जन्म झाला, व "जेथें नाम तेथें मी आहेंच" असें शंभर टक्के सत्य ज्यांनीं आपल्या भक्तांना मोठ्या कळकळीनें सांगितलें, त्या रामस्वरूप झालेल्या श्रीमहाराजांच्या निरूपणांत नामाशिवाय दुसरें काय असणार ? या महापुरुषाचीं अमृततुल्य निरूपणें ज्यांना ऐकावयास मिळालीं ते धन्य होत, आणि ज्यांनीं ही निरूपणें स्वत: ऐकून त्यांचा लाभ दुसऱ्यांनाहि घेता यावा म्हणून त्यांचे अमृतमय शब्द जसेच्या तसे उतरवून घेण्याचा प्रयत्न केला, त्यांचे खरोखर आपल्यावर अनंत उपकार आहेत व ते आपण कधींच विसरूं शकणार नाहीं. अशा अनेक भक्तांनीं वेगवेगळ्या वेळीं मिळवलेले अमृताचे बोल एकत्र करून ठेवण्याचें काम फक्त येथें केलें आहे. नामाचें बीज वृत्तींत एकदां पेरलें गेल्यावर त्या बीजाला खतपाणी मिळण्याची सोय या निरूपणांच्या वाचनानें निश्चित होऊं शकेल.

या सर्व निरूपणांची मांडणी विषयाच्या दृष्टीनें पुढीलप्रमाणें केली आहे :–

जानेवारी–नाम; फेब्रुवारी–नाम; मार्च–प्रपंच, एप्रिल–संत, सत्पुरुष, मे–साधन, जून–परमार्थ, जुलै–सद्‌गुरु, ऑगस्ट–आनंद, समाधान, सप्टेंबर–अखंड नामस्मरण व संपूर्ण शरणागति; ऑक्टोबर–भगवंत, नोव्हेंबर–भगवंत, डिसेंबर–नाम.

या ३६६ प्रवचनांव्यतिरिक्त, श्रीब्रह्मानंदमहाराजांची पुण्यतिथि, श्रीरामनवमी, श्रीगुरुपौर्णिमा व श्रीमहाराजांची पुण्यतिथि या दिवसांसाठीं चार प्रवचनें घातली आहेत.

रूपरेषा थोडक्यांत अशी आहे. जानेवारी व फेब्रुवारी :– नाम :– भगवंताच्या प्राप्तीसाठीं नाम घ्यावें, भगवंताचें नामस्मरण करावें, त्याच्या नामांत राहावें, असें सर्व सांगतात. हें नाम म्हणजे खरोखर काय, आहे, तें घेतांना काय पथ्यें पाळावीत, तें घेण्याचा अभ्यास कसा करावा, तें घेण्याची काय आवश्यकता आहे. त्यामध्यें दृढभाव कसा येईल, इत्यादि सर्व गोष्टींचा विचार साकल्यानें पहिल्या दोन महिन्यांत म्हणजे ६ तों पानांत आला आहे. मार्च :– प्रपंच : एकदां नाम घेण्यास सुरुवात केली म्हणजे, ज्या प्रपंचांत आपण राह त्याचें स्वरूप कसें आहे, प्रपंचांत नामाची काय आवश्यकता आहे, प्रपंचांत मनुष्यानें कसें वागावें, प्रपंचातील आसक्ति व काळजी यांपासून कसें सुटावें, सुखानें प्रपंच कसा करावा, प्रपंचांत भगवंताचा आधार कसा धरावा, या सर्व गोष्टींचा ऊहापोह तिसऱ्या महिन्यातील ३१ पानांत आला आहे. **एप्रिल :– संत, सत्पुरुष :–** नामाच्या योगानें प्रपंचाचें स्वरूप कळून आल्यावर चांगले ग्रंथ, चांगलीं माणसें, यांच्या सहवासांत राहण्याची आपली इच्छा होते; संत कसे ओळखावेत, सत्पुरुषाच्या संगतींत राहिल्यास काय फायदे होतात, संगतीचा आपल्या मनावर काय परिणाम होतो, संतांची योग्यता काय, संतांचा व्यवहार कसा असतो, संत आपल्याकरितां काय करतात, इत्यादि विचार चौथ्या महिन्यांतील ३० पानांत केलेला आढळेल. **मे :– साधन :–** नामाच्या योगानें प्रपंचाचें स्वरूप कळून संतांची गांठ पडली म्हणजे संत, सत्पुरुष, सांगतात तसें करण्याची आपली इच्छा होते, व त्यांनीं स्वतः अनुभव घेऊन सांगितलेल्या तत्त्वांचा आपण साधन म्हणून प्रपंचांत उपयोग करूं लागतो. या साधनांची उपासना कशी करावी, हीं साधनें कोणतीं व तीं आपल्या मनावर काय परिणाम घडवून आणतात, त्यांचा जीवनांत हेतु कोणता, या सर्वांचा तपशील पांचव्या महिन्यांतील ३१ पानांत अंतर्भूत आहे. **जून :– परमार्थ :** अशा रीतीनें नामाच्या साहाय्यानें संतांची गांठ पडून त्यांनीं सांगितलेल्या साधनांचा अभ्यास प्रपंचांत चालू ठेवल्यास आपला प्रपंच हाच परमार्थ बनतो. प्रपंचाला परमार्थाचें स्वरूप येतें. अशा वेळीं आपला देह प्रपंचांत असतो, पण मन मात्र परमार्थांत असतें. या परमार्थाचे स्वरूप काय, तो कसा साधेल, त्यांत प्रेम कसें येईल, तो गुप्तपणें कसा व कां करावा, परमार्थांत प्रपंचाचें स्थान काय, तो कसा वाढवावा, परमार्थाचें सूत्र काय आहे, इत्यादि सर्व गोष्टींचा सहाव्या महिन्यांतील ३० पानांत उल्लेख आहे. जुलै :–**सद्‌गुरु :** एकदां परमार्थांत चित्त गुंतलें म्हणजे प्रपंचांतील आसक्ति कमी होऊन अंतःकरण शुद्ध होत जातें. अशा वेळीं, किंवा

क्वचित् आधींहि, सद्गुरूंच्या भेटीचा योग येतो. कांहीं वेळां सद्गुरु आपण होऊन साधकाच्या भेटीस येतात. सद्गुरूंची भेट भाग्यानें होत असते, सद्गुरु आपल्या हाताला धरून भगवंताची प्राप्ति घडवून आणतात, आपल्याकडून ते अभ्यास करवून घेतात, आपल्याला मदत करण्यास त्यांचा हात सदैव पुढेंच असतो, आपण मात्र अनन्य निष्ठेनें त्यांच्या आज्ञेचें पालन करावें. अशा सद्गुरूंची योग्यता काय, त्यांची कामगिरी कोणती, त्यांना कसें शरण जावें, त्यांना कसें जाणून घ्यावें, त्यांना आपल्या जीवनात काय कर्तव्य असतें, ते कसे भेटतील, ते काय सांगतात, या सर्वांचा ऊहापोह सातव्या महिन्यांतील ३१ पानांत येतो. **ऑगस्ट :-आनंद, समाधान :** अशा रीतीनें सद्गुरूंची आज्ञा अत्यंत श्रद्धेनें व निष्ठेनें पाळून नामाच्या संगतींत केवळ कर्तव्य म्हणून प्रपंच केल्यास त्यालाच परमार्थाचें स्वरूप येऊन, त्यांत आनंद व समाधानाचा लाभ झाल्याशिवाय राहात नाहीं. भगवंताच्या आनंदमय स्वरूपाची साधकाला जाणीव होऊं लागते. अशा या आत्मानंदांत मनुष्य स्वतःलाहि विसरतो. या आनंदाचें मूळ काय, तो कसा कायम टिकेल, प्रपंचांत खरें समाधान कसें मिळेल, समाधानाचें शास्त्र कोणतें, समाधानाची खूण कोणती, समाधानाचें रहस्य कशांत आहे, इत्यादि गोष्टी आठव्या महिन्यांतील ३१ पानांत विशद झाल्या आहेत. **सप्टेंबर :-अखंड नामस्मरण :** आनंद आणि समाधानाचें मूळ जें नाम त्याची कांस धरून भगवंतास अनन्यभावानें शरण गेलें म्हणजे भगवंताच्या नामाशिवाय दुसरें कांहींच दिसत नाहीं, बोलतां येत नाहीं, ऐकतां येत नाही. रात्रंदिवस एक नामच नाम. हें अखंड नामस्मरण कसें टिकवावें, त्याच्या अनुसंधानांत कसें राहावें, अखंड नामस्मरणानें भगवंतास कसें जाणावें, " तूं आहेस, मी नाहीं " ही स्थिति अनुसंधानानें कशी मिळवावी, इत्यादींचें स्वरूप नवव्या महिन्यांतील ३० पानांत उल्लेखिलेलें आहे. **ऑक्टोबर व नोव्हेंबर :- भगवंत :** भगवंतास अनन्यभावें शरण जाऊन अखंड त्याच्या नामांत राहिलें म्हणजे मनुष्याला या जन्मांत मिळविण्याचें असें कांहींच राहत नाहीं. त्याला सर्व जग ब्रह्ममय, भगवंतमय दिसूं लागतें. भगवंताशीं एकरूप होणें, नराचा नारायण होणें, इत्यादि गोष्टी त्याच्या बाबतींत अगदीं सत्यच असतात. अशा या भगवंताचें स्वरूप कसें आहे, परमेश्वराची सगुणोपासना म्हणजे काय, भगवंत नामानें कसा साध्य होतो, भगवंताच्या भक्तीचें रहस्य कोणतें, भगवत्कृपा कशी होते, भगवंताचें रूप श्रेष्ठ कीं नाम श्रेष्ठ, भगवंताजवळ काय मागावें, भगवंताचें कसें व्हावें, इत्यादि सर्व गोष्टींचा खुलासा दहाव्या व अकराव्या महिन्यांतील ६१ पानांत आलेला आहे. **डिसेंबर :- नाम :** जो ब्रह्मरूप झाला, देव-भक्ताचें नातें जेथें संपलें, भगवंताच्या निर्गुण स्वरूपांत जो विलीन झाला, त्यालासुद्धां, त्यानें सुरुवातीपासून घेतलेलें व भगवंताला खेंचून आणणारें नाम हें शेवटपर्यंत कायम राहणारच. नाम हें सुरुवातीपासून शेवटपर्यंत राहणारें आहे. नामास आदि-अंत नाहीं. नाम हेंच साधन व नाम हेंच साध्य. आपण नामाच्या वाहनांत अत्यंत विश्वासानें बसल्यावर तें आपल्या ठिकाणाला नक्की घेऊन जाणारच यांत बिलकुल संदेह नाहीं. नामांतच विश्वाचें मूळ आहे व नामांतच विश्वाचा अंत आहे. भगवंताचें नाम भगवंतालाहि व्यापून कायमच आहे. हे विचार या ३१ पानांत येतात.

अशा या नामाच्या संगतींत सदैव राहण्याचा अभ्यास करणें, हेंच श्रीमहाराजांच्या निरूपणाचें सूत्र आहे, व त्याप्रमाणें, **मुखीं रामाचें नाम। बाह्य प्रपंचाचें काम। ऐसा राम जोडा मनीं।।** हेंच त्यांच्या शिकवणुकीचें रहस्य आहे.

श्रीमहाराजांच्या कृपाप्रसादानें आपल्या सर्वांना नामाची जी संगत लाभली आहे ती शेवटपर्यंत कायम टिको, हीच श्रीमहाराजांना कायावाचामनें शरण जाऊन व त्यांच्या चरणावर मस्तक ठेवून अत्यंत नम्रभावानें प्रार्थना करतों.

।। श्रीराम जय राम जय जय राम ।।

— गो. सी. गोखले, संग्राहक.

अहमदाबाद

१३-११-६६ ( दिवाळी पाडवा )

# पांचव्या आवृत्तीच्या निमित्तानें

" वाचन हें सुद्धां एक व्यसन आहे. उगीच ग्रंथ वाचत बसण्यांत फायदा नाहीं. वाचनाचें मनन झालें पाहिजे. मनन झालें कीं तें आपल्या रक्तांत मिसळतें. साधन आणि वाचन बरोबर चालावें. मगच साधकाला वाचनापासून खरा अर्थ समजतो व आनंद होतो."

आत्मोन्नतीच्या दृष्टीनें अत्यंत उपयुक्त पण व्यावहारिक दृष्टीनें तितक्याच परखड अशा श्रीमहाराजांच्या प्रवचनांचा लाभ आजवर असंख्य वाचकांना मिळाला आहे, मिळत आहे व अनेकांची साधनाकडे, विशेषतः नामस्मरणाकडे वाढती वृत्ति होत आहे, हें गोंदवल्यास दिवसेंदिवस मोठ्या प्रमाणावर येणाऱ्या जिज्ञासु साधक-वर्गाच्या ओघावरून सहज दृष्टोत्पत्तीस येईल.

परमेश्वराविषयीचें प्रेम वृद्धिंगत होणें, म्हणजेच त्याचें नाम घेण्याची भावना जागृत होणें, हेंच तीर्थ-क्षेत्रांत आल्याचें मुख्य लक्षण आहे. गोंदवल्यास आल्यानें नाम घेण्याची वृत्ति होते व पुढें पुढें ती दृढमूल होत जाते असा अनेक साधकांना प्रत्यक्ष अनुभव आला आहे. गोंदवल्यास येऊन नामस्मरण करणाऱ्या लोकांकडे पाहून एकदां श्रीमहाराज म्हणाले होते, " तुम्हां इतक्या लोकांना नामस्मरण करतांना पाहून मला एक समाधान असें वाटतें कीं, मला जी गोष्ट आवडते ती इतक्या लोकांना आवडूं लागली आहे. तुम्ही इतके कष्ट करून येथें मला भेटण्यास येतां, तुम्हांला माझा आशीर्वाद आहे कीं तुम्हाला नामाचें म्हणजे भगवंताचें प्रेम खात्रीनें लागेल."

" माझें निरूपण ऐकण्यानें एक श्रोता जरी नाम घेण्यास प्रवृत्त झाला तरी या सांगण्याचें सार्थक झालें असें मला वाटेल." असें एकदां श्रीमहाराज म्हणाले होते. या प्रवचनांच्या पुस्तकाविषयीं त्यांच्याच शब्दांत सांगायचें झालें तर असें सांगतां येईल कीं, " या प्रवचनांच्या वाचनानें एखादा जरी वाचक नाम घेण्यास प्रवृत्त झाला अथवा त्यास त्यांत गोडी वाटूं लागली तरी या पुस्तकाचें चीज झाल्यासारखें आहे."

खरें म्हणजे, श्रीमहाराजांचें एक प्रवचन जरी वाचलें व त्याप्रमाणें श्रद्धेनें आचरण करण्याचें ठरविलें तरी मनुष्य उद्धरून जाऊं शकेल. लोकांना नामाचें महत्त्व पटावें म्हणून किती कळवळ्यानें, अनुभवानें व जीव तोडून त्यांनीं सांगितलें ! नामस्मरणाची आवड लोकांत निर्माण व्हावी म्हणून त्यांनीं आपलें उभें आयुष्य त्याकरितां खर्ची घातलें. श्रीमहाराजांवर अतिशय प्रेम करणाऱ्या व त्यांच्या सहवासांत राहिलेल्या कांहीं निष्ठावान् भक्तांचे स्फुट विचार त्यांच्याच शब्दांत येथें दिल्यास तें अप्रस्तुत होणार नाहीं, उलट साधकाला ते उपयुक्तच वाटतील, म्हणून पुढे देत आहे.

( १ ) " श्रीमहाराजांचें सांगणें इतकें स्पष्ट असे कीं त्याच्या अर्थाविषयीं वाद उत्पन्न होण्याचें कारणच नाहीं. त्या शब्दांचा जो साधा, सरळ अर्थ असेल तसें वागा. त्यांतच कल्याण आहे. थोडक्यांत म्हणजे, आल्यागेल्याला प्रेमानें अन्नपाणी देत जा, आणि श्रीमहाराजांना शेवटपर्यंत सोडूं नका."

( २ ) " श्रींनीं चमत्काराला महत्व दिलें नाहीं. कुणी एखाद्यानें त्यांच्याजवळ चमत्कार सांगितला तर दुसरें कांहीं बोलणें काढून त्याला ते बोलूं देत नसत. श्री हे मूर्तिमंत चमत्कार होते व आहेत. त्यांची प्रत्येक कृति वरवर दिसण्यांत इतकी स्वाभाविक दिसे, परंतु ती होऊन गेल्यावर ती कशी काय झाली यास आश्चर्यच वाटे. माझी खात्री आहे कीं असा एकहि मनुष्य नसेल, जो श्रींच्या सहवासांत राहिला आहे व त्याचें मनोमन प्रचीति आली नसेल. श्रींचा मोठ्यांतला मोठा चमत्कार पाहावयाचा असेल तर विषयाच्या आसक्तींत असलेल्या लाखो जीवांना श्रीरामनामाकडे वळविणें, यासारखा सार्वजनिक चमत्कार दुसरा कोणता !"

( ३ ) '' श्रीमहाराजांना ' कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुम् ' शक्ति प्राप्त आहे. फक्त एकच गोष्ट त्यांच्या शक्तीबाहेरची आहे; ती म्हणजे कोणाचेंहि अहित श्रीमहाराज कधीं करूं शकणार नाहींत. श्रीमहाराज माझ्या नेहमी जवळ असल्यानें मला नव्वदीच्या वरच्या या वयातहि मरणाचें बिलकूल भय वाटत नाहीं. वरें, मृत्यू-मुळे इथून तिकडे गेलों तरी जायचें श्रीमहाराजांकडेच; मग भीतीचें कारण काय ? ''

( ४ ) '' अनुग्रह देतांना श्रींचा प्रत्येकास सांगण्याचा कटाक्ष अशाप्रकारें असे कीं ज्याचें नांव तोच देतो ( म्हणजे श्रीरामाचें नांव श्रीरामच देतो ), अशी भावना ठेवा. नीतिधर्माचें आचरण राखणें अत्यंत जरूर आहे. श्रींनीं व्यवहार सोडून कोणासहि कांहींहि करण्यास सांगितलें नाहीं. कोणा गरिबास त्यांनीं एकदम श्रीमंत केल्याचेंहि कधीं कोणी ऐकिलें नाहीं. श्री नेहमीं म्हणत, ' मला त्यांनींच खरें ओळखलें, ज्यांचा नामावर पूर्ण विश्वास आहे.' प्रारब्धानें आलेले भोग आनंदानें भोगीत जावें पण त्यात रामाला विसरू नये, हें त्यांचें सर्वांना सांगणें असे. ''

( ५ ) '' श्रीमहाराज आपले खरे देव. ज्या मंदिरात आपण जातों तेथें तरी श्रीमहाराजच त्या रूपांत असतात असें समजायला काय हरकत आहे ?

'' खरोखर महाराजांनी माझी प्रत्येक इच्छा पुरविली. आतां मला कशाचीहि अपेक्षा नाहीं. एक मागणें आतां उरलें आहे; त्यांच्या मांडीवर डोकें ठेवून शेवटची झोंप घ्यायची. श्रीमहाराजांनीं माझें फार कल्याण केलें. ''

( ६ ) '' जवळ जवळ नऊ वर्षे एखाद्या छायेप्रमाणें श्रीमहाराजांच्या बरोबर वावरल्यामुळें पुष्कळ लोक मला विचारतात कीं, श्रीमहाराजांचें वैशिष्ट्य असें मी काय पाहिलें. यावर मला एकच सांगतां येईल कीं, महाराजांनीं मला " अमुक एक वस्तु हवी '' हे शब्द उच्चारलेले मी कधीं ऐकिले नाहींत. तहान लागली तर त्यांनी कधीं पाणी मागितलें नाहीं, भूक लागली तर खायला मागितलें नाहीं, थंडीनें अंग गारठण्याची वेळ आली तर कधीं कपडा मागितला नाहीं, उकाड्यामुळें घामाच्या धारा लागल्या असून देखील कधीं पंखा मागितला नाहीं, आजारी पडले तर कधीं औषध मागितलें नाहीं, पैशाची अत्यंत जरूरी असून देखील कधीं कोणापाशीं हात पसरला नाहीं. ' मला अमुक हवें ' हें वाक्यच श्रीमहाराजांना येत नव्हतें असें वाटतें. आपल्या देहाला त्यांनीं नावडत्या बायकोप्रमाणें वागविलें. देहाला जरूर असणाऱ्या गोष्टी मिळाल्या तर मिळाल्या, न मिळाल्या तर न मिळाल्या, अशा वृत्तीनें महाराज जन्मभर वागले. पूर्ण वासनानाश झाल्याशिवाय कोणीहि असें वागूं शकणार नाहीं. ''

( ७ ) '' श्रीमहाराज आपण सर्वांना नामरूपी होडींत बसवून ती ते वल्हवीत आहेत, म्हणून ते सर्वांना स्वत:च्या मुक्कामाला पोंचविणारच. त्यांनीं दिलेल्या नामांत ते पूर्णपणें असल्यानें, ते व त्यांची कृपा त्या नामांत आहेच. जसजसें आपण नामस्मरण वाढवूं तसतसा हा अनुभव येत जाईल. ''

( ८ ) '' काय सांगूं तुम्हांला ! ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या–म्हणजे भगवंतच फक्त आहे आणि प्रपंच सगळा असत्य आहे, हें श्रीमहाराजांनीं प्रत्यक्ष आचरणामध्यें दाखविलें. रामापुढें पच्चवगवत् जगत् त्यांना तुच्छ वाटे. श्रीमहाराज म्हणजे चालतेंबोलते ब्रह्मच होतें.''

( ९ ) '' आपण मनापासून नामस्मरण केलें म्हणजे श्रीमहाराज खात्रीनें आपल्यापाशीं असल्याचा अनुभव येतो. कांहींहि झालें तरी आपण नाम सोडता कामा नये. श्रीमहाराजांचें खरें अस्तित्व ओळखण्यासाठीं आपल्या प्रपंचात त्यांची मदत किती होते हा मानदंड ठेवून चालणार नाहीं. ' ज्या ठिकाणीं भगवंताचें नाम आहे त्या ठिकाणीं मी खात्रीनें असतों ' या त्यांनी अनेकवार दिलेल्या आश्वासनाचा अर्थ आपण नीट समजून घेतला पाहिजे. भगवंताचें नाम घेणें म्हणजे आपल्या कर्तेपणाचा अभिमान कमी करणें होय. नामाचें प्रेम लागलें

म्हणजे कर्तेपणाचा अभिमान कमी कमी होतो व महाराजांचें अस्तित्व प्रकट होऊं लागतें. नंतर तो जें कर्म करतो त्याचें फल श्रीमहाराजांच्या इच्छेवर सोंपवितो. हें साधलें म्हणजे एक प्रकारची शांति मिळून यशापयशाचें सुखदुःख होत नाहीं. अशा प्रकारें भगवंताच्या नामांत प्रपंचाचें कर्तव्य करीत असतां श्रीमहाराजांच्याकडे कर्तेपण देऊन सुखदुःखामध्यें समाधानांत राहणें, हीच खरी त्यांच्या अस्तित्वाची खूण. आपल्या जीवनांत घडून येणाऱ्या सर्व घटना श्रीमहाराजांच्या इच्छेनें व सत्तेनें घडून येतात अशी खरी जाणीव ज्यांच्या अंतरंगांत उमटली त्यांनाच श्रीमहाराजांचें खरें अस्तित्व समजलें.”

( १० ) “ त्यांची ती प्रेमाची व आपणलेपणाची दृष्टि अजून मला आठवते. त्यांचा निंदक व परीक्षक म्हणून गेलेला मी, अंतरंगांतील त्यांचा शिष्य म्हणून त्या दिवशीं परत आलों. जणूं काय लहानपणापासून माझी ओळख असावी इतक्या आपलेपणानें व निःसंकोचानें महाराज माझ्याशीं लगेच वागूं लागले.”

( ११ ) “ महाराज, माझ्यावर आपले फार उपकार झाले. फार दिवसांपासून माझ्या मनांत अनेक प्रकारच्या शंका होत्या, सर्व शंका आतां फिटल्या. माझें पूर्ण समाधान झालें; पण आपलें बोलणें ऐकून माझी तृप्ति होत नाहीं म्हणून नामाविषयीं आणखी पुष्कळ सांगा, नाहीं म्हणूं नका. आजपासून माझें जीवन मी नामाला वाहून घेणार आहे.”

( १२ ) “ नामांत श्रीमहाराज पूर्णपणें आहेत. तें घेतलें कीं आपण त्यांच्यांत लीन होतों. दुसऱ्या कोणत्याहि साधनानें हें साधत नाहीं. नाम जेवढें जेवढें आपण घ्यावें तेवढी तेवढी गुरुकृपा आपोआप होत असते, व ती आपल्याला न सोडतां गुरुरूप बनवते. नाम घेणाऱ्यांना तें घेत असतां देहामुळें कंटाळा येतो, पण तें अजिबात घेऊं नये असें वाटत नाहीं, हीच नामाची व सद्गुरूंची कृपा. नामच नाम घेतें; आपण गाढ झोंपेतल्याप्रमाणें त्याचे द्रष्टे आहोंत. आमच्या कर्तृत्वानें आमच्या मुखांत नाम येत नाहीं तर नामाच्या कर्तृत्वामुळें, श्रीमहाराजांच्या कृपेनें, तें आपल्या मुखांत येतें या भावनेनें नाम घ्यावें. तें घेत असतां त्याला मनानें नमन करीत असावें व स्वतःला विसरत जावें. नाम घेण्याची एखाद्यानें नुसती इच्छा जरी केली तरी तें त्याला सोडीत नाहीं, स्वतःला घ्यावयास लावतें व यथावकाश स्वतःमध्यें लीन करतें, हा अनुभव आहे. नामाखेरीज दुसरी इच्छा न होणें हीच महाराजांची कृपा.”

( १३ ) “ आपल्या जीवनामधील प्रत्येक क्रिया ही रामाच्याकरितां व्हावी, आपलें जगणें देखील त्याच्या सेवेसाठीं असावें, असा श्रीमहाराजांचा फार आग्रह असे. मंदिरामध्यें उभा असणारा ‘ श्रीराम ’ केवळ मूर्ति नसून तो प्रत्यक्ष परमात्मा आहे. अशा भावनेनें श्रीमहाराज स्वतः वागत, आणि त्यांच्याकडे येणाऱ्या प्रत्येक स्त्री–पुरुषाला तशा भावनेनें वागण्याचा मनापासून उपदेश करीत. आपल्याला सांभाळणाऱ्या व आपल्यावर अत्यंत प्रेम करणाऱ्या वडील माणसास आपल्या जीवनांत जितकें खरें प्रत्यक्ष स्थान असतें, तितकें स्थान श्रीरामरायाला कसें द्यावें हें श्रीमहाराजांनीं शिकवलें. जो जो मनुष्य त्यांच्याकडे येई त्याला मोठ्या प्रेमानें ते सांगत कीं, ‘ अरे ! माझ्या रामाला एकदां डोळे भरून पाहा व नंतर जा. ’ जगांत घडून येणाऱ्या प्रत्येक गोष्टीमध्यें श्रीरामरायाची इच्छा काम करीत असल्याचें त्यांना दिसे. व्यवहारदृष्ट्या आपण योग्य प्रयत्न केल्यानंतर जें चांगलें–वाईट फळ मिळेल तें रामाच्या इच्छेनेंच मिळत असतें, अशी श्रद्धा ठेवण्यास ते सर्वांना सांगत. सर्व कांहीं राम करतो, खरें कर्तेपण रामाचें, हा श्रीमहाराजांच्या उपदेशाचा गाभा असल्यामुळें त्यांच्या प्रत्येक हालचालीमध्यें ते रामाला पुढें करून आपण नाहींसे होत. भगवंताकडे कर्तृत्व देऊन मी-पणानें आपण नाहींसे होणें ही युक्ति सर्वांनीं शिकावी म्हणून त्यांनीं जन्मभर श्रीरामरायाला लोकांच्या समोर ठेवलें.”

( १४ ) " खरोखर श्रीमहाराजांचा सहवास कोणत्याहि स्वरूपांत ज्यांना लाभला ते धन्य होत. नामरूपी रज्जूनें हा सहवास अखंड टिकूं शकतो, हा अनुभव आहे. ".

अक्षरशः लाखो लोकांनीं श्रीमहाराजांवर प्रेम केलें. त्या प्रत्येकाला श्रीमहाराजांनीं ' रामनामाचा ' सोपा मंत्र सांगितला. ज्या ज्या भावनेनें, श्रद्धेनें उत्कटतेनें हा मंत्र ज्यांनीं आत्मसात् केला त्या त्या परीनें त्यांचें अत्यंत कल्याण झालें, असें प्रत्यक्ष अनुभवून सांगणारे आज अनेक आढळतील. दहाबारा वर्षांपूर्वी वयाच्या ८० व्या वर्षी दिवंगत झालेले, व श्रीमहाराज देहांत असतांना त्यांचा अनुग्रह लाभलेले माझे परमपूज्य वडील ती. पंडितराव गोखले यांच्या श्रीमहाराजांवरील उत्कट प्रेमाचें सार येथें उद्धृत करण्याचा मोह मला आवरत नाहीं. " श्रीमहाराजांची गांठ पडली हें माझें परमभाग्य. घराण्यांतील सर्वांना श्रीमहाराजांचें प्रेम आहे ही त्यांची कृपाच होय. अगदीं कडेपर्यंत श्रीमहाराजांना कधीं सोडूं नका हेंच माझें सर्वांना सांगणें. "

श्रीमहाराजांचीं ही प्रवचनें वाचणाऱ्या अनेक वाचकांनीं श्रीमहाराजांचें छोटेसें चरित्र या पुस्तका-मध्ये अंतर्भूत करावें अशी इच्छा प्रदर्शित केली. श्रीमहाराजांचें जीवनसर्वस्व खरें म्हणजे त्यांच्या प्रवचनांतून पूर्णपणें व्यक्त झालेलें आहेच; शिवाय त्यांचें व्यावहारिक व अध्यात्मिक दृष्टीनें विस्तृत असणारें चरित्र थोडक्यांत बसविणें फारच अवघड. तेव्हां मधला मार्ग म्हणजे श्रीमहाराजांचें व्यक्तिदर्शन तरी थोडक्यांत द्यावें म्हणून तें चौथ्या आवृत्तीपासून समाविष्ट केलेलें आहे. श्रीमहाराजांचें संपूर्ण चरित्र व व्यक्तिमत्त्व ज्यांना जाणण्याची इच्छा आहे, त्यांनी " श्रीगोंदवलेकर महाराज—चरित्र आणि वाङ्मय " हा प्रा. के. वि. बेलसरे यांनीं लिहिलेला ग्रंथ जरूर वाचून पाहावा.

परमेश्वराच्या नामस्मरणाकडे प्रवृत्ति होणें हेंच श्रीमहाराजांचें जीवनचरित्र जाणण्याचें लक्षण आहे. श्रीमहाराजांनीं आपला देह ठेवण्यापूर्वी हेंच स्पष्टपणें व अत्यंत कळकळीनें पुढील शब्दांत व्यक्त केलें आहे—

आजवरी तुम्हां सांगितली मात । नामाविण हित समजूं नका ।।
मानूं नका नाम साधन हें लहान । तुम्हां माझी आण जीवेंभावें ।।
मानूं नका सार संसार असार । दृश्य जोजार मानूं नका ।।
सोडूं नका नाम, धरूं नका काम । नाहीं नाहीं नेम आयुष्याचा ।।
दीनदास म्हणे सांगतों तें ऐका । अभ्यास वैखरी सोडूं नका ।।

प्रवचनाच्या स्वरूपांत ग्रथित झालेलें श्रीमहाराजांचे हें बहुमोल वाङ्मय जास्तीत जास्त लोकांच्या हातांत जावें म्हणून सोळा हजार प्रतींची ही पांचवी आवृत्ति प्रकाशित करण्याचा घाट प्रकाशक श्री. अनंतराव वैद्य यांनीं मोठ्या धडाडीनें घातला आहे. आधींच्या चार आवृत्त्या मिळून सुमारें ३० हजार प्रतींचें वाचकांनीं मोठ्या प्रेमानें व उत्साहानें स्वागत केलें. भारतांतच नव्हे तर भारताबाहेरील अनेक देशांतील भाविक महाराष्ट्रीय मंडळी या प्रवचनांचें रोज नियमितपणें वाचन करतात, असें परदेशी वास्तव्य करणाऱ्या अनेक मंडळींकडून प्रत्यक्ष समजल्यावरून हा उल्लेख करावासा वाटला. असंख्य वाचकांनीं, साधकांनीं व भक्तांनीं आपली अंतःकरणें उघडीं करून जो आपुलकीचा भाव दाखविला त्याचें शब्दांत वर्णन करून सांगणें अशक्य आहे. नामस्मरणाबद्दल वाटणारी उत्कट भावना व प्रेमच त्यांनीं व्यक्त केलें असें म्हणावयास हरकत नाहीं.

प्रत्येक आवृत्तीच्या वेळेस अनवधानाने राहिलेल्या चुका व मुद्रणदोष सुधारून व प्रवचनें काटेकोरपणें तपासून आवृत्ति जास्तीत जास्त निर्दोष ठेवण्याच्या कामीं श्री. श्रीकृष्ण चिंतामण तथा आप्पासाहेब मराठे यांची बहुमोल मदत झाली. श्रीमहाराजांच्या प्रेरणेनेंच त्यांनीं हें मेहनतीचें काम आपण होऊन मोठ्या आपुल-कीनें स्वीकारलें व पार पाडलें याबद्दल त्यांचे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत. तसेंच श्रीमहाराजांचे एक

निष्ठावान् भक्त श्री. प्र. वि. पाटणकर यांनीं केलेल्या बहुमोल सूचनांचा व वेळोवेळीं केलेल्या साहाय्याचा उल्लेख करणें अत्यंत जरूर आहे. याशिवाय श्री. चिंतोपंत जोशी ( इंजिनियर ), श्री. बापूसाहेब मराठे, यांच्यासारख्या अनेक मान्यवर भक्तांचें प्रकाशनाच्या कामीं विविध प्रकारें मार्गदर्शन झालें.

श्रीमहाराजांचीं हीं प्रवचनें कानडींत व हिंदींत भाषांतरींत होऊन प्रकाशितहि झालेलीं आहेत. तसेंच गुजराथी व इंग्रजी भाषेंतहि प्रवचनांचें भाषांतर झालेलें असून प्रकाशनाचा योग लवकरच जुळून येईल अशी आशा वाटते. नामरसानें ओथंबलेले श्रीमहाराजांचे हे शब्द जास्तीत जास्त वाचकांच्या अंतःकरणांत शिरून त्यांना नामस्मरणाकडे प्रवृत्त करतील यांत शंकाच नाहीं. नाम घेण्याची वाढती इच्छा होणें हें नामाचें प्रेम लागण्याची खूणच आहे.

या पांचव्या आवृत्तीच्या निमित्तानें दुसऱ्या, तिसऱ्या व चौथ्या आवृत्तींमधील ' दोन शब्द ' एकत्रित करून संकलित स्वरूपांत वाचकांच्या पुढे मांडले आहेत.

या आवृत्तींत अनवधानानें कांहीं दोष राहून गेल्यास वाचकांनीं ते निःसंकोचपणे निदर्शनास आणावेत अशी त्यांना प्रेमळ विनंति करतों व शेवटीं पुन्हा एकदां श्रीमहाराजांचें अमृतमय निरूपणाचें सार उद्धृत करतों. " वाटेल तें झालें तरी भगवंताचें नाम सोडूं नका— नाम घेणाऱ्याचें राम कल्याण करतो हें माझें सांगणें शेवटपर्यंत विसरूं नका. "

|| श्रीराम जयराम जयजय राम ||

१, धरती सोसायटी
प्रभात पथ, गल्ली नं. १०
पुणे ४११००४

गोविंद सीताराम गोखले.
१७ जुलै १९८१
( श्रीगुरुपौर्णिमा )

# श्रीमहाराजांचें व्यक्तिदर्शन

**सगुण स्वरूप :** शके १७६६ (इ. स. १८४५) माघ शुद्ध द्वादशीला बुधवारी, पहाटें सूर्योदयाच्या सुमारास गोंदवल्याला श्रीमहाराजांचा जन्म झाला आणि शके १८४४ (२२ डिसेंबर १९१३) मार्गशीर्ष वद्य दशमीला सोमवारीं पहाटें सूर्योदयाच्या सुमारास गोंदवल्यासच वयाच्या एकूणसत्तराव्या वर्षी त्यांनी देह ठेवला. श्रीमहाराजांची उंची सुमारे साडेपांच फूट असून वजन जवळजवळ दिडशे पौंड होतें. मध्यम बांधा, पिवळसर झाक असलेला गोरा रंग, रुंद चेहरेपट्टी, भव्य कपाळ, सरळ नाक, पांढरे शुभ्र दांत व चमकदार डोळे अशी एकंदर त्यांची ठेवण होती. त्यांच्या तोंडावर एकप्रकारचें तेज तरळत असल्याने त्यांच्या साध्या मंद स्मितानें प्रत्येक माणसावर त्यांची सहज छाप पडे. श्रीमहाराज चोवीस तास लंगोटी घालीत. पण पुष्कळ वेळां कफनी, टोपी किंवा फरगूल घालीत. कमरेला कधीं छाटी, धोतर, पीतांबर किंवा उपरणें गुंडाळीत आणि कधीं डोक्याला रुमाल बांधीत. कपाळाला केशरी गंध लावून मध्यें काळी रेघ काढीत व मुद्रा लावीत. पायांत नेहमी खडावा असत आणि हातांत बहुतेक रुमाल असे. श्रीराममंदिरात रामासमोर एक कोच ठेवलेला असे (अजूनही तो तसाच ठेवलेला आहे.) त्यावर ठेवलेल्या तक्क्याला ते टेकून बसत. आजोबा-आजी त्यांना "गणपती" म्हणून हांक मारीत, तर आई-वडील त्यांना "गणू" म्हणून संबोधित. गांवचे लोक त्यांना "गणुबुवा" म्हणत. उत्तर भारतांत लोक त्यांना "दख्खनके महाराज" असे म्हणत. श्रीतुकामाई (श्रीमहाराजांचे गुरु) त्यांना "माझा बाळ" म्हणून हांक मारीत. सर्व शिष्यमंडळी त्यांना "महाराज" म्हणत तर ते स्वत: "ब्रह्मचैतन्यबुवा रामदासी" अशी आपली सही करीत.

**संवयी व आवडीनिवडी :** श्रीमहाराजांना प्रवासाची विलक्षण आवड होती. त्यांनी वयाच्या बाराव्या वर्षापासून ते वयाच्या पंचेचाळिसाव्या वर्षापर्यंत कल्पनातींत प्रवास केला. या प्रवासामध्यें त्यांना तत्कालीन समाजजीवन उत्तमरीतीनें पाहाण्यास मिळालें. श्रीमहाराज पोहण्यांत फार पटाईत होते. ज्यांना मुळीच पोहतां येत नाहीं अशा माणसाला बरोबर घेऊन ते गंगेमधून या तीरापासून पलीकडल्या तीरावर सहज जात. उताणें पडून पाण्यावर तरंगण्याची त्यांना फार हौस. घोड्यावर बसण्याची कला त्यांना अवगत होती. कसल्याही वात्रट व मुरदाड घोड्याला ते नरम आणीत. जनावराला एकदा त्यांचा स्पर्श झाला कीं ते त्यांना वश होऊन त्यांच्यवर प्रेम करूं लागे.

श्रीमहाराज पळण्यांत व झाडावर चढण्यांत फार पटाईत होते. सूर्यनमस्कार व दंड ते चांगले काढीत. खोखो-आट्यापाट्या वगैरे खेळ ते हौसेने खेळत. वय होऊन पोट सुटले तरी त्यांचा चटपटीतपणा व चपळपणा कायम होता. वयाच्या ६२ व्या वर्षी काशीमध्यें पायांत खडावा घालून शंभर-सव्वाशे दगडी पायऱ्यांचा घाट ते चटचट उतरून किंवा चढून जात. स्वच्छ व वळणदार अक्षरांची त्यांना फार आवड. त्यांचे स्वतःचे अक्षर फार सुबक व वळणदार होते. मोठ्यानें स्पष्ट व अर्थ समजून वाचण्याची त्यांना हौस. लहान मुलांचे त्यांना फार प्रेम. ते त्यांच्यात खेळत व त्यांच्या मनाप्रमाणें वागत. विद्यार्थ्यांनें आपल्या अभ्यासांत मागे पडतां कामा नये, असें तें वारंवार सांगत. श्रीमहाराज आपल्या घरी यावेत असें ज्याला वाटे त्यानें आपल्या लहान मुलाला अगर मुलीला त्यांना घेऊन येण्यास पाठवावें आणि श्रीमहाराजांनी आढेवेढे न घेतां जावें हें गोंदवल्यास नेहमीं पाहावयास सांपडे.

कवितेची व गोड गळ्याच्या गायनाची त्यांना फार आवड. ते स्वत:त कविता रचीत आणि लोकांनी केलेल्या कवितांचा मोठ्या रसिकतेनें परामर्ष घेत. तसेंच ते बसल्या बसल्या मारुतिरायाचे सुंदर चित्र काढीत.

त्यांना स्वाभाविक आवड भजनाची, देवाच्या गोष्टींची, नामस्मरणाची व एकांताची होती. त्यांना विद्वान् माणसापेक्षा अडाणी मनुष्य आवडे. श्रीमंतापेक्षा गरीब आवडे व शहरांत राहण्यापेक्षा खेडेगावांत राहणें आवडे. नवराबायकोमध्ये, आईबाप व मुलांच्यामध्यें, भाऊबहिणींमध्यें निष्कपट प्रेम असलें तर त्यांना त्याचे विशेष कौतुक वाटायचे. सासू व सून प्रेमाने राहिल्या तर दोघींची ते फार स्तुति करीत. प्रपंचामध्यें निष्कपट प्रेम करायला शिकणें हें भगवंतावर प्रेम करावयास शिकण्याची पहिली पायरी आहे, असें ते नेहमी म्हणत.

**व्यक्तिमत्व :** –श्रीमहाराजांचे सारे व्यक्तिमत्त्व त्यांच्या चमकदार डोळ्यांमध्यें आणि विलक्षण वाणीमध्यें व्यक्त होत असे. त्यांच्या पाहण्यामध्यें आणि बोलण्यामधील विशिष्ट प्रकारच्या मोहिनीमुळें त्यांच्याशी विरोध करणारी माणसे त्यांच्या दृष्टीच्या कक्षेंत आल्यावर आणि त्यांचे भाषण ऐकल्यावर वश होऊन जात. वारकऱ्यांशीं, रामदासीयांशीं, अडाणी शेतकऱ्यांशीं, इंग्रजी शिकलेल्या तरुण-तरुणींशी, कलावंतांशी, शास्त्री-पंडितांशी, सुधारकांशीं, सनातन्यांशी, व्यापाऱ्यांशीं, नोकरीवाल्यांशीं, डॉक्टरांशी, इंजिनीअरशीं श्रीमहाराज त्यांच्या भाषेंत बोलायचे आणि त्या व्यवसायांतील एखादि उपमा घेऊन नामाचे महत्त्व समजून द्यावयाचे. त्यामुळे प्रत्येक मनुष्य त्यांचे म्हणणें समजून प्रसन्न होई. भक्तीचे, भगवंताच्या प्रेमाचे व नामाचें तसेच संतांच्या वागणुकीचे स्पष्टीकरण करतांना त्यांच्या वाणीला स्फुरण चढें आणि त्यावेळी तें उत्तम प्रकारचे दृष्टांत सहज बोलून जात.

मनुष्याला गोंजारून वळवून घेण्याची कला जशी त्यांना अवगत होती, तशीच वाह्यांत माणसाला खडसावून ताळ्यावर आणण्याची कला पण त्यांच्यापाशीं भरपूर होती. त्यांची भाषा घरगुती, सोपी व सहज मधुर असे. त्यांची वाक्ये लहान पण जोरकस असायची आणि त्यात कृत्रिमतेचा लवलेशहि नसल्यानें ती वाक्यें ऐकणाऱ्यांच्या हृदयाला जाऊन भिडत. जीवनाचें अनंत नमुनें त्यांनी बघितले असल्यानें सामान्य मनुष्यांची सुखदुःखे, त्यांच्या खऱ्या वासना व भावना, त्यांच्या अडचणी, त्यांची संपूर्ण कल्पना त्यांना स्पष्टपणें आली होती. त्यामुळें श्रीमहाराज प्रापंचिक लोकांच्या अवस्थेचे वर्णन करूं लागले म्हणजे तें इतके वास्तववादी असें कीं, त्यांची भाषा अंतःकरणाचा ठाव घेई व ऐकणाऱ्याचे त्यांच्यावर प्रेम जडे. त्यांची प्रतिभा अहोरात्र जागृत असायची म्हणुन त्यांची भाषा नेहमीपेक्षा निराळी वाटे. लोकांना भगवंताकडे वळविण्यासाठीं श्रीमहाराजांनी आपल्या वाणीची सर्व शक्ति कामाला लावली.

श्रीमहाराजांच्या वागण्यामध्येंहि विलक्षण खुबी असे. अगदी ब्रह्मनंदापासून ते थेट व्यसनी माणसापर्यंत त्यांची वागणूक समान असे. " माझ्यावर श्रीमहाराजांचे फार प्रेम आहे." असें प्रत्येकाला वाटे. प्रत्येक माणसाचे " अंतर " जाणून तें त्याच्याशीं बोलत, म्हणून प्रत्येक माणसाला खूण पटून फार समाधान मिळत असे. समजूतदार मनुष्य श्रीमहाराजांना विशेष आवडे. एकच मनुष्य पूर्णत्वाला जाण्यापेक्षां पुष्कळ माणसें थोडी पुढें जाणें चांगले असें त्यांचें म्हणणे असे. त्यांनीं कधीहि कोणाचा अव्हेर केला नाही. कसाहि मनुष्य येवो, त्याला सुधारण्याचा मार्ग त्यांच्यापाशीं असे. त्यांच्या वागण्यात, बोलण्यांत फार मर्यादा, आकर्षकता व गोडवा भरलेला असे. मुलांची, विशेषतः बुद्धिमान तरुणांची मनें आकर्षित करून त्यांना आपलेपणाचा लळा लावण्याचें त्यांचे सामर्थ्य फार विलक्षण होतें. स्वतः बहुधा लिहीत नसत. कोणास तरी लिहून घेण्यास सांगत. सांगण्याचा प्रवाह सारखा चाले. लिहिणे संपल्यावर पुन्हां वाचून घेत. त्यांना हिंदी, कानडी, तेलगू, संस्कृत वगैरे भाषा उत्तम समजत.

लहानसहान गोष्टींमध्यें श्रीमहाराज माणसाची परीक्षा करीत आणि तो कोठे आहे, याची प्रचिति त्याला आणून देत. गोंदवल्यास त्यांच्याकडे येणाऱ्या प्रत्येक माणसावर श्रीमहाराज पोटच्या मुलाप्रमाणें प्रेम करीत. प्रापंचिक लोकांशीं रात्रंदिवस व्यवहार करीत असतांना श्रीमहाराज कधीं कोणाचे मिंधें राहिले नाहींत. कधींही कोणापुढें हात पसरला नाहीं. कधीं कोणाकडून वर्गणी गोळा केली नाहीं. त्यांनी आपला चरितार्थ

अगदीं स्वतंत्र ठेवला. पैशाचा मिंधेपणा नसल्यानें श्रीमहाराजांना आपल्या मतांना लोकाग्रहास्तव मुरड घालण्याचा प्रसंग कधीं आला नाहीं. लौकिकाचा, प्रसिद्धीचा, वर्तमानपत्री चर्चेचा, व्यासपीठावरील व्याख्यानांचा त्यांना अगदीं मनापासून कंटाळा असे. त्यांनी फार कटाक्षानें प्रसिद्धी टाळली. पूर्वकाळांत श्रीमहाराज आपलें नांव देखील नीट सांगत नसत. कोणाला सांगत मी जंगम आहे, कोणाला सांगत मी नंगा बैरागी आहे, कोणाला सांगत मी कानफाटा योगी आहे, कोणाला सांगत मी पंढरीचा वारकरी आहे, कोणाला सांगत मी रामदासी आहे. या कारणानें श्रीमहाराज गोंदवल्यास असतात, हे बऱ्याच लोकांना माहीत नसे. श्रीमहाराज म्हणत की " भगवंताच्या नामाला खरें महत्त्व आहे. सांगणारा कोणी कां असेना, खरे कार्य इतके प्रचंड आहे, आपल्या जीवनाचा काल इतका थोडा आहे आणि या जगांत आपण इतके क्षुद्रपदार्थ आहोत कीं आपली प्रसिद्धि होऊं देणें अथवा ती करणें हा मूर्खपणा आहे."

ज्या माणसाला त्यांनी एकदा जवळ केला, त्याचे त्यांनी सर्व कांहीं सोसले, म्हणून त्यांचा मनुष्य त्यांना सहसा सोडून गेला नाही. " मागच्या लोकांनी जें जें चांगले उपयुक्त करून ठेवलें आहे, तें आपण का वाया घालवावें ? चांगलें जुनें कायम ठेवून त्यामध्यें चांगल्या नव्याची भर घालावी " असें त्यांचे नेहमीं सांगणें असें. जीवनाला उंची व व्यापकता आणून प्रत्येकानें शेवटपर्यंत हौसेनें जीवन जगत राहिले पाहिजे व त्यामध्यें भगवंताच्या नामाला शेवटचा श्वास जाईपर्यंत सोडतां कामा नये, असें ते म्हणत. एकंदर स्त्रियांच्या-बद्दल त्यांच्या मनांत फार आदर असून ते स्त्रियांना फार पूज्य मानीत. स्त्रियांनीच आतांपर्यंत धर्म टिकवून ठेवला, स्त्रियांनींच समाजांतील नीतिमत्ता टिकवून धरली, स्त्रियाच कुटुंबासाठीं खऱ्या खस्ता खातात. स्त्रियाच पुरुषापेक्षां जास्त निःस्वार्थी असतात. ज्या घराण्यांतील स्त्रिया सुज्ञ असतात तीं घराणीं चांगलीं चालतात, वगैरे गोष्टी ते नेहमीं सांगत. आई व आईच्या प्रेमाविषयीं बोलणें निघालें तर त्यांचा गळा भरून येई व डोळ्यांना पाणी येई. आई म्हणजे भगवंताच्या प्रेमाची प्रापंचिक मूर्ति होय असें ते म्हणत. स्त्रियांचें अंतःकरण जात्याच शुद्ध व श्रद्धायुक्त असल्यानें भगवंताचा मार्ग त्यांना सोपा आहे असें तें सांगत.

आपल्याकडे येणाऱ्या प्रत्येक मनुष्याला श्रीमहाराज जेवायला घालीत. खरे सांगायचे म्हणजे भग_ वंताचें नाम ते जितक्या मुक्त हस्तानें वाटीत असत तितक्याच मुक्त हस्तानें ते अन्नदान करीत. अन्नानें बुद्धि तयार होते म्हणून प्रेमानें केलेला व प्रेमाने वाढलेला रामाचा प्रसाद ( भाजी, भाकरी, व आमटी ) मंदिरा-मध्यें येणाऱ्या प्रत्येकानें खाल्ला पाहिजे असें त्यांचे म्हणणें असें. मंदिरामध्यें अन्न सर्वांना अगदी एक असें. पंक्तिप्रपंचाची त्यांना फार चीड होती. पुष्कळवेळां मंडळींना जेवायला बसवून श्रीमहाराज आपण स्वतः वाढीत आणि त्यांची जेवणें झाल्यावर मग जेवायला बसत. पंढरपूरला जाणारे पुष्कळ वारकरी व त्यांच्या दिंड्या मंदिरा-मध्यें मुक्काम करीत. श्रीमहाराज त्या सर्वांचा मोठ्या प्रेमानें परामर्ष घेत. पानावर बसल्यापासून जेवणाला सुरुवात करीपर्यंत " जयजय श्रीराम जयजय श्रीराम " असें मोठ्यानें म्हणण्याचा प्रघात श्रीमहाराजांनीं चालू केला. कोणतेहि काम करतांना, स्वयंपाक करतांना, पाणी आणतांना पत्रावळी टोंचतांना धान्य निवडतांना, सारवीत असतांना, झाडून काढतांना, शेतांत खपतांना, विहीर खणतांना सर्व मंडळी भगवंताचें नाम घेऊं लागली. जिकडेतिकडे प्रत्येकजण आपले काम करीत असतांना " जयजय श्रीराम " म्हणत असलेला पाहून गोंदवल्यास रामरायाच्या अयोध्येचें वातावरण उत्पन्न झाले, असें श्रीशांताश्रम स्वामींना वाटले.

**आध्यात्मिक जीवन :** भगवंताच्या अस्तित्वाची खरी जाणीव होऊन त्याच्या अनुसंधानामध्यें जीवनाचा प्रत्येक क्षण कसा घालवावा हें सामान्य स्त्रीपुरुषांस समजणें फार कठीण असल्यामुळे श्रीमहाराजांनी रामरायाला गोंदवल्यास आणून उभा केला. नुसता उभा केला असे नव्हे तर स्वतः त्याच्यावर इतकें प्रेम

करून दाखविलें कीं ते नैमिषारण्यात जाण्यास निघाले त्यावेळीं रामाच्या डोळ्यांत खरोखर अश्रू उभे राहिले. जो जो मनुष्य त्यांच्याकडे येई त्याला मोठ्या प्रेमानें तें सांगत, " अरे ! माझ्या रामाला एकदां डोळे भरून पाहा व नंतर घरीं जा. " मंदिरात असलेला " श्रीराम " केवळ मूर्ति नसून प्रत्यक्ष परमात्माच आहे अशा भावनेनें श्रीमहाराज स्वतः वागत आणि त्यांच्याकडे येणाऱ्या प्रत्येक स्त्रीपुरुषास तशा भावनेनें वागण्याचा मनापासून उपदेश करीत. जगांत घडून येणाऱ्या प्रत्येक गोष्टीमध्यें श्रीरामरायाचीच इच्छा काम करीत असल्याचे त्यांना दिसे, व व्यवहारदृष्ट्या योग्य प्रयत्न केल्यावर जें चांगलें वाईट फळ मिळेल ते रामाच्या इच्छेनेंच मिळत असते. अशी श्रद्धा ठेवण्यास सर्वांना सांगत. अशी श्रद्धा ज्याच्यापाशीं असते त्याला सुखदुःखाची बाधा होत नाहीं, हें श्रीमहाराजांनी दाखवून दिलें. सर्व कांहीं राम करतो, खरे कर्तेपण रामाचे, हा श्रीमहाराजांच्या उपदेशाचा गाभा असल्यामुळे त्यांच्या प्रत्येक हालचालींत ते रामाला पुढें करून आपण नाहीसें होत. भगवंताकडे कर्तृत्व देऊन आपण मीपणानें नाहीसें होणें ही भक्ती सर्वांनीं शिकावी म्हणून, त्यांनी जन्मभर श्रीरामाला लोकांच्या समोर ठेवलें. नवीन मनुष्य आला की श्रीमहाराज त्याला सांगत " प्रथम रामाला नमस्कार करून यावे, नंतर इतरांना नमस्कार करावा. " आपल्या जीवनांतील प्रत्येक क्रिया ही रामाच्याकरीतां व्हावी, आपलें जगणें देखील त्याच्या सेवेसाठी असावें असा त्याचा फार आग्रह असे.

प्रत्येक माणसांत भगवंताकडे जाण्यास उपयोगी पडणारा गुण असतोच असतो. त्या गुणाचा उपयोग व विकास करून भगवंताकडे कसें जावें, हें प्रत्येकाला शिकविण्याचें काम तें करीत असत. तत्त्व कितीही उच्च असले तरी त्याचा खरा व पूर्ण अर्थ तत्त्वाच्या आचरणामध्यें समजतो, अशी त्यांची ठाम भूमिका असल्यानें वेदान्ताचीं प्रमेयें किंवा भगवंताची निष्ठा रोजच्या प्रापंचिक जीवनांत उतरली पाहिजे, यावर त्यांचा फार कटाक्ष होता. परमार्थ हा प्रपंचात मिसळला पाहिजे असें तें नेहमीं सांगत ज्या प्रपंचात राम नाहीं त्या प्रपंचांत आराम होणार नाही असें वरचेवर अनेक प्रकारानें ते पटवून देत. आपल्या संगतीला येणाऱ्या प्रत्येक माणसाला भगवंताच्या निष्ठेचें म्हणजे नामाचें महत्त्व कळलें पाहिजे, हा त्यांचा अट्टाहास होता म्हणून जन्मभर परमार्थाचें अखंड चिंतन त्यांनी केलें व लोकांकडून करवून घेण्याचा प्रयत्न केला. खऱ्या परमार्थाबद्दल लोकांमध्यें नाना तऱ्हेच्या गैरसमजुती, नानाप्रकारचें प्रमाद, विपरीत आचार दृढमूल झालेले असतात, ते सर्व दूर करण्याचा प्रचंड खटाटोप त्यांनी जन्मभर केला आणि हें करतांना समाजांतील अनेक व्यक्तींकडून अनेक प्रकारचा त्रास त्यांना सोसावा लागला. आपल्याकडे येणाऱ्या कोणत्याहि माणसाचा अव्हेर करायचा नाहीं, हें श्रीमहाराजांच्या जीवनाचें प्रधान तत्त्व होतें. निंदक जरी त्यांच्याकडे आला तरी ते त्याच्याशी फार प्रेमानें वागत, तीच रीत व्यसनी माणसाशी वागतांना ते पाळीत. याचा परिणाम असा होई की, तो मनुष्य आपोआप त्यांना वश होऊन जाई आणि एकदां तो वश झाला कीं, त्याला भगवंताच्या मार्गावर नेऊन सोडण्याची त्यांची करामत पाहावयास मिळे.

" नुसता प्रपंच चांगला करणें हें कांहीं मनुष्य जन्माचें ध्येय नाही, जनावरें देखील आपापला प्रपंच करतात. मनुष्यानें भगवंताची उपासना करून त्याची प्राप्ती करून घेतली पाहिजे तरच प्रपंचातील कष्टांचें सार्थक होतें. सध्यांच्या परिस्थितींत उपासना करण्यास नामासारखा सोपा उपाय नाहीं. म्हणून प्रत्येकानें नामाचीच कांस धरावी. हेंच त्यांच्या आध्यात्मिक जीवनाचें सूत्र होतें. हें तत्त्व स्वतः पूर्णतः आचरणांत आणून मगच त्यांनी लोकांना सांगितलें.

इ. स. १९१३ साली गोंदवल्यास झालेला रामनवमीचा उत्सव म्हणजे श्रीमहाराजांच्या आयुष्यांतील शेवटचा मोठा उत्सव होय. अहोरात्र नऊ दिवस अखंड नामस्मरण चालू होतें. शिवाय रोज

कीर्तन, पुराण, प्रवचन, अध्यात्मसंवाद इत्यादि गोष्टी सुरू होत्याच. जवळजवळ पांच हजारांवर माणसें गोंदवल्यास जमली होती नमस्कार करायला येणाऱ्या प्रत्येक माणसाच्या पाठीवरून हात फिरवून श्रीमहाराज त्याला सांगत, " बाळ, भगवंतानें ज्या परिस्थितींत प्रपंचामध्यें आपल्याला ठेवलें आहे, तिच्यामध्यें समाधान मानावें, पण त्याच्या नामाला कधीं विसरूं नये. जो नाम घेईल त्याच्यामागें राम उभा आहे, नाम घेणाऱ्याचें राम कल्याण करतो एवढें माझे सांगणे शेवटपर्यंत विसरू नका."

भगवंताच्या नामाची थोरवी गातां गातां त्यांच्या आयुष्याचा प्रत्येक क्षण गेला. नामाचें महत्त्व सांगण्यासाठीं ते जन्माला आले. जन्मभर नामाचें त्यांनी गायन केलें आणि आपल्या आयुष्याचें शेवटचे क्षणहि नामाचें महत्त्व सांगण्यात त्यांनी घालविले. श्रीमहाराजांनी जन्मभर डोळ्यांनी नाम पाहिलें, कानांनी नाम ऐकले, वाणीनें नाम घेतलें, मनानें नाम कल्पिलें, बुद्धीने नाम चिंतिले, काया-वाचा-मनानें जगांत एका नामाशिवाय त्यांनी दुसरें कांही सत्य मानलेंच नाही, हें त्यांचे चरित्र.

जयाचा जनीं जन्म नामार्थ झाला
जयानें सदा वास नामांत केला ।
जयाच्या मुखीं सर्वदा नामकीर्ति
नमस्कार त्या ब्रम्हचैतन्यमूर्ती ॥

( श्रीगोंदवलेकर महाराज — चरित्र आणि वाङमय— लेखक प्रा. के. वि. बेलसरे, या ग्रंथाच्या आधारें ).



॥ श्रीराम समर्थ ॥

# श्रीक्षेत्र गोंदवलें

गोंदवलें बुद्रुक अथवा " थोरलें गोंदवलें " हें गांव सातारा–पंढरपूर या राज-मार्गावर सातारा शहरापासून सुमारें ६५ किलोमीटर ( ४० मैल ) अंतरावर आहे. येथून पुढें म्हसवड सुमारें २४ कि. मी. व पंढरपूर सुमारें ८० कि. मी. राहातें. गोंदवल्यास जाण्यासाठीं मुंबई, पुणें, सातारा, कऱ्हाड, विटें, सांगली, फलटण, पंढरपूर, सोलापूर, अक्कलकोट इत्यादी अनेक ठिकाणाहून महाराष्ट्र स्टेट ट्रान्स्पोर्टच्या थेट बस सेवा उपलब्ध असून त्यांत आणखी भरही पडत आहे. दहिवडीस बदली करून जाण्यासारख्या तर आणखीही गाड्या आहेत आगगाडीनें जाणें असल्यास पुणें–मिरज मार्गावरील सातारा अगर कोरेगांव स्टेशनवर उतरावें; तेथील बस स्टँड स्टेशनपासून अनुक्रमें ६ कि. मी. व २ कि. मी. अंतरावर आहेत, त्यासाठीं रिक्शा वा टांगा करून जावें लागतें.

श्रीमहाराजांचें समाधिमंदिर गोंदवलें येथील बस स्टँडपासून सुमारें २०० मीटर अंतरावर आहे. तेथें उतरण्याची व प्रसादाची सोय असते. समाधि तळघरांत असून त्याच्यावर श्रीगोपाळकृष्णाची मूर्ति आहे. त्याच आवारांत " श्रीआईसाहेबांचें मंदिर " आहे. समाधीची पहाटे कांकड आरती व त्रिकाल पूजा, दुपारीं नित्याचें पोथीवाचन व रात्रीं पंचपदी भजन असा रोजचा कार्यक्रम असतो. प्रतिवर्षी मार्गशीर्ष वद्य प्रतिपदे-पासून दशमीपर्यंत पुण्यतिथीचा उत्सव असतो. दशमीस पहांटे ५–५० वाजतां निर्याणकाल साजरा होतो. गांवांत बसस्टँडपासून जवळच श्रीमहाराजांची राहण्याची वास्तु व श्रीराममंदिर ( थोरले ), श्रीराममंदिर (धाकटे) व बारा ज्योतिर्लिंग, श्रीदत्तमंदिर व श्रीशनिमंदिर हीं त्यांनीं स्थापन केलेलीं मंदिरें आहेत. त्या सर्वांची मालकी व व्यवस्था श्रीमहाराजांच्या इच्छापत्रानुसार पंचमंडळींकडे असते. श्रीमहाराजांचे आजोबांना दृष्टांत होऊन मिळालेल्या श्रीविठ्ठलरखुमाईच्या मूर्ति थोरले श्रीराममंदिराचे आवारांत आहेत.

प्रतिवर्षी पुढील उत्सव साजरे होतात :–

श्रीरामजन्म ( चैत्र शुद्ध ९ )
श्रीगुरुपौर्णिमा ( आषाढ शुद्ध १५ )
श्रीकृष्णजन्म ( श्रावण वद्य ८ )
पुण्यतिथि ( मार्गशीर्ष वद्य १ ते वद्य १० )
श्रीरामदासनवमी ( माघ वद्य ९ )

अधिक माहितीसाठीं समक्ष वा पत्रद्वारें पंचमंडळींकडे चौकशी करावी. पत्ता—

श्रीसमर्थ सद्गुरु संस्थान, मुक्काम पोस्ट गोंदवलें बुद्रुक, ४१५ ५१८, तालुका माण, जिल्हा सातारा.

॥ श्रीराम प्रसन्न ॥

卐 श्रीसद्गुरु श्रीब्रह्मचैतन्य महाराज गोंदवलेकर 卐

## ॥ नमस्कार त्रयोदशी ॥

महारुद्र जे मारुती रामदास । कलीमाजिं ते जाहले रामदास ॥
जनां उद्धराया पुन्हां प्राप्त होती । नमस्कार त्या ब्रह्मचैतन्यमूर्ति ॥ १ ॥
महाराष्ट्रिं या माणगंगातिरातें । असे पुण्य गोंदावलें क्षेत्र तेथें ॥
यजुर्वेदि विप्रगृहीं जन्म घेती । नमस्कार त्या ब्रह्मचैतन्यमूर्ति ॥ २ ॥
न लिंपे कदा बालक्रीडा उपाधी । विवेकें सदा ज्ञान वैराग्य साधी ॥
जया सद्गुरुभेटिची होय स्फूर्ति । नमस्कार त्या ब्रह्मचैतन्यमूर्ति ॥ ३ ॥
समर्थानुयायी तुकाराम सिद्ध । जया पूर्ण वैराग्य अध्यात्मबोध ॥
तया प्रार्थुनी राममंत्रासि घेती । नमस्कार त्या ब्रह्मचैतन्यमूर्ति ॥ ४ ॥
तपें तोषला सद्गुरु ज्ञानियांचा । वदे वाढवीं पंथ या राघवाचा ॥
कलीमाजिं मंदावली धर्मभक्ति । नमस्कार त्या ब्रह्मचैतन्यमूर्ति ॥ ५ ॥
विदेहापरी चालवोनी प्रपंचा । मुमुक्षूजनांलागिं अध्यात्मचर्चा ॥
करोनी बहू लोक जे मेळवीती । नमस्कार त्या ब्रह्मचैतन्यमूर्ति ॥ ६ ॥
जशी माउली ग्रास देते मुलाला । तसें बोधुनी ज्ञान पाजी जनांला ॥
धरेसारिखी ज्या वसे नित्य शांति । नमस्कार त्या ब्रह्मचैतन्यमूर्ति ॥ ७ ॥
किती प्रार्थिती कामना पूर्ण व्हाया । किती भाविती देहव्याधी हराया ॥
कृपादृष्टिनें त्यांसि आनंद देती । नमस्कार त्या ब्रह्मचैतन्यमूर्ति ॥ ८ ॥
जयें गोधना संकटीं रक्षियेलें । किती जीव अन्नोदकें तृप्त केले ॥
बहू मंदिरें स्थापिलीं धन्य कीर्ति । नमस्कार त्या ब्रह्मचैतन्यमूर्ति ॥ ९ ॥
बहू अज्ञ जीवांप्रती उद्धरीलें । तसें नास्तिकां सत्पथा लावियेलें ॥
समस्तां मुखें नाम हें बोलवीती । नमस्कार त्या ब्रह्मचैतन्यमूर्ति ॥ १० ॥
तनू जीर्ण झाली बहू कार्य केलें । रघुनायकें शीघ्र पाचारियेलें ॥
तदा रामरूपी समाधिस्थ होती । नमस्कार त्या ब्रह्मचैतन्यमूर्ति ॥ ११ ॥
समाधी पहातां समाधान होतें । तनू कष्टवी त्यासि आनंद देते ॥
मनीं भावितां कामना पूर्ण होती । नमस्कार त्या ब्रह्मचैतन्यमूर्ति ॥ १२ ॥
मुखें बोलवी सद्गुरु बुद्धिदाता । अहंभार हा वागवी कोण माथां ॥
जडो भावना रामदासीं सदा ती । नमस्कार त्या ब्रह्मचैतन्यमूर्ति ॥ १३ ॥

॥ श्रीराम जयराम जय जय राम ॥

[ कै. गोपाळ विष्णु फडके विरचित श्रीसद्गुरुलीलामृत या ओवीबद्ध ग्रंथातून ]

# आमची कांहीं उत्कृष्ट धार्मिक प्रकाशनें

- ★ श्री गोंदवलेकर महाराज यांची प्रवचनें
- ★ श्री गोंदवलेकर महाराज यांच्या हृद्य आठवणी
- ★ प्रवचन पारिजात (श्री गोंदवलेकर महाराज प्रवचनांचा हिंदी अनुवाद)
- ★ श्रीयोगवासिष्ठ ( भाग १ ते ३ )
  ( संपूर्ण मराठी भाषांतर )
- ★ सार्थ श्रीअध्यात्म रामायण
- ★ सार्थ श्रीविवेक सिंधु
- ★ सार्थ श्रीअमृतानुभव
- ★ वेदान्त विचार
- ★ अज्ञाताचा शोध व बोध
- ★ वैतरणेच्या पैलतीरी
- ★ अमृत तुषार
- ★ सुबोध श्रीदत्तमाहात्म्य
- ★ योगविद्या
- ★ शांताचिया घरा
- ★ श्रीहरिविजय ( पोथी ग्रंथ )
- ★ श्रीभक्तविजय ( पोथी ग्रंथ )
- ★ श्री काशीखंड ( पोथीग्रंथ )
- ★ श्री वेदेश्वरी ( पोथी ग्रंथ )
- ★ श्री सिद्धान्तबोध ( पोथी ग्रंथ )
- ★ जैमिनी अश्वमेध ( पोथी ग्रंथ )
- ★ सार्थ श्रीचांगदेव पासष्टी
- ★ सार्थ श्रीनारद भक्तिसूत्रे
- ★ मनोबोध प्रकाश
  ( सार्थ श्रीमनाचे श्लोक )
- ★ साधा विषय मोठा आशय
- ★ ज्ञानसागरांतील शिंपले ( भाग १ ते ५ )
- ★ श्रीभावार्थ रामायण

॥ श्रीराम ॥

# — प्रवचनांची क्रमवार सूची —

## जानेवारी : नाम

## फेब्रुवारी : नाम



## मार्च : प्रपंच

## एप्रिल : संत सत्पुरुष

## मे : साधन

## जून : परमार्थ

## जुलै : सद्‌गुरु

## ऑगस्ट : आनंद, समाधान

## सप्टेंबर : अखंड नामस्मरण

## ऑक्टोबर : भगवंत

## नोव्हेंबर : भगवंत

## डिसेंबर : नाम

□ □ □



श्रीक्षेत्र गोंदवले येथील श्रीराम मंदिरातील प्रसन्न मूर्ती

श्रीगोंदवलेकर महाराज यांचे सद्‌गुरु



श्रीतुकाराम महाराज (श्रीतुकामाई), येहळेगांव (जि. नांदेड)

☆ श्रीगोंदवलेकर महाराज यांची विविध छायाचित्रे ☆





श्रीगोंदवलेकर महाराज यांच्या द्वितीय सहधर्मचारिणी
( आईसाहेब )

श्रीमहाराजांचे हस्ताक्षर





श्रीमहाराजांच्या सच्छिष्य परंपरेतील



श्रीब्रम्हानंदमहाराज, बेलधडी



सन १८८५) कै. रामचंद्र चिंतामण ऊर्फ तात्यासाहेब केतकर (सन १९६७

★ श्रीरामजयरामजयजयराम ॥ ॐ श्रीरामजयरामजयजयराम ★

卐

## ॥ श्रीराम जयराम जयजय राम ॥

जयाचा जनीं जन्म नामार्थ झाला
जयानें सदा वास नामांत केला. ।
जयाच्या मुखीं सर्वदा नामकीर्ति
नमस्कार त्या ब्रह्मचैतन्यमूर्ति ॥

卐

★ श्रीरामजयरामजयजयराम ॥ श्रीरामजयरामजयजयराम ॥ ★

# नाम हें परमात्मस्वरूपच आहे

**१ जानेवारी**

**नाम म्हणजे** भगवंताचें नांव. देवाच्या कोणत्याहि नांवांत फरक नाहीं. नाम हा जीव आणि शिव यांच्यामधला दुवा आहे. **नाम हें साध्य आहे आणि साधनहि आहे.** नाम सगुण आहे, आणि निर्गुणहि आहे. नामाचा आरंभ सगुणांत आहे तर शेवट निर्गुणांत आहे. आरंभ सगुणांत आहे असें म्हणण्याचें कारण हें कीं, भगवंत मुळांत जो निराकार, निर्गुण आहे, तो जेव्हा सगुणांत आला तेव्हांच त्याला नाम-रूप लागलें; आणि सगुणरूप नाहींसें झालें तरी नाम शिल्लकच राहिलें, म्हणून तें निर्गुणहि आहे. तेव्हां सगुण किंवा निर्गुण भक्तीला नामाचा आधार आहे. नाम हा सत्संगाचा पाया आहे आणि कळसहि आहे. नाम म्हणजे आपली वृत्ति आणि भगवंत यांना जोडणारी सांखळीच आहे. लग्न झाल्यावर स्त्री जशी नवऱ्याशीं एकरूप होऊन जाते, त्याप्रमाणें वृत्तीचें नामाशीं लग्न होऊन ती नामरूप बनली पाहिजे. अन्नाला स्वतःची चव असतें; त्याच्यामध्यें आपण आपली गोडी आणि आवड घालून नंतर तें खातो. पण नामाला स्वतःची अशी चव नाहीं. त्याच्यामध्यें आपणच आपली गोडी घालून तें घेतलें पाहिजे. आपण जितकी जास्त गोडी त्यामध्यें घालूं तितकें तें अधिक गोड वाटेल. पंढरपूरला जायला पुष्कळ रस्ते आहेत; परंतु सर्वांना शेवटीं "बारींतून" जाऊन देवदर्शन घ्यावें लागतें. त्याप्रमाणें, इतर साधनें जरी केलीं तरी नामसाधन केल्यावरच आत्मस्वरूपाची प्राप्ति होते. आपण नाम घ्यावें, तें आपणच आपल्या कानांनीं ऐकावें, आणि तें घेतां घेतां त्यांत शेवटीं स्वतःला विसरून जावें, हाच नामसाधनेंतला आनंदाचा मार्ग आहे. जसें आपलें आपलेपण आपल्या नांवांत आहे तसें देवाचें देवपण त्याच्या नामांत आहे. आपण आज जें नाम घेतो तेंच नाम शेवटपर्यंत कायम राहतें; परंतु आपली देहबुद्धि जसजशी कमी होईल तसतसें तें नाम अधिकाधिक व्यापक आणि अर्थगर्भ बनत जातें, आणि शेवटीं नाम हें परमात्मस्वरूपच आहे असा अनुभव येतो. पाणी जसें शरीराचें जीवन आहे, तसें नाम हें मनाचें "जीवन" बनलें पाहिजे. अंतकाळीं अगदीं शेवटीं सुटणारी वस्तु म्हणजे भगवंताचें नाम पाहिजे. नामांतच शेवटचा श्वास गेला पाहिजे. नामांत एका आनंदाशिवाय दुसरें कांहीं नाहीं.

---

१. ज्याची प्रत्येक कृति रामाच्या स्मरणामध्यें होते तोच रामराज्यात खरा राहतो.

# सद्गुरूकडून घेतलेलें नाम

**२ जानेवारी**

नाम हें सद्गुरूकडूनच घेणें जरूर आहे का ? किंवा तें आपणच आपल्या आवडी-प्रमाणें घेतलें तरी चालेल का ? वास्तविक **भगवंताचें नांव स्वतःसिद्ध आहे आणि परिपूर्ण आहे**; त्याला दुसऱ्या कोठूनहि पूर्णता प्राप्त करून घ्यायची असते असें नाहीं; सद्गुरूकडून घेतलेलें नाम आणि आपण स्वतःच्या पसंतीनें घेतलेलें नाम ह्यांत फरक होऊं शकत नाहीं; कारण तसा फरक जर करूं लागलों तर एकाच सद्गुरूकडून घेतलेल्या नामांतहि फरक करावा लागेल. तसेंच सद्गुरु तरुण असतांना त्यानें दिलेलें नाम आणि म्हातारपणीं किंवा देह सोडल्यानंतरहि दिलेलें नाम यांतहि फरक असूं शकत नाहीं. तरीसुद्धा सद्गुरूकडून घेतलेल्या नामाचें वैशिष्ट्य आहेच. तें असें कीं, तो त्या नामाच्या पाठीशीं संतरूपानें असतो, आणि आपल्याकडून नामस्मरण होण्याच्या बाबतींत त्याची आपल्याला फार मदत होते; आणि त्यामुळें; आपल्या हातून होणारें नामस्मरण त्याच्या सत्तेनेंच होत आहे ही जाणीव राहून, " मी नामस्मरण करतों " अशा तऱ्हेचा अहंकार उत्पन्न व्हायला वाव राहात नाहीं. म्हणूनच सद्गुरूकडून नाम घेणें जरूर आहे. सद्गुरूभेट होईपर्यंत मात्र आपण आपल्याकडून नामस्मरण रीत राहणें जरूर आहे. कारण तेंच नामस्मरण सद्गुरूची भेट करवून देईल. तसें पाहता आधीं संतांची भेट होणें कठीण, आणि समजा भेट झाली, तरी त्यांच्यावर विश्वास बसणें त्याहून कठीण असतें. म्हणून नामाचें साधन चालू ठेवावें, आणि मग ज्याप्रमाणें खडीसाखर ठेवली म्हणजे मुंगळ्यांना आमंत्रण देण्याची जरूरी नसते, ते आपोआप तिचा शोध काढीत येतात, कारण ती त्यांना फार आवडते; त्याप्रमाणें तुम्ही खडीसाखर बना, म्हणजे संत तुमच्याकडे धांवतच येतील. ' खडीसाखर बना ' म्हणजे संतांना आवडेल असें वर्तन करा. संतांना काय आवडतें ? भगवंताचें अनुसंधान आणि अखंड नामस्मरण याशिवाय त्यांना कोणतीहि गोष्ट प्रिय नाहीं. म्हणून आपल्या हृदयामध्यें अखंड नामाची ज्योत तेवत ठेवा. सद्गुरु तुमचा शोध घेत येतील आणि तुमच्यावर कृपेचा वर्षाव करतील.

---

२. कोणतेंच कर्म यथासांग घडत नसतें; तरी पण मनुष्यानें संस्कार–कर्म शास्त्राप्रमाणें करून जेथें कमी पडेल तेथें भगवंताचें स्मरण करावें. भगवंताची श्रद्धा वाढावी हाच संस्कारांचा मूळ हेतु आहे.

# नाम कोठवर घ्यावें ?

**३ जानेवारी**

नामजपाची संख्या नोंद करून ठेवावी का ? अमुक एक संख्येपर्यंत जप करण्याचा संकल्प केला असेल, किंवा रोजचा कांहीं कमींत कमी जप करण्याचें ठरविलें असेल, तर जपसंख्येची नोंद करून ठेवणें जरूर आहे. जपाची सवय होण्याच्या दृष्टीनें आणि नेमानें कांहींतरी किमान जप झाल्याशिवाय दिवस जाऊं नये या दृष्टीनेंहि, जपसंख्येची नोंद करावी. पण असें करतांना एका बाबतींत खबरदारी घ्यावी; ती म्हणजे, आपली आजची नामसंख्या पुरी झाली, आतां उद्यांपर्यंत आपला आणि नामाचा कांहीं संबंध नाहीं, अशा तऱ्हेची वृत्ति होण्याचा संभव असतो, त्याला जपावें; आणि नेमाची संख्या पुरी झाली तरी होईल तेवढें आणखी नाम घेण्याची सवय ठेवावी.

नाम कुठवर घ्यावें ? आपला श्वासोच्छ्वास चालू आहे किंवा स्वतःची स्मृति आहे तिथपर्यंत नाम घ्यावें. आपण श्वासोच्छ्वास जसा मरेपर्यंत घेतों तसेंच नामाचें आहे. बरोबर भाषेंत बोलावयाचें झालें तर असें म्हणतां येईल कीं, श्वासोच्छ्वास थांबला म्हणजे मरण येतें, त्याचप्रमाणें नामाशिवाय जगणें मेल्यासारखेंच आहे असें वाटलें पाहिजे. नाम कितीहि घेतलें तरी अतृप्ति वाटली पाहिजे, इतकी त्या नामाची गोडी वाटावी. नाम घेऊन कधीं पुरें होऊं शकत नाहीं. **मुक्ति मिळाली कीं सर्व पुरें झालें असें म्हणतात. पण मुक्तीनंतरहि जर कांहीं कर्तव्य उरत असेल तर तें नामच.** हें स्पष्ट करणारा चरण श्रीतुकाराममहाराजांच्या अभंगांत आहे; " मुक्तीवरील भक्ति जाण । अखंड मुखीं नारायण ॥ "

माणसाला गुंगीचें औषध दिलें म्हणजे त्याला गुंगी आली कीं नाहीं हें पाहण्यासाठीं अंक मोजायला सांगतात. अंक मोजतां मोजतां तो थांबला, कीं तो देहभानावर नाहीं असें ठरतें, तसें नाम घेतां घेतां, " मी नाम घेतों " हेंहि स्मरण जेव्हां राहात नाहीं तेव्हांच त्या नामांत रंगून गेलेल्या माणसाचें पर्यवसान " एकांतांत " होतें. मग अशा स्थितींत त्याचें चित्त भगवंताकडे आहे कीं नाहीं, असा प्रश्न करायला वावच कुठें राहतो ? निद्रानाशाचा रोग झाला तर झोप लागेपर्यंत झोपेचें औषध आपण घेतों, तसें आपल्याला स्वाभाविक समाधान मिळेपर्यंत आपण नाम घेतलें पाहिजे.

---

३. सध्यां जगाला सुधारण्याचा आणि जगावर उपकार करण्याचा काल राहिला नाहीं. प्रत्येकानें आपल्याला तेवढें सांभाळावें, भगवंताचें अनुसंधान चुकूं देऊं नये.

# नामासाठीं आसन

**४ जानेवारी**

नाम घेतांना कोणती बैठक असावी किंवा आसन घालावें ? हा प्रश्न म्हणजे, श्वासोच्छ्वास करतांना कोणत्या तऱ्हेची बैठक असावी असें विचारण्यासारखा आहे. समजा एखाद्याला दमा झाला आहे, तर तो काय करतो ? तो अशा तऱ्हेनें बसण्याचा किंवा पडण्याचा प्रयत्न करतो कीं, जेणेंकरून श्वासोच्छ्वास कष्टाशिवाय व्हायला मदत होईल; म्हणजे त्याचें ध्येय श्वासोच्छ्वास सुलभ रीतीनें कसा चालेल हें असतें, आणि मग त्याकरितां, देहाची बैठक कशीही ठेवावी लागली तरी चालते. श्वासोच्छ्वास विनाकष्ट चालू ठेवणें हें त्याचें ध्येय असतें, तसें नाम कसें चालेल हें ध्येय ठेवावें; आणि त्याला मदत होईल, व्यत्यय येणार नाहीं, अशा तऱ्हेची कोणतीहि बैठक असावी. बैठकीला फार महत्त्व देऊं नये. समजा, आपण पद्मासन घालून नामस्मरणाला बसलों आणि कांहीं वेळानें पाठीला कळ लागली, तर आपलें लक्ष नामापेक्षां देहाकडेच लागेल; म्हणजे नाम घेतां घेतां देहाचा विसर पडण्या-ऐवजीं देहाची स्मृतीच वाढल्यासारखी होईल. म्हणून **नामस्मरणांत खंड न व्हावा** हें ध्येय ठेवून, त्याला अनुकूल अशी ज्याच्या त्याच्या प्रकृतिधर्माप्रमाणें कोणतीहि बैठक ठेवावी.

वास्तविक नाम कसें घेऊं हें विचारणें म्हणजे पेढा कसा खाऊं म्हणून विचारण्यासारखें आहे. पेढा कोणत्याहि बाजूनें खाल्ला तरी गोडच लागतो, तसें नाम कसेंहि घेतलें तरी तें आपलें काम करतेंच करतें. पेढा ज्यानें खाल्ला आहे तो पेढा कसा खाऊं म्हणून जसें विचारणार नाहीं, तसें नाम घेणारा मनुष्य नाम कसें घेऊं म्हणून विचारणार नाहीं. शेतांत बीं पेरतात तेव्हां त्याचें तोंड वरच्या बाजूला आहे कीं नाहीं हें पाहात नाहींत. बीं शेतांत पडतें तेव्हां, त्या तोंडातून मोड यायचा असतो तें तोंड कोणत्या तरी एका बाजूला, खालीं, किंवा वरहि असूं शकेल; पण जेव्हां मोड बाहेर पडतो तेव्हां त्याची दिशा कोणत्याहि बाजूला असली तरी तो वळण घेऊन जमिनींतून वरच येतो. तसें नाम कसेंहि घेतलें तरी घेणाऱ्याची तें योग्य दिशेनें प्रगति करून त्याला योग्य मार्गावर आणून सोडील. म्हणून कसेंहि करून नाम घ्यावें.

---

४. आपला प्रत्येक सण भगवंताची आपल्याला आठवण करून देण्यासाठीं आहे. प्रपंच करीत असतांना वाईट विचार येतात तसेच परमार्थ करीत असतांनाहि येतात. पण म्हणून घाबरण्याचें कारण नाहीं. दृढ अभ्यासानें नाम चालू ठेवावें.

# नामस्मरण व एकाग्रता

**५ जानेवारी**

नामस्मरण करतांना चित्त एकाग्र कां होत नाहीं ? त्याकरितां काय करावें ? नामस्मरण करीत असतांना हजार तऱ्हेचे विचार मनांत येतात हें खरें. त्यांना आवरण्याचा पहिला उपाय म्हणजे त्या विचारांच्या मागें न जाणें. विचार मनांत आले तर त्या विचारांना फाटे फोडून ते वाढवूं नयेत; म्हणजेच मनोराज्य करूं नये. विचार येतील तसे जातील, तिकडे लक्ष देऊं नये. चित्त एकाग्र होण्याकरतांच नामस्मरणाची गरज आहे. चित्ताची एकाग्रता ही फार पुढची पायरी आहे. चित्त चंचल आहे, त्याला कुठेंतरी स्थिर करून ठेवल्याशिवाय भागत नाहीं, म्हणून तें नामात गुंतवून ठेवावें. **नामस्मरण करीत असतांना तें नाम आपल्या कानांनीं ऐकावें**, म्हणजे एकाग्रता व्हायला मदत होईल.

मनुष्य अगदीं एकटा असला किंवा एकांतांत असला तरी आपल्या कल्पनेनें तो अनेक माणसें आपल्या भोंवतीं गोळा करतो. विशेषतः विद्वान् लोकांना कल्पना जास्त असतात. तेव्हां कल्पना करायचीच तर ती भगवंताविषयीं करूं या. भगवंत हा दाता आहे, त्राता आहे, सुख देणारा आहे, अशी कल्पना आपण करूं या; त्यांतच खरें हित आहे. कल्पनेच्या पलीकडे असणारा परमात्मा आपण कल्पनेंत आणून सगुण करावा, आणि तिथेंच आपलें चित्त स्थिर करण्याचा प्रयत्न करावा. दुसरी गोष्टी अशी कीं, ज्याची आपल्याला आवड असते त्यांत आपल्याला एकाग्र होतां येतें. आपल्याला विषयाची आवड असते म्हणून विषयाचें सेवन करतांना आपण एकाग्र होतो; मग विषयाच्या ऐवजीं आपण परमात्म्याची आवड धरली तर त्याच्या ठिकाणींही एकाग्र होतां येणार नाहीं का ? म्हणून, विषयाची जितकी आवड आहे तितकीच देवाच्या प्राप्तीबद्दलहि आवड ठेवावी; म्हणजे आपल्याला त्याच्या ठिकाणीं एकाग्र होता येईल, परंतु विषयाबद्दल तरी आपण खरें एकाग्र होतों का ? आपण विषयांतसुद्धा एकाग्र होत नाहीं, तर साक्षीरूपानें ते विषय सेवन करतो, म्हणून त्यापासून सुखदुःख होतें. एकाग्र होणें म्हणजे त्या ठिकाणीं समरस होणें. मीठ पाण्यांत टाकलें म्हणजे तें पाण्याहून वेगळें करतां येईल काय ? योग केल्यानें एकाग्र होतां येईल, पण जोपर्यंत समाधि आहे तोपर्यंतच ती एकाग्रता टिकेल. **सर्वांभूतीं भगवद्भाव पाहणें हेंच खरें एकाग्रतेचें साधन. सर्व ठिकाणीं तोच भरलेला आहे असें समजल्यावर द्वैत कुठें राहिलें ! आणि जिथें द्वैत गेलें तिथें आपोआप एकाग्रता आलीच. अशी एकाग्रता साधते तीच खरी समाधि होय.**

---

५. चित्ताची एकाग्रता होण्याकरितांच नामस्मरणाची गरज आहे.

# नाम-रूपाचा संबंध

**६ जानेवारी**

नाम घेत असतां रूपाचें ध्यान आवश्यक **आहे** कां ? वास्तविक **नाम आणि रूप हीं भिन्न नाहींतच.** " नाम तेंचि रूप, रूप तेंचि नाम । नाम रूप भिन्न नाहीं नाहीं ॥ " ( नामदेव ) नाम हें रूपाच्या आधींहि आहे आणि नंतरहि उरतें. नाम रूपाला व्यापून असतें. वाल्मीकींनीं राम जन्माला येण्यापूर्वीं रामायण लिहिलें, आणि रामानें मागाहून जन्म घेऊन त्यांत वर्णन केल्याप्रमाणें आचरण करून दाखविलें. म्हणजे रूप अस्तित्वांत येण्यापूर्वीं नाम होतें, आणि रूप गेल्यानंतरहि आज नाम शिल्लक आहे; नाम घेणें हें मुख्य आहे. तें घेत असतांना रूपाचें ध्यान राहिलें तर उत्तमच, पण तें तसें न राहिलें तरी नाम घेत असतांना रूपाचें स्मरण सूक्ष्मरूपानें असतें. समजा, एका गृहस्थाच्या घरीं " राम नांवाचा गडी आहे. तो गृहस्थ " राम राम " असा जप करीत बसला आहे, पण त्याचें लक्ष रामरूपाकडे नाहीं, मनांत कांहींतरी दुसरेंच विचार चालू आहेत. अशा वेळीं त्याला जर एकदम विचारलें कीं, " तुम्ही कुणाचें नांव घेत आहांत ? " तर अर्थात् " रामाचें " असेंच उत्तर तो देईल. हें उत्तर देतांना त्याच्या मनांत ' दाशरथि राम ' हीच व्यक्ति असणार, ' राम गडी ' ही व्यक्ति नसणार. याचाच अर्थ असा कीं, नाम घेत असतांना रूपाचें ध्यान सूक्ष्मरूपानें आंत जागृत असतें. म्हणूनच रूप ध्यानीं येत नाहीं म्हणून अडून बसूं नये. नामस्मरण करण्याचा अट्टाहास ठेवावा त्यांत सर्व कांहीं येतें. एखाद्या माणसाची आणि आपली ओळख असेल तर पहिल्यानें त्याचें रूप पुढें येतें आणि नंतर नाम येतें. पण आपली त्याची ओळख नसेल, आणि त्याला बघितलेला नसेल, तर त्याचें नांव आधीं येतें. आणि नंतर रूप येतें. आज आपल्याला भगवंताची ओळख नाहीं, म्हणून त्याचें रूप माहिती नाहीं. परंतु आपल्याला त्याचें नाम घेतां येईल. सध्यांसुद्धां त्याचें नाम घेतांना त्याची आठवण आपल्याला होते हा आपला अनुभव आहेच. भगवंताचें रूप तरी निश्चित कुठें आहे ? एक राम ' काळा ' तर एक राम ' गोरा ' असतो. एक राम ' लहान ' तर एक ' मोठा ' असतो. एक राम ' उग्र ' तर एक ' सौम्य ' असतो. पण सर्व रूपें एका रामाचीच असतात. भगवंत स्वतः अरूप आहे; म्हणून जें रूप आपण त्याला द्यावें तेंच रूप त्याचें असतें. यासाठीं आपण कोणत्याहि रूपामध्यें त्याचें ध्यान केलें तरी चालतें.

---

६. नामस्मरण करण्याचा अट्टाहास ठेवावा, रूप ध्यानीं येत नाहीं म्हणून अडून बसूं नये.

# नामाचें प्रेम येण्यास खरी कळकळ पाहिजे

**७ जानेवारी**

नामांत प्रेम कां येत नाहीं? हा प्रश्न बहुतेकजण विचारतात. पण थोडासा विचार केला तर असें लक्षांत येईल कीं प्रश्नच बरोबर नाहीं, मूल न झालेल्या बाईनें 'मुलाचें प्रेम कसें येईल?' असा प्रश्न करण्यासारखाच हा प्रश्न आहे. मूल झालें कीं प्रेम त्याच्याबरोबरच येत असतें, तेव्हां 'मुलाचें प्रेम कसें येईल' हा प्रश्न करण्याऐवजीं 'मूल कसें होईल' याचाच विचार करणें बरोबर ठरेल. आपणसुद्धां प्रश्न करायचाच असेल तर 'नामांत प्रेम कसें येईल' असा करण्याऐवजीं **'मुखीं नाम कसें येईल'** असा प्रश्न करणें बरोबर होईल. मुखीं नाम यायला वास्तविक आडकाठी कोणाची आहे? तर दुसरी कोणाचीहि नसून आपली स्वतःचीच आहे. वास्तविक एकदां नाम घ्यायचें ठरवून सुरुवात केली कीं झालें. पण तसें होत नसेल तर दोष दुसऱ्या कोणाचा नसून आमचा स्वतःचाच आहे; त्या बाबतींत दुसऱ्याकडे पाहण्यांत काय अर्थ? म्हणून नाम घेणें हें आपलें काम आहे; मग त्याच्या पाठोपाठ येणें हा प्रेमाचा धर्मच आहे. नाम आणि त्याचें प्रेम एकमेकांना सोडून राहूंच शकत नाहींत; जसें, आईच्या बाबतींत मूल आणि प्रेमाचा पान्हा हीं निराळीं असूंच शकत नाहींत. ह्यावरून एक गोष्ट अशी ठरली कीं, 'प्रेम कां येत नाहीं' याचें उत्तर आमच्याजवळ आहे आणि तें म्हणजे, "नाम घेत नाहीं म्हणून." यावर कोणी असें म्हणेल कीं, आम्ही नाम घेतोंच आहोंत, मग प्रेम कां येत नाहीं? हें विचारणें ठीक. आम्ही जें नाम घेतों म्हणून म्हणतों, त्याचा विचार केला तर काय दिसेल? एखाद्या वांझोट्या बाईनें जसें एखादें कृत्रिम मूल घेऊन नाचावें, तसें आम्ही नाम घेतों; म्हणजे पोटीं जन्माला आलेल्या मुलाबद्दल जसा कळवळा असतो तसा नामाबद्दल आपल्या ठिकाणीं कळवळा नसतो. सर्व संतांनीं किंवा आपल्या गुरूनें नाम घ्यावें असें सांगितल्यामुळें आपण तें घेतो किंवा दुसरें कांहीं करायला नाहीं म्हणून घेतों. अर्थात, तसें घेतलें तरी आज ना उद्यां काम होईलच. पण 'प्रेम कां येत नाहीं' असा प्रश्न विचारण्यापूर्वी, आपण नाम किती आस्थेनें घेतों हा प्रश्न स्वतःला विचारणें जरूर आहे. एखाद्या बाईला फार दिवसांनीं मूल झालें तर त्याच्या बाबतींत तिची जी स्थिति होते ती नामाच्या बाबतींत आपली होणें जरूर आहे.

---

७. नवऱ्याला देव आवडत नाहीं म्हणून बायकोनें नामस्मरण सोडण्याचें कारण नाहीं. तिनें नाम घेतलें तर धर्म सोडला असें न होतां उलट संसार सुखाचाच होईल.

# नामाचें प्रेम—आत्यंतिक सहवास व दृढनिश्चय

**८ जानेवारी**

नामांत प्रेम येण्यासाठीं आपल्या प्रेमळ आईकडेच बघा. मुलाला जरा ताप आला तरी आईच्या पोटांत धस्स होतें, अन्न गोड लागत नाहीं, झोंप लागत नाहीं, अशा एक ना दोन गोष्टी. थोडक्यांत म्हणजे तिला सर्व बाजूंनीं अस्वस्थता उत्पन्न होते. नाम घेण्यांत थोडा व्यत्यय आला तर आपली स्थिति तशी होते कां ? याचें उत्तर स्वतःकडून आपल्याला मिळण्यासारखें आहे. नाम घेणें हा माझा धर्म आहे, तें माझें आद्य कर्तव्य आहे. त्याच्याशिवाय जगणें म्हणजे मेल्यासारखेंच आहे, नाम घेण्यांत माझें आत्यंतिक हित आहे, किंबहुना मी नामाकरितांच जन्माला आलों आणि तद्रूपच होऊन जाईन, इतक्या प्रज्ज्वलित भावनेनें नाम घेणें जरूर आहे; आणि मग प्रेम आलें नाहीं ही गोष्टच शक्य नाहीं. प्रेम येत नाहीं याचा अर्थच आम्ही नाम खऱ्या आस्थेनें घेत नाहीं. ह्या सर्वांवर उपाय म्हणजे नाम घेण्याच्या निश्चयानें जसें येईल तसें तें घेत राहणें. तेंच नाम आपल्याला एक एक पाऊल पुढें नेऊन ध्येय गांठून देईल. " परिस्थिति चांगली आली म्हणजे नाम घेईन " असें म्हणणारा मनुष्य नाम कधींच घेत नाहीं.

नाम हें आंतून आणि बाहेरून घेतां येतें. नामांत राहावें म्हणजे अंतःकरणाची शुद्धता होईल, आणि अंतःकरण शुद्ध झालें कीं भगवंताचें प्रेम येईल. नुसत्या पुष्कळ जपापेक्षां विवेकानें आणि विचारानें आलेलें प्रेम नामांत असणें जरूर आहे. म्हैसूरकडील एक गृहस्थ नेहमीं नाम घेत असे, परंतु आपल्या मुलांना थोड्याशा चुकीबद्दलसुद्धां अंगाचीं सालटीं निघेपर्यंत मारीत असे. हें कसलें नामाचें प्रेम ?

**खरें म्हटलें म्हणजे नामांतच नामाचें प्रेम आहे.** ताकांत लोणी असतेंच, तें वर दिसत नाहीं; पण ताक घुसळल्यावर जसें तें वर येतें, तसें भगवंताचें नाम आपण घेतलें कीं त्याचें प्रेम आपोआप वर येतें. साध्या शब्दांचादेखील आपल्या वृत्तीवर परिणाम होऊन तो तो भाव आपल्या मनांत जागृत होतो. मग भगवंताच्या नामानें भगवंताचें प्रेम कां येणार नाहीं ? आज तुम्हांला जेवढा वेळ रिकामा मिळतो. तेवढा सगळा भगवंताच्या नामांत घालवण्याचा प्रयत्न करा. प्रपंचाचें प्रेम आपल्याला सहवासानें आलें आहे, तसें नामाच्या अखंड सहवासानें त्याचें प्रेम आपोआप येईल.

---

८. जेथें कर्तव्याची जागृति आणि भगवंताची स्मृति आहे तेथेंच समाधानाची प्राप्ति होते.

# नाम व विकल्प

**१ जानेवारी**

**नाम घेऊं लागलें कीं, विकल्प उठतात आणि तें घेण्याबद्दलची निष्ठा कमी होते याला काय करावें?** अशी तक्रार आपण सर्वसाधारणपणें करतों; पण असें होण्यांतच नामाचें महत्त्व प्रस्थापित होतें हें आपल्या लक्षांत येत नाहीं. एखाद्या वेश्येला जशी पतिव्रतेची स्तुति खपत नाहीं त्याप्रमाणें, मनुष्य नाम घेऊं लागला कीं, विकल्पांना असह्य होतें आणि आतां हा नाम घेऊं लागला, आपली धडगत नाहीं अशा धास्तीनें त्यांची चळवळ चालू होते, आणि मनुष्याला नामापासून परावृत्त करण्याचा ते प्रयत्न करतात. विकल्प हे अति सूक्ष्म आहेत, त्यांचें उच्चाटन करायला त्यांच्यापर्यंत पोहोंचणारा आणि तितकाच सूक्ष्म उपाय पाहिजे. तो उपाय म्हणजे भगवंताचें नाम. एखाद्या बिळांत सर्प शिरला तर त्याला बाहेर काढण्याकरितां त्याच्यापर्यंत पोचून तिथें राहणें त्याला असह्य करील असाच उपाय करणें जरूर असतें; बाहेरून कितीहि आरडाओरडा केला तरी त्याचा उपयोग होत नाहीं. बिळांत धूर किंवा गरम पाणी सोडलें कीं तो बाहेर येतो. त्याप्रमाणें, नाम घेतलें कीं विकल्प उठतात, म्हणजे विकल्पांच्या मूळ ठिकाणापर्यंत नामाची आंच जाऊन पोंचली हें ठरतें. तर मग नाम घेऊं लागल्यावर विकल्प येऊं लागले तर गांगरून न जातां, हें सुचिन्ह आहे असें समजून, विकल्पांच्या उच्चाटनाची गुरुकिल्ली मिळाली अशा जाणिवेनें, जास्त आस्थेनें नाम घेण्याचा निश्चय करावा, हाच त्याला उपाय. नामाबद्दल सुरुवातीला सर्वांचीच वृत्ति साशंक असते, पण **आपण सतत नाम घेत गेल्यानेंच विकल्प कमी होतात.** विकल्प जाऊन भगवंताचे संकल्प उठूं लागले कीं आपलें काम झालें.

आपण रस्त्यानें चाललों कीं नको तीं माणसें भेटायचींच; पण आपण आपलें चालणें चालू ठेवावें. तसें, विकल्प आले तरी आपण आपलें नाम सोडूं नये. पण गंमत अशी होते कीं, वाईट मनुष्य भेटला आणि आपण त्याच्याकडे लक्ष द्यायचें नाहीं असें म्हटलें तरी; तो मुद्दाम खांकरतो आणि आपलें लक्ष वेधतो. अशा वेळीं त्याच्याकडे आपण पहावें, तिरस्कारानें पाहावे. त्याचप्रमाणें विकल्पांनीं आपले लक्ष ओढून घेतलें तर नावडीनें लक्ष द्यावें पण आपलें नाम सोडूं नये. शंका घ्यायचीच झाली तर नाम चालू ठेवून घ्या. म्हणजे तें नामच शंकांचें निरसन करील आणि विकल्पांनाहि हळूहळू पायबंद घालील.

---

१. गुरुचरणीं अत्यंत विश्वास । आणि साधनाचा अखंड सहवास ।
येथें प्रपंचाचा सुटला फांस । हाच परमार्थाचा मार्ग आहे खास ॥

# नाम-प्रपंच सुखी करण्याचें साधन

**१० जानेवारी**

संसारांतील सार । आपला करावा रघुवीर ॥ कली अत्यंत मातला । **नीति-** कर्तव्यांचा विसर पडला ॥ अनाचार होतसे फार । आतां नाहीं रामावांचून दुजा ठाव ॥ संधी **साधून** जो राहिला ॥ तोच जगीं धन्य झाला ॥ चोरानें घरफोड केलें। मग जागृतीचें कारण नाहीं उरलें॥ म्हणून असावी सावधान वृत्ति । अखंड राखावी भगवंताची स्मृति ॥ भगवंतासीं अनन्य होतां । दुःखाची नाहीं तेथें वार्ता ॥ अभिमानवृत्ति सोडावी करी । त्यास घडे रामसेवा खरी । सरे मीपणाची उरी । ब्रह्मरूप दिसे चराचरीं ॥ म्हणून ज्यानें जन्माला घातलें । ज्यानें आजवर रक्षण केलें । तो माझा धनी हें ठेवून चित्तीं । भावें भजावा रघुपति ॥ **रामाचें व्हावें आपण । राम जोडावा आपण । हेंच जन्माचें, प्रपंचाचें मुख्य कारण ॥** म्हणून रामावीण न मानी कोणी त्राता । धन्य त्याची मातापिता ॥ प्रपंच तसा परमात्म्यावांचून । हें जसे अलंकार सौभाग्यावांचून ॥ अलंकार सर्व घातले । पण सौभाग्यतिलक न लावले । तैसें रामाविण राहाणें आहे खरें ॥ प्रेतास घातले अलंकार । केशरादि लावला सुगंध फार । पण जीवाचा तेथें नसे वास । अशी भगवंतांवांचून कोणतीहि स्थिति होते खास ॥ रोग्यास उपचार बहुत केले । पण रोगी न दगावेल लक्ष देणें भलें । तसे सत्य व्यवहाराचें आहे खरें ॥ औषधाचा लाभ झाला । पण रोगी हाताशीं नाहीं आला ! तसें व्यवहार उत्तम प्रकारचा केला । पण परमात्मा विसरला । तो व्यवहार दुःखच देता झाला ॥ ऐहिक आणि पारमार्थिक । न जाणावें एकाहून एक परते॥ ऐहिक आणि पारमार्थिक सुख । रामावांचून नाहीं देख॥ म्हणून शुद्ध असावें आचरण। तसेंच असावें अंतःकरण । त्यांत भगवंताचें स्मरण । हेंच प्रपंच सुखी करण्याचें साधन ॥ रामचरणावर ठेवावा विश्वास । हेंच परमार्थाचें भांडवल खास ॥ ऐहिक वागण्यांत रामाचें स्मरण । हीच परमार्थाची खरी शिकवण ॥ मी कोण हें जाणून ठेवावें वर्तन । हेंच परमार्थाचें मुख्य साधन ॥ माझें हित भगवंताचे हातीं । ही ठेवावी मनाची प्रवृत्ति ॥ राम कर्ता ही असावी भावना । तो जें करील तें आपल्या हिताचें जाणा ॥ भाव ठेवावा रामापायीं । पण व्यवहार चुकूं न देई ॥ परमात्म्याचें राखणें अनुसंधान। हाच परमार्थाचा मुख्य मार्ग जाण । बाह्यांगानें करावी प्रपंचाची संगति । चित्तीं असावा एक रघुपति ॥ प्रयत्न करणें आपल्या हातीं। यश देणें भगवंताचें हातीं ॥ प्रयत्नाला न पाहावें पुढें मागें । परी परमात्मा उभा आहे मागे। ही ठेवावी जाणीव मनामध्यें ॥ प्रपंचांत दक्षतेनें वागत जावें ॥ धीर सोडूं नये । भगवंताचे आधारावर निभ्रांत असावें ॥ सर्व कामधंदा घरीं करी । पण चित्त लेंकरावरी । ऐसें जैसें करी जननी जाण। तैसें वागावें आपण ॥ काया गुंतवावी प्रपंचांत । मन असावें रघुनाथांत ॥ नीतिधर्माचें आचरण । पवित्र असावें अंतःकरण । त्यांत कर्तव्याची जोड पूर्ण । त्या सर्वांत राखतां आलें अनुसंधान । तर याविण दुजा परमार्थ नाहीं जाण ॥

---

१०. असावी सावधानवृत्ति । अखंड राखावी भगवंताची स्मृति ॥

# नामाचें सूक्ष्म स्वरूप

११ जानेवारी

" राम राम " म्हणून राम कसा भेटेल ? हा प्रश्न सहजी विचारण्यांत येतो आणि त्याला दाखला म्हणून असें सांगण्यांत येतें कीं, समजा, एखादा मनुष्य " नोकरी नोकरी " असा जप करीत खोलींत बसला तर त्याला नोकरी मिळणें शक्य आहे का ? वरकरणीं हा दाखला अगदीं बेमालूम दिसतो खरा, पण थोडासा विचार केला तर तो इथें मुळींच लागू पडत नाहीं असें कळून येईल. जो दाखला द्यायचा आणि ज्या बाबतींत तो द्यायचा त्याचे गुणधर्म सारखे असावे लागतात. " रामनाम " आणि " नोकरी " यांचे परिणाम एकमेकांविरुद्ध आहेत. " राम राम " म्हणण्याचा शेवट रामप्राप्तींत म्हणजे स्वतःच्या विस्मरणांत होत असतो. म्हणजे देहबुद्धींतून देहाच्या पलीकडे जाणें, म्हणजे स्थूलांतून सूक्ष्माच्या पलीकडे जाणें, हा " राम राम " म्हणण्याचा परिणाम. परंतु नोकरीचा प्रकार याच्या अगदीं विरुद्ध आहे. मुळांत, नोकरी ही कल्पना सूक्ष्म आहे. नंतर, ती मिळावी म्हणून दहाजणांचे आर्जव करणारा, त्याच्यानंतर ती देणारा, आणि मग करणाऱ्यानें ती करायची. म्हणजे नोकरी या कल्पनेंतून, सूक्ष्मांतून, स्थूलांत जाणें हा नोकरीचा प्रकार. पण " राम राम " म्हणणें हा प्रकार स्थूलांतून सूक्ष्माच्याहि पलीकडे जाण्याचा आहे. यावरून, नोकरीचा हा दाखला इथें लागू पडत नाहीं हें स्पष्ट होतें. दुसरी गोष्ट म्हणजे " नोकरी नोकरी " असा जप करून नोकरी मिळणें कठीण हें तर खरेंच पण **" राम राम " म्हणून राम मिळणें कसें सोपें, किंबहुना कसें हमखास शक्य आहे हें पाहूं.** नोकरी म्हणजे मूळ कल्पना असून, ती प्रत्यक्षांत आणण्याकरितां इतर अनेक गोष्टींची कशी जुळवाजुळव करावी लागते हे आत्तांच सांगितलें. तसेंच घर बांधणें ही मूळ कल्पना; ती पुरी करून तें घर सर्व बाजूंनीं सुखसोयींचें आगर व्हावें या हेतूनें त्यांत सर्व जिनसा पैदा करून आणून ठेवणें, म्हणजेच कल्पनेंतून कृतींत येण्याचा प्रकार झाला. आतां हें करणें किती कष्टाचें आणि अनिश्चित आहे याचा अनुभव सर्वांना आहे. " राम राम " म्हणण्याचा परिणाम स्थूलांतून सूक्ष्माच्या पलीकडे जाणें, म्हणजेच अगदीं सर्व बाजूंनीं परिपूर्ण आणि भरलेलें घर एकेक वस्तु फेंकून देऊन रिकामें करण्यासारखे आहे. ही गोष्ट करण्याची इच्छा असल्यास कोणालाहि सहज होण्यासारखी आहे. म्हणून " नोकरी नोकरी " म्हणून नोकरी मिळणें जितकें कठीण तितकेंच " राम राम " म्हणून राम मिळणें निश्चित आहे. सबब " राम राम " म्हणून राम कसा भेटेल अशी शंका न घेतां " राम राम " जपावा.

---

११. एखादी वस्तु आपल्याला हवी असें वाटल्यावर आपण तिच्या प्राप्तीविषयीं विचार करूं लागतो; म्हणून पहिल्यानें भगवंत हवा असें वाटलें पाहिजे.

# नाम व भगवंत

**१२ जानेवारी**

" राम राम " म्हणून राम कसा भेटेल या विचारण्यांत कांहींच अर्थ नाहीं. उलट असें म्हणतां येईल कीं, " राम राम " म्हटल्याशिवाय राम भेटणेंच शक्य नाहीं. व्यवहारांतहि हाच आपला अनुभव आहे. समजा, आपल्याला काशीला जायचें आहे आणि तिकीट काढण्याकरितां म्हणून आपण स्टेशनवर गेलों, आणि तेथें, ज्या ठिकाणाला जायचें आहे त्याचें नांव न सांगतां तिकीट मागूं लागलों, तर कांहीं झालें तरी आपल्याला तिकीट मिळणार नाहीं आणि आपल्याला त्या ठिकाणीं जातां येणार नाहीं. म्हणजे ठिकाण पाहिलेलें नाहीं पण नांव माहीत आहे, तर तिकिट मिळून आपल्याला तेथें जातां येतें. पण समजा, ठिकाण ओळखीचें आहे, त्याचें सर्व वर्णन केलें, आणि नांव तेवढेंच न आठवलें तर मात्र कांहीं उपयोग होत नाहीं. यावरून एक गोष्ट स्पष्ट होते कीं, बाकी सर्व केलें पण नाम नाहीं घेतलें तर कांहीं उपयोग होत नाहीं; म्हणून नाम घेणेंच जरूर आहे. **नामानें भगवंताची प्राप्ति होणार ही खात्री असावी.** अशा नामालाच निष्ठेचें नाम असें म्हणतात. तें नाम मंगलांत मंगल आणि अत्यंत पवित्र आहे.

भगवंताच्या नामाची गरज दोन तऱ्हेनें आहे; एक प्रपंचाचें स्वरूप कळण्यासाठीं, आणि दुसरी, भगवंताच्या प्राप्तीसाठीं. खायला प्यायला पोटभर, बायकामुलें, घरदार, वगैरे सर्व गोष्टी असल्या तरी सुद्धां आपल्याला काळजी आणि तळमळ कां असते हें आपल्याला कळत नाहीं. याचा अर्थ, दुःखाचें खरें स्थान कोठें आहे हें कळत नाहीं. तें कळण्याकरितां भगवंताच्या नामाची गरज आहे. भगवंताची तळमळ लागेपर्यंत नामाची जरूरी आहे; नंतर, भगवंतावांचून आपल्याला दुसरा आधार नाहीं म्हणून नाम घ्यायला पाहिजे; आणि शेवटीं, भगवंताच्या दर्शनानंतर नाम संवयीनें आपोआप येतें. एकूण, आरंभापासून शेवटपर्यंत भगवंताचें नामच शिल्लक राहतें. जो नामस्मरण करील आणि त्याचें अनुसंधान ठेवील त्याला भगवंताची जिज्ञासा आपोआप उत्पन्न होईल. नामाकरितां नाम घ्या कीं त्यांत राम आहे हें कळेल. नाम घेत असतां, जें घडेल तें चांगलें आणि आपल्या कल्याणाचें आहे असा भरंवसा ठेवावा. जसें इमारतीच्या पायालाहि दगड आणि कळसालाहि दगडच असतो, तसेंच साधकाला आणि सिद्धालाहि नाम हेंच साधन आहे. आपले जीवन देवाच्या हातीं आहे आणि देव नामाच्या स्वाधीन आहे हें पक्कें लक्षांत ठेवा.

---

१२. सकाळीं उठतांना, रात्रीं निजतांना, जेवायच्या आधीं, नाम घ्यायचेंच व भगवंताची आठवण करायचीच असा नियम करावा. तो आयुष्यांत फार उपयोगी पडेल.

# नाम आणि सत्कर्म

**१३ जानेवारी**

नाम हा सत्कर्माचा पाया आहे तसाच कळसहि आहे. भगवंताच्या स्मरणांत केलेलें कोणतेंहि कर्म सत्कर्म या सदरांत पडते; म्हणजे या उलट, भगवंताच्या विस्मरणांत केलेलें कर्म सत्कर्म होऊं शकत नाहीं असें ठरतें. समजा, एखादा मनुष्य नुसतें तोंडानें "राम राम" म्हणत असतांना भगवंताच्या स्मरणांत नसेल, तर त्याची "राम राम" म्हणण्याची क्रिया सत्कर्म या सदरांत पडूं शकते कीं नाहीं? वास्तविक, नाम हें स्वतःसिद्ध असल्यानें तें जाणतां वा अजाणतां म्हटलें तरी तें सत्कर्म या सदरांतच पडतें; कारण '**जेथें माझें नाम तेथें मी पुरुषोत्तम**' असें भगवंताचें वाक्य आहे. म्हणून नामाचा उच्चार आणि भगवंत या दोन गोष्टी निराळ्या असूंच शकत नाहींत. मुखानें नाम म्हणणाऱ्याचें लक्ष भगवंताकडे असो वा नसो, तें सत्कृत्य या सदरांतच पडतें. इतर कर्में आणि नाम घेणें हें कर्म, यांत जो फरक आहे तो हा कीं, इतर कर्मांना पूर्णत्व किंवा सत्यत्व नामानें येतें, तर या उलट नाम आणि अपूर्णत्व या गोष्टी एकत्र संभवतच नाहींत; म्हणून नाम भगवंताच्या स्मरणांत घेतलें किंवा कसें हा प्रश्नच उद्‌भवत नाहीं. शिवाय नाम घेतां घेतां त्यांत इतकें रंगून जाणें जरूर आहे कीं त्याचें पर्यवसान एकान्तांत झालें पाहिजे. 'एकान्त' म्हणजे नाम घेणारा मी एक, ह्या एकाचाहि अंत होणें म्हणजेच देहबुद्धीचा विसर पडणें, तिच्या पलीकडे जाणें. नाम घेतां घेतां जेव्हां अशी स्थिति प्राप्त होते तेव्हां चित्त भगवंताकडे आहे, कीं, नाहीं हा प्रश्नच उद्‌भवत नाहीं. सत्कर्माचा शेवट भगवंताच्या नामांत प्रेम उत्पन्न होण्यांतच होणें जरूर आहे; कारण सत्कर्में फळाला केव्हां आलीं, तर जेव्हां भगवंताचें नाम मुखीं येईल तेव्हां. हें स्पष्ट करणारा श्रीतुकाराम महाराजांचा एक अभंग आहे :—

पाहुनिया ग्रंथ करावें कीर्तन । तेव्हां आलें जाण फळ त्याचें ॥ १ ॥
नाहींतरी वायां केली तोंडपिटी । उरी ते शेवटीं उरलीसे ॥ २ ॥
पढोनियां वेद हरिगुण गावे । ठावें तें जाणावें तेव्हां जालें ॥ ३ ॥
तपतीर्थाटणें तेव्हां कार्यसिद्धि । स्थिर राहे बुद्धि हरि या नामीं ॥ ४ ॥
यागयज्ञादिक काय दानधर्म । तरी फळ नाम कंठीं राहे ॥ ५ ॥
तुका म्हणे नको काबाडाचे भरीं । पडो, सार धरीं हेचि एक ॥ ६ ॥

---

१३. भगवंताजवळ आपण लहान मूल झाल्याशिवाय त्याला कृपेचा पान्हा फुटायचा नाहीं; म्हणून भगवंतापाशीं आपण लहान होऊन सतत त्याच्या नजरेसमोर राहावें.

# नाम घेण्यास कांहींहि आड येत नाहीं

**१४ जानेवारी**

सत्कर्माच्या बाबतींत आपल्याला असें म्हणतां येईल कीं नाम मुखीं आलें कीं सत्कर्में होऊंच लागतात. मूल झालें म्हणजे मुलाच्या आईला पान्हा फुटणें, मुलाचे लाड करणें, त्याच्यावर सर्व बाजूंनीं प्रेम करणें, वगैरे गोष्टी जशा न शिकवितां सहजच होतात, तशीच स्थिति नाम घेतलें कीं सत्कर्माच्या बाबतींत होते. उलट त्या आईला मूल झाल्यावर, तें मूल तूं फक्त आपल्याजवळ ठेव पण त्याच्या बाबतींत प्रेम करणें वगैरे गोष्टी करूं नको असें म्हटलें, तर तें मात्र कधींच शक्य नाहीं. **त्याप्रमाणें नाम घेणाऱ्याला सत्कर्में टाळूं म्हणून टाळतां येणार नाहींत.** आपण आतां असें पाहूं कीं नामांत प्रेम येण्याकरितां एकएक सत्कर्म करीत राहणें सुलभ, कीं तें नामच बळजबरीनें, विचारानें, सर्व संतांनीं अत्यंत कळवळ्यानें सांगितलें आहे म्हणून, किंवा कोणत्याहि कारणानें घेणें हें सुलभ. समजा, एक यंत्र आहे, त्यांत पुष्कळ चक्रें आहेत; हेतु तें यंत्र चालू करणें हा आहे. आतां एखाद्यानें त्यांतले एखादेंच चक्र चालू करूं म्हटलें, तर तें यंत्र चालू होईलच असा भरंवसा नाहीं. परंतु समजा, त्या सर्व चक्रांचा संबंध असलेली कळ आपण दाबली, तर मात्र बिनतक्रार आणि अत्यंत अल्प प्रयासानें तें यंत्र सहज चालू करतां येईल. त्याप्रमाणें नाम ही कळ जर धरली तर सत्कर्मरूपी सर्व चक्रें एकदम फिरूं लागून, आपलें काम फार सुलभ रीतीनें आणि निश्चितपणें होईल. म्हणून, युक्तीनें आणि हमखास काम व्हावें अशी ज्याची इच्छा असेल त्यानें कशाहि रीतीनें कां होईना पण भगवंताचें नाम घेण्यास सुरुवात करावी. नाम घेण्याचेंच ठरविलें म्हणजे कांहींहि आड येऊ शकत नाहीं. व्यवहारांत आपण पाहतों कीं, ज्या गोष्टीचें कोणत्याहि रीतीनें समर्थन करतां येत नाहीं अशी गोष्टसुद्धां, करायचीच म्हटली म्हणजे मनुष्य ती करूं शकतो. एखाद्याच्या चार बायका मेल्या, वय साठाच्याहि पुढें झालें, तरीसुद्धां तो पांचवें लग्न करून घेतो, ही त्याची कृति कोणत्या बाजूनें समर्थनीय ठरूं शकेल ? मग नाम घेण्याचा जर निश्चय केला तर नाहीं कां होणार ? कांहींहि केलें तरी शेवटीं नामाशिवाय गत्यंतर नाहीं; तर मग तें घेण्यांत विलंब किंवा चालढकल करण्यांत काय हंशील आहे ? म्हणून, कोणत्याहि तऱ्हेच्या शंकाकुशंका न घेतां कशाहि रीतीनें पण नाम घेत राहावें हें उत्तम; शंका घ्यायच्याच झाल्या तर त्या नाम चालू ठेवून घ्याव्या; म्हणजे तेंच नाम शंकेचें निरसन करील, आणि विनाकारण काळ फुकट घालविला अशी पश्चात्तापाची पाळी येणार नाहीं.

---

१४. प्रपंचांत जी आपली चिकाटी आहे, तिच्या एकचतुर्थांश चिकाटी जरी भगवंतासाठीं धरली तरी आपलें काम भागेल.

# नामांत असणें म्हणजेच शुद्धींत असणें

१५ जानेवारी

एकदां एकानें प्रश्न विचारला, "महाराज, सध्यां इतकीं यंत्रें निघालीं आहेत मग भगवंताच्या प्राप्तीसाठीं संतांनीं एखादें यंत्र शोधून काढलें नाहीं का?" प्रश्न ऐकून श्रीमहाराज झट्दिशी म्हणाले, "होय तर, असें यंत्र संतांनीं केव्हांच शोधून काढलें आहे. त्या यंत्राचें नांव आहे 'रामनाम'. हें यंत्र सर्वांना मिळूं शकतें, सर्वांना वापरतां येतें, शिवाय तें कधींच गंजत नाहीं." जो नामांत असतो तोच खरा शुद्धीवर असतो. शुद्धीवर असणें म्हणजे काय? जसें दारूड्यांमध्यें सर्वजण दारूच्या धुंदींत असतात, त्यांतला एखादा दारू प्यायलेला नसला तर त्याला बाकीचे दारूडे "हा शुद्धीवर नाहीं" असें म्हणत असतात. वास्तविक, तोच एकटा शुद्धीवर असून बाकीचे दारूडेच खरे बेशुद्ध असतात. त्याप्रमाणें, आपण सर्वजण विषयांत दंग असल्यामुळें, जो नामांत असतो त्याला "हा शुद्धीवर नाहीं" असें म्हणत असतों. आपल्याला झालेला हा भ्रम नाहींसा करण्याला तीन उपाय आहेत. एक सद्विचार, दुसरा नामस्मरण व तिसरा सत्संगति. भगवंताचा विचार हाच सुविचार होय. एखाद्या माणसाला सांगितलें कीं, "तूं आपल्या इंद्रियांशिवाय आणि रंगाशिवाय ये," तर त्याला येतां येणार नाहीं. तो जिथें आहे तिथें त्याचीं इंद्रियें आणि रंग हीं असणारच. त्याचप्रमाणें जिथें नाम आहे तिथें सत्संगति आणि भगवंत हीं असतातच. खरें म्हणजे नाम हें घराच्या छपराप्रमाणें आहे. इतर साधनें खोल्याप्रमाणें आहेत, तुम्हीं नाम घेत गेलांत तर तुम्हांला संत धुंडीत जाण्याची जरूरी नाहीं. **नाम, संत आणि भगवंत एकमेकांना चिकटूनच आहेत.** जो शुद्धींत असतो त्याची नामाशिवाय जगांत दुसरें सत्य नाहीं अशी दृढ भावना असते. अत्यंत कठीण प्रमेयें असलेले जगांतले ग्रंथ तो वाचील पण शेवटीं अत्यंत सोप्यांतलें सोपें असें भगवंतांचें नामच तो घेईल. नामाशिवाय जो जो विश्वास। तें तें अविश्वासाचें कारण आहे खास॥ नामाविण मानी सत्य। नाहीं त्यानें जोडला भगवंत॥ नामाविण मानीं जग। त्याचा होऊं देऊं नये विटाळ॥ जेथें नाम तेथें राम राहतो॥ नामाची जेथें मस्ती। तेथें रामाची वस्ती॥ याहून जें जें वाटलें सुख। तें तेंच दुःखाला कारण॥ देवळें सभामंडपें न येत कामा। ज्यानें नाहीं ठेविलें हृदयीं रामा॥ राम करून घ्या आपुलासा। तोडा तोडा जन्ममरणाचा फांसा॥ राम एक दाता। त्याचेवांचून नाहीं कोणी देता॥ आतां दुसरें नाहीं सांगणें कांहीं। राम जोडावा लवलाही॥

---

१५. तुम्ही नाम घेत गेलात, तर तुम्हांला संत धुंडीत जाण्याची जरूरी नाहीं.

# नामाकरितांच नाम

**१६ जानेवारी**

नाम हें निसरड्यासारखें आहे; म्हणजे, त्याला उपाधि सहन होत नाहीं. निसरड्यावर गवत वाढत नाहीं आणि त्याच्यावर पाय पडला तर सरकतो, त्याप्रमाणें नाम आपल्यावर उपाधि ठरूं देत नाहीं; म्हणजेच, नाम आपण उपाधिरहित होऊन घेतलें पाहिजे. उपाधिरहित होणें म्हणजे नाम हें केवळ नामाकरितांच किंवा स्वतःच्या कल्याणाकरितां घेणें, जगांतील दुसऱ्या कशाकरितां न घेणें. नाम हें स्वतः उपाधिरहित असल्यानें तें जर आपण सकाम बुद्धीनें घेतलें तर कार्यभागहि होत नाहीं. आणि आपलें कल्याणहि होत नाहीं. सकाम नाम घेणें हें अत्यंत वाईट आहे; तें किती वाईट आहे हें सांगणें फार कठीण आहे. असें पहा कीं, स्त्री ही अत्यंत पवित्र आहे; तिच्या पोटीं देव, संत, यांसारख्या विभूति जन्म घेतात; अशा स्त्रियांना पळवून नेऊन अनीतीनें वागण्यास भाग पाडून कांहीं लोक पैसा मिळविण्याचा धंदा करतात ही अत्यंत निंद्य गोष्ट आहे. पण त्याच्याहिपेक्षा कितीतरी पटीनें वाईट गोष्ट म्हणजे सकाम नाम घेणें ही होय. म्हणून **नाम हें नामाकरितांच घ्यावें, त्याचा संबंध दुसऱ्या गोष्टींशीं येऊं नये.** आपण फक्त तीन गोष्टींकडेच कटाक्षानें लक्ष द्यावें. एक, आचरण अगदीं शुद्ध ठेवावें; दुसरें, नामाला कधींहि सोडूं नये; आणि तिसरें, माझा सांभाळ करणारा कोणीतरी (म्हणजे सद्‌गुरु) आहे ही जाणीव ठेवावी. प्रत्येक माणसाला कशाची तरी आवड असते. ज्यामध्यें पडलें असतां दुःखाची जाणीव कमी होते तिचें नांव आवड होय. त्या आवडीमध्यें आपण राहावें आणि त्यांत जबरीनें नाम घ्यावें. आत्मज्ञान व्हावें म्हणून त्याच्यामागें लागलें तर तें लवकर होत नाहीं. भगवंताकडे लक्ष लागलें कीं आत्मज्ञान आपोआप होतें; भगवंताचें नाम घेणें हें ज्ञान होण्याचेंच लक्षण आहे. उत्तम वस्तु नेहमीं थोडीच असते. श्रीखंडामध्यें चक्का व साखर कितीतरी असते, पण केशर किती थोडें घालावें लागतें? तसें भगवंताच्या नामाचें आहे. रोज थोडें पण अगदीं मनापासून आणि मोबदल्याची अपेक्षा न करतां नाम घ्यावें, तें फार काम करील. भगवंत हा सर्वसत्ताधीश खरा, पण एका बाबतींत तो लुळापांगळा होतो व सहज अडकतो. भुंगा जसा लांकूड पोखरतो पण कमळांत अडकतो, तीच स्थिति नामाच्या बाबतींत भगवंताची होते. वेदांती लोक ज्याला "ब्रह्म" असें म्हणतात, त्यालाच भक्त 'नाम' असें म्हणतात. एखाद्या वांड मुलाप्रमाणें मनाला वाटेल तिकडे जाऊं द्यावें, आपण नामस्मरण केल्यानें तें आपोआपच नामांत येईल. तेलाची चूळ घेऊन पाण्यांत सोडली तर प्रकाश पडतो, तसें नामाची 'चूळ' घेऊन संसार करावा म्हणजे त्यांत प्रकाश पडेल.

---

१६. सर्व विसरून भगवंताला आळवलें कीं तो कृपा करतो.

# नाम व इतर साधने

१७ जानेवारी

नवविधा भक्तीचा दासबोधांत सांगितलेला क्रम हा सृष्टिनियमाला धरून आहे; श्रवण, कीर्तन, विष्णु-स्मरण, इत्यादि. मनुष्यप्राणी जन्माला आला की शिकायला सुरुवात करतो तें श्रवणापासून. श्रवण करील तेंच वाचेनें बोलतां येतें, मुके लोक बहिरे असलेच पाहिजेत, कारण श्रवण न झाल्याकारणानेंच त्यांना बोलतां येत नाहीं. मनुष्यप्राणी ज्या देशांत जन्माला येतो, त्या, देशाची भाषा तो बोलतो. म्हणून श्रवणानंतर कीर्तन (बोलणें), आणि बोलणें झाल्यानंतर कृति म्हणजे नामस्मरण, असा स्वाभाविक क्रम लागतो. नामस्मरण होऊं लागलें कीं आपलें काम झालें. पुढल्या सर्व भक्ति नामस्मरणांत येतात, त्यांच्याकरितां निराळी खटपट करण्याचें कारण नाहीं. एका इसमाला दुसऱ्या इसमाला भेटण्यासाठीं नऊ मैल अंतरावर असलेल्या ठिकाणीं जायचें होतें. म्हणून तो घरांतून निघाला; पण ज्याला भेटायचें होतें तोच मनुष्य तीन मैल चालून गेल्यावर त्याला भेटला तर आपलें काम झालें म्हणून तो जसा पुढें जाण्याच्या खटपटींत पडणार नाहीं, त्याचप्रमाणें नामस्मरणाच्या बाबतींत पुढल्या सहा प्रकारच्या भक्तीची स्थिति आहे.

नामस्मरणाची बुद्धि झाली कीं आपलें काम झालें. नामांत प्रेम येणें जरूर आहे; याकरितां तें नाम अत्यंत आवडीनें, आणि त्याच्याशिवाय दुसरें कांहीं साधायचें नाही अशा भावनेनें घेतलें पाहिजे, म्हणजे त्यांत प्रेम येईल. नाम हें अत्यंत उपाधीरहित आहे, त्याला कोणत्याहि उपकरणाची गरज नाहीं. रोगी-निरोगी, विद्वान्-अडाणी, श्रीमंत-गरीब, लहान-थोर, स्त्री-पुरुष, जात-गोत, यांपैकीं कोणतीहि गोष्ट असली तरी अडत नाहीं आणि नसली तरी अडत नाहीं. नामाशिवाय दुसऱ्या कोणत्याहि साधनाला शक्ति, बळ, पैसा वगैरे कोणत्या तरी गोष्टीची मदत लागते. म्हणून असें हें अत्यंत उपाधीरहित नाम, त्यांत प्रेम येण्यासाठीं, आपण उपाधीरहित होऊन घेतलें पाहिजे. नामांत प्रेम येणें ही फार उच्च कोटीची स्थिति आहे. ती अगदीं सहजासहजीं प्राप्त होणारी नाहीं. म्हणून त्यांतलें वर्म ओळखून योग्य तऱ्हेनें आणि चिकाटीनें सतत नामस्मरणाचा अभ्यास ठेवणें जरूर आहे. " **भगवंताच्या नामाशिवाय मला कांहीं कळत नाहीं** " असें ज्याला कळलें त्याला सर्व कळलें.

---

१७. एखादे वेळीं मनुष्य भगवंतावांचून जगांत अजिंक्यपत्र मिळवूं शकेल, पण शांति मात्र जर तो भगवंताचा झाला तरच त्याला मिळेल.

# नाम श्रद्धेनें वा निष्ठेनें घेणें

**१८ जानेवारी**

नाम श्रद्धेनें घेणें म्हणजे अमक्या अमक्या व्यक्तीनें सांगितलें म्हणून घेणें. (अर्थात् तीं व्यक्ती म्हणजे आपला गुरु, किंवा ज्याच्याबद्दल आपली पूज्य भावना असते ती व्यक्ति.) अशा श्रद्धेनें नाम घेणाऱ्याच्या मनांत शंका येत नाहीं. ही स्थिति फार भाग्याची, पण तितकीच दुर्मिळ. निष्ठेनें नाम घेणें म्हणजे शंकारहित नाम घेणें. शंका अनेक तऱ्हेच्या असतात. नाम घेतांना भगवंताकडे लक्ष नसलें तर त्या नामाचा उपयोग आहे की नाहीं, नाम घेतांना कोणती बैठक असावी, दृष्टि कशी असावी, शुचिर्भूतपणेंच नाम घ्यावें किंवा कसें, अशा तऱ्हेच्या अनेक शंका मनांत येतात. थोडक्यांत असें म्हणतां येईल कीं, आपण जें नाम घेतों तें भगवंतापर्यंत पोंचतें कीं नाहीं ह्या एका शंकेंत सर्व शंकांचा समावेश होतो. भगवंत आणि त्याचें नाम हीं एकरूपच असल्यानें त्या दोहोंच्या आड कांहींच येऊं शकत नाहीं. एखाद्या व्यक्तीच्या पाठीमागून आपण चाललो असतां आपल्या तोंडून त्याचें नांव उच्चारलें गेलें तर तो लगेच मागें वळून बघतो. ही जर मनुष्याची स्थिति, तर भगवंताच्या बाबतींत त्याचें नांव त्याच्यापर्यंत पोंचत नाहीं हें कसें शक्य आहे? खरें पाहिलें तर भगवंताचें नांव त्याच्याच कृपेनें आपल्या मुखांत येतें; म्हणजे त्याचें नांव तोच घेत असतो; मग नाम भगवंतापर्यंत पोंचतें कीं नाहीं ह्या शंकेला वावच कोठें राहिला? समजा, दोन माणसें जेवायला बसलीं. त्यांतल्या एकाच्या मनांत कांहीं विचार घोळत असून त्याचें जेवणाकडे लक्ष नव्हतें, पण हातानें तोंडांत एकेक घांस घालण्याचें काम चालू होतें. दुसरा इसम मात्र लक्षपूर्वक जेवण जेवीत होता. दोघेहि जेवून उठले. ह्यांत उपाशी कोण राहिला? दोघांचीहि पोटें भरलींच! तसें, नाम घेतल्यानंतर त्याचा उपयोग झाला नाहीं असें कसें होईल? समजा, आपण परगांवच्या एका अनोळखी इसमाला पत्र लिहून त्याला बोलाविलें; तो आला आणि त्यानें सांगितलें कीं, तुम्हीं ज्याला पत्र पाठविलेंत तोच मी; तर त्याच्यावर आपण विश्वास ठेवून त्याला जवळ करतों, तसें भगवंतानें सांगितलें आहे कीं, "जेथें माझें नाम तेथें मी पुरुषोत्तम;" तर मग त्याच्यावर श्रद्धा ठेवून नाम घ्यावें आणि त्यांतच त्याला पाहावें असें कां करतां येऊं नये? हीच श्रद्धा. आपण ज्याच्या पोटीं जन्माला आलो त्याचेंच फक्त नांव आपण आपल्या नांवापुढें लावतों; तसें भगवंताच्या बाबतींत करावें. भगवंताच्याच नांवानें जगावें; म्हणजे, माझा सर्व कर्ता, रक्षिता तो एकच असून त्याच्याशिवाय दुसरें कोणीहि ह्या जगांत माझें नाहीं, त्या भावनेनें राहावें. लहान मुलाला बापाइतकें उंच होण्याची इच्छा झाली तरी तें त्याला शक्य नसतें; त्यावेळीं बापच त्याला उचलून वर घेतो, तें इतकें कीं, त्या मुलाची उंची बापाच्या उंचीपेक्षांहि जास्त होते; **तसे जो भगवंताचा झाला, त्याचें महत्त्व तो स्वतःपेक्षां जास्त वाढवितो.**

---

१८. तीर्थामध्यें जाऊन आल्याची खूण । कांहीं पालटावे अवगुण ॥
अवगुणांत अवगुण । भगवंताचें विस्मरण ॥

# नाम व प्रारब्धभोग

**१९ जानेवारी**

नामाचा संबंध प्रारब्धाशीं कसा आहे याबद्दल पुष्कळ लोक मला विचारतात. हा प्रश्न एका दृष्टीनें फार महत्त्वाचा आहे, कारण बहुतेक लोक प्रारब्ध टळावें म्हणून नाम घेतात. देहाचे सुखदुःख हें माझेंच सुखदुःख आहे. किंबहुना, देह सुखी तर मी सुखी आणि देह दुःखी, तर मी दुःखी, अशी सामान्य मनुष्याची अवस्था असतें खरें ! प्रारब्धाचे भोग हे आजपर्यंत कोणालाहि चुकले नाहींत. मग कसें करावें ? इथें असें लक्षांत ठेवावें कीं, प्रारब्धाची गति फक्त देहापुरतीच असते; म्हणून, ज्याची देहबुद्धि कमी झाली तो देहाच्या सुखदुःखानें सुखी वा दुःखी होत नाहीं. नामानें देहबुद्धि कमी होते, म्हणून प्रारब्धाचे भोग भोगीत असतांना देखील नामांत मनुष्य आनंदांत असतो. नामाच्या आनंदापुढें त्याला प्रारब्धाची किंमत राहात नाहीं. **नामाचें सामर्थ्य फार विलक्षण आहे. पूर्वी घडलेले अपराध नाम नाहींसे करतें. वायां गेलेल्या माणसांना नाम तारतें. नाम हा सर्व प्रार्थनांचा, सेवेचा, पूजेचा राजा आहे.** नामानें आनंदमय अशा भगवंताचें सान्निध्य लाभल्यानें त्याची कृपा व्हायला वेळ लागत नाहीं; किंबहुना ज्याच्यावर भगवंताची कृपा होते त्याच्याच मुखांत नाम येतें. सर्व काळीं, सर्व ठिकाणीं सर्व अवस्थांच्यामध्यें कोणालाहि करतां येण्यासारखें नाम हेंच एक साधन आहे. नामाला उपाधि अत्यंत कमी असल्यानें निरुपाधिक भगवंताशीं नातें जोडायला नामासारखें साधन नाहीं. किती प्रकारांनी खरोखर तुम्हांला मी सांगू ! अखंड नामांत राहणें यालाच मोक्ष म्हणतात. अखंड नामांत जगणें यालाच पराभक्ति म्हणतात. जो नामांत अखंड गुंतला त्यालाच संत म्हणतात. नामांत प्रेम येणें ही संतांची खरी खूणच आहे. माझें एवढें ऐका : नामाला कदापिहि विसरूं नका. प्रारब्धाच्या भोगांना न कंटाळता, भगवंतानें ज्या स्थितींत आपल्याला ठेवलें असेल त्यामध्यें समाधान माना, पण केव्हांहि त्याच्या नामाला विसरूं नका. नामानें पापी माणसें पुण्यवान बनतात. देहबुद्धि कमी होणें हेंच पुण्य होय. आणि तें नामानें प्राप्त होतें. नामानें कलीची सत्ता नाहींशी होते. वाईट किंवा विषयाच्या वासनेनें बुद्धि भ्रष्ट करणें हेंच कलीचें मुख्य लक्षण होय. त्याच्या मुळावर घाव घालण्याचें काम नाम घेतल्यानें होतें, म्हणून नामधारकाला कलीची बाधा नाहीं आणि प्रारब्धाची क्षिती नाहीं. नामानें पुण्यशरीर बनतें. ज्याच्या अंतरांत नाम असतें तिथें भगवंताला यावें लागल्यानें त्याच्या शरीरांत सत्त्वगुणाची वाढ होत जाते आणि तो पुण्यवान बनतो. साध्या माणसानें विशेष खोलामध्यें न शिरतां सांगितल्याप्रमाणें नाम घ्यावें. त्याचें कल्याण झाल्याशिवाय राहणार नाहीं, याची जरूर खात्री बाळगा.

---

१९. भगवंताला स्मरून काम करीत असतां जें योग्य दिसेल तें त्याच्या इच्छेनेंच आहे असें समजून काम करावें. जो असें करील त्याला समाधान झालेंच पाहिजे.

# नाम हाच भगवंताचा शिक्का

२० जानेवारी

नाम घेणें म्हणजे सर्वस्व देणेंच होय. मोठा अधिकारी आपल्या सहीचा शिक्का करतो. तो ज्याच्या हातामध्यें असतो तो मनुष्य त्या शिक्क्यानें साहेबाइतकेंच काम करवून घेऊं शकतो. हें जसें व्यवहारामध्यें आहे, अगदीं तसेंच भगवंताच्या बाबतींतहि आहे. **जे काम प्रत्यक्ष भगवंत करतो, तेंच काम त्याचें नाम करीत असतें.** एखादा ध्यान लावणारा मनुष्य ध्यानामध्यें असेपर्यंत रूप बघेल, पण इतर वेळीं त्याला नामांतच राहावें लागेल. अखंड नाम घेणें हीं कांहीं सोपी गोष्ट नाहीं. ध्रुवासारखी नामावर निष्ठा पाहिजे. प्रत्यक्ष भगवंत समोर आला तरी त्यानें नाम सोडलें नाहीं. उत्तम आंबा पाहिजे असेल तर उत्तम आंब्याची कोय पेरली पाहिजे. अशी कोय म्हणजे भगवंताचें नाम आहे. तें ज्यानें आपल्या हृदयांत ठेवलें त्याच्या झाडाला उत्तम फळ आलेंच पाहिजे. सर्व सारांचें सार, जन्मास आल्याचें सार्थक, आणि सर्व पुण्याची कमाई, म्हणजे 'मी भगवंताचा झालों' अशी जाणीव करून घेणें; ह्याशिवाय दुसरें कांहीं नाहीं. देह प्रारब्धावर टाकून; आपण त्याहून निराळें राहून, जें होईल त्यांत आनंद मानावा. नामाचें अनुसंधान । प्रपंचांत सर्वांचें समाधान ॥ जें जें होईल तें तें समाधानाचेंच कारण । रामास व्हावें अर्पण ॥ मोह, ममता, देहाचा अभिमान । हा संसाराचा पसारा जाण तेथें ठेवूं नये मन ॥ रामाचरणी लावावें मन । इतकें करावें तुम्ही थोडें फार ॥ नाहीं करूं दुसरी यातायात जाण । नाहीं देहाला कष्ट देऊं । अनुसंधान न द्यावें बिघडूं ॥ नामांत आहे समाधान । हा विश्वास ठेवावा पूर्ण ॥ मी मागतसें एक दान । तें द्यावें तुम्हीं सर्वांनीं ॥ नावापरतें नका मानूं सुख । रामापायी करून घ्यावें आपणांस अर्पण ॥ याहून नको मज कांहीं । एवढी भीक घालावी सर्वांनीं ॥ व्यवहार, लौकिक, विषयाची आवड । हेच परमार्थाला मुख्य येतील आड ॥ त्यांना सारावें बाजूस । एक भजावें भगवंतास ॥ नाहीं सत्य मानूं जगीं कांहीं । रामाचा आसरा घ्यावा हृदयीं ॥ जोपर्यंत देहाचा संबंध । तोपर्यंत लौकिकाची चाड ॥ देह जाईल उठाउठी । लौकिक कोठें राहील पाठीं ? ॥ त्याची धरूं नये चाड । नाहीं सोडूं भगवंत जाण ॥ प्रपंचाच्या थोड्या सुखासाठीं । नाहीं अंतर देऊं जगजेठी ॥ चार वेद सहा शास्त्रें । सर्व केल्या स्मृति पारायण ॥ तरी पण जोंवरी मन नाहीं झालें स्थिर । तोंवर तेथें कोठें समाधान ॥ सर्व शास्त्रांचें सार । एक भजावा रघुवीर ॥ नामीं ठेवावें लक्ष पूर्ण । तेणें होईल समाधान ॥ तुम्हीं घ्यावें नाम । म्हणजे होईल तुमचें काम ॥

---

२०. रामचरणीं लावावें मन । इतकें करावें तुम्ही थोडे फार । नाहीं करूं दुसरी यातायात ॥

# नामाचा अनुभव

**२१ जानेवारी**

[ एक बाई श्रीमहाराजांना भेटली व तिनें त्यांच्याजवळून शाळिग्राम घेतला. त्यावेळीं ती बाई म्हणाली, "महाराज, मला मनापासून शंकराची आवड आहे, आणि मी तर हा शाळिग्राम आपल्याकडून घेतला. तेव्हां कसें करावें ?" त्यावर श्रीमहाराज म्हणाले:– ]

महत्त्व नामाला आहे, उपासनेंत फरक नाहीं. **उपासना कोणतीहि असली तरी नामाशिवाय ती पचनीं पडत नाहीं.** निरनिराळ्या देशांतलें अन्न निरनिराळें असूं शकतें पण तें पचविण्याकरितां लागणारें पाणी इथून तिथून सर्व सारखेंच. पाण्याशिवाय कोणतेंहि अन्न पचणार नाहीं. त्याप्रमाणें उपासनारूपी अन्नाला पचविण्यासाठीं नामरूपी पाण्याची जरूरी आहे. म्हणून नामाला महत्त्व देऊन तें सतत घेण्याचा अभ्यास करावा.

भगवंताच्या नामाचा नाद लागला तर दुःखाची जाणीव कमी होते. दुःखाची जाणीव नसल्यावर दुःख असलें म्हणून बिघडलें कुठें ? काळोख्या रात्रीं जशी काठी आधार असते, तसें संसारांत नाम आहे. खांचखळगे काठीच्या योगानें टाळतां येतात, तसें मोह, लोभ, इत्यादि संसारांतल्या अडचणी नामानें समजतात आणि दूर करतां येतात. विस्तवाजवळ तूप ठेवलें कीं तें विरघळतें, तसें नामाची शेगडी ठेवली कीं अभिमान वितळलाच पाहिजे. हाच नामाचा अनुभव. पण लोक नामाबद्दल ऐकूनच घेत नाहींत; जर कोणी ऐकून घेतलें तर तें खिंचवून घेत नाहींत, त्याचें मनन करीत नाहींत; आणि मनन करून ज्यांना पटलें ते, तें पटलें असूनहि करीत नाहींत. अडचणी असल्या तरी नाम घेतां येतें. म्हणून नामस्मरण न करण्याबद्दल सबबी सांगूं नका. सबब सांगितली कीं त्यापासून लबाडी उत्पन्न होते, लबाडींतून आळस उत्पन्न होतो; आणि आळसानें सर्वनाश होतो. आपण रोज उठल्यावर भगवंताचें स्मरण करण्याचा नियम ठेवावा. स्नान वगैरे गोष्टी झाल्या तर कराव्याच, पण त्यांच्यावांचून अडून बसूं नये. भगवंताचें स्मरण हें मुख्य आहे. नाम घ्यायला स्वतःचीच आडकाठी असते, ती दूर केली तर नामाचा अनुभव आल्यावांचून राहणार नाहीं.

नामाचा अनुभव कोणता ? नामाचा अनुभव नामाव्यतिरिक्त दुसऱ्या कशांतहि पाहूं नये, म्हणजे, नामापासून दुसरें कांहीं मिळवायचें आहे ही कल्पनाच नसावी. नाम मुखीं येतें हाच नामाचा अनुभव. ज्या प्रमाणांत आपल्या हातून नामस्मरण घडलें त्या प्रमाणांत आपल्याला नामाचा अनुभव आला. अखंड नामस्मरण टिकलें, कीं पुरा अनुभव आला.

---

२१. भगवंताच्या देखत आपल्याला करायला लाज वाटणार नाहीं अशीच कृति आपण करावी, आणि नेहमीं त्याचें स्मरण ठेवावें.

# नाम हें स्वतःसिद्ध आहे

**२२ जानेवारी**

नाम हें स्वतःसिद्ध आहे म्हणूनच तें अत्यंत उपाधीरहित आहे. तें नाम घेतांना आपणच पुष्कळदां त्याच्या मागें उपाधि लावतो; ती म्हणजे, आपण ऐहिक सुखाच्या प्राप्तीकरितां नाम घेतो किंवा मी नाम घेतों ही अहंकाराची भावना बाळगतो. या उपाधीमुळें आपल्या प्रगतीला बरेच अडथळे येतात; म्हणून नामाकरितांच नामस्मरण आणि तेंहि सद्‌गुरु आपल्याकडून करवून घेतात या भावनेनें करावें. त्या योगानें अहंकार नष्ट होऊन शरणागति येईल. **शरणागतीला रामनाम हाच रामबाण उपाय आहे**; तो आपण करावा. प्रत्येक वाराची कहाणी असते, ती त्या त्या वारालाच म्हणतात. नामाची कहाणी नित्य नवी होईल, आणि वार संपले तरी शिल्लकच राहील. नामाचा महिमा वाचेनें सांगणें अशक्य आहे, पण हें सांगण्याकरितां तरी बोलावें लागतें इतकेंच. भवसागर तरून जाण्यासाठीं नाम हेंच साधन आहे. मनुष्यप्राणी भवसागरांत गटांगळ्या खातो आहे. समुद्रांतून तरून जाण्यासाठीं जशी नाव, तसें भवसागरांतून तरून जाण्यासाठीं भगवंताचें नांव आहे. फक्त एकच दक्षता घेणें जरूर आहे. ती ही कीं, नावेंत समुद्राचें पाणी येऊं नये; नाहींतर नावेसकट आपण बुडून जाऊं; त्याप्रमाणें संसाररूपी समुद्राचें पाणी नामरूपी नावेंत येऊं देऊं नये. म्हणजे, कोणत्याहि प्रापंचिक अडचणीमुळें नामांत व्यत्यय येऊं देऊं नये. तसेंच नामाचा उपयोग संसारांतल्या अडचणी दूर होण्याकरितां व्हावा ही बुद्धि न ठेवतां नामाकरितांच नाम घ्यावें; म्हणजे नावेंत पाणी न शिरतां सुखरूपपणें पैल तीराला म्हणजे भगवंतापर्यंत पोंचतां येतें.

सोन्यामोत्याचे दागिने घालणारी श्रीमंताची बाई असूं द्या, बेताचे लहान दागिने घालणारी मध्यम स्थितींतील बाई असूं द्या किंवा चांदीचीं जोडवी आणि नुसतें मंगळसूत्र घालणारी अगदीं गरिबाची बाई असूं द्या, त्या सर्वांना कुंकू ज्याप्रमाणें सारखेंच असतें, त्याप्रमाणें कसलाहि भेद न ठेवतां नाम हें सर्वांना सारखेंच साधन आहे. ज्या वेळीं वाईट विचार मनांत येतील, त्यावेळीं भगवंताचें नांव घेतलें तर त्या विचारांची मजल पुढें जाणार नाहीं. सूर्य हा फक्त प्रकाश देतो; पण त्यामुळें अंधार आपोआप नाहींसा होतो. तसेंच नाम हें भगवंताचें प्रेम वाढवितें; मग आपले दोष आपोआपच नाहींसे होतात.

---

२२. नामस्मरण, सद्‌गुरूच आपल्याकडून करवून घेतात या भावनेनें करावें.

# नामस्मरणरूपी शेताची मशागत

**२३ जानेवारी**

नामस्मरणरूपी शेतांत उत्तम पीक येण्यासाठीं कोणकोणत्या गोष्टींची जरूरी आहे ? ( १ ) **सदाचरण**:– हें शेताचें रक्षण करण्याकरितां लागणाऱ्या कुंपणासारखें आहे, म्हणून महत्त्वाचें आहे. ( २ ) **शुध्द अंत:करण**:–म्हणजेच उत्तम काळी भुसभुशीत जमीन. या जमिनीमधले दगड, चुना, हरळी काढून साफ करावी; म्हणजे, अंत:करणांत कोणाबद्दलहि द्वेष, मत्सर, वगैरे ठेवूं नये. ( ३ ) **नामस्मरण** :– हें त्या जमिनींत पेरण्याचें बीं आहे. हें बीं किडकें नसावें; म्हणजे नाम सकाम नसावें. उत्तम बीं म्हणजे 'नामाकरितांच नाम' हें आहे. ( ४ ) **तीर्थक्षेत्रें, संतांचे आशीर्वाद, कृपादृष्टि, वगैरे**:– या सर्व गोष्टी पाटाच्या पाण्यासारख्या आहेत; यामुळें शेत चांगलें यायला मदत होते. ( ५ ) **भगवत्कृपा**:– ही पावसाच्या पाण्यासारखी आहे. पाटाच्या पाण्यापेक्षां पावसाच्या पाण्याची गोष्ट कांहीं और आहे. पण तो पडणें न पडणें आपल्या हातांत नाहीं. शेताला लावण्याकरितां पाटाचें पाणी एखादी विहीर, तलाव किंवा नदी यांमधून नेतां येणें शक्य असतें; परंतु पावसाच्या बाबतींत कोणाला कांहींच करतां येत नाहीं. त्यामुळें, एखाद्यानें मघां सांगितल्याप्रमाणें शेताची उत्तम निगा राखली, उत्तम बीं पेरलें तरी पावसाच्या अभावी पीक न येण्याचा संभव असतो. परंतु नामस्मरणरूपी शेताचें एक वैशिष्ट्य आहे. तें हें कीं, त्याच्या अंगी लोहचुंबकासारखी आकर्षक शक्ति आहे. म्हणून हें शेत भगवत्कृपारूपी पाऊस खेंचून घेऊन आपल्यावर पाडतें, त्यामुळें पावसाच्या अभावीं शेत वायां गेलें असें कधींच होत नाहीं. आपण असें पाहूं कीं, दोन शेतकरी आहेत; एक कर्तव्यकर्म म्हणून वेळ झाली कीं आपल्या शेताची मशागत करणारा आहे, तर दुसरा आळशी म्हणजे मशागत न करणारा आहे. आतां जेव्हां पाऊस पडेल तेव्हां, ज्यानें मशागत केली त्याचें शेत उत्तम वाढेल, पण दुसऱ्याचें वाढणार नाहीं. भगवंताच्या कृपेनें जो पाऊस पडणार, त्याचा एकाला फायदा मिळेल. तो दुसऱ्याला मिळणार नाहीं. म्हणजे जो नियम प्रपंचांत लागू तोच नियम परमार्थांत लागूं. **भगवंताची कृपा सर्वांवर सारखाच वर्षाव करीत असते.** ज्यानें ज्या प्रमाणांत चित्तशुद्धि केली असेल, त्या प्रमाणांत त्याला फायदा होईल, दुसऱ्याला नाहीं होणार. भगवंत किंवा संत समदृष्टि असतात ते असे. त्यांच्या ठिकाणीं जर विषमता दिसली तर तिचा उगम किंवा कारण आपल्यांतच आहे हेंच यावरून दिसतें.

---

२३. जो नामांत राहिला त्याचा वासनाक्षय झाला; आणि जिथें वासना संपली तिथें भगवंताची कृपा झाली.

# नामसाधन कसें करावें ?

**२४ जानेवारी**

नामाचें साधन कसें करावें ? एखाद्या दगडावर पुष्कळ पाणी एकदम ओतलें तर तो दगड नुसता भिजेल आणि पाणी निघून जाऊन कोरडा होईल. पण तेंच पाणी थेंब थेंब असें एकाच ठिकाणीं आणि अखंड पडत राहिलें तर त्या दगडाला भोंक पडेल, आणि कांहीं दिवसांनीं दगड फुटूनहि जाईल; त्याप्रमाणें केव्हांतरी पुष्कळ साधन करण्यापेक्षां अगदी अल्प प्रमाणांत कां होईना पण नित्यनेमानें, ठराविक वेळीं, आणि शक्य तर ठराविक स्थळीं, जर नामाचें साधन केलें तर तें जास्त परिणामकारक होतें. जात्याला दोन पेठीं असतात; त्यांतलें एक स्थिर राहून दुसरें फिरत राहिलें तर दळण दळलें जाऊन पीठ बाहेर पडतें; पण जर दोन्ही पेठीं फिरत राहिलीं तर दळण दळलें न जातां फुकट श्रम मात्र होतात. माणसाचीं शरीर आणि मन अशीं दोन पेठीं आहेत. त्यांतील मन हें स्थिर आहे आणि देह हें फिरणारें पेठें आहे. मन परमेश्वराच्या ठिकाणीं स्थिर करावें आणि देहानें प्रपंचाच्या गोष्टी कराव्यात. प्रारब्धाचा संबंध देहापर्यंतच असतो. प्रारब्धरूपी खुंटा देहरूपी पेठ्यांत बसून तो त्याला फिरवितो आणि मनरूपी पेठें स्थिर असतें. **देह प्रारब्धावर सोडावा, आणि मन भगवंताच्या स्मरणांत स्थिर ठेवावें याहून नामाचें साधन दुसरें काय !** हें साधन अमक्यालाच साधेल असें नाहीं, तें कोणालाही साधेल. गरिबाला गरिबीचें दुःख होतें म्हणून साधत नाहीं, तर श्रीमंताला पैशाचा अभिमान आणि लोभ असतो म्हणून साधत नाहीं; विद्वानाला विद्येचा अभिमान होतो म्हणून साधत नाहीं, तर अडाण्याला काय करावें हें समजत नाहीं म्हणून साधत नाहींत. साशंक वृत्तीनें कितीहि साधन केलें, कितीहि नामस्मरण केलें, तरी कधीं समाधान होणार नाहीं. गुरुचरणीं अत्यंत विश्वास। साधनाचा अखंड सहवास। येथें प्रपंचाचा सुटला फांस। हाच परमार्थाचा मार्ग आहे खास॥ नीतिधर्माचें आचरण, शास्त्रशुद्ध वर्तन, शुद्ध अंतःकरण, आणि भगवंताचें स्मरण, इतक्या गोष्टी असतील तरच साधक शेवटपर्यंत पोंचेल, आणि शेवटपर्यंत तो पोंचला तरच फायदा. घरीं पोंचल्यावर पत्र लिहा असें म्हणतात याचा अर्थ हाच आहे. प्रपंच करीत असतां वाईट विचार मनांत येतात, त्याचप्रमाणें परमार्थ करीत असतां वाईट विचार आले म्हणून घाबरण्याचें कारण नाहीं. दृढ विश्वासानें नाम चालू ठेवावें. जेथें कर्तव्याची जागृति आणि भगवंताची स्मृति आहे तेथेंच समाधानाची प्राप्ति होतें.

---

२४. मन परमेश्वराच्या ठिकाणीं स्थिर करावें आणि देहानें प्रपंचाच्या गोष्टी कराव्यात.

# अखंड नामस्मरण हेंच जन्माचें सार्थक

**२५ जानेवारी**

नामस्मरण हें प्रपंचाकरितां म्हणजे तो चांगला व्हावा म्हणून नाहीं, तर प्रपंचाची आसक्ति कमी करण्यासाठीं आहे. तरी पण त्यानें प्रपंच बिघडणार नाहीं. जें होईल तें आपल्या बऱ्याकरितां आहे असें मानून परमात्म्यावर विश्वास ठेवून राहावें. कारवारकडचे एक गृहस्थ भेटायला आले आणि म्हणाले, " मी रिकाम्या वेळांत नामस्मरण करतो. " त्यावर मीं म्हटलें, " साऱ्या जन्मांत महत्त्वाचा आणि सार्थकीं लागलेला वेळ असेल तर तो हाच; त्याला तुम्ही रिकामा वेळ कसा म्हणतां ? " पुढें तो म्हणाला, " प्रारब्धाचे भोग कांहीं केल्या टळत नाहींत, ते भोगावेच लागतात, असें सर्व संत सांगतात. हें जर खरें, तर प्रारब्धाचे भोग आपण भोगत असतांना त्यामध्यें भगवंताच्या स्मरणाची काय गरज आहे ? " खरोखर हा प्रश्न अगदीं बरोबर आहे. आपल्याच कर्माचे भोग आपल्यालाच भोगावे लागतात हें खरें. पण भोग आले कीं आपल्या मनाला चैन पडत नाहीं. म्हणून मनाला भगवंताच्या स्मरणांत गुंतवून ठेवलें कीं आपलें समाधान टिकतें. आपल्या सध्यांच्या अवस्थेमध्यें, " भगवंताच्या इच्छेनें घडायचें तें घडतें " असें मानणें, किंवा " भगवंत चांगलें करील " असा विश्वास ठेवून वागणें, हेंच सोपें जाईल. हें दिसायला साधें दिसलें तरी यांत फार मोठें मर्म सांठविलें आहे हें ध्यानांत धरा. " भगवंताच्या इच्छेनें घडणार तें घडूं द्यावें " अशी निष्ठा उत्पन्न व्हायला त्याचें अनुसंधान सतत ठेवलें पाहिजे. " विषय कसा सुटेल ? मन एकाग्र कसें होईल ? " हें न कळलें तरी चालेल. **सोडण्याच्या गोष्टीचा अभ्यास करण्यापेक्षा धरण्याच्या गोष्टीचा, म्हणजे अनुसंधानाचा अभ्यास करावा.** एक भगवंताचें अनुसंधान ठेवलें कीं सर्व गुण आपोआपच वाढतील. तें कसें घडतें ? तर शरीराचे अवयव सारख्या प्रमाणांत वाढतात तसें. झाडाच्या मुळाला पाणी घातलें कीं त्याच्या सर्व भागांना तें पोंचतें, तसें भगवंताचा विसर पडूं न दिला तर सर्व कांहीं होतें. " अज्ञानाच्या अंधकारानें दुःख भोगीत असतांना तूं माझें स्मरण, माझें अनुसंधान ठेव, म्हणजे तुला पुढें उजेड दिसेल, " असें गीतेमध्यें प्रत्यक्ष श्रीकृष्णच अर्जुनाला सुचवीत आहे. दिवा जळायला हवा असेल तर त्यामध्यें सतत तेल घातलें पाहिजे; तसें भगवंताचें अनुसंधान सारखें राहण्यासाठीं त्याचें नामस्मरण आपण सतत करीत असावें.

---

२५. मनाला भगवंताच्या स्मरणांत गुंतवून ठेवलें कीं आपलें समाधान टिकतें.

...४

# अंतकाळचें नामस्मरण

**२६ जानेवारी**

अंतकाळीं नामस्मरण होणें म्हणजेच अंतकाळ साधणें; आणि हा साधण्यासाठीं आधीं नामस्मरण करायला पाहिजे. अंतकाळ साधत असेल तर आणखी जगून काय करायचें ? आणि तो साधत नसल्यास आणखी जगून काय उपयोग ? अंतकाळ साधण्यासाठींच जगावें. देवापाशीं "मला तूं आपला म्हण, माझें मन तुझ्या चरणीं अर्पण केलें, आतां मला तुजजवळ कांहींहि मागण्याची इच्छा न होवो," असें मागावें. परमेश्वर आपल्या मागेंपुढें आहे असें अखंड मानावें, भगवंताचें स्मरण करणें, म्हणजे जे कांहीं आपल्या हातून घडतें आहे तें त्याच्याच इच्छेनें घडतें आहे असें समजणें, प्रपंच देवाचा मानून अभिमानरहितपणें तो करणें, हा परमार्थ; आणि परमात्म्यावांचून आपल्याला कोणी नाहीं याचा दृढनिश्चय होणें याचें नांव ज्ञान. हें ज्ञान बाणलें म्हणजे मनुष्य खऱ्या अर्थानें परमात्मप्राप्तीच्या मार्गाला म्हणजे साधनाला लागला. या साधनानें परमात्म्यावांचून दुसरें कांहीं आवडेनासें होतें; आणि ही जी अत्यंत आवड तिलाच भक्ति म्हणतात. या भक्तीची परिपूर्णता अंतकाळ साधण्यांत होते, म्हणून या सर्व गोष्टीला सतत नामस्मरण किंवा अखंड अनुसंधान हेंच एकमेव साधन सांगितलें आहे. साधन प्राणाबरोबर असावें; म्हणजे, प्राण जसे अभिमानरहित अखंड चालतात त्याप्रमाणें साधन अभिमानरहित अखंड चालावें. ते ' करतां ' कामा नये; ' करणें ' म्हणजे अभिमान आला. सहज प्राणाबरोबर झालें म्हणजे अखंड चाललेलेंच असतें; मग होत नाहीं म्हणून तळमळ कां असावी ? काशीला पोंचल्यावर मग मजल करण्याचें कारण काय ? देवळांत श्रीरामाचें दर्शन घेण्याचा जिवापलीकडे नियम केला, आणि प्रत्यक्ष राम घरीं आला तरी आपला नेम म्हणून देवळांत जायला निघाला, याला काय म्हणावें ? प्रपंचांतली तळमळ सोडून वागावें. गुरुआज्ञेंत असावें, मग ती आज्ञा कांहीं साधन न करण्यासंबंधीं का असेना. अनंत जन्मांचा देहाशीं सहवास, म्हणून देहावर प्रेम जडून देहबुद्धि होते; तसाच नामाचा सहवास पुष्कळ करावा, म्हणजे विषयाची आसक्ति कमी होऊन नामावर प्रेम जडतें. योगांत कष्ट फार, या युगांत तो साधणें अशक्यप्रायच; आणि कर्मांत तर अभिमान असतो आणि वाढतो. **भक्तींत कष्ट नसून, ती करण्यांत अभिमान टाकावा लागतो.** पहिलीं दोन साधनें परमात्म्याच्या दत्तक पुत्राप्रमाणें आहेत, तर भक्तीचें साधन म्हणजे परमात्म्याच्या औरस मुलाप्रमाणेंच आहे. भगवंताला दृष्टि आड होऊं न देणें हीच खरी भक्ति, हेंच खरें अनुसंधान, हाच खरा परमार्थ, आणि हेंच आपलें सर्वस्व आहे.

---

२६. देहानें नुसतें तीर्थस्नान, पूजापाठ वगैरे करून परमार्थ घडत नाहीं; आपली वृत्ति भगवंताच्या ठिकाणीं चिकटली पाहिजे.

# नाम हा परमात्म्याकडे जाण्याचा राजमार्ग

**२७ जानेवारी**

देहबुद्धि आहे तोपर्यंत नित्यनैमित्तिक कर्मे केलींच पाहिजेत, तीं सोडायचीं नसतात. योगांत, योग करीपर्यंतच समाधान असतें; पण नामस्मरणाच्या अनुसंधानांत सतत समाधान असतें. निर्गुण उपासना स्वतः निर्गुण झाल्याशिवाय होत नाहीं. तेज दिसणें, नाद ऐकणें, या सर्व गोष्टी गुणांतच नाहीं का आल्या? निर्गुण व्हायला देहबुद्धि सुटायला पाहिजे. सर्वव्यापी परमेश्वराला सर्वभूतीं पाहणें ही निर्गुण उपासनाच होय. योग नामस्मरणाला पोषक तितकाच करावा; केवळ त्यालाच प्राधान्य देऊं नये. योग नामस्मरणाला पोषक आहे, पण **नामस्मरण योगाच्या पलीकडे आहे**; म्हणून नामस्मरणांत योग येतो, योगांत नामस्मरण येत नाहीं. सर्व साधनांचा अंत नामस्मरणांत आहे. नामाचें साधन हें ' फास्ट ' गाडीप्रमाणें आहे. रंग दिसणें, प्रकाश दिसणें, आवाज ऐकूं येणें, हीं मधलीं स्टेशनें सोडून नाम एकदम भगवंतापर्यंत नेऊन पोंचवतें. इतर साधनांनीं लवकर साधल्यासारखें वाटेल, पण तें तात्पुरतें असतें. नामानें थोडा उशीर लागेल, पण जें साधेल तें कायमचें साधेल, कारण नामानें मुळापासून सुधारणा होते. तुकारामबुवांची वाचा त्यांना अनावर झाली, ती सारखी नाम घेऊं लागली; याचा अर्थ असा कीं, त्यांच्या कल्पनेच्या बाहेर नाम येऊं लागलें. आपल्या शक्तीच्या बाहेर कार्य होणें ही भगवंताची कृपा होय. गाडी उतरंडीला लागली की जशी अति वेगांत येते आणि आवरत नाहीं, तसें हें आहे.

नामस्मरण हा परमात्म्याकडे जाण्याचा राजमार्ग होय. नामांत एका आनंदाशिवाय दुसरें कांहीं नाहीं. नामाच्या आनंदाचा झटका आला कीं मनुष्य स्वतःला विसरेल. कांहीं काल तो त्या अवस्थेंत राहील. त्यांतून थोडा खालीं आला तर त्याची दृष्टि निराळी दिसेल. पण नाम पचलें कीं, मग तो साध्या माणसासारखाच दिसेल.

चार माणसें होतीं, त्या सर्वांना एकच रोग झाला होता. पण त्यांची सांपत्तिक स्थिति सारखी नव्हती. वैद्यानें त्यांपैकीं अगदीं गरीब माणसाला एक औषध तुळशीच्या रसांत घ्यायला सांगितलें, त्याच्यापेक्षां पैसेवाल्याला तेंच औषध मधांत घ्यायला सांगितलें, त्याच्यापेक्षां पैसेवाल्याला तेंच औषध केशरामध्यें घ्यायला सांगितलें; आणि जो सर्वांत श्रीमंत होता त्याला तेंच औषध कस्तुरीमध्यें घ्यायला सांगितलें. त्याचप्रमाणें, ज्याचा जसा अधिकार तसें त्यानें नाम घ्यावें. नाम नुसतें तोंडानें घ्यावें, नाम श्रद्धेनें घ्यावें, नाम वृत्ति सांभाळून घ्यावें, नामाशिवाय जगांत दुसरें सत्य नाहीं अशा दृढ भावनेनें घ्यावें; सर्वांना फळ सारखेंच मिळेल.

---

२७. सर्व साधनांचा अंत नामस्मरणांत आहे.

# अकर्तेपणानें नाम घेणें

**२८ जानेवारी**

काय, आतां नामस्मरण होत नाहीं असें म्हणता ? म्हणतां म्हणजे आजपर्यंत जें कांहीं झालें तें तुम्हींच केलें असें नाहीं का होत ? कोण हा अभिमान ! कां या अभिमानाचें ओझें डोक्यावर घेऊन त्याच्या दडपणाखालीं जगतां ? साधन, अभिमान घालविण्याकरितां करायचें, कीं वाढविण्याकरितां ? अभिमान घालविण्याकरितां म्हणून जें साधन करायचें त्या साधनाचाच जर तुम्ही अभिमान धरला तर तो तुमचा अभिमान जाईल कसा ? आजपर्यंत जें नामस्मरण झालें तें परमात्म्यानेंच तुमच्याकडून करवून घेतलें, आणि आतां तुमच्या हिताकरितांच त्याच्या मनांतून तुमच्याकडून करवून घेण्याचें नाहीं. तुमचें हित त्याला तुमच्यापेक्षां जास्त कळतें. नामस्मरण करणोरे असे तुम्ही कोण ? जें कांहीं होतें आहे तें परमात्म्याच्या इच्छेनेंच होतें आहे, त्यांत तुम्ही आपला मीपणा कशाला मिरवितां ? हा मीपणा, हें कर्तेपण, हें प्रपंचाच्या आणि परमार्थाच्या जबाबदारीचें ओझें, श्रीसद्‌गुरुचरणीं अर्पण करून खुशाल आपल्या आनंदांत मोकळेपणानें कां राहात नाहीं ?

एखाद्या थोरामोठ्या गृहस्थाचा मुलगा वाईट चालीचा निघाला म्हणजे लोक त्याला "यानें आपल्या बापाची अब्रू घालविली" असें म्हणतात, तशी तुम्ही माझी अब्रू घालवीत आहांत. तुम्ही माझे म्हणवितां आणि काळजींत दैन्यवाणें राहतां त्याला काय म्हणावें ? आतां तुमच्याजवळ एकच मागणें आहे. माझी अब्रू घालवूं नका, माझी एवढी लाज राखा.

**देहबुद्धि गेली म्हणजे तिच्याबरोबर सर्व कर्में नष्ट होतात.** एकानें पंचवीस खून केले, एका खुनाबद्दल फांशीची शिक्षा झाली, बाकीचे खून त्या शिक्षेंत सर्व आलेच. आहे त्या परिस्थितींत समाधान नसणें हा जो देहबुद्धीचा स्वभाव तो आपण सगळीकडे लावतो. सर्व गोष्टींचें ज्ञान होत नाहीं तोंपर्यंत आपण कांहीं करणार नाहीं, असे आपण म्हणतों; सर्व गोष्टींचें ज्ञान मेरेपर्यंत आपल्याला होत नाहीं आणि आपण कांहीं करीत नाहीं ! देहबुद्धि आपल्याला भगवंताचा विसर पाडते. या देहबुद्धीवर आपण नामाच्या मंत्राचें पाणी शिंपडूं या म्हणजे तिची वाढ होणार नाहीं.

---

२८. प्रारब्धाची आणि ग्रहांची गति देहापर्यंतच असते. मनानें भगवंत भजायला त्यांची आडकाठी येत नाहीं.

# नामांत दृढभाव कसा येईल ?

२९ जानेवारी

नामांत प्रेम नामानेंच येणार. या प्रेमासाठीं विषयावरलें प्रेम कमी करायला पाहिजे. दृढनिष्ठा पाहिजे. नामच तारील, नामच सर्व कांहीं करील, असा दृढभाव पाहिजे. तो ठेवून व्यवहारांतले प्रयत्न चालू ठेवावेत. पण यश देणारा परमात्मा, असा भाव पाहिजे. वैद्याकडचें औषध आपण गड्याकडून आणवतो, पण गुण गड्यानें दिला असें नाहीं म्हणत. याच्यापुढें जाऊन, वैद्याच्या औषधानें आलेला गुण परमात्म्यानेंच दिला, असें कां मानीत नाहीं ? परमात्म्याला शरण जाणें म्हणजे परमात्मा आपला आहे, त्याच्यावांचून आपल्याला दुसरें कोणी नाहीं, आपण कांहीं करीत नसून सर्व तोच आपल्या हिताकरितां करतो आहे, असा दृढ विश्वास ठेवणें. आपण आपल्या मुलांबायकोवर प्रेम करतों, कारण त्यांना आपलें म्हटलें म्हणून. म्हणजे प्रेम हें आपलेपणांत आहे. मग परमात्म्याला आपलें म्हटलें म्हणजे सहजच त्याच्यावर प्रेम बसणार नाहीं कां ? दुसरें असें कीं, हा आपला जिवलग सखा सर्व कांहीं आपल्या हिताकरितां करीत असल्यानें काळजीला तरी जागा कुठें उरली ? आपलें हित आपली देहबुद्धि नाहींशी होण्यांतच आहे. परमात्म्याच्या ठिकाणीं आपलेपणा उत्पन्न व्हायला त्याच्या नामाशीं पुष्कळ सहवास पाहिजे. नामांत प्रेम आहे असें म्हणत असून तें घेत असावें असें म्हणणें म्हणजेहि आत्मस्फूर्तीच होय. सिद्धीच्या, चमत्काराच्या, पाठीस लागूं नये. तीं आपल्या मार्गांत विघ्नें आहेत. उलट, त्यांनीं आपल्या पाठीस लागलें पाहिजे. एखाद्याला साप चावत नाहीं, पण त्यांत विशेष तें काय आहे ? सापांत काय किंवा कशांतहि काय, भगवद्भाव, आपलेपणा पाहतां यावा, म्हणजे कोणीहि आपले शत्रु होणार नाहींत. आई आपल्याजवळ आहे, या भावनेनें मूल जसें निर्भय असतें, तसें भगवंत आपल्यापाशीं आहे या भावनेनें आपण निर्धास्त व्हावें. आपल्याला ज्या गावाला जायचें आहे, त्या गांवची गाडी आली कीं नाहीं एवढें पाहावें; गाडींत कोण भेटतो याला फारसें महत्त्व नाहीं. समजा गाडींत आपल्याला कोणीच भेटलें नाहीं, तर स्वस्थ झोंप घेत आपल्या गांवीं जावें. त्याप्रमाणें आपण आपलें साधन करावें. सृष्टीचीं तत्त्वें किती आहेत वगैरेंच्या भानगडींत पडूं नये, त्याचा निकाल कधींच लागायचा नाहीं. **शंका गेल्याशिवाय नाम "स्थिरच" होत नाहीं हें लक्षांत ठेवावें.**

---

२९. परमात्म्याला आपलें म्हटलें म्हणजे सहजच त्याच्यावर प्रेम बसेल व याकरितां त्याच्या नामाशीं पुष्कळ सहवास पाहिजे.

# जेथें नाम तेथें परमात्मा आहेच

**३० जानेवारी**

तुम्ही सर्व भाविकजन । ऐकावें वचन ॥ तुम्हींच सर्वांनीं आजवर कष्ट केले फार । मोबदला देणार एक रघुवीर ॥ माझे भेटीं सदा राहावें । मुखानें रामनाम घ्यावें ॥ जो नामांत राहिला । तो अखंड माझ्या दर्शनांत बसला ॥ जेथें नामाचें स्मरण । तें माझें वसतिस्थान ॥ जेथें रामाचें नांव । तेथें माझा ठाव ॥ हें आणून चित्तीं । सुखें राहावें प्रपंचाप्रती ॥ नामांत ठेवा मन । हेंच माझें खरें दर्शन ॥ नेहमीं रामाचा ध्यास । हाच माझा सहवास ॥ तुम्ही सुज्ञ माझे प्राण । नाम करा तेवढें जतन ॥ नामांत ठेवावें प्रेम । तेथें माझी वसति जाण ॥ ज्यानें ज्यानें इच्छा धरावी व्हावें माझें । त्यानें नाम कधीं न सोडावें वाचें ॥ एवढें देईल जो नामदान । त्याला अर्पण करून घेईन जाण ॥ जेथें नाम । तेथें माझें धाम ॥ नामापरतें न मानी सुख । तेथेंच माझें राहणें देख ॥ **तुम्ही शक्य तितकें राहावें नामांत । हेंच माझें सांगणें तुम्हांस ॥ शक्य तों नामस्मरण करावें । म्हणजे मी तुमचेजवळ । अखंड आहे असें समजावें ॥** जेथें परमात्म्याचें नांव । तेथें माझा आहे ठाव ॥ जेथें नामाचें प्रेम । तेथेंच मी सतत जाण ॥ नामाव्यतिरिक्त कांहीं । माझें न मानावें कोणीहि ॥ जेथें नाम तेथेंच मी । हा भरंवसा बाळगून असावें तुम्ही ॥ नाहीं केलें वेदपठण । शास्त्रांचें नाहीं झालें ज्ञान । श्रुतिस्मृति उपनिषदें यांचीं नाहीं ओळखण । असा मी अज्ञान जाण ॥ तरी एक भजावें रघुनाथाशीं । अर्पण होऊन जावें त्यासी ! ऐसें जाणून चित्तीं ! खंड नाहीं समाधान वृत्ति ॥ मी आहें तुमच्यापाशीं हा ठेवा निर्धार । न सोडावा आतां धीर ॥ ठेवावा एक विश्वास । मी सतत आहें तुम्हांजवळ खास ॥ श्रीदासबोध नामस्मरण । याचें असावें वाचन । मी त्यांतच मानावें जाण । कृपा करील रघुनंदन ॥ मी तेथें आहे हें नक्की समजावें । राम सर्व ठिकाणीं आहें हें लक्षांत ठेवावें ॥ उपाधिरहित मीं तुमचे-जवळ सतत आहें ॥ मी नाहीं अशी कल्पना करूं नये । तुमचेजवळ आहें हें खात्रीनें समजावें ॥ मी नाहीं सोडून गेलों कोणाला दूर । माझी वसति तुमच्या शेजारी जाण ॥ माझें येणें जाणें तुमचे हातीं । तुम्हां सर्वांहून नाहीं परती ॥ रामापरता मी । जैसा प्राणापरता देह जाण ॥ सदा सर्वकाळ माझ्याशीं वास । हाच धरावा हव्यास ॥ त्याला न जावें लागे कोठें । घर बसल्या राम भेटे ॥ जें जें करणें आणिलें मनीं । रामकृपें पावलों जनीं ॥ कारणा-स्तव येणें झालें । आतां काम संपलें ॥ आतां पाहा मला रामांत । आनंद मानावा नामांत ॥ काळ फारच थोडा झाला । पण प्रेमा फार वाढला ॥ सर्वांनीं राखावें समाधान । जें माझें प्राणाहून प्राण जाण ॥ माझें ऐकावें सर्वांनीं । सदा राहावें समाधानी ॥ राम इच्छेनें सर्व गोष्टी घडतात । हा माझा पूर्ण विश्वास ॥

---

३०. जेथें नामाचें प्रेम । तेथेंच मी सतत जाण ॥

# नाम हाच भगवंताचा अवतार

**३१ जानेवारी**

नाम हाच भगवंताचा अवतार आहे. 'सुष्टांचें रक्षण आणि दुष्टांचा नाश करण्याकरितां मी अवतार घेतों.' असें भगवंतांनीं गीतेंत सांगितलें आहे; त्यावरून असें ठरतें कीं सुष्ट आणि दुष्ट या दोघांचेंहि आस्तित्व असून, त्यांत दुष्टांकडून सुष्टांना त्रास होण्यांतच भगवंताच्या अवताराची उत्पत्ति आहे. आजकाल पाहूं गेलें तर असें दिसतें कीं, सुष्टांचें अस्तित्वच जवळजवळ दुर्मिळ झालें आहे. म्हणजे, ज्यांचा छळ झाला असतां भगवंतानें अवतार घ्यावा, ते सुष्टच नामशेष झाल्याकारणानें अवतार तरी कसा व्हावा? याचा अर्थ, अवतार होणारच नाहीं, असें नाहीं; पण वस्तुस्थिति काय आहे तें यावरून आपल्याला समजेल. आजची परिस्थिति आणि मागची परिस्थिति यांत फरक आहे. पूर्वी सद्‌वासना जिवंत होती, पण ती उघडपणें कृतींत आणणें कठीण होतें. आतां सद्‌वासनाच नाहींशी झाली आहे, म्हणजे पायाच ढांसळला आहे, तेथें कृतीचा प्रश्नच उद्‌भवत नाहीं. पूर्वी सद्‌वासना (सूक्ष्मपणें) जिवंत होती, पण कृति (स्थूलपणें) दुर्घट झाली होती; त्या वेळीं भगवंताला स्थूलांत येऊन कार्य करणेंच जरूर होतें, आणि अशा वेळीं अवतार घेऊन (म्हणजे सगुण रूप धारण करून) भगवंतानें कार्य केलेंहि. आत्तांचा प्रश्न, दुर्वासना जाऊन सद्‌वासना कशी उत्पन्न होईल हा आहे; म्हणजेच कार्य सूक्ष्मांतलें आहे. म्हणून, 'जसा रोग तसें औषध' किंवा 'कांट्यानें कांटा काढावा' या न्यायानें, उपाययोजना सूक्ष्मांतील असली पाहिजे. वासना बदलण्याला वासनेइतकाच जबरदस्त इलाज पाहिजे; आणि तो म्हणजे भगवंताचें नाम. म्हणून चालू परिस्थितीशीं झगडून मार्ग काढून देणारा असा जर कोणता अवतार असेल तर तो भगवंताच्या नामाचाच आहे, आणि त्याकरितां सर्वांनीं भगवंताच्या नामाचा टाहो फोडणेंच जरूर आहे. हें कार्य भगवंतानें सगुणरूप धारण करून होणें कठीण आहे; ज्या अर्थी कारण सूक्ष्मांतलें आहे त्या अर्थी त्याला इलाजहि सूक्ष्मांतला पाहिजे. म्हणून नामावताराची आज गरज आहे. प्रत्येक नामागणिक त्याचा अवतार आहे, आणि त्याची कांस धरणें **म्हणजेच नाम घेणें, हें आमचें आजचें मुख्य कर्तव्य आहे,** आणि तेवढें केलें कीं नाम आपुलें अवतारकार्य करून दाखवील.

---

३१. प्रारब्धानें आलेले भोग सर्वांनाच भोगावे लागतात, पण भगवंताचा पाठिंबा ज्याला आहे तो मार्गेंपुढें सोयीनें भोग भोगूं शकतो.

# देहबुद्धीच्या विस्मरणाकरितां नाम

१ फेब्रुवारी

आपली स्वतःची ओळख करून घेण्याला नामस्मरण हाच उपाय आहे. प्रत्येक प्राणिमात्राच्या ठिकाणीं परमेश्वराचा अंश आहे. पण हें जाणण्याची बुद्धि मात्र फक्त मनुष्यप्राण्याच्याच ठिकाणीं आहे. प्रथमतः 'मी तो (परमेश्वर) आहें,' येथपासून घसरगुंडीला सुरुवात होते; नंतर, 'मी त्याचा (परमेश्वराचा आहे)' आणि शेवटीं, 'त्याचा माझा कांहीं संबंध नाहीं', येथपर्यंत आपण खालीं येतो. याला कारण, देहबुद्धीचा पगडा बसत जाऊन शेवटीं, देह म्हणजेच मी अशी भावना होते. असें असलें तरी मनुष्य अजाणतां का होईना, पण खरें आहे तें ओळखल्यासारखेंच बोलतो. उदाहरणार्थ, एखाद्या इसमाचा स्नेही वारला, तर लगेच तो इसम काय म्हणतो, "आमचे स्नेही गेले." म्हणजे ज्या देहाला अनुलक्षून तो आपल्या मित्राला ओळखत असतो, तो देह तसाच असूनसुद्धां "आमचे स्नेही गेले" असें म्हणतो. याचाच अर्थ त्या मित्राच्या देहाला तो आपला मित्र समजत नसून, त्यांत असणाऱ्या चैतन्याला (ईश्वरी अंशाला) तो खऱ्या अर्थानें आपला मित्र समजतो; म्हणजे अजाणतां का होईना, पण खरें तेंच त्याच्या तोंडून बाहेर पडतें. असें असलें तरी त्या व्यक्तीला स्वतःच्या बाबतींत मात्र ही जाणीव राहात नाहीं; कारण आपण स्वतः म्हणजे माझा देहच असें तें आपल्या स्वतःच्या बाबतींत समजतो. याला कारण म्हणजे, मी ज्याचा आहें त्याचा विसर पडून देहबुद्धि बळकट होत गेली. याकरितां उपाय म्हणजे, ज्या मार्गानें खालीं घसरत आलों त्याच मार्गानें पुनः वर जाणें. म्हणजेच पहिली गोष्ट, आतां मी देहरूपच बनलों आहें, तो मी त्याचा (परमेश्वराचा) आहे ही जाणीव करणें. दुसरी गोष्ट, या जाणीवेची परमावधि म्हणजेच मी तोच (परमेश्वर) आहे ही भावना होणें. यावर उपाययोजना म्हणजे, ज्याच्या विस्मरणामुळें ही अधोगति झाली त्याचें स्मरण करणें ही होय. स्मरणाला उत्तम साधन म्हणजे, भगवंताचें नांव. म्हणजे नामस्मरणाचा ध्यास ठेवला कीं मीं कोण हें कळेल, आणि स्वतःची ओळखण होईल. भगवंताच्या नामस्मरणामध्यें देहबुद्धीचें मरण आहे.

जो खरा साधक आहे त्यानें स्त्रियांना भिऊनच वागावें; जो सिद्ध आहे त्यानेंदेखील स्त्रियांपासून दूरच राहावें, पण तो स्त्रियांत वागला तरी त्याला दोष नाहीं, तो अलिप्तच असतो. आपल्या देहाची वाढ जशी आपल्याला न कळत होते, तशी आपली पारमार्थिक उन्नतीहि आपल्याला न कळत झाली पाहिजे. ती कळली तर सर्व फुकट जाण्याचा संभव असतो. परमार्थ अगदीं सोपा आहे, पण तो योग्य मार्गानें केला पाहिजे. एखादी गांठ सोडविण्यासाठीं कोणती दोरी ओढायची हें माहीत पाहिजे, नाहीं तर जास्तच गुंतागुंत होते. तसेंच परमार्थाचें आहे. **परमार्थांत मिळविण्यापेक्षां मिळविलेलें टिकविणें हेंच जास्त कठीण आहे.** ज्याला "मी कांहीं तरी झालों" असें वाटतें तो कांहींच झालेला नसतो. अशा माणसानें फारच सांभाळलें पाहिजे.

---

३२. आपल्या इच्छेनुसार सर्व गोष्टी घडत नाहींत ही भगवंताची कृपाच आहे.

# नामानें सद्बुद्धि उत्पन्न होते

२ फेब्रुवारी

भगवंत सर्वसत्ताधीश खरा; पण एका बाबतींत तो अगदीं लुळापांगळा होतो. नामरूपी जाळ्यात तो सहज अडकतो. भुंगा हा अत्यंत कठीण आणि मोठमोठ्या तुळ्या पोखरायलाहि समर्थ असतो, पण कमळातल्या परागाला भुलून तो कमळात पकडला जातोच. अत्यंत कठीण पदार्थ पोखरण्याचें सामर्थ्य असूनहि कमळाची नाजूक पाकळी पोखरून त्याला बाहेर पडतां येत नाहीं. तीच स्थिति नामाच्या बाबतींत भगवंताची होते.

एखाद्याचें घड्याळ रस्त्यात पडलें आणि तें दुसऱ्यानें उचललें आणि तो तें घेऊन चालला, म्हणजे ज्याचें तें घड्याळ असतें तो तें शोधीत त्या इसमाच्या मागावर जातो. त्याप्रमाणें भगवंताचें नाव जो घेतो त्याचा शोध घेत भगवंत त्या इसमाच्या मागोमाग जातो; म्हणजेच जो नाम घेतो त्याचेजवळ भगवंत असतो. **हृदयामध्ये असणारी भगवंताची खूण म्हणजे नाम** होय. नाम म्हणजे भगवंतच होय. सद्बुद्धि उत्पन्न करण्याचें सामर्थ्य फक्त भगवंताच्या नामांतच आहे.

कौरवांनीं पांडवांना निदान पांच गावें तरी द्यावींत म्हणजे युद्धाचा प्रसंग टळेल, म्हणून भगवान् श्रीकृष्ण स्वतः दुर्योधनाकडे शिष्टाई करण्याकरितां गेले. त्या वेळीं दुर्योधनानें सांगितलें कीं, "देवा, तूं म्हणतोस तें सर्व बरोबर आहे. पांडव जरी वचनबद्ध झालेले असले तरी नीतिन्यायाच्या दृष्टीनें तूं म्हणतोस तसें कांहींतरी करणें जरूर आहे. हें सर्व खरें, पण तसें करण्याची मला बुद्धीच होत नाहीं त्याला मी काय करूं ! तूं सर्वसत्ताधीश आहेस, तर मग माझी बुद्धीच पालट म्हणजे सर्वच प्रश्न एकदम मिटेल." परंतु तसें कांहीं न होतां पुढें युद्ध वगैरे झालें हें प्रसिद्धच आहे. तीच स्थिति रावणाच्या बाबतींतहि दिसते. म्हणून सगुणरूपी अवतारानें वासना किंवा बुद्धि पालटण्याचें कार्य होऊं शकत नाहीं असें दिसतें. सद्बुद्धि उत्पन्न करण्याचे सामर्थ्य फक्त भगवंताच्या नामांतच आहे. म्हणूनच त्रिकालाबाधित असणाऱ्या नामावताराची आतां जरूरी आहे.

आतां काळ कठीण आला । नामाचा आधार पाहिजे धरला ॥
नामाच्या संगतीं । ज्या व्यवहाराची प्राप्ति । तोच व्यवहार जाई भगवत्सेवेप्रति ॥
भगवंत ठेवील त्यांत हित मानावें । अखंड नामस्मरण घ्यावें ॥
सर्वांनीं नामाला लागावें । जन्माचें सार्थक करून घ्यावें ॥

---

३३. नामापाशीं सर्वसत्ता । नामें होय ब्रह्मवेत्ता
नाम धन्य तिन्हीं लोकीं । नाम घेतां होय सुखी ॥

# नाम घेतल्यानें आपले सर्व अवगुण आपल्यालाच कळून येतील

३ फेब्रुवारी

जगातलीं अनेक साधनें जरी पाहिलीं तरी त्या सर्व साधनांची पहिली पायरी ही कीं मनुष्याला त्याचे अवगुण दिसूं लागणें. जसजसें साधन वाढत जाईल तसतसें आपल्यातले अवगुण प्रखररूपानें बाहेर दिसूं लागतात, आणि त्या अवगुणांचा पुढें इतका डोंगर वाटतो कीं, " हे परमेश्वरा ! इतक्या अवगुणांनी मी भरलेला असताना, मला तुझें दर्शन व्हावें अशी मी कशी इच्छा करूं ? एवढ्या पर्वतप्राय अवगुणांच्या राशींतून मला तुझें दर्शन होईल हें कालत्रयीं तरी शक्य आहे का ? " असें वाटूं लागतें. साधन करण्यापूर्वी, रागीट माणूस कधीं त्या रागाची खंत बाळगीत नाहीं; किंबहुना तो अवगुण आहे हें मुळींच त्याला पटत नाहीं. तो म्हणतो, ' व्यवहारांत असा दरारा पाहिजेच; त्याशिवाय कसें चालेल ? ' एकजण मला म्हणाला कीं, अलीकडे मला फार राग येऊं लागला आहे. वास्तविक, तो राग आत्तां येत नसून पूर्वीपासूनच त्याच्याजवळ होता, परंतु साधन करूं लागल्यापासून त्याची त्याला जाणीव होऊं लागली आहे; किंवा तो नसावा, तो वाईट आहे, हें आतां त्याला कळूं लागलें आहे इतकेंच.

एक लग्नाचा मुलगा होता. त्यानें बऱ्याच मुली पाहिल्या, पण एकहि पसंत पडेना. त्याचे आईवडील त्याला म्हणाले, " तुला मुलगी पसंत पडूं दे. मग आम्ही पुढचें काय तें ठरवूं. " ते कांहीं मुलगी पाहायला बरोबर जात नसत. त्या मुलाची मोठी बहीण होती, ती मुलगी पाहायला जातांना त्याच्याबरोबर जात असे. एका ठिकाणाहून मुलगी पाहून आल्यावर मोठ्या बहिणीनें त्याला विचारलें, " कशी वाटली रे तुला ? " त्यावर तो म्हणाला, " नाहीं बुवा आपल्याला पसंत. " बहीण मोठी धूर्त होती; तिनें फक्त त्याच्या तोंडासमोर आरसा धरला आणि विचारलें, " या प्रतिबिंबापुढें कशी काय वाटते ? " तेव्हा स्वतःचें आणि मुलीचें रूप त्याच्या ध्यानीं आलें, आणि तो म्हणाला, " पुष्कळ बरी आहे. " सारांश, जेथपर्यंत आपल्याला स्वतःचें खरें दर्शन होऊं शकत नाहीं तेथपर्यंत दुसऱ्यांचेच अवगुण आपल्याला दिसतात. जे कांहीं आपल्याला दुसऱ्याचे अवगुण दिसतात, त्याचें बीज आपल्यांतच आहे हें माणसानें ठाम ओळखलें पाहिजे. तेव्हां दुसऱ्याचा अवगुण पाहण्याची वृत्ति आपण प्रथम टाकून दिली पाहिजे. दुसऱ्याचे अवगुण पाहणे हा साधा व्यवहार आहे, तो परमार्थ नव्हे. **खरा परमार्थी जो असतो तो स्वतःची आत्मपरीक्षा करीत असतो.** त्याला दुसऱ्याचे अवगुण दिसतच नाहींत; त्याला आपल्याच अवगुणाचें इतकें दर्शन होतें कीं, त्या मानानें इतर सर्वजण त्याला परमेश्वररूपच भासतात; आणि हाच खरा परमार्थ.

---

३४. आत्मपरीक्षा करून स्वतःमधील अवगुणाच्या बीजाचें उच्चाटन करणें हें एक मोठे साधन आहे। आणि हें साधण्यास नामस्मरणासारखें दुसरें साधन नाहीं.

# भगवंताच्या नामांतच वासनेचा क्षय आहे

४ फेब्रुवारी

आपण सर्व जीव वासनेंत गुंतलेले आहोंत. कारण आमचा जन्मच वासनेंत आहे. केवळ आपल्या कर्तबगारीनें वासनेच्या पलीकडे जाणें अशक्य आहे. म्हणूनच शरणागतीशिवाय गत्यंतर नाहीं. वासना म्हणजे 'आहे तें असूं द्याच, आणि आणखीहि मिळूं द्या' असें वाटणें. आपण सध्यां या स्थितींत आहोंत. पण सुरुवात म्हणून आपण असें म्हणावें कीं, "आहे तें असूं द्या, आणि आणखी मागायचें तें परमेश्वराजवळ मागूं या." म्हणजे, मिळालें तर भगवंतानें दिलें, आणि न मिळालें तर त्याची इच्छा नाही, अशी जाणीव होऊन आसक्ति कमी व्हायला मदत होईल; आणि 'परमात्मा दाता' ही भावना वाढीस लागून आहे तेंहि त्याच्याच इच्छेचें फळ आहे असें वाटूं लागून, अस्वथता कमी होईल. याप्रमाणें आसक्ति कमी होऊं लागली कीं, "हवें-नको" कमी होऊन वासना ओसरूं लागेल. एकदां संसाराचा वीट येऊन संन्यास घेतलेला मनुष्य दुसऱ्याचा संसार उसना घेऊन चालविण्याच्या फंदांत पडत नाहीं, ती स्थिति आपली होईल; आणि याकरितां संगतीचा फार उपयोग होईल, एखाद्या वैराग्याची संगति केली तर स्वाभाविकच कपड्याचें प्रेम कमी होईल, पण एखाद्या शेटजीच्या संगतींत राहिलों तर छानछोकी करण्याकडे प्रवृत्ति होईल. म्हणून अशा संगतींत रहावें कीं, ज्यामुळें शरणागति येण्याला मदत होईल. शरणागति म्हणजे आपण सर्वस्वीं परमेश्वराला अर्पण होऊन राहणें; याचाच अर्थ, उपाधीरहित बनणें. तर मग आपण अशाच साधनाची संगति केली पाहिजे कीं, जें अत्यंत उपाधीरहित आहे. हें साधन म्हणजे भगवंताचें नाम. काळ, वेळ, परिस्थिति, उच्चनीच भाव, स्त्री-पुरुष, विद्वत्ता, अडाणीपणा, श्रीमंती-गरिबी, तब्येतीची सुस्थिति वा दुःस्थिति, वगैरे कोणतीहि गोष्ट नामाच्या आड येऊं शकत नाहीं. तसेंच त्याला कोणतीहि उपकरणें लागत नाहींत, फक्त तें घेण्याची इच्छाच तेवढी पाहिजे. खरोखर भगवंताचें नाम हें बॅटरीसारखें आहे. आपल्याला पाहिजे तेव्हां तें प्रकाश देतें. तें आपल्या खिशामध्यें, म्हणजे हृदयामध्यें राहूं शकतें. बॅटरीनें अंग भाजण्याची कधींच वेळ येत नाहीं. तसें नामानें आपल्याला वैराग्याचें कष्ट होत नाहींत, आणि कुठेंहि, केव्हांहि तें बरोबर नेतां येतें. एक नाम तरी सोडलें पाहिजे, किंवा विषयाची तदाकारवृत्ति तरी सोडली पाहिजे. "भगवंत माझ्या मागें आहे" असें म्हटलें कीं, वृत्ति विषयाशीं तदाकार होत नाही. मारुतीनें दिलेली मुद्रिका पाहिल्यावर सीतेला रामाच्या स्वरूपाची आठवण झाली, त्याप्रमाणें नाम घेतांना आपल्याला त्याची आठवण झाली पाहिजे. **वासनेचा क्षय भगवंताच्या नामांतच आहे हें अक्षरशः खरें आहे.** वासनेच्या क्षयामध्यें आपलेपणाचें मरण आहे, आणि हें मरण डोळ्यांनीं पाहाण्यासाठीं आपण भगवंताच्या नामांत राहिलें पाहिजे.

---

३५. जेथें वासना संपली तेथेंच भगवंताची कृपा झाली.

# कळकळीचें नामस्मरण

५ फेब्रुवारी

आम्ही सुस्थितींत असलो म्हणजे आमचें नामस्मरण अधिक होतें. त्यांत कांहीं बिघाड झाला कीं, तिकडेच सारें लक्ष वेधतें. याला कारण म्हणजे आमचें स्मरण हें वरवरचें असतें. श्रद्धेनें करणें आपल्याला कठीण जातें, आपलें परमात्म्याशिवाय कोणी नाहीं असा दृढ निश्चय अगर श्रद्धा असणें आवश्यक आहे. म्हणजे मग प्रकृतींत कांहीं बिघाड झाला तरी आपले स्मरण टिकून राहील. द्रौपदीला आतां आपला कोणी त्राता नाहीं असें वाटून जेव्हां तिनें श्रीकृष्णाचा धावा केला, तेव्हां भगवान लगेच धांवून आले. असें खऱ्या कळकळीचें स्मरण आपलें असायला पाहिजे. जसें लहान मूल कांहींहि झालें तरी आपल्या आईलाच हांक मारतें, दुसरें तिसरे कोणी जाणत नाहीं, तसें तुमचें परमेश्वर-स्मरणाच्या बाबतींत झालें पाहिजे. खरोखरच तुमची भिस्त कोणावर आहे हें संकटकाळींच उत्तम कळतें. या स्मरणाच्या पायऱ्या अशा सांगतां येतील – ( १ ) सुस्थितींतलें वरवरचें स्मरण. ( २ ) नंतर, परमात्म्या-शिवाय आपलें कोणी नाहीं ही जाणीव होऊन संकटसमयीं त्याचें स्मरण. ( ३ ) हीच जाणीव दृढ होऊन पुढें अखंड स्मरण होणें. वरवर स्मरण करणारा 'आम्हांस संकटेंच नकोत' असें म्हणतो, तर साधुसंत 'आम्हाला संकटे येऊं देत' असें भगवंताजवळ मागतात. कारण त्यावेळेसच त्याचें खरें स्मरण होतें. आपण स्वतः आहोंत याची आपल्याला आज जितकी खात्री आहे, तितकी खात्री भगवंत आहे अशी झाली पाहिजे. परमात्मा सर्व ठिकाणीं आहे ही कल्पना केव्हां तरी आपल्याला होते, पण ती कायम न राहिल्यामुळें तसें आपल्या आचरणांत येत नाहीं; आपली वृत्ति तशी झाली कीं, तें आपल्या आचरणांत येईल. भगवंत हा कर्ता आहे अशी आपली दृढ भावना झाली कीं, आपण प्रत्येक गोष्ट त्याला सांगत बसणार नाहीं. "भगवंताला माझें सर्व कळतें" असें जर खरेंच वाटलें तर त्याला आवडेल असेंच आपण वागूं. पहाटे उठावें, आणि भगवंताची मूर्ति डोळ्यांसमोर आणून प्रार्थना करावी. "तुझें विस्मरण जेथें होतें, तेथें मला जागृत करीत जावें; नाहीं मला आतां तुझ्याशिवाय आसरा," असें म्हणून त्याला मनःपूर्वक नमस्कार करावा. मनुष्य कसाहि असला तरी भगवंताच्या स्मरणात त्याला समाधान खात्रीनें मिळेल जो भगवंताचा झाला त्याला जगण्याचा कंटाळा कधींच येणार नाहीं. विषयाचा आनंद हा दारूसारखा आहे; ती धुंदी उतरल्यावर मनुष्य जास्त दुःखी बनतो "मी भगवंताचा आहें" या भावनेनें जो राहील त्यालाच खरा आनंद भोगतां येईल.

---

३६. नुसते इंद्रियदमन हें कांहीं सर्वस्व नाहीं, तें ज्याच्याकरितां आहे त्याचें अनुसंधान पाहिजे.

# नामस्मरण, शरणागति, आणि भगवत्प्राप्ति

६ फेब्रुवारी

भगवत्प्राप्तीला शरणागतीशिवाय मार्ग नाहीं, आणि शरणागतीला नामस्मरणासारखा उत्तम उपाय नाहीं. शरणागति म्हणजे, मी कर्ता हा अभिमान नाहींसा होऊन, "सर्व कर्तृत्व परमेश्वराचें आहे" ही भावना होणें. नामाशिवाय इतर साधनांत कृति आहे; म्हणजे 'मी कर्ता' या अहंकाराला वाव आहे. स्मरण हा मनाचा धर्म असल्यानें त्यांत कृतीचा प्रश्नच येत नाहीं, म्हणून अहंकाराला वाव नाहीं; शिवाय स्मरण किंवा विस्मरण या दोन्ही गोष्टी आपल्या हातांत नाहींत, म्हणून नामाचें स्मरण झालें तरी त्यांत स्वतःचें कर्तृत्व नसतें, त्यामुळें 'मी कर्ता' ही जाणीव टिकूं शकत नाहीं. 'मी नामस्मरण करतों' हा शब्दप्रयोगसुद्धां बरोबर नाहीं, कारण नामाचें स्मरण 'होत असतें, तें 'करूं' म्हणून जमत नाहीं' म्हणून शरणागतीला नामस्मरणासारखें दुसरें साधन नाहीं. शरणागतीचा दुसरा अर्थ म्हणजे कायिक, वाचिक आणि मानसिक क्रिया थांबविणें. क्रिया न करणें हें कृति करण्यापेक्षां केव्हांहि जास्त सोपें आहे; म्हणजेच शरणागति ही सहजसाध्य वाटली पाहिजे. पण अनुभव तसा येत नाहीं. जी गोष्ट अत्यंत सोपी वाटते ती पुष्कळदां करायला कठीण जाते असा अनुभव येतो. एखाद्याला मोटार वेगांत चालव म्हटलें तर तो तें सहज करील, पण अति हळूं चालव म्हटलें तर तें फार कठीण जातें. म्हणून कांहींहि कृति न करणें हें कृति करण्यापेक्षां फार कठीण असतें. गीतेंत भगवंतांनीं अर्जुनाला 'तूं नुसता मला शरण ये' असें सांगितलें आहे. देहबुद्धि गेल्याशिवाय शरणागति येत नाहीं. देहबुद्धि, वासना, अहंकार, हीं सर्व एकच आहेत. जगांतल्या वैभवाची आसक्ति आणि परमात्मप्राप्ति, या दोन्ही गोष्टी एकत्र असूंच शकत नाहींत. म्हणूनच उद्धवाला श्रीकृष्णांनीं एकांतांत जाऊन हरि-चिंतन करायला सांगितलें आणि असें केल्यानेंच माझी तुला खरी प्राप्ति होईल असें म्हणाले. याचा अर्थ हाच कीं, जगाकडे पाठ फिरविल्याशिवाय भगवंत मिळत नाहीं.

अनन्य व्हावें रामास शरण । तुजवांचून नाहीं मागणें कांहीं अन्य ।
अखंड राखावें अनुसंधान । येणें कर्म होईल सहज रामार्पण ।

---

३७. ज्याला कांहींतरी करण्याची संवय आहे, त्यानें कांहीं काल मुळींच कांहीं करूं नये; नंतर भगवंताचें अनुसंधान ठेवायला शिकावें.

# समर्थांसारखें समतोल वृत्तीचे संत प्रापंचिकांना जास्त उपयोगी

७ फेब्रुवारी

( श्रीदासनवमीच्या दिवशी झालेले श्रींचे निरूपण )

हुन्नरी लोक निरनिराळ्या वस्तूंमधून अत्तरें काढतात. कोणी जाईतून, कोणी जुईतून, कोणी गुलाबातून, असे अत्तर काढतात. ही गोष्ट सोपी आहे; पण मातीमधून अत्तर काढणारे जे लोक असतात त्यांची मात्र कमाल आहे. हें जसें खरें, त्याचप्रमाणें सर्व संत सारख्याच योग्यतेचे खरें, पण मातीमधून अत्तर काढणारा, म्हणजे प्रपंचामध्यें परमार्थ करायला शिकविणारा, कोणी असेल तर ते समर्थच होत. समर्थांनीं विषयाला खरें ओळखलें म्हणून "सावधान" म्हटल्याबरोबर ते पळून गेले. शिवाजी-सारख्या शिष्याला समर्थांनीं सांगितलें कीं, "अरे, माझा दाता राम आहे!" हें उपासनेचें तेज होय. समर्थांनीं प्रपंची लोकांना तुच्छ केलें नाहीं; परंतु प्रपंचांत सुख मिळणार नाहीं हें सांगितल्याशिवाय ते राहिले नाहींत. नुसती भिक्षा मागणें हें काही समर्थांचें ध्येय खास नव्हतें. आपल्या ठिकाणीं उपासनेचें तेज पाहिजे. उपासना चालवीत असतां जगण्यासाठीं म्हणून भिक्षा मागायला हरकत नाहीं; पण दुसऱ्या कशासाठीं भिक्षा मागणें पाप आहे. शिवाजीसारखा शिष्य झाला तरी समर्थांनीं आपली लंगोटी सोडली नाहीं. हें खरें वैराग्य होय. म्हणूनच ते 'समर्थ' पदवीला पोंचले. स्वतःचा जीव धोक्यांत घालून मिळविलेलें राज्य गुरूच्या झोळींत टाकणारा शिष्य धन्य होय. आणि अनायासें चालून आलेलें एवढें राज्य निरासक्तीनें परत करणारा गुरु त्याहून धन्य होय! समाजातल्या ज्या वर्गामध्यें परमार्थाच्या शिकवणीची जरुरी आहे, त्यामध्यें जाऊन त्याला अनुरूप अशी शिकवण देणें हेंच प्रत्येक संताचें काम आहे. कांहीं संत एकांतिक वृत्तीचे असतात, तर कांहीं संत समतोल वृत्तीचे असतात. समर्थांसारखें समतोल वृत्तीचे संत प्रापंचिकांना जास्त उपयोगी असतात. समर्थांच्या काळीं लोकांची भगवंताबद्दलची बुद्धि कायम होती; फक्त परिस्थितीमुळें त्यांना बाहेर तसें वागतां येत नव्हतें. पण आज ती बुद्धीच नाहींशी होत चालली आहे. हा काळ जास्त कठीण आहे. इथें सूक्ष्मामध्यें बिघाड झाला आहे. म्हणून नाम हें सध्यां फार परिणामकारक ठरणारें आहे, कारण तें फार सूक्ष्म आहे. समर्थांनीं दासबोध लिहिला, आणि त्यांत आपल्याला सुचणार नाहींत इतक्या शंका घेऊन त्यांनी त्यांची उत्तरें दिलीं आहेत. प्रत्येकानें तो जरूर वाचावा आणि त्याप्रमाणें मनाला बोध घ्यावा. समर्थांना रामाची मूर्ति म्हणजे प्रत्यक्ष रामच आहे असें वाटे; अशांनाच राम आपण होऊन अनुग्रह देतो. अशा संतांनीं सांगितलेल्या नामाची कांस धरल्यानेंच आपण त्यांचे उतराई होऊं शकूं.

---

३८. नामाचें प्रेम एकदम येणार नाहीं, पण नामस्मरण सतत केल्यानें आज ना उद्या भगवंताचें प्रेम येईलच.

# दासबोध व नामस्मरण

८ फेब्रुवारी

जशी ज्याची पायरी तितकें समर्थांनीं त्याला सांगितलें. मुलीला बोललें कीं सुनेला लागतें, त्याप्रमाणें समर्थांनीं उपदेश केला. खरोखर दासबोधासारखा ग्रंथ मिळणें कठीण. **जो दास होतो त्यालाच त्याचा बोध होतो**, जो भगवंताचा दास झाला त्याचें जन्माचें कल्याण दासबोध करील. समर्थांनीं स्वतः केलें आणि मगच जगाला सांगितलें. सुखदुःखाचा मनावर परिणाम होतो, मग तोंडानें 'मीं ब्रह्म आहें' असें नुसतें म्हणण्यांत काय अर्थ आहे! जग मिथ्या आहे हें ज्याला वाटेल त्यालाच ब्रह्म सत्य हें कळेल. "आम्ही 'राम राम' असें म्हणत होतो, आणि सद्गुरूनें तेंच सांगितलें यांत काय मोठे झालें?" असें एखाद्याला वाटेल. पण यांतच विशेष आहे. 'मी कर्ता' हा अभिमान त्यांत टाकावा लागतो. मिठाचा एकच खडा खीर नासवायला पुरेसा होतो; म्हणून मुख्य म्हणजे अभिमान टाकायला पाहिजे, पंचमहाभूतांच्या पलीकडे जो राहतो तो भगवंत. आपण त्याला जाणण्यासाठीं पंचमहाभूतांच्या पलीकडे जाणें आवश्यक आहे. "मी देव पाहिला आहे असें कोणी नाहीं म्हणत" असें एक गृहस्थ म्हणाला. मीं त्याला सांगितलें, "मीं पाहिला आहे देव; आणि तुला पाहायचा असेल तर माझे डोळे घेऊन पाहा म्हणजे तो दिसेल." त्याला नामस्मरणाला लावलें, माझें काम झालें. **लहान मुलगा वयांत येऊं लागणारच, त्याला नवस नको करायला. आपल्या गुरूनें जें सांगितलें तें सत्य मानावें.** 'या मार्गानें शंभर पावलें गेलास तर खजिना सांपडेल' असें गुरूनें सांगितलें, तर दुसऱ्या मार्गानें दोनशें पावलें जरी गेला तरी त्याचा काय उपयोग! जर प्रत्यक्ष बोलणारा–चालणारा सद्गुरु पाहून समाधान होत नाहीं तर परमात्म्याचें दर्शन करून देऊन काय उपयोग! आंबा हवा असेल तर कोय पेरल्याशिवाय कुठला मिळणार! सद्गुरूनें जें सांगितलें त्यापरतें माझें कांहीं हित आहे, हें मनांतच येऊं नये. आपण खरोखरी त्याचें व्हावें. नामस्मरणापरतें दुसरें हित नाहीं. माझ्या नामानें घरांत आजारी पडलेला मनुष्य बरा व्हावा म्हणणें, म्हणजे त्याचा विषयाकडे उपयोग नाही का केला? बरें झाल्यावर ज्याप्रमाणें आम्ही बाटलींतलें औषध टाकून देतो त्याप्रमाणें गरज संपली कीं आम्ही देवाला विसरतो. अमुक एक घडावें असें जिथें वाटतें तिथें साधनांत कमतरता आली. एक सद्गुरुवचनावर विश्वास ठेवला म्हणजे सुखदुःखाच्या गोष्टींचा मनावर परिणाम होत नाहीं. मोठा अधिकारी झाला तरी पोराबाळांबरोबर खेळतांना ज्याप्रमाणें तो त्यांच्यासारखा होतो, त्याप्रमाणें व्यवहारांत वागावें. आपण निर्लोभतेनें वागावें. खेळांत ज्याप्रमाणें आपण चुकूं देत नाहीं, त्याप्रमाणें प्रपंचांत करावें. खरोखर समर्थांनीं मातींतून अत्तर काढलें; म्हणजे, प्रपंचामध्येंच परमार्थ करायला शिकवला. समर्थांसारखे संत स्वतः कधींच उद्धरलेले असतात, म्हणून जगाचा उद्धार करण्यासाठीं ते जन्माला येतात.

---

**३९. समर्थांनीं प्रपंची लोकांना तुच्छ लेखलें नाही, परंतु प्रपंचांत सुख मिळणार नाहीं हें सांगितल्याशिवाय ते राहिलें नाहींत.**

# नित्यनेम करणें म्हणजे काय ?

९ फेब्रुवारी

नित्यनेम करणें म्हणजे सर्वकाळ नित्यांत राहणें. आपणच स्वतः नित्य असून अनित्यांत राहिलों आहोंत. नित्य जो परमात्मा त्याला विसरून, आपण विषय जे अनित्य त्यांत पडल्यामुळें आपल्याला त्याची आठवण होत नाहीं. तरी त्याची ज्यामुळें आठवण होईल असें जें करणें त्याला नित्यनेम म्हणतात. आपण नेहमींच नित्यनेमांत असावें, पण तसें होत नाहीं, म्हणून दिवसांतून थोडा वेळ तरी त्याची आठवण होण्याकरितां कांहीं वाचन आणि वाचलेल्याचें मनन करावें, म्हणजे त्याची संवय होतें. जो नेहमीं नामस्मरण करतो तो नेहमींच नित्यनेमांत असतो. नित्यनेम खरा कोणीं केला असेल तर तो ब्रह्मानंदबुवांनींच. ते सदाच नामांत असत. आपल्याला सदा नामांत कसें राहतां येईल याचा आपण विचार करावा. याकरितां गुरुआज्ञा प्रमाण मानणें हेंच खरें साधन आहे. गुरु सांगेल तोच नित्यनेम होय. त्याला शरण जावें म्हणजे त्याच्या कृपेनें तसें होतें. रोज थोडेंसें वाचन, त्यानंतर मनन, मननानंतर त्याप्रमाणें आचरण, आणि शेवटीं गुरूस अनन्य शरण, हाच साधकाचा साधनक्रम आहे, आणि हाच त्याचा नित्यनेम होय.

कांहीं ठिकाणीं परीक्षेचा निकाल वाचून दाखवतात. निकाल वाचणारा नंबर वाचू लागला कीं, जसजसा आपला नंबर जवळ जवळ येऊं लागतो तसतशी आपली उत्सुकता वाढत जाते, आणि आपल्या अलीकडचा नंबर आला कीं, ती अगदीं शिगेला पोंचते. त्याचप्रमाणें, आपलें आयुष्य जसजसें वाढत जाईल तसतशी साधकाची भगवंताला भेटण्याची उत्सुकता वाढत गेली पाहिजे. केवळ नेम आहे म्हणून उगीच करूं नये; साधकानें कोणतीहि गोष्ट मनापासून करायला शिकावी. सात्त्विक वृत्तीनें परमार्थांत सर्व बिघडतें हें त्यानें ध्यानांत ठेवावें. श्रद्धा हें परमार्थाचें मुख्य भांडवल होय। पण विद्या, बुद्धि, कला, यांच्याच वाढीमध्यें हें भांडवल खर्च करणें योग्य नव्हे. ज्याप्रमाणें थर्मामीटरनें आपला ताप आपल्याला पाहतां येतो, त्याप्रमाणें साधन करतांना आपलें आपल्याला समाधान किती झालें हें पाहिलें पाहिजे. समाधान हेंच सर्वस्व आहे अशी श्रद्धा ठेवावी. साधकानें जगातले दोष पाहूं नयेत, कारण त्या दोषांचें बीज आपल्यामध्येंच असतें. लोकेषणा, मान, फार घातक आहे. मोठमोठे साधकसुद्धा त्याच्यापायीं अधोगतीला जातात। तसेंच पैसा आणि कामवासना यांच्या मर्यादा ओलांडल्यामुळें मोठे साधनी लोकहि भगवंताच्या जवळ येऊन घसरतात. जगातले हे सर्व पाश आपल्याला बंधनांत पाडतात. भगवंताचा पाश हाच खरा पाश. तोच आपल्याला सर्व बंधनांपासून मुक्त करून शाश्वत समाधानाचा लाभ मिळवून देतो.

---

४०. झाडाच्या मुळाला पाणी घातलें कीं त्याच्या सर्व भागांना तें पोंचतें। तसें भगवंताचा विसर न पडूं दिला तर सर्व कांहीं होतें.

# अखंड समाधानाचा मार्ग : नामस्मरण

१० फेब्रुवारी

अखंड रामसेवा ज्याला लाभली । धन्य धन्य त्याची माउली ।। स्वार्थरहित रामसेवा । याहून दुजा लाभ न जीवा !। आपण न करावी काळजी । त्याची तोच दूर करील ।। वाचेनें भगवंतांचे नाव । कायेनें भगवंतसेवा । चित्तीं भगवंताचें ध्यान । आपण राहावें रामार्पण । याहून अन्य सेवा । कोणतीही नाहीं जाण ।। जें जें दिसतें तें तें नासतें । हा बोध घेऊनि चित्तीं । सज्जन लोक जगीं वर्तती । तैसें तुम्ही आतां वागा जगांत । मुलं-बाळांस सांभाळून राहावें । प्रपंचात उदास न व्हावें ।। प्रपंचाची उपाधि । आतां मनांत न आणावी । उपाधिवेगळे झालों । ऐसें ऐकूं द्यावें मला ॥ उपाधींत राहिला । परी चित्ताला न वास दिला । ऐसें ठेवा मनीं । राम आणावा ध्यानीं ॥ आतां यापरतें हित । नाहीं दुसरें जगांत । हा माझा बोल । न मानावा फोल ॥ आतां रामा तुझा झालो । कर्तेपणांतून मुक्त झालों । ऐसें आणावें मनांत । शक्य तितकें राहावें नामांत । याहून दुसरें न आणावें मनांत ॥ लौकिकांतील मानापमान । याचें सोडावें उदक । ध्यानीं आणावा रघुनंदन एक ॥ बायको-मुलाबाळांत राहावें । चित्त रामाकडे ठेवावें । होईल तेवढें नाम घ्यावें ॥ माझा ठेवावा अभिमान । बाकीच्याचा धनी मी जाण । **शेवटी मागणें तुम्हां एकच पाहीं । नामावांचून दूर कधीं न राहीं** ॥ अंतरी परमात्मा त्यास । ठेवून साक्ष भावें भजावें रघुनाथास ॥ न सोडावा मनाचा धीर । मागें आहे रघुवीर ॥ शरीरसंपत्ती क्षीण झाली । तरी वृत्ति नाहीं बनली ।। जोंवर देहाची संगति । तोवर मी माझें ही वृत्ति ।। आता वृत्ति राखावी रामापाशीं । दुजी उठूं न द्यावी त्यापरती ।। आजवर जें जें घडलें । तें प्रापंचिक पारमार्थिक असो भलें । तें रामकृपेनें झालें । हें ठेवावें चित्तीं । आतां न सोडावा रघुपति ।। वयमानानें शरीर होतें क्षीण । वागणें आहे फार जपून ।। देह आळशी न ठेवावा हें जरी खरें । तरी त्याची परिस्थिति ओळखून राहाणें हें बरें ।। आतां आपण झालों शरीराचे आधीन । हें वयोमानानें दृश्य भासत ।। तरी भाव ठेवा रामापायीं । ज्याला क्षीणता कधीं आली नाहीं ।। सर्व कर्ता राम हा भरंवसा ठेवावा ठाम । मग काळजीचें उरलें नाहीं काम । हें सर्व जुळतें म्हणतां राम राम ।। तरी सर्वांनीं घ्यावें रामनाम । व्हावें परमात्म्याचे आपण । कृपा करील रघुवीर ।।

---

४१. मागणें तुम्हां एकच पाहीं । नामावाचून दूर कधी न राहीं ॥

# मायेच्या तावडींतून सुटण्यास नाम हेंच साधन

**११ फेब्रुवारी**

पुष्कळ लोकांना परमेश्वराची भक्ति करावी, त्याचें नामस्मरण करावें, असें मनांतून फार वाटतें. पण कांहीं ना कांहीं कारणानें तें घडत नाहीं. असें कां व्हावें ? तर माया आड येते. मायेला बाजूला सारून भगवंतापर्यंत कसें पोंचायचें ? माया ही भगवंताच्या सावलीसारखी आहे. तिला सोडून तूं ये असें म्हणणें म्हणजे भगवंतालाच तूं येऊं नकोस असें म्हणण्यासारखें आहे; कारण एखाद्या इसमाला 'तूं ये, पण तुझी सावली आणूं नको' म्हटलें तर तें कसें शक्य आहे ? म्हणून माया ही राहणारच. आपण तिच्या तावडींतून सुटून भगवंतापर्यंत कसें पोंचायचें हाच प्रश्न आहे; आणि या प्रश्नाचें उत्तर एकच : भगवंताचें नाम घेणें. नामानेंच मायेच्या तावडींतून सुटून भगवंतापर्यंत जाता येते. जसें व्यक्तीशिवाय सावलीला अस्तित्व नाहीं, तसें मायेला स्वतंत्र अस्तित्व नाही. तसेंच तिला स्वतंत्र शक्तीहि नाहीं, कारण व्यक्तीच्या हालचालींप्रमाणेंच तिची हालचाल होते. व्यक्ति न दिसली तरी तिची सावली जशी दिसते, त्याप्रमाणें मायेचें अस्तित्व मात्र जाणवतें. मायेची सत्ता भगवंतावर नाहीं. समजा, एखादा इसम पूर्व दिशेला चालला आहे, तर त्याची सावली त्याच्यामागून त्याच दिशेनें जाईल; पण त्या सावलीच्या मनात जर दिशा बदलून पश्चिमेकडे जाण्याचें आलें तर तिला तें शक्य नाहीं. तो मनुष्यच जर पश्चिमेकडे जाऊं लागला तरच तिला त्या दिशेकडे जाणें शक्य आहे. याचाच अर्थ माया भगवंताच्या आधीन आहे. सर्व विश्व हें मायारूप आहे; म्हणजे तें परमेश्वराची छाया आहे; याचा अर्थ, या विश्वाला आधार परमेश्वरच आहे. आतां या मायेच्या तावडींतून सुटून परमेश्वराकडे कसें जायचें ? समजा, एखाद्या इसमाला एका मोठ्या व्यक्तीस भेटायचें आहे. पण त्याच्याकडे सरळ जाणें शक्य नाहीं; कारण त्याच्या घराच्या दारावर रखवालदार, कुत्रे, वगैरे आहेत. तेव्हां त्यांच्या तावडींतून सुटून गेलें तरच मालकाची भेट होणार. पण समजा, "मला अमक्या दिवशीं येऊन भेटावें" अशा मजकुराचें त्या मालकाच्या सहीचें पत्र जर आपल्याला आलें असेल, तर तें पत्र त्या रखवालदाराला दाखवितांच तो आपल्याला बिनतक्रार आंत सोडील आणि मालकाची भेट होईल. तसें भगवंताचें नाम म्हणजे भगवंताच्या सहीचें पत्र जर आपण घेऊन गेलों तर मायारूपी रखवालदार ती सही पाहून आपल्याला आंत सोडील आणि भगवंताची भेट होईल. म्हणून माया तरून जायला भगवंताचें नामस्मरण हाच रामबाण उपाय आहे.

---

४२. सर्व संतांचें सांगणें एकच आहे कीं, "तूं भगवंताचें अनुसंधान म्हणजे स्मरण ठेव, त्यानें तुला ज्ञान होईल."

# नाम पूर्वीं होतें, आज आहे, व पुढेंहि राहील

१२ फेब्रुवारी

नाम हें रूपापेक्षां निश्चित श्रेष्ठ आहे, त्यामुळें रूपाचें ध्यान मनामध्यें आलें नाहीं तरी नाम सोडूं नये. पुढें रूप आपोआप येऊं लागेल. रूप हें जड आणि दृश्य असल्यामुळें उत्पत्ति, स्थिति आणि विनाश, वाढ होणें आणि घटणें, जागा व्यापणें आणि जागा बदलणें, कालमानानें फरक पडणें, इत्यादि बंधनें त्याला असतात; पण नाम हें दृश्याच्या पलीकडे आणि सूक्ष्म असल्यामुळें त्याला उत्पत्ति आणि विनाश, वाढ आणि घट देशकालनिमित्ताच्या मर्यादा, इत्यादि कोणतेहि विकार नाहींत; म्हणून नाम हें पूर्वीं होतें, आज आहे, आणि पुढेंहि पण तसेंच राहील. नाम हें सत्स्वरूप आहे. जगामधील रूपाचे प्रकार, हे नुसत्या रोजच्या व्यवहारात लागणाऱ्या वस्तुंच्याकडे पाहिले तरी कळून येतील. दगड, लाकूड, आंबा, पाणी, भात, झाड, घड्याळ, या प्रत्येक वस्तूच्या समुदायासाठीं एकेक नाम असतें. उदाहरणार्थ, अनेक तऱ्हेच्या दगडांना ' दगड ' हें नाम आहे. अनेक प्रकारचे आंबे ' आंबा ' या नामांतच येतात. अशा रीतीनें या जड जगामध्यें जशी अनेक रूपांची गर्दी आहे तशी सूक्ष्म जगामध्यें अनेक नामांची गर्दी आहे कां ? याचें उत्तर देण्याआधीं आपण आपली ज्ञानक्रिया कशी चालते हें पाहूं. समजा, आपण एका टेकडीवर उभें राहून सृष्टिसौंदर्य पाहिलें. त्या पाहण्यांत कोणकोणत्या क्रिया होतात पाहा. प्रथम डोळ्यांमधून प्रकाश-किरणें आंत मेंदूपर्यंत गेलीं. बाह्य पदार्थांचें मनुष्याला ज्ञान व्हायला इंद्रियें हें पहिलें साधन आहे. इंद्रियांमधून आंत आलेले संस्कार एकत्र करून मन त्यांना वस्तुस्वरूप देतें. वस्तुस्वरूप तयार झाल्यावर, बुद्धि सारासार विचार करून त्या वस्तूचें यथार्थ ज्ञान आपल्याला करून देते. पण मनुष्याच्या बुद्धीचा व्यापार इथेंच थांबत नाहीं. टेकडीवरून आजूबाजूला पाहात असतांना झाडें, वेली, घरें, बागा, माणसें, पक्षी, पाण्याचे तलाव, इत्यादि सर्व वस्तूंचे ज्ञान झाल्यावर पुन्हां त्यांचें एकीकरण होऊन, " ही सृष्टीची शोभा आहे " असें ज्ञान आपल्याला होतें. म्हणजे अनेकांत एकत्व शोधणें हेंच मानवी ज्ञानाचें लक्षण आहे. या जगामध्यें कितीतरी वैचित्र्य आढळतें. नाना तऱ्हेचे दगड, नाना तऱ्हेचे किडे, नाना प्रकारचे पक्षी, प्राणी, या सर्वांचीं नांवें जरी भिन्न असलीं तरी त्या सर्वांमध्यें ' असणेंपणाचा ' गुण आहे; म्हणजे, सजीव प्राणी झाला तरी तो " आहे " आणि निर्जीव वस्तू झाली तरी तीहि " आहे " एवढेंच काय, पण आनंदालासुद्धां ' आहेपणा ' चा गुण आहे. ' असणेंपणा ' च्या गुणाला ' नाम ' असें म्हणतात. यालाच " ॐकार " असें म्हणतात. ॐकारांतून सर्व सृष्टि जन्म पावली. ॐकार हें परमात्म्याचेंच स्वरूप आहे. म्हणूनच नाम हें सृष्टीच्या आरंभीं होतें, तें सध्यां आहेच, आणि सृष्टीचा लय झाला तरी तें शिल्लक राहणारच.

---

४३. भगवंताचें अनुसंधान आणि अखंड नामस्मरण याशिवाय संतांना दुसरी कोणतीहि गोष्ट प्रिय नाहीं. म्हणून आपल्या हृदयामध्यें अखंड नामाची ज्योत तेवत ठेवा.

# नामाचें त्रिकालाबाधित श्रेष्ठत्व

**१३ फेब्रुवारी**

नाम हें सच्चिदानंद-स्वरूप आहे. शुद्ध परमात्मस्वरूपाच्या अगदीं अगदीं जवळ कोणी असेल तर तें फक्त नामच होय. नाम हें चिन्मय असल्यामुळें त्याचा आनंद ओसंडून येतो आणि ही सृष्टि तयार होते. अनेक रूपें घडविणें, तीं मोडणें आणि नवीन तयार करणें, पण आपण मूळ स्वरूपानें राहणें, ही केवढी विलक्षण लीला आहे! खरोखर, तुम्हाला मी काय सांगू! **मी बोलायला शिकल्या-पासून आजपर्यंत मी नामाबद्दलच बोलत आहें, अजून नामाचें माहात्म्य संपत नाहीं. नामाचें माहात्म्य सांगून संपलें तर भगवंताचे भगवंतपण लटकें झालें असें समजावें.** जो नामांत मीपणानें नाहींसा झाला त्यालाच नामाच्या माहात्म्याची कल्पना आली. असा पुरुष नामाविषयीं मौन तरी धरील, कारण त्याचें माहात्म्य कोणालाच सांगतां येणार नाहीं–किंवा शेवटच्या श्वासापर्यंत नामाचें माहात्म्यच सांगत राहील, कारण तें कितीहि सांगितलें तरी संपणार नाहीं, आणि कितीहि ऐकलें तरी तृप्ति होणार नाहीं. नामानें सर्व पापें नाहींशीं होतात. **भगवंताला विसरणें हें सर्वांत मोठें पाप आहे.** नामानें भगवंताचें स्मरण होतें. नाम हें वेदापेक्षांहि श्रेष्ठ आहे. वेदाध्ययनापासून फ़ायदा होण्यासाठीं चारी वेदांचा अभ्यास करणें जरूर आहे, त्यासाठीं पुष्कळ वेळ आणि श्रम लागतात. नामाला श्रम नाहींत. शिवाय वेदाचा अधिकार सर्व लोकांना नाहीं. पण नाम कोणीहि घ्यावें. वेदाच्या मंत्रांचा आरंभ ॐकारानेंच होतो, म्हणून वेदारंभी नामच आहे. नाम हें तीर्थयात्रेपेक्षां श्रेष्ठ आहे. अंतरंगामध्यें बदल होण्यासाठीं यात्रा करावयाची असते; पण त्याला श्रम, पैसा, प्रकृति, वगैरे गोष्टी अनुकूल असाव्या लागतात. नाम हें घरबसल्या अंतरंग बदलण्याचा अनुभव आणून देतें. पंढरपूरला येऊन नाम घेण्याचें जर न शिकला तर येणें व्यर्थ गेलें म्हणावें. नाम घ्यावें अशी बुद्धि होण्यासाठींच येथें येणें जरूर आहे. **नाम हें सर्व सत्कर्मांचा राजा आहे.** सत् म्हणजे भगवंत. त्याच्याकडे नेणारें जें कर्म तेंच सत्कर्म. इतर कर्में आडवळणानें भगवंताकडे नेतात. नाम हें साक्षात् भगवंताकडे पोंचवतें. नामानें भवरोग नाहींसा होतो. भव म्हणजे विषय होय. विषयाची आसक्ति असणें हा सर्व रोगांचा पाया आहे. नाम घेतल्यानें भगवंताकडे प्रेम लागतें आणि इतर ठिकाणची आसक्ति सुटते. नामानें सर्व दुःखें नाहींशीं होतात, या सर्व दुःखांचें मूळ विषयाच्या आसक्तीमध्यें आहे नामानें ती आपोआप सुटते; म्हणून दुःख नाहींसें होतें. शिवाय भगवंत हा आनंदरूप असल्यानें त्याला नामानें घट्ट धरला कीं दुःख त्या ठिकाणीं कसें राहूं शकेल?

---

४४. प्रत्येक मनुष्यानें भगवंताचें नाम घ्यावें, त्याचें ध्यान करावें, त्याच्या स्मरणांत राहावें, आणि आपल्या जन्माचें सार्थक करून घ्यावें.

# आनंद हवा असेल तर नाम घ्यावें

**१४ फेब्रुवारी**

शरीरस्वास्थ्याला लागणाऱ्या शरीरातल्या द्रव्यांत जेव्हां कमीअधिकपणा उत्पन्न होतो तेव्हां शरीरस्वास्थ्य बिघडतें, त्यालाच आजार म्हणतात. सुंठ हें असें औषध आहे कीं, तें शरीरांत कमी झालेल्या द्रव्याची भरपाई करतें आणि जास्त झालेलें द्रव्य कमी करून शरीरस्वास्थ्य उत्पन्न करतें आणि आरोग्य राखतें. हें नाम सुंठीसारखें आहे. पारमार्थिक प्रगतीच्या मार्गांत प्रत्येक व्यक्तींतल्या ज्या ज्या गुणदोषामुळें अडथळा येतो ते गुणदोष दूर करून प्रगतीचा मार्ग भगवंताचें नाम मोकळा करतें. **म्हणून कोणांत कोणतेहि गुणदोष असोत, त्यानें निष्ठेनें नाम घेतलें कीं, त्याचें बिनचूक काम होऊन तो ध्येय गांठतो.** आपल्यांत नंदादीप लावण्याची पद्धत आहे. नंदादीप हा तेलाचा दिवा असून त्याचें वैशिष्ट्य म्हणजे तो अखंड तेवत ठेवायचा असतो. त्यांत तेलाचा पुरवठा करावा लागतो. तसें, ज्याला आनंदरूपी नंदादीप हवा असेल त्यानें सतत नामरूपी तेलाचा पुरवठा करीत राहिलें पाहिजे. थोडक्यांत म्हणजे, ज्याला आनंद हवा असेल त्यानें सतत नाम घेतलें पाहिजे. आनंदाचा उगमच नामांत आहे. केव्हांहि आणि कुठेहि पाहिलें तरी बर्फामध्यें गारपणा हा असायचाच, त्याचप्रमाणें परमात्म्याजवळ नेहमीं आनंद हा असायचाच असें समजावें. आपण जगामध्यें व्याप वाढवितों तो आनंदासाठींच वाढवितो; पण भगवंताच्या व्यतिरिक्त असणारा आनंद हा कारणांवर अवलंबून असल्यानें, तीं कारणें नाहींशीं झालीं कीं तो आनंद पण मावळतो. म्हणून तो आनंद अशाश्वत होय. "खावें, प्यावें आणि मजा करावी" हें तत्त्वज्ञान मला थोडेसें पटतें, पण त्यामध्यें मोठा दोष असा कीं, तें देहबुद्धीवर आधारलेलें असल्यानें कायमचें म्हणजे टिकणारें नाहीं; कारण आजची चांगली परिस्थिति उद्या बिघडली, कीं याची मजा गेली! उलट, येईल त्या परिस्थितीमध्यें आपण आनंद निर्माण करावा. **रोज अगदीं पांचच मिनिटें का होईना, भगवंताशीं अनन्य व्हायला शिका.** अशा त्या पांच मिनिटांचा आनंद शंभर वर्षें नुसतें जगून मिळणार नाहीं. साखरेच्या गोडपणाबद्दल तासन्तास निरूपणें करण्यापेक्षा एक चिमूटभर साखर तोंडांत टाकली असतांना जसा खरा आनंद मिळतो तसेंच इथें आहे. जगण्यामध्यें आनंद आहे ही गोष्ट खरी, पण आनंदाचें जगणें नसेल तर तें मेल्यासारखेंच आहे. ज्याच्याजवळ भगवंत आहे त्यालाच आनंदाचें जगणें प्राप्त होईल. म्हणून ज्याला जगायचें आहे त्यानें नाम घ्यावें "सदा सर्वदा योग तुझा घडावा" असें श्रीसमर्थांनीं मागितलें. "तुझा विसर न व्हावा" असें श्रीतुकारामबुवांनीं मागितलें. याचें कारण हेंच कीं, जिथें भगवंत तिथें आनंदीआनंद असतो. व्यापारी लोक "आज रोख उद्या उधार" अशी पाटी लावतात, त्याप्रमाणें आपणहि "आनंद रोख, दुःख उधार" अशी वृत्ति ठेवावी. ज्याचा आनंद नामांत टिकेल, त्याला नित्य दिवाळीच आहे.

---

४५. भगवंतानें आपल्याला ज्या स्थितींत ठेवलें आहे त्यांत समाधान मानून त्याचा कधींहि विसर पडूं न द्यावा.

# " जेथें नाम तेथें मी आहेंच "

१५ फेब्रुवारी

मला तुम्ही नामांत पाहता म्हणजे काय, हें तुम्हांला समजलें आहें का ? मी जेव्हां देहांत होतों असें तुम्हांला वाटत होतें तेव्हां मी देहांत होतों कां ? तर मी त्या वेळींहि देहांत नव्हतोच. तुमची ज्या ठिकाणीं वासना असते तेथेंच तुम्ही खरे असतां. तुम्ही आतां यात्रेकरितां आलां आहांत, पण तुमचें मन जर घराबद्दल चिंतन करीत असेल तर तुम्ही येथें असूनहि घरींच आहांत असें होतें. तुम्हांला जर कोणीं विचारलें, तुम्ही नेहमीं कोठे असतां ? तर आम्ही विषयांतच असतों असेंच सांगावें लागेल. तर ज्यांना जें जास्त आवडतें त्यांतच ते असतात हें खरें ना ? मग तुमचा गुरु कोठें आहें असें जर तुम्हांला कोणी विचारलें, तर तुम्ही त्याला कुठें दाखवाल ? मी नामांत आहे असेंच म्हणाल ना ! मी जेव्हां गोंदवल्यास होतों तेव्हांहि मी देहांत नव्हतो, मी नामांतच होतों; आणि तेव्हांहि जेथें नाम तेथेंच मी असें. मी ज्या देहांत होतों असें तुम्ही म्हणत होता, त्या देहाची जर मला गोडी असती तर देह मी कां टाकला असता ? मला देह राखण्याची शक्ति नव्हती काय ? त्या वेळेस जर मला दुसऱ्या कोणत्याहि देहांत जाता येत होतें; तर मी एकाच देहांत होतो हें म्हणणें कसें शोभेल ? तर मी देहांत नसून नामांतच होतों आणि आतांहि नामांतच आहे. आतां देह नसला तरी शब्दानें मी तुम्हांत आहेंच ना ? एखाद्याला डोळे नसले तर तो नाहीं असें जर होत नाहीं; तर मला आतां देह नाहीं म्हणून मी नाहीं असें नाहीं. **म्हणून जेथें नाम आहे, जो नामस्मरण करतो, त्याचे मागेंपुढें मी उभा आहे.** मला तेथें जाणेंच भाग आहे. नामस्मरण करतांना मला कसें पाहावें हें मी तुम्हाला सांगतों. मला चार तऱ्हेनें पाहतां येईल. एक देहांत, दुसरें मनानें, तिसरें रूपानें आणि चौथें नामस्मरणानें. जोपर्यंत तुमची देहबुद्धि गेली नाहीं तोंपर्यंत मला देहानेंच पाहणें चांगलें. नामस्मरण करतांना मला देहांतच पाहावें, नाहीं तर मनानें आठवावें. नामस्मरणानें तुम्हांला आतांच पाहतां येणार नाहीं, कारण त्या वेळेस नामस्मरण करणारा आणि ज्याचें नामस्मरण करतां तें, वेगळें उरतच नाहीं. एकदम चार पायऱ्या उडी मारण्याची हाव कशाला धरतां ? आपण गुरूनें सांगितलेलें साधन करीत जावें, म्हणजे साधनांत पुढें वाट दाखवायला गुरु उभाच असतो. जसें, जेथें दोन वाटा फुटतात तेथें एक पंढरपूरची आणि एक गोंदवल्याची पाटी असते, तसें साधनांत राहून, जेथें त्या दोन वाटा फुटतात तेथपर्यंत या, म्हणजे तेथें गुरु उभाच आहे, आणि तुम्हांला तो वाट दाखवतच असतो. पण उगीच कांहीं न करतां, पुढें काय आहे हें विचारण्यानें काय होणार ? तुम्हांला जसें वाटेल तसें तुम्ही मला पाहा, पण नामस्मरण करा, म्हणजे पुढचे मी सर्व तुम्हांकरितां करीतच आहें.

---

४६. ज्यानें आपलें मन भगवंताकडे ठेवलें, जो सदैव भगवंताच्या नामांत राहिला, त्यालाच शांतीचा लाभ होतो. मग त्याची इतर परिस्थिति कशीहि असो.

# नाम हीच सत्संगत

१६ फेब्रुवारी

**ज्या स्थितींत परमात्मा ठेवतो त्यांत आनंद मानावा.** प्रपंचातल्या दुःखाबद्दल वाईट वाटून घेऊं नये. आपण जगांत वागतांना सर्व ' माझें, माझें, '' म्हणतों, पण प्रत्यक्ष आपल्या वांटणीला किती येतें याचा कधीं आपण विचार करतों का ? मिळण्याची आणि मिळविण्याची हाव वाढल्यामुळेंच आपल्याला खरें दुःख होतें. ही हाव नाहींशी व्हायला भगवंताच्या स्मरणांत राहणें हा एकच उपाय आहे. भगवंताकडे चित्त गुतवून ठेवणें हाच खरा धर्म मानावा. जगाला फसवूं नये आणि जगाकडून फसलें जाऊं नये. मी भगवंताचा आहें ही जाणीव ठेवून वागावें. साहेब कुठेतरी दूर असतो आणि तुमची बदली कागदाच्या तुकड्यानेंहि तो करूं शकतो, त्याला प्रत्यक्ष यावें लागत नाहीं. त्याप्रमाणें मीं सांगतों तसें वागणें यांतच माझी संगत आहे. **नामांत जो राहिला तो सत्संगतींत राहिला.** व्यवसाय आणि हौस याप्रमाणें आपण संगत धरतों. मनाची आणि नामाची संगत जोडून द्यावी. मालकाच्या बरोबर असलेला कुत्रा ज्याप्रमाणें धीट होऊन दुसऱ्यावर भुंकतो, त्याप्रमाणें आपण भगवंताच्या आधारानें राहावें; भुंकूं मात्र नये. नेहमीं लीनता ठेवावी. '' मी '' साधन करतों हे विसरून जावें; त्याबद्दल अभिमान धरणें म्हणजे साधनाला कमीपणाच आणणें आहे. आपल्या कामांत लक्ष ठेवून सर्वांशी प्रेमानें वागावें. स्त्री दीराचा किंवा सासू-सासऱ्याचा मान ठेवते, ती नवऱ्याला खुष करण्याकरितां. त्याप्रमाणें भगवंताला ज्या रीतीनें समाधान होईल त्याप्रमाणें आपण वागावें, याकरितांच संतांची संगत धरून, ते सांगतील तसें वागावें; ते वागतील तसें नाहीं वागूं. डॉक्टरला जर आपण ' त्या काळ्या बाटलींतलें औषध का मला देत नाहीं ? ' असें म्हटलें तर तो ज्याप्रमाणें '' तुला तो रोग नाहीं '' असें उत्तर देतो, त्याप्रमाणें संत ज्याची त्याची वृत्ति ओळखून मार्ग सांगतात. आपल्या पतंगाची दोरी आपण संतांच्या हातांत द्यावी आणि आपण खुशाल निश्चित राहावें. संत आत्मानंदाच्या मानससरोवरांतच न राहतां प्रपंचाच्या डबक्यांत आणि त्यांतल्या चिखलांत आले. त्या वाण पाण्याची संतांनीं भगवंताच्या प्रेमाची गंगा बनविली. हीच त्यांची खरी करामत होय. त्या डबक्यांतलें पाणी अर्थात् मुळामध्यें शुद्ध उगमांतूनच आलेलें आहे. फक्त संतांनाच वेदाचा खरा अर्थ कळला. त्यांचे केवढे उपकार सांगावेत कीं, त्यांनीं तो अर्थ आपल्याला सांगितला. म्हणून आपण मुद्दाम वेद वाचण्याचें कारण नाहीं; आपण फक्त संत आपल्याला सांगतील त्याप्रमाणें वागावें. त्यांत आपलेंच घुसडूं नये. आपलें काम खात्रीनें झालेंच पाहिजे. पाणी गोठून जसें बर्फ बनतें, बर्फाच्या आंत-बाहेर पाणीच असतें, तसें जो आंत-बाहेर भगवंताच्या प्रेमानें ओथंबलेला असतो त्याला संत म्हणतात. असे संत फक्त नामस्मरणानेंच जोडतां येतात.

---

**४७. नुसते जिवंत राहणे हे काहीं खरें नाहीं, जगणे हें दुसऱ्या कशासाठीं तरी असले पाहिजे ही वृत्ति असावी. जगून भगवंताच्या अनुसंधानामध्यें राहावे.**

# नाम भावयुक्त अंतःकरणानें घ्यावें

१७ फेब्रुवारी

विषयांत काळ घालवूं लागलों कीं, पूजेचा विसर पडतो. मला आज देवाची नड अशी वाटत नाहीं, पण कशी वाटेल याचा तरी आपण विचार करावा. भगवत्‌चिंतनानें, नामानें ही गरज भासूं लागते. गरज इतकी भासली पाहिजे कीं, अन्नपाणी सुद्धां गोड लागूं नये. जितकी आग जोराची तितका पाण्याचा मारा जास्त हवा, तसें जितकी देहबुद्धि बळकट जितका नामाचा जोर अधिक पाहिजे. नामांत प्रेम नाहीं म्हणून तें घेण्याचें सोडूं नये. पाण्यांत पडल्यावर पुढें पोहायला येतें. काशीला गेलें नाहीं तरी काशीस जायचें असें तरी म्हणावें; त्याप्रमाणें नामांत प्रेम नसलें वाटत तरी, नामांत प्रेम आहे असें नित्य म्हणावें. नामाशिवाय दुसरें सत्य नाहीं, दुसरें साधन नाहीं असा दृढ विश्वास झाला म्हणजे नाम घेतल्याशिवाय राहवत नाहीं; आणि घेतल्यानें; त्याच्या सहवासानें, त्याचें प्रेम येतें.

संत देव आहे असें म्हणतात, मीहि देव आहे असें म्हणतों, मात्र फरक इतकाच कीं, माझें म्हणणें अनुमानाचें असतें, त्यांचें प्रत्यक्ष अनुभवाचें असतें. संत देहातीत असतात; त्यांच्याजवळ गेल्यानें देहाभिमान कमी होतो, प्रत्यक्ष गेले नाहीं तरी चालेल; भाव ठेवून कार्य जितकें लवकर होतें तितकें देहाच्या सहवासानें होत नाहीं. तीर्थांत तीर्थपण, देवांत देवपण आणि गुरूंत गुरूपण आपण आपल्या भावनेनें देतो. तीर्थास जाऊन जर 'आपण यानें निष्पाप होऊं' अशी भावना असली तरच मला तीर्थाचें स्नान होईल, नाहींतर मला तें नुसतें पाणीच आहे ! थोडक्यांत म्हणजे सर्व कांहीं भावनेंत आहे. नाम हें भाव उत्पन्न करतें. भावयुक्त अंतःकरणानें आपण नाम घेतलें म्हणजे आपलें काम शीघ्र होतें.

साधूंचीं अगर संतांचीं लक्षणें आपल्या अंगांत ती बाणून घेण्याकरितां सांगितली आहेत. परंतु त्या लक्षणांवरून साधु कधींहि ओळखतां येणार नाहीं; साधु होऊनच त्याला ओळखले पाहिजे. प्रापंचिकाला त्याला ओळखायचें असेल तर त्यानें आपल्यावर त्याच्या संगतीचा काय परिणाम झाला हें पाहावें; म्हणजे आपणावरूनच त्याला ओळखायचें. आपल्या मनाला कांहीं वेळ तरी शांति मिळाली, आपला थोडा तरी मीपणा कमी झाला, मन निर्विषय झालें, निदान निर्विषय राहावें असें वाटूं लागलें तर तें साधूचें स्वरूप आहे असें समजावें. साधु सर्वांभूतीं भगवद्‌भाव किंवा सर्वत्र मीच आहें असें पाहातात, त्यामुळें सर्वांवर ते प्रेम करतात. आपण आपलेपणा कांहींमध्येंच पाहतों, सर्वत्र पाहात नाहीं, म्हणून द्वैतप्रचीति येते. साधूंचा मीपणा गेल्यानें जगांत त्यांना सर्वत्र अभेदप्रचीति येते. सर्वत्र भगद्‌भाव ते पाहतात आणि त्यांचें प्रेम अगदीं निर्मळ असतें. साधूच्या प्रेमाची थोडी छटा आईच्या प्रेमाला येते; पण तिचें प्रेमसुद्धां थोडें स्वार्थमूलकच असतें. संतांचें प्रेम यायला नाशिवंत वस्तूंवरचें प्रेम नष्ट झालें पाहिजे. सर्वत्र प्रेम करायचें म्हणजे निःस्वार्थ बुद्धीनें योग्य तें करणें. **भगवंताच्या दास्यांत जें प्रेम आहे तें जगाच्या मालकींत नाही.**

---

४८. आपण सर्वांनीं " मी भगवंताकरितां आहे " असें मनानें समजावें आणि सदैव त्याच्या नामांत राहावें.

# नामाविषयीं शुद्ध भाव व दृढनिश्चय आवश्यक

१८ फेब्रुवारी

ईश्वर सर्वांचा उत्पन्नकर्ता आहे, रक्षणकर्ता आहे, तसेंच संहारकर्ताहि आहे। परंतु तरी त्याला न्यायी आणि प्रेमी म्हणतातच. म्हणजे प्रेम हें निःस्वार्थातच असतें. आपल्याला खरें म्हटलें म्हणजे आपला स्वार्थच नडतो. आपला स्वार्थ या प्रेमाच्या आड येतो; आपले विषय ईश्वरप्रेमांत व्यत्यय आणतात. ज्या ज्या गोष्टींमुळें हें प्रेम प्राप्त होत नाहीं त्यांचा त्याग नको का करायला? त्यांची आसक्ति, त्यांच्यावरचें प्रेम नाहींसें झालें पाहिजे. आपण ईश्वराचें, संतांचें झालें पाहिजे. त्याशिवाय आपल्याला कशाचीहि गरज वाटतां कामा नये. एकाच मातीचा जसा गणपति, बाहुलें, किंवा मडकें होतें, त्याप्रमाणें ईश्वरहि आपल्या भावनेप्रमाणें होतो. म्हणूनच आपला भाव नेहमीं शुद्ध आणि निःस्वार्थी असावा. मुळांत पाणी घातलें कीं झाड वाढतें, पण आपण मुळापर्यंत जातच नाहीं. भाव शुद्ध कसा होईल तें पाहावें. एकादशीच्या दिवशीं उपवास करायचा एवढेंच आपल्याला ठाऊक असतें. एक गृहस्थ एकादशीला बारा वाजेपर्यंत अंघोळ न करतां अंगण, मोरी झाडत बसला! थोडक्यांत म्हणजे, आपल्याला मुळांत काय पाहिजे हेंच कळत नाहीं. याकरितां **गुरुआज्ञा प्रमाण मानून आपण वागत जावें**. डोळ्याला कावीळ झाली म्हणजे खरें रूप कसें कळणार? म्हणून ज्याचे डोळे साफ आहेत, तो सांगेल त्याप्रमाणें वागावें. नाम श्रद्धेनें आणि शुद्ध भावानें घ्यावें म्हणजे मनांत शंका येत नाहींत. शंका अनेक तऱ्हेच्या असतात. नाम घेतांना भगवंताकडे लक्ष नसलें तर त्या नामाचा उपयोग आहे कीं नाहीं, नाम घेतांना कसें बसावें, दृष्टि कशी ठेवावी, नाम शुचिर्भूतपणेंच घ्यावें किंवा कसें वगैरे; थोडक्यांत म्हणजे, आपण जें नाम घेतो तें भगवंतापर्यंत पोचतें कीं नाहीं, या एकाच शंकेंत सर्व शंकांचा समावेश होतो. वास्तविक भगवंत आणि त्याचें नाम हीं एकरूपच असल्यामुळें त्या दोहोंच्या आड कांहींच येऊं शकत नाहीं. या भगवंताच्या नामाची गोडी एकदां लागली म्हणजे भगवंत नाहीं आपल्याला सोडीत. नामाशिवाय दुसरें सत्यच नाहीं अशी दृढभावना झाली पाहिजे. जितका देहाचा संबंध जास्त तितकें नाम अधिक घेतलें पाहिजे. नामासारखें सोपें साधन नाहीं. आज इतके दिवस आपण विषयाचें चिंतन केलें, त्यानें आपल्या हातांत काय आलें? विषयाच्या ध्यासापासून सुख नाहीं असें वाटूं लागलें म्हणजे नामांत गोडी येतें.

---

४९. भगवत्प्राप्ति हें आपल्या जीवनाचें ध्येय ठरवून आपण नेहमीं त्याच्या भोंवतीं फिरत असावें; म्हणजेच, त्याच्या अनुसंधानांत असावें.

# जमेल तसें नामांत राहण्याचा प्रयत्न करा

**१९ फेब्रुवारी**

**मी ' कोणीतरी ' आहें असें वाटण्यापेक्षां मी ' कोणाचा तरी ' आहें असें वाटणें हिताचें आहे.** एका बाईला सासरीं नामस्मरण करणें कठीण जाई; कारण सासरच्या लोकांना तें आवडत नसे. मी तिला सांगितलें, " लोणी चोरून खाण्याचा परिपाठ ठेवला तरी त्याचा परिणाम शरीरावर दिसतोच, तसें नाम कोणाला न कळत घेतलें तरी त्याचा उपयोग होतोच, म्हणून उघडपणें नाम न घेतां आलें तरी तें गुप्तपणें घ्यावें आणि त्याप्रमाणें युक्तीनें वागावें. " पोटामध्यें अन्नाची जरुरी असतांना जर तें तोंडातून जात नसेल तर नळीनें पोटांत घालतात; त्यामुळें तें लवकर पोटांत जातें, तसें भावनेच्या नळीनें नाम घेतलें तर फार लवकर काम करतें.

नुसत्या विषयांत राहणें हा आडमार्ग आहे; नामांत राहणें हा सरळ मार्ग आहे; एक मनुष्य बैलगाडीतून जातांना रस्त्यामध्ये पडला. एका सज्जन माणसानें त्याला तेथें पडलेला पाहून उचलला आणि आपल्या घरीं नेला. आपण भगवंताच्या नामांत पडून राहावें; त्यांत राहिलें कीं कोणी-तरी संत भेटतो आणि आपलें काम करतो; आपण सरळ मार्गांत मात्र पडलें पाहिजे.

खरोखर, नाम किती निरुपाधिक आहे ! आपण देहबुद्धीच्या उपाधींत राहणारे लोक आहोंत म्हणून आपल्याला नामाचें महत्त्व तितकेंसें समजत नाहीं. संतांनाच नामाचें खरें महत्त्व कळतें. विलायत येथून हजारो मैल लांब आहे. तेथें जाऊन आलेल्या लोकांकडून आपण तेथील गोष्टी ऐकतों. तेथें आपण पायीं जाऊं शकत नाहीं, कारण तें फार लांब आहे. शिवाय वाहनामध्यें बसून जावें म्हटलें तर मध्यें मोठा समुद्र आहे. तेव्हां पायाला श्रम न होऊं देतां, समुद्राचें पाणी पायाला न लागतां, आणि आपल्याला बुडूं न देता समुद्रातून पार नेणारी जशी आगबोट आहे, त्याचप्रमाणें भगवंताचें नाम आहे. भगवंत कसा आहे तो आम्हीं पाहिला नाहीं, पण संत त्याला पाहून आले आणि त्यांनीं त्याचें वर्णन आमच्याजवळ केलें. आम्हीं आमच्या कष्टानें त्याला गाठूं म्हणावें तर तें शक्य नाहीं शिवाय प्रपंचासारखा एवढा भवसागर मध्यें आडवा आलेला आहे. अशा परि-स्थितीमध्यें **आपण नाम घट्ट धरलें तर सुखानें भगवंतापर्यंत जाऊन पोहोचूं.**

व्यवहारामध्यें जशीं एकाच माणसाला अनेक नावें असतात, तीं त्यापैकीं कोणत्याहि नावाला " ओ " देतो, तसें कोणत्याहि नावानें हाक मारली तरी एकच भगवंत " ओ " देतो. खरेदीपत्रांतल्या नामनिर्देशानें निरनिराळ्या गांवी असलेल्या सर्व जिंदगीची ( इस्टेटीची ) मालकी मिळते, तसें सर्वव्यापी असलेल्या देवाची प्राप्ति त्याच्या नामानें होते. खरोखर, नाम ही कधींहि नाहींशी न होणारी जिंदगीच आहे.

---

५०. नामाचा अनुभव जसा नामांतच घ्यायचा असतो, तसा भगवंताचा अनुभव त्याच्या अनुसंधानात येतो.

# कर्तव्याला चुकूं नये। पण त्यांत रामाला विसरूं नये ॥

२० फेब्रुवारी

आपलें कर्तव्याला न विसरावें । भगवंताचे अनुसंधान राखावें । व्यवहारानें योग्य तें कर्तव्य करीत जावें । बाकी रामावर सोंपवावें ॥ कर्तव्यात परमात्म्याचें स्मरण । यांतच सिद्धीचें बीज जाण ॥ असा करावा संसार । जेणें राम न होईल दूर ॥ देहानें कर्तव्याची जागृति । त्यांत ठेवावी भगवंताची स्मृति । कर्तव्यांत असते मनाची शांती ॥ कर्तव्याचा कधीं न पडावा विसर । हृदयीं धरावा रघुवीर । ऐसें वागेल जो जनीं । त्यानें जोडला चक्रपाणी ॥ उद्योगाशिवाय राहूं नये । कर्तव्याला चुकूं नये । पण त्यांत रामाला विसरूं नये ॥ ठेवावा रामावर विश्वास । कर्तव्याची जागृति ठेवून खास ॥ देहाचा विसर पण भगवंताचें ध्यान । हेंच भक्तीचें मुख्य लक्षण ॥ देह करावा रामार्पण । स्वतःचें कर्तेपण सोडून ॥ शास्त्रीपंडित विद्वान् झाला । भगवत्पदीं न रंगला । व्यर्थ व्यर्थ त्याचें जिणें । उचित हें समजून वागणें । भगवंतापाशीं राहावें रात्रंदिन । हाच सुखाचा उत्तम उपाय जाण । रामाचे चरणीं ध्यावी गति । हाच विचार आणावा चित्तीं ॥ सुटावी प्रपंचाची आस । तेथें परमात्म्याचें प्रेम खास ॥ सर्व कर्मांत अधिष्ठान असावें देवाचें । तोच कल्याण करील साचें ॥ भलें बुरें जें असेल कांही । तें सोडावें रामापायीं ॥ चित्त असावें रामापायीं । देहानें खुशाल संसारांत राहीं । आपण व्हावें रामार्पण । सुखदुःखास न उरावें जाण ॥ धन्य त्याची जननी । ज्यानें राम आणिला ध्यानीं मनी ॥ रामावीण दुजें कांहीं । आतां सत्य उरलें नाहीं ॥ भाव ठेवावा चित्तांत । सुखें आयुष्य घालवावें त्याचे सान्निध्यांत ॥ ज्यानें जिणें केलें रामार्पण । त्यासी व्यवहार हेंच खरें योगसाधन ॥ "माझें सर्व तें रामाचें" । हें मानून जगांत वागणें साचें । अशास नाहीं कष्ट फार । मागें पुढें रघुवीर ॥ आपण व्हावें मनानें रामाचें । राम जें करील तेंच घडेल साचें ॥ चित्त ठेवावें रामापायीं । दुजें मनांत न आणावें कांहीं ॥ आतां न सोडावी हरीची कास । होऊन जावें त्याचे दास ॥ दास्यत्वाचें मुख्य लक्षण । मालकावांचून न दुसऱ्याची आठवण ॥ भगवंताचा दास झाला । जग मानत त्याला ॥ म्हणून आपण सर्व आहों रामाचे दास । हें उरीं बाळगावें खास ॥ "एकच जगतीं माझा रघुपति" याहून दुजा न करावा विचार । हाच ठेवावा निर्धार ॥ भाव ठेवतां रामापायीं । तो कधीं कमी पडूं देणार नाहीं ॥ मनानें जावें भगवंताला शरण । जो चुकवील दुःखाचें कारण ॥ राम माझी मातापिता । बंधु सोयरा सखा । तोच माझे सर्वस्वाचें ठिकाणीं । याहून दुजा विचार मनांत न आणीं ॥ काळ फार कठीण आला । बुद्धिभेद त्वरित झाला ॥ आतां सांभाळावें सर्वांनीं आपण । रामावीण न जाऊं बावा क्षण ॥ जोपर्यंत विषयाची आस ॥ तोपर्यंत नव्हे भगवंताचे दास ॥

---

५१. धन्य त्याची जननी । ज्यानें राम आणिला ध्यानीं मनीं ॥

# अभिमान सोडून, निश्चयानें, नियमितपणें नाम घेणें

**२१ फेब्रुवारी**

विषयांत राहून परमात्म्याची भक्ति होईल का ? विषय सोडल्याशिवाय मी भक्ति करतों असें म्हणणें चुकीचें आहे. विषय आहेत तेथें भक्ति नाहीं आणि भक्ति आहे तेथें विषय नाहींत. भक्त म्हणजे भगवंताचें होऊन राहणें. त्याला शरण गेल्याशिवाय त्याचें होताच येत नाहीं. अभिमान धरून भक्त होतां येईल का ? जसें, संन्यास घेतांना, ही माझी बायको घेऊन मी संन्यास घेईन असें म्हटलें तर तो संन्यास होईल का ? अभिमान ठेवून आपल्याला कधींच भक्त होतां येत नाहीं. आपला अभिमान कशानें कमी होईल याचा आपण कधीं विचार केला आहे का ? प्रथम अभिमान कसा नाहींसा होईल हें पाहावें आणि तसें वागण्याचा प्रयत्न करावा, म्हणजे तें साधूं लागतें. आपण प्रपंचात 'मी करीन तसें होईल' या भावनेनें वागत असतों. परवांच एकजण आले होते, त्यांना त्या वेळीं कोणींहि म्हटलें असतें कीं, हे सातआठ दिवसच वांचतील. परंतु त्या वेळेसहि, "मी अमुक करीन, मी तमुक करीन," असें ते म्हणतच होते; आयुष्याच्या शेवटच्या घटकेलाहि केवढा तो अभिमान ! म्हणून सांगतों कीं, 'मी करतों' ही भावना टाकून देऊन, सर्व काहीं तोच करीत आहे, आणि त्याची इच्छा असेल तोंपर्यंत आपल्याकडून तो करवून घेत असतो, ही भावना ठेवून वागावें. हें कसें साधावें, तर आपण वेदानें सांगितल्याप्रमाणें वागावें. त्याप्रमाणें वागूं लागलें म्हणजे आपोआपच विषयाची आसक्ति कमी होऊं लागते. कोणतेंहि कर्म केलें म्हणजे अमुक एक फळ मिळेल म्हणून वेदांत सांगितलें आहे. त्यावरून वेद हे विषयासक्ति वाढवतात असें म्हणतात. पण वडील माणसें जसें औषध देतांना गुळाचा खडा दाखवितात त्याप्रमाणें तें आहे. फळाच्या आशेनें तरी कर्म करण्यास लागावें, आणि तो कर्म करूं लागला म्हणजे आपोआपच फळावरची त्याची आसक्ति कमी होत जाते; आणि पुढें अभिमान जाऊन, मी कर्ता नसून तोच करवीत आहे असें वाटूं लागतें; मग तो जें कर्म करील तें देवास आपोआपच अर्पण होतें. आपण नेहमीं दुःख झालें म्हणजे देवाला नवस करतों, देवानें मनासारखें दिलें नाहीं म्हणजे 'देवांत अर्थ नाहीं' असें म्हणतों; पण देवाला फसविणें शक्य आहे का ? तो म्हणतो, हा सुखांत असतांना माझी आठवणहि काढीत नव्हता, आणि आतां आठवण करतो आहे ! वास्तविक त्यानें आपल्याला पावावें असें आपण काय केलें आहे ? म्हणून केव्हाहि देवाला फसवूं नये; कारण देव फसला न जातां आपलीच फसगत होते. आपण प्रपंचासाठीं रोज इतके काबाडकष्ट करतों, परंतु आपण दिवसांतून एखादा तास तरी देवाकरितां खर्च करतों का हें आपणाशींच विचार करून पाहावें.

---

५२. भगवंताची मनापासून प्रार्थना करावी. त्याचें मनापासून स्मरण केलें असतां पुढच्या मार्गाचें आपल्याला आपोआप ज्ञान होतें.

# निर्हेतुक नामांत भगवंत

२२ फेब्रुवारी

खरोखर आज आपल्याला आपलें अंतरंग ओळखण्याची खरी गरज आहे. सत्कर्म असो किंवा दुष्कर्म असो, हेतूवर सर्व कांहीं आहे. पुष्कळ पुण्य-कर्में केलीं, आणि कांहीं तरी विषयाचा हेतु मनांत धरला, तर काय उपयोग ! काबाडकष्ट खूप केलें; बायकापोरें टाकून बाह्यागानें कितीहि केलें, तरी मन जोपर्यंत तिथें नाहीं तोंपर्यंत राम नाहीं भेटणार. मनाला भगवंताची तळमळ लागली तरच त्याचा उपयोग. निर्हेतुकांत भगवंत असतो, म्हणून आपलीं कर्में तशीं करावींत. प्रापंचिकाएवढे काबाडकष्ट साधकाला, पारमार्थिकाला नसतात. प्रपंचाच्या काबाडकष्टांपेक्षा निम्म्यानें जरी भगवंताकरितां केलें तरी खूप फायदा पदरांत पडेल. ज्या स्थितींत भगवंतानें आपल्याला ठेवलें त्या परिस्थितींतून त्याला ओळखतां येणें सहज शक्य आहे. आपण विषयाकडे दृष्टि ठेवून कर्में करतों, आणि भगवंत भेटत नाहीं म्हणून दुःखी होतों, याला काय करावें ? दैत्यदानवांनीं भगवंताची तपश्चर्या केली, आणि समर्थांनींहि केली एकानें हेतु धरून केली त्यामुळें त्यांना विषयाचा, हेतूचा, लाभ झाला, परंतु भगवंत अंतरला; तर समर्थांना भगवंताशिवाय दुसरा कशाचाहि लाभ नको होता. त्या लाभांतच त्यांनीं सर्वस्व मानलें. उत्कट प्रेमामुळें भगवंताचा ध्यास लागतो. भगवंताला पाहून " तूं भेटलास, आतां मला कांहीं नको," अशी वृत्ति झाली पाहिजे, तरच मीपणा मरेल. भगवंताचा हात तर पुढें आहेच; आपलाच हात त्याच्यापर्यंत पोहोंचत नाहीं. बुद्धीपेक्षां आणि पैशापेक्षां सदाचरणाचें वजन जास्त असतें. सदाचरण असून भगवंताची निष्ठा असेल, आणि आहे त्या परिस्थितींत समाधान ठेवण्याची संवय असेल, तर प्रापंचिक सुख लाभतें. सुख हें कुठून उत्पन्न करायचें नसून तें आपल्या वृत्तींमध्येंच असतें. जसा " मी " भगवंताचा आहें तसें " सर्वजण " भगवंताचे आहेत. म्हणून भगवंतावर प्रेम केलें कीं सर्व जगावर प्रेम बसेल.

ज्याप्रमाणें भगवंताच्या प्रसादामध्यें एखादा कडू बदाम आला तरी तो आपण खातों, त्याप्रमाणें भगवंतानें एखादे वेळीं दुःख दिलें तरी तें आनंदानें सोसायला पाहिजे. चिकित्सा थोडी बाजूला ठेवून भगवंताचें आपण स्मरण करावें. अंतःकरणाची शुद्धि नामाशिवाय नाहीं होणार. लोकांना सांगणें जेथें बंद होतें तेथेंच कांहीं कृतींत येऊं लागेल. सांगणाऱ्यांनीं श्रवणाकडेहि लक्ष द्यावें. नामापरतें कांहीं नाहीं हें एकदाच ज्याच्या मनानें घेतलें त्याला दुसरें कांहीं सांगावें नाहीं लागत. मीठ म्हणून साखर खाल्ली तरी साखरेची गोडी आल्याशिवाय राहात नाहीं; त्याप्रमाणें कोणत्याहि परिस्थितींत जरी नाम घेतलें तरी तें आपल्याला तारकच ठरेल यांत शंका नाहीं.

---

५३. ज्याच्यामागें उपासनेचा जोर आहे तोच जगांत खरें काम करतो.

# साधक व नाम

**२३ फेब्रुवारी**

प्रत्येक शब्दात रामच आहे असें ज्यांना वाटतें त्यांची तयारी कांहीं निराळीच असते. आपल्याला अमुक एका नांवांतच प्रेम येतें; परंतु सिद्धांना मात्र कोणी कशाचाहि उच्चार केला तरी नामाचाच केला असें वाटतें. प्रल्हादानें नामस्मरण केलें तें साधक स्वरूपांत केलें, तेंच तेवढें बरोबर, असें साधकांना वाटेल, सिद्धांना नाहीं तसें वाटणार. प्रल्हादानें नामावर जसें प्रेम ठेवलें तसें आपण ठेवावें. कोणत्या वाचेनें नाम घ्यावें याचा नाहीं विचार करूं. नाम घेऊन नामाचा अनुभव घ्या. जसें होईल तसें नामस्मरण करा, पण नामाची कांस सोडूं नका. विषयाचा घाला जेव्हां पडतो तेव्हां नामाची आठवण ठेवा. प्रल्हादानें नामा-शिवाय दुसरें काय केलें ? आजवरच्या सर्व भक्तांनीं हेंच केलें.

साधकानें लोण्यासारखें मऊ असावें. कोणालाहि कोठेहि खुपूं नये, आपण हवेसें वाटावें. आपण निःस्वार्थी झालों तरच हें साधेल. कोणी आपल्या पायां पडतांना, "मी या नमस्काराला योग्य नाहीं" असें साधकानें मनामध्यें समजावें, म्हणजे कोणीं नमस्कार केल्याचा अभिमान वाटणार नाहीं, आणि न करणाऱ्याचा आपल्याला राग येणार नाहीं. **सत्कर्मानंतर आपली स्तुति ऐकायला साधकानें तेथें उभेंसुद्धां राहूं नये.** भगवंत ज्याला हवा आहे त्यानें असें समजावें कीं, आपण आतां कुस्तीच्या हौद्यांत उतरलों आहोंत, अंगाला माती लागेल म्हणून आतां घाबरून चालायचें नाहीं यासाठीं चांगली माणसें पहिल्यानेंच मातींत लोळतात, म्हणजे ती लाज जाते.

भगवंताच्या प्राप्तीचे दोन मार्ग आहेत. एक मार्ग म्हणजे, आजपर्यंत सर्व त्याच्या इच्छेनें घडून आलें, माझें जें सर्व आहे तें त्याचेंच आहे, त्याचें तो पाहून घेईल, तो जें करील तें सर्वांच्या हिताचेंच करील; उद्यांचा दिवस त्याच्या इच्छेनेंच यायचा आहे. असें मनाशीं ठरवून आपण त्याच्या स्मरणांत निश्चिंत राहणें; हा होय. दुसरा मार्ग म्हणजे, "मी जगांत कोणाचाच नाहीं, मी रामाचा आहें," असें म्हणून कोठेहि प्रेम न ठेवतां त्याच्या स्मरणांत राहणें हा होय. हा मार्ग जरा कठीण आहे. यामध्यें मनानें इतर ठिकाणचें प्रेम तोडून टाकायचें असतें, कारण प्रेम एकाच वस्तूवर राहूं शकतें. मन जर आपलें ऐकत नसेल तर न ऐकूं द्या. आपण चांगलें-वाईट शोधावें, तें करूं लागावें. मन आपोआप तेथें येईल. म्हणूनच, "**आपलें मन मारा**" **असें न सांगतां "आपलें मन भगवंताकडे लावा" असेंच संत आपल्याला सांगतात.** आपण भगवंतासाठींच नाम घ्यावें.

---

५४. "हेंच माझें सर्वस्व आहे" असें नामांत प्रेम असावें.

# भक्तांच्या चुका व नाम

२४ फेब्रुवारी

[ ' आमच्या हातून वारंवार चुका होतात, ' **असें** श्रींना म्हटलें तेव्हां श्री म्हणाले :— ] लहान मुलगा चालतांना अडखळतो, पडतो, किंवा बोबडे बोलतों, त्याचें आई-बापांना मोठे कौतुक वाटतें; त्याप्रमाणें मला या तुमच्या चुकांचें कौतुक वाटतें; तसेंच, चुका सांवरण्याच्या तुमच्या प्रयत्नांचेंहि मला कौतुक वाटतें, म्हणून त्याबद्दल तुम्ही कांहींहि मनांत आणण्याचें कारण नाहीं. एखादा मुलगा ' मी विहिरींत उडी घेणार ' म्हणून हट्ट धरून बसला तर त्याच्या बापानें त्याचा हा हट्ट पुरवायचा, का त्याला समजावून किंवा तोंडात मारून तिथून बाहेर काढायचें ? त्याप्रमाणें तुमचे विषय मागण्याचे हट्ट आहेत. खरा भक्त कधींहि दुःखीकष्टी असत नाहीं; आपल्या समाधानांत असतो. मग तो कितीहि दरिद्री किंवा व्याधिग्रस्त असेना ! मला अमुक एक हवें, आणि तें मिळालें नाहीं म्हणजे दुःख होतें. भक्ताला कसलीहि आस नसते, त्यामुळें त्याला दुःख नसतें. तो आणि परमात्मा एकरूपच असतात. परमात्म्याची इच्छा हींच त्याची इच्छा असते. सगुणाची भक्ति करतां करतां त्याला ' मी ' चा विसर पडत जातो. ' मी ' नसून ' तूंच ' आहेस ही भावना दृढ होत जाते, शेवटीं ' मी ' नाहींसा झाला कीं, राम किंवा कृष्णदेखील नाहींसे होतात आणि परमात्मा तेवढा शिल्लक उरतो.

आजारामधून उठलेल्या अशक्त माणसानें जसें काठीच्या आधारानें चालावें, त्याचप्रमाणें प्रापंचिकानें सगुण-भक्तीनें तरून जावें. देहबुद्धि असणाऱ्या माणसाला सगुणावांचून भक्ति करतांच येणार नाहीं. भगवंताला आपण सांगावें कीं, " भगवंता, तुझी कृपा मजवर असूं दे, आणि कृपा म्हणजे तुझें स्मरण मला अखंड राहूं दे. " यांतूनच त्याची भक्ति उत्पन्न होईल. आपल्या हातून होणाऱ्या चुकांचें परिमार्जन नामच करूं शकतें. **भगवंताचें नाम हें सर्व रोगांवर रामबाण औषधच आहे. नामाचें हें औषध सतत थेंब थेंब पोटांत गेलें पाहिजे.** ऑफिसमध्येंसुद्धां आपण तें बरोबर घेऊन जावें. विद्वान्, अडाणी, श्रीमंत, गरीब सर्वांना हें औषध सारखेंच आहे. जो पथ्य सांभाळून हें औषध घेईल त्याला गुण लवकर येईल. गुरूनें एकदा सांगितलें कीं, " तुझें मागचें सर्व गेलें; पुढें मात्र वाईट वागूं नकोस " तर शिष्यानें तें श्रद्धेनें खरें मानावें.

---

**५५. भगवंतावांचून कशांतहि समाधान नाहीं. त्याच्याशिवाय जगण्यांत आनंद नाहीं. जो भगवंताचा झाला, म्हणजे त्याच्या नामांत राहिला, त्याला जगण्याचा कंटाळा येणार नाहीं.**

# नाम घेतल्यानें आपले सर्व अवगुण आपल्यालाच कळून येतील

**२५ फेब्रुवारी**

[अश्वत्थपूरच्या मंडळींना निरोप देतेवेळी :] तुम्हां सर्वांना निरोप देतांना मला खरोखरच फार वाईट वाटत आहे. पुन्हां आपली भेट होईल कीं नाहीं, ते कांहीं सांगतां येत नाहीं. तुम्हीं सर्वांनीं एकमेकांशीं अत्यंत प्रेमानें वागा. प्रेमानें जग जिंकतां येतें. तुम्ही माझ्यापासून जनप्रियत्व शिका. मला जनप्रियत्व फार आवडतें. लोकांना प्रिय असणारा मनुष्य मला फार आवडतो. कारण जो लोकांना आवडतो, तोच भगवंताला आवडतो. जो निःस्वार्थी असेल त्यालाच जनप्रियत्व येईल. जो भगवंताच्या इच्छेनें वागेल त्यालाच जनप्रियत्व येईल. आपण आपल्यासाठीं जें करतो तें सगळ्यांसाठीं करणें, हें भगवंताला आवडतें. आपण आपल्यापुरतें न पाहतां सर्व ठिकाणीं भगवंत आहे असें पाहावें. प्रत्येकाला आपण हवेसें वाटलें पाहिजे. असें वाटण्यासाठीं लोकांच्या मनासारखेंच वागलें पाहिजे किंवा त्यांना आवडेल तेंच बोललें पाहिजे असें नाहीं. प्रेम करायला कशाचीहि जरूरी लागत नाहीं. पैसा तर बिलकूल लागत नाहीं, हें मी माझ्या अनुभवावरून सांगतों. जगांत कोणीं कधी भोगली नसेल एवढी गरिबी मी भोगली आहे. अशा गरिबीमध्यें राहूनहि माझें अनुसंधान टिकलें. मग तुम्हांला तें टिकवायला काय हरकत असावी ? मी जर कांहीं केलें असेल तर मीं कधींहि कोणाचें अंतःकरण दुखवलें नाहीं. तेवढें तुम्ही सांभाळा. जो जो कोणी मला भेटला तो तो मीं आपलाच मानला. तुकाराम-समर्थांनीं खरा प्रपंच केला. मीं नुसता खेळ मांडला आणि तो खेळलों, त्यामुळें त्याचें सुखःदुख मला कधीं बाधलें नाहीं. नाम घ्यायची इच्छा पूर्ण झाली नाहीं म्हणून मी पुन्हां जन्मास आलों. मला तुम्ही सगळें रामरूप दिसत आहांत. **मला जें सांगायचें असेल तें मारुतीरायाला सांगावें म्हणजे तें मला कळतें.** माझा मनुष्य कोठेंहि असला तरी तो माझ्याकडेच येणार. मला दुश्चितपणा अगदीं आवडत नाही. खरें म्हणजे ज्यांनीं माझी निंदा केली त्यांना मी कोण हें कळलें नाहीं; पण ज्यांनीं माझी स्तुति केली त्यांना मी कोण आहें हें त्याहून कळलें नाहीं. मी तरी तुमच्यापासूनच व्यवहार शिकलो; पण त्यांतली लबाडी मात्र शिकलों नाहीं. प्रत्येकाला वाटते कीं आपल्याला लोकांनीं चांगलें म्हणावें, मीं मात्र वागायचा तसाच वागेन; हें कसें शक्य आहे ? नाम घेतल्यानें आपले हे सर्व अवगुण आपल्यालाच कळून येतील याबद्दल खात्री बाळगा, आणि अंतःकरणपूर्वक नाम घ्या. **जेथें नाम आहे तेथें मी आहे म्हणून खचित समजा. माझी कृपा म्हणजे "पैसा गेला तर आपल्याला आनंद झाला पाहिजे."** ही कृपा कोणाला पाहिजे ! माझ्या माणसांना मी जरूर तर नुसते खड्डे खणून बुजवायला लावीन, पण कोणाला आळसानें स्वस्थ बसूं देणार नाहीं.

---

**५६. जी जी गोष्ट घडेल ती ती आपण भगवंताला सांगावी; भगवंताच्या अस्तित्वाची जाणीव ठेवण्यासाठीं भगवंताला सांगून काम करावें व नेहमीं त्याच्या नामांत राहावें.**

# कोणत्याहि परिस्थितींत नामस्मरण शक्य आहे

२६ फेब्रुवारी

मनुष्याची सर्व धडपड शाश्वत समाधान मिळविण्यासाठीं चालू असते. तें समाधान फक्त भगवंताजवळ असल्यानें समाधानासाठीं प्रत्येक माणसाला भगवंताची गरज आहे. आपल्या सर्व धडपडींतून भगवंताच्या प्राप्तीचें समाधान आपणांस मिळत नाहीं आणि त्याला परिस्थिति कारणीभूत आहे, असें सर्वजण सांगतात. पण खरोखरच परिस्थिति आड येते किंवा काय हें आपण बघितलें पाहिजे. परिस्थितीसंबंधीं विचार करतांना एक बाह्य परिस्थिति आणि दुसरी आंतर स्थिति यांचा विचार करावा लागेल. बाह्य परिस्थितीचा विचार करतांना प्रथम आपली शरीरप्रकृति आड येते. ही प्रकृति कशीहि असली तरी भगवंताचें स्मरण आपल्याला करतां येईल कीं नाहीं ? या प्रकृतीला कितीहि क्षीणत्व आलें, देहाला कितीहि विकलता आली, तरी अंतकाळीं भगवंताचें स्मरण करतां येतें असें भगवंतानें गीतेंत सांगितलें आहे. देहाची अवस्था कोणतीहि असली तरी, त्यामध्यें नामस्मरण करतां येत नाहीं हें म्हणणें कांहीं बरोबर नाहीं. तेव्हां प्रकृति आड येते असें म्हणणें कितपत संयुक्तिक ठरेल ? पुष्कळ लोक आर्थिक अचडणीसंबंधीं कुरकुर करतात. पैसा नसल्याकारणानें प्रपंचांत काळजी उत्पन्न होऊन, भगवंताकडे लक्ष द्यायला सवडच मिळत नाहीं असें बरेचजण सांगतात. पण खरोखरच तुम्ही मला सांगा, जगांत भरपूर धन मिळवून वैभवाच्या शिखरावर पोहोंचलेले कितीसे लोक नामस्मरण करतात ? आजपर्यंत किती राजे लोक आपलें राजवैभव लाथाडून भगवंताच्या प्राप्तीसाठीं वैरागी झाले ? आपल्याजवळ पैसा नसणें हें भगवंताच्या प्राप्तीच्या आड येतें, हें म्हणणें बरोबर नाहीं. उलट, पैसा हा भगवंताची निष्ठा फार कमी करतो. पैसा असला कीं आपल्याला एक आधार आहे असें वाटतें. म्हातारपणीं आपल्याला उपयोगी पडावा म्हणून पैसा सांठवायचा प्रयत्न करावा, तर मी म्हातारपणापर्यंत जगेन याची खात्री कोणीं द्यावी ? सुख, समाधान, हें पैशावर अवलंबून नाहीं. प्रत्येकाची गोतावळी ठरलेली आहे. वेताळाची स्वारी निघाली कीं त्याच्याबरोबर पिशाच्चें निघायचींच आणि भगवंताची स्वारी निघालीं की त्याच्याबरोबर दया, क्षमा आणि जिकडेतिकडे आनंदी वृत्ति हीं असायचीं. त्याचप्रमाणें पैसा आला, कीं त्याच्याबरोबर तळमळ, लोभ, असमाधान, हीं यायचींच. परस्त्री एखादे वेळीं विषयभोगामध्यें आपल्याला सामील होणार नाहीं, पण पैसा मात्र आपण वापरूं तसा वापरला जातो. बाप-मुलगा, भाऊ-भाऊ, भाऊ-बहीण, मित्र-मित्र, यांच्यामध्यें वितुष्ट आणायला कारण कांहीं असेल तर पैसाच होय.

---

५७, " तूं जें देशील तें मला आवडेल " असें आपण भगवंताला सांगावें व त्याचें अनुसंधान ठेवावें.

# नाम घेण्याच्या आड आपणच येऊं नये

**२७ फेब्रुवारी**

आज इतकीं वर्षें होऊन गेलीं तरीसुद्धां ज्ञानेश्वर, तुकाराम, समर्थ रामदास, यांसारख्या थोर संतांचें नांव टिकून राहिलें आहे. **याचें खरें कारण हें कीं त्यांचें नामावर अत्यंत प्रेम होतें.** या सर्व संतांच्या वचनावर आपण विश्वास ठेवतों, त्यांच्याप्रमाणें नामाचें प्रेम आपल्यालाहि यावें असें आपल्याला वाटतें; पण तें प्रेम आम्हांला कां उत्पन्न होत नाहीं, याचा विचार आपण करायला पाहिजे. त्या नामाला उपमा देतांना, तें अमृतापेक्षांहि गोड आहे असें त्यांनीं सांगितलें. नामाला अमृताची उपमा देतांना, त्या अमृताच्या पलीकडे दुसरी गोष्टच नाहीं असें आपण म्हणतों; मग त्या नामाचें प्रेम आम्हांस कां बरें नसावें ? तर त्या नामाच्या आड कांहीं तरी येत असलें पाहिजे हें खास. ज्याप्रमाणें आपण तोंडांत साखर घातल्यावर आम्हांला जर ती गोड लागली नाहीं, तर तो दोष साखरेचा नसून आमच्याच तोंडाला चव नाहीं असें आपण म्हणतों, त्याप्रमाणें नामाची गोडी आमच्या अनुभवाला येत नसेल तर आमच्यामध्येंच कांहीं तरी दोष असला पाहिजे खास. नामाचें प्रेम येण्याला बहुतेक लोक कांहीं ना कांहीं अडचणी सांगतात. कोणाला विचारलें, "नामाचें प्रेम कां येत नाहीं ?" तर तो सांगतो, "माझें लग्न झालें नाहीं, तें होऊन प्रपंच, मुलेंबाळें, हें सर्व झाल्यावर मला नामाचें प्रेम येईल." पण लग्न करून मुलेंबाळें असलेल्या किती लोकांना नामाचें प्रेम लागलें आहे ? कोणी म्हणतो, 'पैसा नाहीं म्हणून प्रपंचाची काळजी वाटते आणि नामाचें प्रेम येत नाहीं.' परंतु अगदीं भरपूर पैसा असलेल्या किती लक्षाधीशांनीं नामाचें प्रेम मिळविलें आहे ? कोणी म्हणतो, "या प्रपंचांत बायकामुलें, आजारपण, शेतीवाडी, यांच्या व्यापामुळें आम्हांला नामाचें प्रेम लागत नाहीं,' कोणी म्हणतो, 'प्रपंचांत राहून मला आतां कंटाळा आला आहे; मी आतां संन्यास घेतों, म्हणजे मला नामाचें प्रेम येईल,' तर कोणी प्रापंचिक दुःखाला कंटाळून अगदीं आत्महत्या करायला निघतो. अशा रीतीनें, सर्वजण ज्या परिस्थितींत असतात त्या परिस्थितींत नामस्मरणाला अडचणच सांगत असतात. नामाचें प्रेम न यायला खरोखरच ही परिस्थिती कारणीभूत आहे का, याचा विचार आपण करायला पाहिजे. मला वाटतें, नामाचें प्रेम यायला खरोखर कारण कोणतें असेल, तर भगवंत हवा असें आम्हांला मनापासून वाटतच नाहीं. तो भगवंत हवा आहे असें वाटणें, हें खरोखर भाग्याचें लक्षण आहे. तुम्हांला खरोखरच भगवंत हवा आहे असें वाटू लागलें म्हणजे त्या हवेपणांतच त्याच्या प्राप्तीचा मार्ग दिसूं लागेल.

---

**५८.** भगवंताच्या इच्छेनेंच सर्व चाललें आहे ही भावना ठेवून जें येईल त्याला नको म्हणूं नये, आणि जें येत नाहीं त्याबद्दल दुःख करूं नये.

# भगवंताजवळ नामाचें प्रेमच मागा

२८ फेब्रुवारी

[ काकडआरतीच्या समाप्तीच्या दिवशीं :— ] इतके दिवस, म्हणजे सबंध महिनाभर, एखादें सत्कर्म चालणें हें भगवंताच्या कृपेशिवाय शक्य नाहीं. त्याचा मोबदला तोच देईल. तुम्ही मात्र त्याच्याजवळ मागतांना नामाचें प्रेमच मागा; दुसरें कांहीं मागूं नका. देवाजवळ मागणें मागतांना चूक होऊं नये. एखाद्या शिक्षकानें विद्यार्थ्यांना वर्षभर उत्तम रीतीनें शिकविलें, परीक्षेच्या वेळीं परीक्षक कोणते प्रश्न विचारण्याचा संभव आहे तें सांगून, त्यांचीं उत्तरेंहि सांगून ठेवलीं; पण परीक्षक परीक्षा घ्यायला आला असतांना प्रश्नांचीं उत्तरें विद्यार्थ्यांनींच द्यायची असतात. तिथें शिक्षक हजर असला, आणि विद्यार्थी उत्तर चुकीचें देतो आहे हें जरी त्याला दिसलें, तरी तिथें त्याला कांहीं बोलतां येत नाहीं. तशी माझी स्थिति आहे. म्हणून मागणें मागण्याचें काम तुम्हांलाच करायचें आहे, तेव्हां त्या वेळीं चुकीनें कांहीं भलतेंच मागूं नका, एवढ्याचकरितां हा इशारा आहे.

कोणतीहि परिस्थिति असली तरी त्यांत भगवंताचें स्मरण ठेवावें, म्हणजे बऱ्यावाईट गोष्टींचा परिणाम मनावर कमी होतो. मनुष्यावर संकटें आलीं कीं तो घाबरतो; परंतु परमेश्वराचें अस्तित्व मानणाऱ्यांनीं तरी असें करणें योग्य नाहीं. एखाद्या लहान मुलाच्या बापानें डोक्यावर पांघरूण घेऊन बागुलबुवा केला तर तें मूल भितें; पण पांघरूणाच्या आंत आपला बापच आहे असें त्याला समजलें कीं तें घाबरत नाहीं. त्याप्रमाणें, प्रत्येक व्यक्तीनें आपल्या बाबतींत घडणाऱ्या बऱ्यावाईट गोष्टी परमेश्वराच्या किंवा आपल्या गुरूच्या इच्छेनें होतात ही जाणीव ठेवावी; म्हणजे त्याला भीति वा दुःख वाटणार नाहीं; तसेंच चांगल्या गोष्टी घडल्या तरी त्याबद्दल आनंदातिरेकहि होणार नाहीं. याकरितां सदासर्वकाळ भगवंताचें चिंतन करावें.

**कर्ज फिटतांना जसा आपल्याला आनंद होतो तसा देहभोग भोगतांना आपल्याला आनंद झाला पाहिजे. प्रारब्ध टाळणें म्हणजे लोकांचें कर्ज बुडविणेंच होय.** आपला ( म्हणजे मीपणाचा ) नाश आणि प्रारब्धाचा नाश बरोबर होतो. दळायच्या जात्याचे दोन दगड असतात; खालचा दगड स्थिर असतो आणि वरचा दगड गोल फिरतो. खालचा स्थिर राहिल्यानें जात्यामधून पीठ बाहेर पडतें. त्याचप्रमाणें, आपलें शरीर प्रारब्धाच्या खुंट्यानें जिथें फिरेल तिथें फिरूं द्यावें, पण आपलें मन मात्र भगवंताच्या ठिकाणीं स्थिर ठेवावें, तरच त्यांतून समाधानाचें पीठ बाहेर पडेल. " भगवंता, प्रारब्धानें आलेल्या दुःखाचा दोष तुझ्याकडे नाहीं, पण जर त्या दुःखामुळेंच तुझें अनुसंधान टिकत असेल तर मला जन्मभर दुःखामध्येंच ठेव, " असें कुंतीनें भगवंताजवळ मागितलें, यातलें मर्म ओळखून वागावें व कांहीं करून अनुसंधानात राहण्याचा प्रयत्न करावा.

---

**५९. प्रारब्धाची व ग्रहाची गति देहापर्यंतच आहे, मनानें भगवंत भजायला त्याची आडकाठी नाहीं.**

# नामाविण नाहीं दुजें साधन । हें सांगत आले सर्व संतजन

२९ फेब्रुवारी

[ श्रीमहाराजांच्या एका शिष्यानें नामस्मरण पुष्कळ केलें, पण वृद्धपणीं त्याची स्थिती फार बिघडली. त्याला लिहिलेलें पत्र — ] तुमची प्रकृति बरी नाहीं हें ऐकून बरें वाटलें नाहीं; तरी पण, चित्तांत राखावें समाधान ।। चित्तांत ज्याचें राहिलें समाधान । तोच भगवंताचा आवडता जाण ।। ज्याचा विश्वास रामावरी । त्याला समाधान स्वीकारी ।। माझें हित रामाचे हातीं हा धरितां विश्वास । समाधान मिळत असे जीवास ।। दुःख ही परमात्म्याची इच्छा जाणून जो भगवंताचा झाला । त्याला देह प्रारब्धावर टाकतां आला ।। प्रारब्धानें देहाची स्थिती । हें सर्वच सांगती । पण त्यांत मानतां येतें सुख समाधान । ध्यातां एक रघुनंदन ।। तात्पुरतें कांहीं तरी औषध घ्यावें । देहाच्या लोभांत न सांपडावें ।। माझें सांगणें दुजें नाहीं । जोंवर श्वासोच्छ्वास देहीं । तोंवर मुखीं नाम पाहीं ।। तरीपण मीं सांगतों एक । ठेवावा रामावर विश्वास । तोच साह्यकारी होईल खास ।। असावें शुद्ध आचरण । करावें भगवंताचें स्मरण ।। कर्तव्याची ठेवावी जागृति । त्यांत भगवंताची राखावी स्मृति ।। नामाविण नाहीं दुजें साधन । हें सांगत आले सर्व संतजन ।। देहाचें अस्तित्व भगवंतासाठीं । याहून नाहीं दुजी उच्च प्राप्ति ।। देहाचे भोग देहाचे माथीं । ऐसें सर्व सांगती ।। परी एक वाटतसे चित्ता । ते दूर होतील एक भगवंत चिंतितां ।। भगवंतावांचून देहाचे सुखभोग । हे न मानिती साधुसज्जन ।। आतां जगणें रामासाठीं । हा निश्चय मानावा चित्तीं ।। जगांतील वैभव ऐश्वर्य संपत्ति । लौकिक आणि कीर्ति । हे परमात्म्यावांचून मातीमोल साधुसंत गणती । आजवर झाले कष्ट फार । देहाचा भरंवसा धरून थोर ।। देहाचें सुखसौख्य आदरसत्कार । हे प्रारब्धाधीन सत्य जाण ।। मुलींनीं खेळ मांडला । परि नाहीं कामाला आला । तैसा प्रपंच थोर झाला । परमात्म्याचा तो न म्हणावा भला ।। जग त्यागी आपणास ।। आपण न त्यागावें जगास । हीच देहबुद्धि खास ।। रामापरतें सत्य नाहीं । श्रुतिस्मृति सांगतात हेंच पाहीं ।। आतां न ठेवावा जगीं भरंवसा । राम सखा करावा खासा ।। रामविण अन्य प्रीति । उपजे देहबुद्धीचे संगती ।। आतां रामा एकच करीं । तुझा विसर न पडो अंतरीं ।। आतां जसें असेल तसें होऊं द्यावें । रघुनाथभजनीं असावें ।। मागील झालें होऊन गेलें । पुढील येणार येऊं द्यावें भलें ।। आतां न धरावा हव्यास । हेंच वाटे जीवास । जें जें करणें आणिलें मनीं । रामकृपें पावलों जगीं । माझें आतां कांहीं । दुसरें मागणें नाहीं ।।

---

६० जोंवर श्वासोच्छ्वास देहीं । तोंवर मुखीं नाम पाहीं ।।

# प्रापंचिक माणसाची स्थिति कशी असते

१ मार्च

सर्व संतांनीं भवरोगावर खात्रीचें औषध सांगितलें आहे. सर्व संत आपापल्या परीनें मोठेंच आहेत. पण त्यांतल्या त्यांत समर्थांनीं आपली जागा न सोडतां, विषयीं लोकांचें चित्त कुठें गुंतलेलें असतें हें पाहिलें आणि मगच रोगाचें निदान केलें. आमचा मुख्य रोग, संसार दुःखाचा असून तो सुखाचा आहे असें वाटतें हा आहे. रोग कळून आला पण औषध जर घेतलें नाहीं तर रोग कसा बरा होणार ? रोग असेल तसें औषध द्यावें लागतें. अजीर्णानें पोट दुखतें तें भुकेने दुखतें असें वाटून आम्ही अधिक खाऊं लागलों तर कसें चालेल ? संसार ज्याला दुःखाचा वाटतो त्यालाच परमार्थमार्गाचा उपयोग ! एखादा दारू पिणारा मनुष्य दारूपायीं आपलें सर्व घालवतो. दारूचा अंमल नसतो त्यावेळीं तो शुद्धीवर येतो, आणि त्याला आपल्या बायको-मुलांची काळजी वाटतें. आपला प्रपंच नीट व्हावा असेंहि त्याला वाटतें. पण त्याच्या बुद्धीला त्यांतून मार्ग सुचत नाहीं. मग तो पुनः इतकी दारू पितो कीं, त्यांत त्याला स्वतःचा विसर पडतो, आणि अशा रीतीनें त्यामध्येंच तो स्वतःचा नाश करून घेतो. अगदीं याचप्रमाणें प्रापंचिक माणसाची स्थिति होते. पहिल्यापहिल्यानें प्रपंच बरा वाटतो, मनुष्य त्यांत रमतो. पुढें कांहीं दिवसानंतर तो थकतो, त्याची उमेद कमी होते, आणि म्हणून आतां आपल्या हातून परमार्थ कसा होणार असें त्याला वाटतें. पण नंतर तो पुनः जोरानें प्रपंच करूं लागतो, आणि शेवटीं हीन अवस्थेंत मरून जातो. जो जगाचा घात करतो तो एका दृष्टीनें बरा, कारण जग स्वतःला सांभाळून घेईल. पण जो स्वतःचा घात करून घेतो त्याला कोण सांभाळणार ? तो फार वाईट समजावा, केवळ प्रापंचिक हा असा आत्मघातकी असतो. खोटें कळूनहि त्यांत सुख मानून तो राहतो, आणि देवानें जें निर्माण केलें तें माझ्या सुखा-करितांच केलें असें समजून मरेपर्यंत त्यांतच गुरफटून जातो. मनुष्य तेंच तेंच करीत असूनसुद्धां त्याला त्याचा कंटाळा कसा येत नाहीं ? कालच्या गोष्टीच आपण आज करतों. आपल्या लक्षांत जरी आलें नाहीं तरी त्या गोष्टी झालेल्याच असतात. तेंच तें जेवण, तीच ती नोकरी, तोच तो पैसा मिळविणें, सगळें तेंच ! असें असतांना माणसाला कंटाळा येऊं नये का ? याचें कारण असें आहे कीं, विषय अत्यंत गोड तरी असला पाहिजे किंवा हांवेला तृप्ति तरी नसली पाहिजे, या दोन कारणांपैकीं दुसरे कारणच खरें आहे. आपली हांव पुरी झाली नाहीं हेंच खरें आहे.

---

६१. जो मनुष्य प्रपंचांतील आपला अनुभव जमेस धरीत नाहीं तो कशानेंच शहाणा होत नाहीं.

# प्रपंचांत मनुष्यानें कसें वागावें

२ मार्च

**खरोखर जगांत माझें हित अगर अनहित करणारा जर कोणी असेल तर तो माझा मीच.** मी कर्ता ही भावना ठेवली कीं फळ भोगण्याची इच्छा राहते. गाढवाचा आणि इंद्राचा विषयानंद यांत फरक कोणता ? विषयाचें खत घालीत गेलें कीं मीपणा वाढत जातो. फलाच्या आशेतसुद्धा कर्मयोग असतोच. मनुष्याला वाटत असतें कीं आपल्याला दुःख येऊं नये, आजारपण येऊं नये; पण तरीसुद्धां आजारपण आणि दुःख तो टाळूं शकत नाहीं. म्हणजे " मी कर्ता " ही जी आपली भावना असते ती निखालस खोटी ठरते. मालकी नसतांना घरची मालकी गाजविण्याचा आपण प्रयत्न करतो याला काय करावें ! तेव्हां प्रापंचिकांत आणि संतांत फरक हाच कीं, ते कर्तेपण रामाकडे देतात, आणि आम्ही तें आपल्याकडे घेतों. खायला देऊं नका असें डॉक्टरनें बजावून सांगितलें असताहि रोग्याच्या इच्छेप्रमाणें गोड पदार्थ त्याला खायला घालून आपण त्याचें अनहितच करतों, तसें विषयाच्या लालचीनें विषयाला बळी पडून, आपलें अनहित आपणच करून घेत असतों. दुसऱ्यांचें शिव्या देणें बंद करायचें असल्यास प्रथम आपण शिव्या देणें बंद करावें. **खरें सांगतों मी, मनुष्यानें जन्मास येऊन एकच करावें : आपण नामांत राहावें आणि दुसऱ्याला नामाला लावावें.** संसारांत न्यून पडूं देऊं नये, पण भगवंताला विसरूं नये. भगवंताच्या स्मरणांत स्वतःला विसरावें. सर्वांभूतीं नम्र होणें हाच अभिमान घालविण्याचा उपाय होय. व्यवहारांत मागें राहूं नये, पण संधि साधावी. 'राम कर्ता' म्हणावें कीं सुख, कल्याण, सर्व कांही आलेंच. त्याच्याकडे सर्व सोंपवा आणि आनंदात राहा, त्यांतच खरें हित आहे. आकाशाचें छत्र जसें सर्वांवर आहे तसें भगवंताचें छत्र सर्वांवर आहे अशी खात्री बाळगा. भगवंत अवतरला आहे, तो येथें जन्मास आला आहे, हें अखंड स्मरणांत ठेवा. कृष्णाचा अवतार पूर्णावतार होता असें म्हणतात, परंतु भगवंताचा जो जो अवतार झाला तो तो त्या वेळीं पूर्णच होता. प्रत्येक अवताराला भगवंताचा अवतार असेंच म्हणतात. ज्यावेळीं जेवढ्या शक्तीची जरुरी होती तेवढीच भगवंताने दाखविली. जास्त शक्ति लावल्यानें कार्य होणार नाहीं.

---

**६२. तुम्ही भगवंताच्या प्रेमानें अगदीं भरून जा; आपापसांत प्रेम वाढवा.**

# प्रपंच परमार्थाच्या आड न येईल अशा युक्तीनें करावा

**३ मार्च**

पुष्कळ लोक जोडधंदा करतात। म्हणजे, त्यांचा एक मुख्य धंदा असतो, आणि त्याला मदत म्हणून दुसरा धंदा करतात. त्यांचें सर्व लक्ष मुख्य धंद्याकडे केंद्रित झालेलें असतें. म्हणजे, जोडधंद्यामुळें जर मुख्य धंद्यात व्यत्यय येऊं लागला तर तो जोडधंदा वेळेनुसार ते जरूरीप्रमाणें बंदहि करतात, किंवा नफानुकसानीचा प्रसंग आला तर जोडधंद्यातल्या नफानुकसानीकडे विशेष आस्थेनें पाहात नाहींत. प्रत्येक माणसानें परमार्थ हा मुख्य धंदा ठेवून, प्रपंच हा जोडधंदा म्हणून करावा म्हणजेच प्रपंचांत होणाऱ्या लाभहानीचा परिणाम भगवंताच्या अनुसंधानावर होऊं देऊं नये. परमार्थाच्या आड प्रपंच न येईल अशा युक्तीनें वागावें. भाजीला जसें मीठ लागतें तसा परमार्थाला प्रपंच लागतो. मीठ नसेल तर भाजी आळणी लागते, पण मीठ जास्त झालें तर भाजी खाववत नाहीं. त्याचप्रमाणें प्रपंच आणि परमार्थ यांचा संबंध आहे. काहीं लोकांना मीठ जास्त लागतें, तसें, ज्यांना प्रपंचाची संवय झाली आहे त्यांना तो जास्त लागतो. त्यांची गोष्ट निराळी, पण ज्यांना प्रपंच नवीन सुरू करायचा आहे, त्यांनी तो बेतानेंच वापरावा. भगवंत डोळ्यापुढें ठेवून वागावें. प्रपंचांत व्यवहार जतन करावा खरा, पण तो कांहीं सर्वस्व नव्हे. भगवंताचा विसर हा कोणत्याहि कारणानें झाला तरी तो बरा नाहीं; मग प्रपंचांत सुखसोयी असल्यामुळें तो होवो, किंवा प्रपंचांत दुःख झाल्यामुळें होवो. प्रत्येकाला प्रपंचाची अत्यंत जरूरी आहे; पण आपण त्याला वाजवीपेक्षां जास्त महत्त्व देतों, आणि त्यामुळें सर्व बिघडतें, **प्रपंच पाहिजे आणि दुःख नको असें म्हणणें वेडेपणाचें आहे**. मूल असेल तर तें कधीं तरी आजारी पडायचेच. नवराबायकोचें ध्येय एकच असेल तर त्यांचा प्रपंच सुखाचा होतो. प्रपंच हा कुणाला सुटला आहे ? हा प्रपंच, हा संसार, जर भगवंतानेंच उत्पन्न केला आहे तर कुणाला तरी सुटेल काय ? **नुसता प्रपंच तापदायक नाहीं, तर आकुंचित प्रपंच हा तापदायक आहे.** ज्याप्रमाणें आपण आपल्या या खिशांतले पैसे त्या खिशामध्यें ठेवतो, त्याचप्रमाणें प्रपंचातलें आपलें मन आपण काढून भगवंताकडे लावावें। तसें करण्यांत समाधान आहे. जो मनुष्य हौसेनें प्रपंच करील त्याला तो करायला चोवीस तासहि पुरणार नाहींत। पण जो जरूरीपुरता प्रपंच करील त्याला तीनचार तास पुरतील.

---

६३. प्रपंच हा मोडक्या वस्तु नीट करण्याचा कारखाना आहे, तेथें मोडक्या वस्तु जितक्या जास्त असतील तितकी शिकणाऱ्याला संधि जास्त असते.

# प्रपंचाचें स्वरूप पूर्ण समजून घेऊन भगवंताच्या नामांत राहावें

**४ मार्च**

आपलें जीवन किती अस्थिर आहे हें लढाईच्या काळांत चांगलें समजून येतें. अशा अस्वस्थतेच्या काळांत मनानें घाबरूं नये. काळजी न करतां शांत चित्तानें भगवन्नामांत कर्तव्य करीत राहावें. काळजीला म्हणा कारण असें कांहींच लागत नाहीं, कारण ती आपल्या काळजापर्यंत, नव्हे काळजापाशींच, असते. काळजी करायचीच म्हटलें म्हणजे कोणच्याच गोष्टी तिच्यांतून सुटत नाहींत. काळजीमुळें मानसिक आणि शारीरिक त्रास होतो. भगवंतावर पूर्ण विश्वास टाकून, तुम्ही काळजी करण्याचें एकदम बंद करा.

ज्याप्रमाणें कोणाचीहि कुंडली मांडली तरी, मग तो श्रीमंत असो कीं गरीब असो, तिच्यामध्यें सर्व ग्रह यायचेच, त्याचप्रमाणें जन्मलेल्या प्रत्येक प्राण्याला सर्व विकार असायचेच. भगवंताचे अवतार जरी झाले किंवा साधु-सत्पुरुष जरी झाले तरी त्यांनाहि विकार असतातच. अर्थात् त्या विकारांच्याबरोबर प्रेम, दया, शांति, क्षमा हे गुणहि त्यांच्या अंगीं असतात. ग्रह हे या जन्माचे आहेत, पण विकार हे मागच्या जन्मापासून आलेले असतात. **या विकारांना वश न होतां, म्हणजेच त्यांचें नियमन करून, गुणांचें संवर्धन करणें हें प्रपंचांत मनुष्याला शिकायचें असतें.** विकारवश झालेल्या मूर्ख लोकांच्या हातीं सत्ता गेली कीं प्रजा दुःख पावणारच. अशा लोकांचा व्यवहार कसा असतो, तर वांझोट्या बायकांनीं लहान मुलांबद्दल गप्पा माराव्या त्याप्रमाणें.

या प्रपंचातल्या व्यवहारामध्यें प्रत्येक घटकानें आपापलें स्थान ओळखून असावें. ज्याला स्वतःच्या मुलाबद्दल प्रेमामुळें इतकी खात्री असते कीं, आपण सांगितलेलें आपला मुलगा केल्याशिवाय राहणार नाहीं, तो बाप खरा. ज्याला अशी उत्सुकता असते कीं, वडिलांनी आपल्याला सांगावें आणि आपण तें करावें तो मुलगा खरा. बापाचा पैसा हा मुलानें अनीतीनें वागण्यासाठीं नाहीं. जो मुलगा अनीतीनें वागतो, त्याला बापानें पैसा देऊं नये. ज्याप्रमाणें वर बसणाऱ्याची मांड पाहून घोडा दौडगाई करतो, त्याचप्रमाणें बापाचें पाणी ओळखूनच मुलगा वागतो. गृहिणीनें स्वतः स्वयंपाक करून घरांतील माणसांना जेवायला घालावें; त्या करण्यामध्यें प्रेम असतें. प्रत्येक गृहिणीला घरामध्यें थोडें तरी काम पाहिजेच. खरोखर, विवाहामध्यें बंधनें फार आहेत, कारण ती अत्यंत पवित्र गोष्ट आहे। आपण तिचा फार दुरुपयोग करतो.

---

६४. जो मनुष्य तरुणपणीं स्वाभाविक रीतीनें नीतिनियमानुसार वागेल त्याला म्हातारपण मुळींच दुःखदायक होणार नाहीं.

# ज्या प्रपंचात ' राम ' नाहीं त्या प्रपंचांत आराम होणार नाहीं

५ मार्च

जगामध्यें सर्वस्वीं खरें अस्तित्व एकच असलें पाहिजे; त्यालाच आपण " भगवंत " असें म्हणतों. भगवंत हा अत्यंत सूक्ष्म असल्यामुळें मनुष्याचा विचार त्याच्यापर्यंत पोहोचूं शकत नाहीं. मानवी विचार हा शब्दमय आहे; म्हणून विचाराच्या भूमिकेवर उभें राहून भगवंताची कल्पना करायला शब्द हेंच साधन आहे. याला ' नाम ' असें संत म्हणतात. ज्या अंतःकरणात नाम आहे, म्हणजे ज्या अंतःकरणामध्यें भगवंताबद्दल प्रेम, अस्तित्वबुद्धि, भाव, श्रद्धा, आहे तिथें भगवंत विशेष प्रकट झालेला दिसून येतो. भगवंताबद्दल आस्तिकबुद्धि असणें म्हणजे स्वतःबद्दल नास्तिकबुद्धि असणें होय. एका म्यानात ज्याप्रमाणें दोन तलवारी राहूं शकत नाहींत त्याप्रमाणें " मी " आणि " भगवंत " एका अंतःकरणात राहूं शकत नाहींत. संत हे भगवंताशी एकरूपच झालेले असतात. भगवंताचें नाम घेणें म्हणजे आपल्या कर्तेपणाचा अभिमान कमी करणें होय. नामाचें प्रेम लागलें म्हणजे कर्तेपणाचा अभिमान कमी होतो. कर्तेपणा भगवंताकडे सोंपविल्यावर आपली स्वतःची इच्छा राहात नाहीं. जिथें इच्छा नाहीं तिथें यशापयशाचें महत्त्व उरत नाहीं. कधीं सुख तर कधीं दुःख, कधीं यश तर कधीं अपयश, हा प्रपंचाचा धर्मच आहे हें ओळखून, आपल्या आयुष्यांत घडणाऱ्या सर्व घटना " त्याच्या " इच्छेनें आणि सत्तेनें घडून येतात अशी जाणीव ज्याच्या अंतःकरणात उमटली, त्याला, भगवंताचें खरें अस्तित्व समजलें. " मी खरा नसून तोच खरा आहे " हें सांगण्यासाठीं जिथें ' मी 'च उरत नाहीं, ती खरी पूर्णावस्था होय. तिथें " मी त्याला जाणतों " हें देखील संभवत नाहीं. अशा रीतीनें ज्यांनीं आपलें सर्वस्व मला दिलें ( आणि अशीं मंडळीं काहीं थोडी नव्हती ) त्यांना त्या मानानें मला परत देता आलें नाहीं. वाणी जिंकणें किंवा दुसऱ्याचें अंतःकरण न दुखवतां बोलणें, हें वाचेचें तप आहे. प्रत्येक मनुष्याचा दोष तर त्याला सांगायचा, पण त्याचें अंतःकरण न दुखवतां. खरोखरच मला असें वाटतें कीं, एकच मनुष्य पूर्णत्वाला जाण्यापेक्षां ( अर्थात् तो गेला तर फारच उत्तम ) पुष्कळ माणसें थोडीं तरी पुढें जाणें चांगलें. संत ओळखूं यायला आणि त्याची भेट घडायला भगवंताचें नामच घेत राहणें आवश्यक आहे. नाम घेत असतांना सदाचरण कधीं सोडूं नये, नीतीच्या मर्यादा कधीं ओलांडूं नयेत; निराश कधीं बनूं नये, देहाला उगीच कष्टवूं नये. पण काहीं झालें तरी भगवंताचें नाम कधीं सोडूं नये. कर्तव्याचें फळ प्रारब्धाधीन असल्यानें, जे फळ मिळेल त्यात समाधान मानावें, किंबहुना, भगवंताच्या सत्तेनें सर्व सूत्रें हालतात, म्हणून प्रारब्धदेखील त्याच्या नजरेखालीं काम करतें.

---

६५. भगवंताचें प्रेम एकदां चिकटलें कीं, त्याच्या आड दुसरें काहीं येत नाहीं.

# वासनेचें प्राबल्य

**६ मार्च**

माझ्या निरूपणाचा तुम्हांस विसर पडतो म्हणूनच बरें आहे. एखादी गोष्ट चांगली आहे आणि ती मिळाली तर सुखप्रद होईल, ह्या गोष्टीची आठवण असूनही आपण ती गोष्ट मिळविण्यासाठीं प्रयत्न करीत नाहीं, हें अगदीं अयोग्य आहे. हे पापच आहे. खरें म्हणजे, प्रयत्न करणें हें आपल्या हातांत आहे. जर आपल्याला समजलेंच नाहीं तर तें न करण्यांत पाप नाहीं, परंतु समजूनहि न करण्यांत अत्यंत पाप आहे. आपण ऐकतों कीं, अंतकाळीं जी मति तीच गति. मृत्यूसमयीं जशी वासना धरावी त्याप्रमाणें आपल्याला पुनर्जन्म प्राप्त होतो; तेव्हां वासनेंतच आपला जन्म आणि वासनेंच आपला अंत, असें असतांना तिला दूर कशी करतां येईल ? एखादा मनुष्य काळा असेल तर त्याला आपलें काळेपण काहीं घालवतां येत नाहीं, त्याप्रमाणें वासना असणें हा मनुष्याचा एक सहज गुण आहे, तो त्याला पालटतां येत नाहीं. तर मग आम्हांला वासनेंतून कधींच मुक्त होतां येणार नाहीं का ? मनुष्याच्या ठिकाणीं इतर प्राणिमात्रांपेक्षा जर कांहीं वेगळें असेल तर, चांगलें काय आणि वाईट काय हें कळण्याची बुद्धि. आपण कळूनसवरूनहि वासनेला अहंपणाला आधार देतो येथेंच आपलें चुकतें. आपला अहंपणा इतका खोल गेलेला आहे कीं, आपल्याला हें सर्व माझेंच वाटते. माझी बायको, माझी मुलें, माझें घर, माझें माझें म्हणून किती सांगावें ! त्या माझेपणामुळें अहंभाव वाढीला लागून सर्व कांहीं आपल्या मनाजोगतें, आपल्याला सुख देणारें हवेंसें वाटूं लागतें, आणि दुःख अगदीं नकोसें वाटतें. अर्थात् जगांत कोणालाच नुसतें सुख मिळत नाहीं. असें असूनहि अहंपणाला बळी पडून सुखाच्या लालचीनें मनुष्य मरेपर्यंत बरींवाईट कृत्यें करीत असतो, आणि त्याप्रमाणें त्याची वासना बदलत जाते. अशा रीतीनें अहंपणाच जर वासनेचें मूळ अधिष्ठान आहे, तर तो नको का घालवायला ? खरोखर मनुष्याचा अहंपणा इतका खोल मुरलेला आहे कीं त्याचें निर्मूलन करायला तसेंच सूक्ष्म अस्त्र पाहिजे. नामाइतकें प्रभावी आणि सूक्ष्म अस्त्र दुसरें कोणतेंच नाहीं. तें परमेश्वराच्या अगदीं जवळचें आहे. परंतु एवढें असूनहि आपण तें आवडीनें, निष्ठेनें घेत नाहीं. आम्हांला सर्व कांहीं समजतें, परंतु नामस्मरण करण्याचा आळस आपल्यांत भरलेला आहे.

**६६. भगवंताच्या नामाला नीति हें पथ्य आहे. असें जो वागेल त्याचें भगवंतावरचें प्रेम वाढेल.**

# प्रपंचांतील थोडी तरी चिकाटी भगवंतासाठीं धरावी

**७ मार्च**

लग्न करणें याला आपण सामान्यतः प्रपंच समजतों. लग्न ही फार पवित्र संस्था आहे. तिच्यामध्यें दोन जीवांचा उद्धार आहे. ज्याप्रमाणें गुरु आणि शिष्य यांचा संबंध असतो, म्हणजे दोघांचें मत एकच असतें, त्याप्रमाणें पति आणि पत्नी यांचा संबंध असावा. पत्नी आपलें सर्वस्व पतीला देते यामध्येंच खरें तिचें पवित्रपण आहे. परंतु आपली अशी समजूत असते कीं, आतां लग्न वगैरे केलें तेव्हा सुख हें लागणारच. जें जें परमेश्वरानें निर्माण केलें तें माझ्या सुखासाठींच केलें असें आपण म्हणतों. वास्तविक, एकच वस्तु ठेवली आणि ती सर्वांनीं घ्यावी म्हटलें, तर सर्वच एकट्याच्या हातीं कशी येईल ? बायको म्हणते, मी माहेरीं सोळा वर्षें तपश्चर्या केली आणि आतां यांच्या पदरांत पडले, तेव्हां यांनीं मला आतां सुख द्यावें. पोरांना वाटतें, आमची पुण्याई म्हणून यांना इतका पगार झाला, तेव्हां यांनीं नाहीं का आमचे लाड पुरवूं ? खरोखर, सुखाकरितांच प्रत्येकाची धडपड चललेली असते. परंतु खरें सुख कशांत आहे हें माहीत असूनसुद्धां, आपण डोळ्यांवर कातडें ओढून घ्यावें, त्याप्रमाणें तिकडे दुर्लक्ष करीत असतों. प्रपंचात सुख मिळावें म्हणून आपण जी चिकाटी धरतों तिच्या एकचतुर्थांश चिकाटी जरी भगवंतासाठीं आपण धरली तरी आपलें काम भागेल. आनंदाच्या प्राप्तीसाठीं आपण जें साधन आज करतों आहोंत तें चुकीचें आहें. तात्पुरत्या सुखासाठीं आपण आज धडपडत आहोंत, त्यापासून दुःखच पदरांत पडतें. म्हणून तसें न करतां, चिरकाल टिकणाऱ्या सुखासाठीं आपण कांहीं तरी साधन करावें. म्हाताऱ्या माणसांना मागचा अनुभव असतो, म्हणून त्यांच्या विचारानें आपलें ध्येय ठरवावें. म्हाताऱ्यांना कोणता अनुभव आलेला असतो ? तो हा कीं, आपण सर्व तऱ्हा करून पाहिल्या तरी कोणत्याहि अवस्थेमध्यें समाधान मिळालें नाहीं.

जगामध्यें प्रत्येक गोष्टीला बंधन आहे. प्रत्येकाचे नियम ठरलेले आहेत. त्या नियमांचें उल्लंघन करणें म्हणजे अनवस्था आणणें होय. त्याप्रमाणें प्रत्येक कुटुंबामध्यें प्रत्येक माणसाचें कर्तव्य ठरलेलें आहे. असें कर्तव्याचें वळण जिथें असतें त्या घराला " वळण आहे " असें म्हणतात. ज्या घरामध्यें वळण असतें तें घर सुखी होईल. समजा, आपण एक घर बांधले. त्यामध्यें दरवाजे केले, भिंतीला खिडक्या केल्या, वर आढ्याला झरोके केले. त्यांपैकीं झरोक्यांनीं विचार केला कीं, " आम्हीं कां म्हणून लहान असावे ? आम्ही दरवाजाइतकेच मोठे होणार ! " असें म्हणून ते दरवाजाइतके मोठे झाले; खिडक्यांनींहि तोच विचार केला, आणि त्या सगळ्या दरवाजाइतक्या मोठ्या बनल्या. असें झाल्यावर त्या घराचें काय होईल ? हें जसें योग्य नव्हे, तसें, ज्या घरामध्यें प्रत्येकजण आपलेंच मत खरें म्हणतो, आणि जिथें वडील माणसांविषयीं आदर नसतो, त्या घराचा विचका व्हायला वेळ लागत नाहीं.

---

६७. नीतिधर्माचें आचरण ठेवतां यावें, मुलाबाळांचे रक्षण करतां यावें, अब्रूनें जगतां यावें, इतका पैसा जवळ असला, कीं तो मनुष्य श्रीमंत समजावा.

# प्रपंचाच्या अपूर्ण गोष्टींत केव्हांहि समाधान मिळणार नाहीं

८ मार्च

सर्व अनुभवांत आत्मप्रचीति ही खरी. दुसऱ्यानें पुष्कळ अनुभव सांगितलें, परंतु स्वतःला येईल तो अनुभव हाच खरा महत्त्वाचा. आत्मप्रचीतीनें जागरूकता येईल, भाव वाढेल, साधनाला जोर येईल, आणि भगवत्प्राप्ति लवकर होईल. संतांनीं पुष्कळ गोष्टी आजवर आपल्याला सांगितल्या, परंतु त्यांना देव जसा हवासा वाटला तसा आपल्याला वाटतो कां ? प्रपंच करीत असतांना भगवंताची आपल्याला आवश्यकता वाटते का ? आपण असा विचार करावा कीं, आपण लहानाचें मोठे झालों, विद्या संपादन केली, नोकरी मिळाली, लग्न झालें, मुलेंबाळें झालीं, घरदार केलें, परंतु आपल्याला अजून काहींतरी हवेंसें वाटतेंच आहे; हें आपलें हवेंपण केव्हां संपणार ? आपण नोकरी करतो, कोणी वकिली, कोणी डॉक्टरकी. नोकरी करणारा, मालकाला आपल्याशिवाय दुसरा कोणी नोकर मिळणार नाहीं म्हणून कांहीं नोकरी करीत नाहीं, किंवा कुळाला कोणी दुसरा वकिल मिळणार नाहीं म्हणून वकील वकिली करीत नाहीं. म्हणजेच नोकरीवाला काय, डॉक्टर काय, वकील काय, कोणीहि आपापले कर्म केवळ त्या कर्मासाठींच करीत नाहीं, तर त्यांतून आपल्याला सुख मिळेल ह्या ईर्षेनें तो करीत असतो. परंतु आपण जन्मभर पाहतोंच कीं सर्व कांहीं केलें, आयुष्यहि संपलें, तरी काहींतरी करण्याचें राहूनच जातें. त्याला पूर्णता येत नाहीं. एखादी गोष्ट आपल्याला मिळाली कीं आतां ह्यापुढें काहीं करण्याचें उरलें नाहीं, असें काहीं वाटत नाहीं. आतां काहींएक नको आहे, जेवढें आहे त्यांत समाधान आहे, असें कधीं वाटतें कां ? पुढें कसें होईल ? हें सर्व टिकेल का ? आणखी ह्यांत कशी भर पडेल ? याची विवंचना ? कायमच ! एखाद्याचें लग्न ठरलें, तें झालें कीं आतां प्रपंचाची काळजी मिटली असें वाटतें का ? लग्न झाल्यावर, समजा पांच वर्षे मूल झालें नाहीं, तरी हा काळजी करतोच, आणि समजा, मुलेंच मुलें झालीं तरीहि याची काळजी आहेच ! तेव्हां या प्रपंचाच्या गोष्टी अपूर्ण आहेत. त्यांतून समाधान लाभेल हें कसें शक्य आहे ? ह्या गोष्टी एकांतून एक निर्माण होणाऱ्या आहेत. **ज्या ज्या म्हणून सुखाच्या गोष्टी मानल्या त्या सर्व जरी एकत्र केल्या तरी त्यांतून समाधान निर्माण होणार नाहीं.** ज्या गोष्टी अपूर्णच आहेत, त्यांतून पूर्णस्वरूप असलेलें समाधान कसें लाभेल ? समजा, एका वेड्याच्या इस्पितळांत दोनशे वेडे आहेत. जर कोणी म्हणाले कीं आतां आणखी शंभर वेडे आले कीं एक शहाणा त्यांतून निर्माण होईल, तर कधीं शक्य आहे का हें ?

---

६८. मनुष्याला किती " असले " म्हणजे पुरे होईल हे ठरलेलें नाहीं, आहे त्या परिस्थितीमध्यें आपण समाधान मानलें कीं जें आहे ते पुरेल.

# प्रपंचांत मध्यम स्थितींतील माणसें व्यवहाराला चांगलीं

१ मार्च

एकदां एका गावांत चोरांची एक सभा भरली. तींत कांहीं चोर म्हणाले कीं, लूट करायची ती हानि करून करावी; तर कांहींचें असें म्हणणें पडलें कीं, कुणाला उगीच मारायला नको, नुसतीच लूट करावी. पण लूट करावी असें सर्वांचेंच ध्येय होतें ! तसें आपले होतें. एक म्हणतो, व्यवहारदृष्ट्या प्रपंच करावा, एक म्हणतो, तसें नव्हे, योग्य-अयोग्य पाहून प्रपंच करावा, तर दुसरा म्हणतो; स्वतःचा स्वार्थ साधून प्रपंच करावा, परंतु देवाचें अधिष्ठान ठेवून प्रपंच करावा असें कोणीच म्हणत नाहीं ! सगळ्यांना प्रपंच 'हवा,' आणि देव 'असला तरी चालेल.' म्हणजे प्रपंच तेवढा खरा असें ते मानून चालतात; देवाविषयीं त्यांच्या मनांत संशय असतो. मात्र वृत्ति कितीहि अस्थिर असलेली त्यांना चालते. दारू पिऊन बेहोष झालेला माणूस मनाला येईल तें गाणें गातो. असा एक दारुडा गाणें गात असतांना दुसरा दारुडा त्याला म्हणूं लागला कीं; "अरें, हें असलें गाणें काय म्हणतोस ? तुला कांहीं कळत नाहीं." नंतर कांहीं वेळानें तोच प्रश्न पहिल्या दारुड्याने दुसऱ्या दारुड्याला विचारला ! त्याप्रमाणें, प्रपंचामध्ये ज्यांची वृत्ति स्थिर नाहीं अशा लोकांनीं वाटेल तीं मतें प्रतिपादन करावीं असें घडतें, आणि मग ते एकमेकांना नांवें ठेवतात. आपला प्रपंचांतला व्यवहार असा असतो. "आम्हांला बंधनें नकोत" असें म्हणणारे लोक वेडेच समजले पाहिजेत. समाज हा बंधनाशिवाय राहूंच शकत नाहीं. खरोखर, नोकरीमध्ये फार त्रास नसेल तर ती मालकीइतकीच सुखाची असते; उलट कित्येक वेळां मालकीमध्येंच फार त्रास असतो. व्यवहारामध्यें आपण दुसऱ्याची लबाडी ओळखून वागावें एवढीच लबाडी आपल्यामध्यें असावी. पण आपण स्वतः लबाडी करूं नये. म्हणजेच, आपले डावपेंच किंवा लबाडी लोकांना फसविण्यासाठीं नसावी. लोकांकडून न फसण्याइतकेंच आपण व्यवहारी असावें. व्यवहाराच्या दृष्टीनें बघितलें तर मला मध्यम स्थितींतलीं माणसेंच जास्त भेटलीं. तीं व्यवहाराला आणि संगतीला फार चांगलीं असतात. कारण तीं सर्व बाजूनीं मध्यम असतात. त्यांचें पाप मध्यम, पुण्य मध्यम, परिस्थिति मध्यम, आणि परमार्थदेखील मध्यमच असतो. असा मनुष्य वेळप्रसंगी कर्जबाजारी झाला तरी मला चालतो, पण कर्ज किती पाहिजे ? या महिन्यांत तें देऊन टाकतां येईल इतकेंच असावें.

---

६१. कर्ज फिटतांना जसा आपल्याला आनंद होतो तसा देहभोग भोगतांना आपल्याला आनंद वाटला पाहिजे.

# प्रपंचांत स्त्रीनें कसें वागावें ?

**१० मार्च**

[ स्त्रीनें प्रपंचांत कसें वागावें याबद्दलचें पत्र– ] पतिसेवा हाच आपला धर्म । प्रपंचाचें कर्तव्य हेंच आपलें सत्कर्म । अंतरीं समाधान हेंच आपले साधन । सर्वांनीं राहावें सुखी । रामनाम नित्य ध्यावें मुखीं । सर्व सुखाचा लाभ । घर बसल्या मिळतो देव ॥ कर्तव्यीं असावें तत्पर । मुखीं नाम निरंतर ॥ देहानें करावी सेवा । याहून दुजा लाभाचा नाहीं ठेवा ॥ परमात्म्यानें जें जें दिलें । तें तें त्याचें म्हणून सांभाळणें भलें ॥ त्या लोभांत न गुंतवावें चित्त । हाच परमार्थ सत्य । नसावें कशाचें ज्ञान । वाटावें सदा ध्यावें रामनाम । प्रपंचीं राहावें समाधान । हेंच भक्ताचें मुख्य लक्षण जाण ।। पतिव्रता साध्वी थोर थोर । त्यांचें करावें स्मरण । जें करील पुण्यवान ।। तुमच्या पतिसारख्याची संगति । हीच भाग्याची खरी प्राप्ति ।। त्यांच्या आज्ञेनें वागावें । त्यांच्या सुखांत आपलें सुख पाहावें ।। रामावर ठेवावा विश्वास । सुखानें करावा संसार ।। राम धरितां चित्तीं । प्रपंचाची काळजी त्याचे हातीं ।। प्रपंचीं असावें खबरदार । परी लोभांत न गुंतावें अंतर । धन संग्रहीं राखावें । सर्वच खर्चून न टाकावें । ही प्रपंचाची रीत । सर्व जगांत आहे चालत ।। जगाची रीत लोभांत असणें । हें मात्र आपणास न आवडावें ।। देहानें पतिसेवा करावी । ध्यानीं धरावा रामराया । त्याचा संसार उत्तम झाला । हाच आशीर्वाद माझा भला ।। प्रपंचाची संगति । काळजीची उत्पत्ति । तेथें धरितां नामाची संगति । काळजीविरहित आनंद देई ।। मुलींच्या लग्नाची काळजी करूं नये । प्रयत्नाला सोडूं नये । प्रयत्नांतीं परमेश्वर । हे सज्जनांचे बोल । मनीं ठसवावे खोल ।। आरंभीं ज्यानें स्मरला राम । त्यालाच प्रयत्नाअंतीं राम ! हा ठेवावा विश्वास ।। सुखें साधावें संसारास । मिष्ट भाषण वरिवरी । विष आहे अंतरीं । असल्याची संगत नसावी बरी ।। वृद्धपण आलें । शरीर क्षीण झाले । तरी आपण अभिमान घेऊनच राहिलें ।। त्यास सोडावें दूर । ही आपली हानि जाण ।। मी तुम्हास सांगतों हित । दृश्यांत न ठेवावें चित्त ।। रामसेवेकरतां प्राण । म्हणून करणें आहे जतन ।। मान अपमान जगतांत । तें मूळ कारण झालें घातास ।। कोणतेंही काम करीत असतां । राखावी मनाची शांतता । अगदीं व्यवहारबुद्धिनें कामें करावीं सर्वथा ।। आप्तइष्ट सखेसज्जन । यांचें राखावें समाधान । परी न व्हावें त्यांचे आधीन ।। सर्वांशीं राहावें प्रेमानें । चित्त दुश्चित्त न व्हावें कशानें ॥ आल्या अतिथा अन्न द्यावें । कोणास विन्मुख न पाठवावें ॥ अगदीं व्यवहाराच्या मार्गानें जावें । त्यांत रामाचें अधिष्ठान राखावें ।।

---

७०. रामावर ठेवावा विश्वास । सुखानें करावा संसार ॥

# अहंपणा टाकल्यास प्रपंचांतील लाभ-हानि झेलतां येईल

११ मार्च

प्रपंच हा परमेश्वरप्राप्तीच्या आड कधींही येऊं शकत नाहीं. आपण पाहतोंच कीं प्रपंचात आपला कितीतरी लोकांशीं निरनिराळ्या स्वरूपात संबंध येतो. आई, वडील, बायकोमुलें, बहीण भाऊ, इतर सगेसोयरे, मित्र आणि इतर जन, या सर्वांचा उत्तम उपयोग करायचा असेल तर या सर्वांशीं आपण व्यवहार करतांना आपलीं सर्व कर्मे एका हरिस्मरणाच्या धाग्यात जोडून करावींत म्हणजे सर्वांशी संबंध सलोख्याचे राहून. प्रपंच फार सुखकर होईल; निदान तो तापदायक तरी खचित होणार नाहीं. या सर्वांशीं संबंध बिघडायला आपला अभिमान, अहंपणा, विशेषकरून कारणीभूत होत असतो. हा अभिमान श्रीमंतालाच असतो असें नव्हे, तर गरिबालाहि तो सोडीत नाहीं. आपण पुराणांत वाचलें आहेच कीं, हिरण्यकश्यपूला जेव्हां भगवंतानें मांडीवर घेऊन पोट फाडायला सुरुवात केली, तेव्हां त्याचा हात अभिमानानें तलवारीकडे गेला. प्रत्यक्ष भगवंत समोर असूनहि त्यानें कांहीं हात जोडले नाहींत. केवढा हा अभिमानाचा जोर! गरीब लोकसुद्धां या अभिमानाच्या आहारीं किती गेलेले असतात! एकदा एक भिकारी एकाच्या दाराशीं येऊन भिक्षा मागूं लागला, तेव्हां तो गृहस्थ त्या भिकाऱ्याला म्हणाला, "अरे! तुला कांहीं काळवेळ समजते कीं नाहीं!" त्यावर तो भिकारी म्हणाला, "जा जा! मला कांहीं तुमचें एकट्याचेंच घर नाहीं, अशीं गावांत शंभर घरें आहेत." पाहा, अभिमानाचें तण किती खोल गेलेलें असतें तें! अभिमान हा शेतांत उगवणाऱ्या हरळी सारखा आहे. ही हरळी समूळ नाहींशी केल्याशिवाय चांगलें पीक हातीं लागत नाहीं. त्याप्रमाणें अभिमान संपूर्णपणें नाहींसा झाल्याशिवाय परमेश्वरी कृपेचें पीक येणेंच शक्य नाहीं. फणस चिरतांना एक काळजी घ्यावी लागते. हाताला तेल लावून तो कापावा लागतो आणि त्यातले गरे काढावे लागतात; म्हणजे हाताला चिकाचा त्रास न होता गरे चटकन् निघतात. त्याप्रमाणें, प्रपंचात 'नाम' घेऊन व्यवहार केल्यास अभिमानाचा किंवा विषयवासनांचा चीक न लागतां परमेश्वरी कृपेचे गरे हस्तगत करता येतात, हा अहंपणा, हा देहाभिमान टाकला तर प्रपंचातील लाभ-हानि हंसतखेळत झेलता येईल, लहान मुलें पावसाळ्यात कागदाच्या लहान लहान होड्या करून पाण्यात सोडतात, त्यातली होडी तरली तरी हंसतात, बुडाली तरी हसतात, त्याप्रमाणे प्रपचातलीं सुखदुःखें हंसतखेळत झेलावींत, आणि हें एका नामानेंच साधतें.

---

७१. नामस्मरण म्हणजे 'तूं आहेस, मी नाहीं' ही स्थिति होय.

# प्रपंचांत मनुष्य अखेरपर्यंत पुढील जन्माचीच तयारी करीत राहतो

१२ मार्च

भगवंताकडून येणारी शांति हेंच समाधान होय. परमात्मा हा आनंदरूप आहे. सत्य ही आनंदाची खूणच आहे. प्रत्येक गोष्टींत मनुष्य आनंद पाहात असतो. वारा आला, त्याला वाटतें बरें झालें; पाऊस आला कीं त्याला वाटतें, आतां गारवा येईल. कोणत्याहि तऱ्हेनें काय, मनुष्य आनंद साठवूं पाहात असतो. मनुष्याला भूक लागेल तेव्हा तो जर अन्न खाईल तर त्याचें पोट भरेल आणि त्यापासून त्याला आनंद होईल; परंतु त्यानें विष खाल्लें तर मात्र त्यानें आनंद न होतां मरण मात्र येईल. तसें आपलें होतें. आपण विषयांतून आनंद घेऊं पाहातो, आणि तो बाधक होतो. एखाद्या रोग्याला जर जंत झाले आणि त्याला जर खूप खायला घातलें, तर तें शरीराला पोषक न होतां, जंतच वाढतात; त्याचप्रमाणें आपण सत्कर्में करतांना पोटांत विषयांचें प्रेम ठेवून तीं केलीं, तर त्यामुळें विषयच पोसला जाऊन, त्यापासून त्याला समाधान लाभूं शकत नाहीं. याकरितां कर्तव्यबुद्धीनें कर्म करावें, म्हणजे तें बाधक ठरत नाहीं.

मनुष्य जन्मभर जो धंदा करतो त्याच्याशींच तो तद्रूप होऊन जातो. एखादा वकील घ्या, तो त्याच्या धंद्याशीं इतका तद्रूप होतो कीं मरतेवेळींसुद्धां तो वादच करीत जाईल. नोकरी करणारा नोकरीशीं इतका तद्रूप होतो कीं, स्वप्नांत देखील तो स्वतःला नोकर समजूनच राहतो. कर्म कसें करावें, तर त्याच्यांतून वेगळे राहून. लग्नाचा सोहळा भोगावा, लाडू खावेत, परंतु ते दुसऱ्याचे आहेत असें समजून, आपल्या मुलीचे किंवा मुलाचे नाहींत असें मानून; नाहीं तर व्याह्यांची काळजी लागायची, किंवा हुंडा मिळतो कीं नाहीं इकडे लक्ष लागायचें ! त्यांमुळे तापच निर्माण होईल. कर्माशिवाय कोणालाच राहतां येत नाही. एखाद्याला शिक्षा द्यायची म्हटलें कीं, अगदीं हालायचें नाहीं, पापणी, हात, पाय तसें काहींहि हालवतां कामा नये, असें सांगितलें तर तें जसें त्याला शक्य होणार नाहीं तसें काहीं ना काहीं तरी कर्म हें होणारच. भगवंतानीं अशी काहीं सांगड घालून दिली आहे कीं कर्म केल्याशिवाय गत्यंतरच नाहीं. परंतु तीं कर्में ' राम कर्ता ' ही भावना विसरून केलीं तर बाधक होतात, आणि मरणापर्यंत माणूस पुढल्या जन्माचीच तयारी करीत राहातो; तेव्हा, देहानें कर्म करतांनाहि ' कर्ता मी नव्हे ' हें जाणून कर्म करावें.

---

७२. प्रपंचांत सर्वांकरितां सर्व करावें. पण मनांत मात्र मी रामाचा आहें ही अखंड आठवण ठेवावी, म्हणजेच त्याच्या ' नामांत ' राहावें.

# प्रपंचाची काळजी न करतां परमेश्वरप्राप्तीची काळजी करावी

**१२ मार्च**

आईकरितां रडत असलेलें मूल आई भेटल्याशिवाय रडणें थांबवत नाहीं. त्याप्रमाणें समाधानाकरितां, आनंदाकरितां धडपडणारा आपला जीव परमेश्वर प्राप्त झाल्याशिवाय शांत राहूं शकत नाहीं. म्हणून प्रपंचाची काळजी न करतां, परमेश्वराची प्राप्ति कशी होईल याची काळजी करा. भगवंतावर संपूर्णपणें निष्ठा ठेवल्याशिवाय आपलीं प्रपंचाची काळजी दूर होणार नाहीं. सर्व जगताचा जो पालनकर्ता, तो आपलें पालन नाहीं का करणार ? प्रत्येक गोष्ट त्याच्याच सत्तेनें होतें हें लक्षांत ठेवा, मग प्रपंच कधींहि बाधक होणार नाहीं. एक भगवंतावरची निष्ठा मात्र शेवटच्या श्वासापर्यंत सांभाळा. आपण पुराणांत वाचलेंच आहे कीं, भीष्मानें पांडवांना मारण्याची प्रतिज्ञा केली; ती भीष्मप्रतिज्ञाच, मग ती खोटी कशी होऊं शकेल ? सर्व पांडव चिंताग्रस्त झाले, पण द्रौपदीची निष्ठा मात्र जबरदस्त होती. ती म्हणाली, " आपण श्रीकृष्णाला विचारूं " तिनें सर्व वृत्तांत त्याला कथन केला. श्रीकृष्ण म्हणाला, " भीष्मांची प्रतिज्ञा खोटी कशी होईल ? तरी पण आपण एक प्रयत्न करून बघूं. " तो म्हणाला, " द्रौपदी, तूं आतां असें कर, रात्रीं भीष्माचार्यांच्या आश्रमांत जा तेथें फक्त संन्याशांना आणि स्त्रियांना मुभा आहे. मी तुझ्या बरोबर आश्रमापर्यंत येतो. " त्यानंतर श्रीकृष्ण द्रौपदीला घेऊन भीष्माचार्यांच्या आश्रमापर्यंत गेले, आणि बाहेरच तिचे अलंकार आणि इतर वस्तु सांभाळत बसले. श्रीकृष्णांनीं तिला आंत जातांना सांगितलें कीं, " भीष्माचार्य आतां झोंपत आहेत. अशा वेळीं तूं आंत जा आणि बांगड्या वाजवून नमस्कार कर. " त्याप्रमाणें द्रौपदी आंत गेली; आणि बांगड्या वाजवून भीष्माचार्यांना तिनें नमस्कार केला. त्यांनीं लगेच तिला " अखंड सौभाग्यवती भव " म्हणून आशीर्वाद दिला. मग त्यांनीं पाहिलें तों द्रौपदी ! तेव्हां ते म्हणाले, " द्रौपदी, ही खचित तुझी अक्कल नव्हे, तुझ्याबरोबर कोण आहे तें सांग. " ती म्हणाली, " मी माझ्याबरोबर गडी आणला आहे, तो बाहेर उभा आहे. " भीष्माचार्यांनीं बाहेर येऊन पाहिलें. त्यांनीं श्रीकृष्णाला ओळखलें, परंतु आतां सर्व काम होऊन चुकलें होतें. म्हणून म्हणतो, परमात्म्यावर एक पूर्ण निष्ठा पाहिजे. या निष्ठेच्या आड जर कांहीं येत असेल तर, तो म्हणजे आपला अभिमान. हा अभिमान सर्वांचा घातक आहे, तो घालविण्यासाठींच परमात्म्याला वारंवार अवतार घेणें भाग पडलें. ही अभिमानाची हरळी नाहींशी व्हायला भगवंताच्या नामासारखा दुसरा उपाय नाहीं. **हें नाम निष्ठेनें घ्या, याच जन्मांत तुम्हांला हें नाम शांतीचा आणि समाधानाचा ठेवा मिळवून देईल.**

---

७२. नामस्मरणांत स्त्री–पुरुष, श्रीमंत–गरीब, हे भेद नाहींत. फक्त तें श्रद्धेनें घेणें जरूर आहे.

# प्रपंचांतील आपलेपण भगवंताकडे वळवा, हाच प्रपंच सुखी करण्याचा मार्ग

१४ मार्च

[ एका गृहस्थानें 'देवावर प्रेम कसें करावें तें शिकवा' असें विचारलें. त्या वेळीं श्रीमहाराज म्हणालें :— ] प्रेम हें लहानपणापासून सर्वांना उपजत येत असतें. हा माझा मुलगा, ही माझी मुलगी, यांच्यावर प्रेम कसें करावें हें कोणीं शिकवावें लागत नाहीं. एकदा आपलें मानलें कीं आपोआप प्रेम निर्माण होतें. हें प्रेमसुद्धा खरें बघितलें तर स्वार्थी आहे. मुलगा ऐकत नाहीं, तो वाटेल तसें वागतो, अशी आपण तक्रार करतों. त्याच्यावर जर आपलें खरें प्रेम असेल तर आपण अशी तक्रार करणार नाहीं; परंतु त्याच्यामागें 'हा माझें ऐकत नाहीं' हा स्वार्थ आहे. परमार्थ हा कांहीं प्रपंचाहून वेगळा नाहीं. एक गृहस्थ मला भेटले. त्यांना मी विचारलें, "झालें कां मुलाचें लग्न?" तेव्हा ते म्हणाले, "नाहीं, उद्यां आहे." "मुलगा चांगला वागतो का?" असें मीं विचारल्यावर ते म्हणाले, "आतांच नाहीं सांगत, सहा महिन्यांनीं सांगेन." स्वार्थाचें प्रेम इतकें अशाश्वत आहे! मला सांगा, अशा स्वार्थाच्या प्रेमापासून सुख कसें लागेल? खरोखर, प्रपंच हा एखाद्या वर्कशॉपसारखा आहे. कॉलेजचें शिक्षण पुरें करण्यासाठीं कांहीं महिने वर्कशॉपमध्यें शिकावें लागतें असें म्हणतात. त्या वर्कशॉपमधून त्या वेळीं कांहीं उत्पादन काढण्याचा उद्देश नसतो, फक्त मुलांना शिकविण्यासाठीं त्याचा उपयोग होतो. तेथें आपण सर्व कांहीं शिकून घ्यायचें असतें. आज तें आपल्या किती उपयोगी पडेल, त्यापासून किती फायदा होईल, याची अपेक्षा ठेवावयाची नसते. तसेंच, प्रपंचांत आपण कर्तव्यबुद्धीनें वर्तावें, म्हणजे 'मुलगा माझें ऐकत नाहीं' हा प्रश्नच उद्‌भवत नाहीं. मुलगा असा कां वागावा? तो म्हणेल कीं, मीं जन्माला यावें ही कांहीं तुमची प्रेरणा नव्हे.

आजपर्यंतचा आपला अनुभव पाहिला तर आपण 'केलें' असें थोडेंच असतें. म्हणून, परिस्थितीबद्दल फारशी काळजी न करतां आपण आपलें कर्तव्य तेवढें योग्य रीतीनें करावें. आपल्या वृत्तीवर परिणाम होऊं देऊं नये. प्रत्येक गोष्ट घडायला योग्य वेळकाळ यायला लागतो. तेव्हां, कर्तव्य-बुद्धीनें वागून काय तें करा, आणि 'भगवंता, हा प्रपंच तुझ्या इच्छेनें चालला आहे' म्हणा, म्हणजे आपोआप भगवंताचें प्रेम लागेल. **प्रपंचांतलें जें आपलेपण आहे तें भगवंताकडे वळवा.** घरांतल्या मंडळींवर निःस्वार्थ बुद्धीनें प्रेम करायला शिका, म्हणजे परमार्थ आपोआप साधेल आणि आपलेपणा भगवंताकडे वळविल्यामुळें भगवंतावर प्रेम जडेल; याकरितां कांहीं वेगळें करणें नको. हा आपलेपणा निर्माण होण्यासाठीं, भगवंतावांचून आपलें नडतें ही भावना झाली पाहिजे. याकरितां आपण त्याच्या अखंड सहवासांत राहण्याचा प्रयत्न केला पाहिजे. त्याच्या नामस्मरणानेंच ही गोष्ट सहज शक्य आहे.

---

७४. वाचलेलें विसरेल, पाहिलेलें विसरेल, कृति केलेली विसरेल, पण अंतःकरणांत घट्ट धरलेलें नाम कधीं विसरायचें नाहीं.

# उपाधिरहित "मी" म्हणजेच भगवंत

**१५ मार्च**

ब्रह्माचें निरूपण सांगता येण्यासारखें नसतें. साखर खाल्ल्याशिवाय तिची गोडी कळत नाहीं. काहीं मर्यादेपर्यंतच शब्दांनीं सांगतां येतें. खोट्यावरून खऱ्याची परीक्षा करतां येते. तसें माया ज्याला कळली त्यानें ब्रह्म जाणलें म्हणून समजावें. पण मी मायारूपच जर झालों तर ती कशी ओळखावी बरें! सत्यावर छाया पडली तीच माया झाली. वस्तु आहे तशी न दिसतां विपरीत दिसणें म्हणजे माया; जें विपरीत दिसतें तें ब्रह्म कसें म्हणावें? आमचें सर्व जीवितच अशा विपरीत गोष्टींवर उभारलेलें आहे. तेव्हां मायेच्या तावडींत सांपडल्यावर सत्य आणि परमात्मस्वरूप असणारें ब्रह्म जाणणें कसें शक्य होणार? जी जगते-मरते ती माया; म्हणचे माया ही नासणारी आहे, भंगणारी आहे. शाश्वत आनंदापासून जी मला दूर करते ती माया; भगवंतापासून मला जी दूर सारते ती माया. म्हणूनच ज्यानें शाश्वत सुख मिळतें, जें मायेच्या पकडींतून सुटण्याचा मार्ग दाखवितें, तेंच खरें तत्त्वज्ञान होय. एक भगवंतच फक्त सत्यस्वरूप आहे; त्याच्यासाठी जें जें करणें तें तें सत्य होय. "मी देवाचा आहे" हें कळणें याचें नाव आत्मनिवेदन होय. आत्मनिवेदन म्हणजे देवाला ओळखणेंच होय; म्हणजेच मायेला दूर सारणें. वास्तविक उपाधिरहित जो "मी" तोच भगवंत आहे. उपाधिरहित राहणें म्हणजे भगवद्रूप होणें. किनाऱ्यावरून पाण्याकडे जात असतां अशी एक जागा येते कीं, तेथें वाळू संपते आणि पाणी सुरू होतें. म्हणजे त्या रेषेच्या अलीकडे वाळू आणि पलीकडे पाणी असतें. ही मधली स्थिति म्हणजे तूर्यावस्था होय. इथें "मी ब्रह्म आहें" अशी जाणीव राहतें. **निर्गुण परमात्मा आणि ही सगळी सृष्टि यांना जोडणारी सांखळी असेल तर तो ॐकार होय.** म्हणून परमार्थामध्यें कोणत्याहि साधनानें जडाचा निरास करतां करतां शेवटी ॐकारापर्यंत येऊन थांबावें लागेल, म्हणजे प्रत्येकाला नामाशींच यावें लागेल. दहा माणसें उभी केलीं, त्यांतलीं नऊ 'हीं नव्हेत' म्हणून बाजूला सारलीं, दहावा राहिला तोच खरा. त्याप्रमाणें "हें नाहीं, तें नाहीं" झाल्यावर जें शेवटीं उरलें तें ब्रह्मच होय. भगवंत गीतेमध्यें अर्जुनाला म्हणतात, "तूं ज्ञानी असशील तर समाधानांत राहा, पण तूं तसा नसशील तर मग उगीच ज्ञानाच्या गोष्टी सांगूं नकोस; आणि कोणाचें तरी, म्हणजे अर्थात् ज्ञानी माणसाचें किंवा सद्गुरूचें किंवा माझें ऐक आणि त्याप्रमाणें वाग." याचा साधा अर्थ असा कीं, आपण संतांना शरण गेलें पाहिजे. सर्व सृष्टीच्या दृष्टीनें आपण आणि आपला प्रयत्न अगदी क:पदार्थ आहे; म्हणजे खऱ्या अर्थानें आपण निमित्तमात्र आहोंत. म्हणून आपल्या आयुष्यांत आपल्या वाट्याला येणारीं चांगलीं अगर वाईट कर्में हीं ईश्वराचें मनोगत आहे असें समजावें.

---

७५. भगवंताच्या नामांत सतत राहा, म्हणजे इतर सर्व गुण आपोआप मागें चालत येतील.

# प्रपंचांतील आसक्ति कशी कमी होईल ?

११ मार्च

आज आमची स्थिति कशी झाली आहे पाहा : प्रपंच आम्हाला सुटत नाहीं; भगवंताचें प्रेम आम्हाला पाहिजे आहे; या प्रपंचावरचें प्रेम न सोडतां आम्हाला भगवंताचें समाधान लाभावें अशी आमची इच्छा आहे. खरोखर, प्रपंचातलें आमचें हें प्रेम व्यभिचारी आहे. प्रेम ही वस्तु अशी आहे की, ती एकाच ठिकाणीं ठेवतां येईल. एका म्यानांत ज्याप्रमाणें दोन तलवारी राहूं शकत नाहींत, त्याप्रमाणें आमचें प्रेम आम्हाला दोन ठिकाणी ठेवतां येणार नाहीं. आमचें खरें सुख एका भगवंताजवळच आहे; आणि तें मिळविण्यासाठीं आम्हीं प्रपंच सोडायलाच पाहिजे असें नाहीं. प्रपंचांत आम्हाला वाटणारी आसक्ति ही मुख्यतः नाहींशी झाली पाहिजे. शास्त्रांतसुद्धा हेंच सांगितलें आहे. शास्त्र हें अनुभवाचें बनलेलें आहे. आमचा अनुभव आम्ही शास्त्राबरोबर पडताळून पाहात नाहीं. प्रपंचाची खरी किंमत आम्हाला कळल्याशिवाय त्याच्याबद्दल वाटणारी आमची आसक्ति कमी होणार नाहीं. आज प्रपंचांत सुख नाहीं हें अनुभवाला येऊनहि त्याची आसक्ति आम्हाला सुटत नाही. ती आसक्ति सुटायला काय मार्ग आहे तो आम्हीं पाहणें अगदीं जरूर आहे. प्रपंचाची आम्हाला गरज किती आहे ? एखादा मनुष्य फिरायला जातांना हातांत काठी घेतो, त्याला हातांत काठी घेणें हें भूषण आहे असें कोणी म्हणत नाहीं; त्याप्रमाणें भगवंताकडे जायला प्रपंचाची आम्हांला आधारापुरतीच गरज आहे. हा प्रपंच करीत असतांना त्याची आसक्ति कमी होऊन भगवंताचें प्रेम येण्यासाठीं, शास्त्रांनीं घालून दिलेलीं बंधनें आम्हीं पाळलीं पाहिजेत, आणि त्यासाठीं आपले आचार, विचार आणि उच्चार आम्हीं सांभाळणें जरूर आहे. प्रपंचांत सदाचारानें वागावें. सदाचार हा मूळ पाया आहे. नीतिधर्माचें आचरण असावें. नीतिधर्माचीं बंधनें हीं आमचे विकार आवरण्यासाठींच आहेत. विचारानें अत्यंत पवित्र असावें. कोणाचा द्वेष, मत्सर करूं नये, आणि दुसऱ्याचें अहित चिंतूं नये. उच्चार तर फार सांभाळले पाहिजेत. नेहमीं सर्वांशीं गोड बोलावें. **ज्या जिभेनें आपण भगवंताचें नाम घेतों त्या जिभेनें दुसऱ्याचें अंतःकरण कधींहि न दुखावेल याची खबरदारी घ्या; अंतःकरण दुःखवीत असतांना त्याच्या ठिकाणीं वास करीत असलेल्या भगवंतालाच आपण दुखवीत असतों हें ध्यानांत धरा.**

---

७६. इतर साधनांनीं जें साधायचें तें नुसत्या नामस्मरणानें साधतें, हाच या युगाचा महिमा आहे.

# प्रपंचांतील काळजी आपल्याला भगवंतापासून दूर करते

१७ मार्च

सत्त्वगुणात भगवंत असतो, तेव्हा त्या मार्गानें आपण जावें. भगवंत आपल्यात यायला, सर्व कर्मे चांगल्या प्रकारें केलीं तरी तीं भगवंतार्पण बुद्धीनें करावीं. व्यवहार सोडूं नये, प्रयत्नहि करून करावा. परंतु त्याबरोबर भगवंताकडे मन कसें लागेल इकडे लक्ष द्यावें. आपण प्रपंचाची जितकी काळजी घेतों तितकी जरी देवाचीं घेतली तरी खूप होईल. आपण किती परस्वाधीन आहोंत हें आजारी पडलों म्हणजे समजतें; तेव्हां आपल्या हातात किती सत्ता आहे हें ओळखून राहावें. काळजी न करता-देखील प्रयत्न होणार नाहीं असें नाहीं. उलट, प्रयत्न दुप्पट करावेत; पण जें फळ येईल तें भगवंताच्या इच्छेनें आलें या भावनेनें समाधान मानायला पहिल्यांदा आपण शिकावें, आपण स्वतःबद्दल काळजी करतों याचें कारण असें कीं, आपण आपल्यापेक्षा जास्त दुःखी असलेल्या माणसाकडे पाहात नाहीं. एक म्हणतो कीं, मला लोकांच्या "देण्याची" काळजी आहे; दुसरा म्हणतो की, मला लोकांकडून माझें येणें "येण्याची" काळजी आहे; तिसरा म्हणतो कीं, मला माझ्या मुलाबाळांची काळजी आहे. पण या सर्व काळजीच्या घोटाळ्यामध्यें आपली स्वतःची काळजी कोणालाच नाहीं ! मागल्या आठवणींनीं आणि उद्यांच्या भीतीनें आपण काळजी करीत बसतों. ही काळजी आपल्याला भगवंतापासून दूर करतें. उद्याच्या काळजीनें आजची भाकरी आपल्याला गोड लागत नाहीं याला काय करावें ? यावर रामबाण असा एकच उपाय आहे तो म्हणजे आजपासून आपण काळजी करण्याचें अजिबात सोडून देऊन तेवढा वेळ भगवंताच्या नामस्मरणात घालविणें. एका माणसानें माझ्यापाशीं तक्रार केली कीं, "काय करावें, हा माझा मुलगा कशाचीच काळजी करीत नाहीं, नुसता हंसतखेळत दिवस घालवितो; पुढें याचें कसें व्हायचें ?" मीं म्हटलें, "तुमचें म्हणणें वरवर खरें दिसतें; पण वास्तविक पाहाता खरें नाहीं. तुम्ही आजपर्यंत इतकी काळजी करून काय मिळविलें ! शारीरिक आणि मानसिक त्रास भोगला. आणि भगवंताला विसरला इतकेंच ना ! मग ? मग तेंच तुमच्या मुलाला का शिकविता ! त्यानें आपलें कर्तव्य जरूर करावें आणि आनंदांत राहावें; पण काळजी करूं नये असेंच मी त्याला सांगेन." तुम्ही प्रपंचाची काळजी करता तोंपर्यंत देवाची सेवा करता असें कसें म्हणावें ! आपण मुलाला आधीं "चिरंजीव" म्हणतो आणि तो गेल्यावर दुःख करीत बसतो याला काय म्हणावें ! असलें तर असूं दे आणि नसलें तर नसूं दे, अशा मनाच्या अवस्थेंत जो राहील त्यालाच काळजी सुटेल.

---

७७. भगवंताला अशी प्रार्थना करावी कीं देवा ! प्रारब्धानें आलेले भोग येऊं देत, पण तुझें नामस्मरण मात्र चुकूं देऊं नकोस.

# सुखानें प्रपंच करा, पण त्यामध्यें भगवंताचें अनुसंधान ठेवा

**१८ मार्च**

तुम्ही येथें इतकेजण जमलां आहांत, ह्यांपैकीं कोणीहि मला सांगावें कीं, आपली सर्व धडपड कशाकरितां असते ? प्रत्येकजण सुखासाठी खटपट करीत असतो. प्रपंचांत सुख मिळावें असें सर्वांस वाटत असतें आणि त्याकरितां जो तो प्रयत्न करीत असतो. परंतु आजपर्यंत प्रपंचांत कोणाला सुख मिळालें आहे ? ज्याला मिळालें असेल त्यानें तसें सांगावें. कोणी म्हणतो, मजजवळ संपत्ति आहे, पण संतान नाहीं; कोणी दारिद्र्य आहे म्हणून रडतो; कोणी कांहीं, कोणी कांहीं, सांगतच असतो, आणि म्हणतो कीं, माझी इच्छा पूर्ण झाल्यावर मी सुखी होईन; पण ती इच्छा तृप्त झाल्यावर दुसरी तयारच असते; म्हणजेच आपली लोभाची हांव कधींच तृप्त होणें शक्य नाहीं. मृगजळ पिऊन कोणी कधीं तृप्त झाला आहे का ? प्रपंचच जेथें खोटा तेथें सुख कसलें मागतां ? त्याचा अर्थ असा नाहीं कीं, प्रपंच सोडावा; पण तो सुखाचा कसा होईल हें पाहात जावें. मी तुम्हांला खात्रीनें सांगतों कीं, प्रपंच जर सुखाचा करायचा असेल तर त्याला एकच उपाय आहे. तो अगदीं सोपा आहे. तो म्हणजे, 'प्रपंच माझा नाहीं, तो रामाचा आहे,' असें म्हणा म्हणजे झालें. हें दिसण्यांत सोपें आहे, पण आचरणांत आणायला अत्यंत कठीण आहे; तें परमात्म्याची कृपा झाल्याशिवाय साधायचें नाहीं. याकरितां रामाला अनन्यभावानें शरण जावें म्हणजे त्याची कृपा होईल. त्याच्या कृपेला तुम्ही देहबुद्धीचा बंधारा घालूं नका. सर्व विसरून भगवंताला आळवावें. भगवंताची कृपा आपल्यावर आहेच असें म्हणावें. ती काम करीतच असते. आपण आपल्या शंकेनें ती झांकून टाकूं नये. तुम्ही इतके कष्ट घेऊन मला भेटायला येतां, पण तुम्ही रिकामे परत जातां हें पाहून मला वाईट वाटतें. **माझ्याजवळ जें आहे तें व्यावहारिक जगांत कोठेंहि तुम्हांला मिळायचें नाहीं. तें म्हणजे भगवंताच्या नामाचें प्रेम होय.** तुम्हांला माझा आशीर्वाद आहे कीं, तुम्हांला नामाचें म्हणजे भगवंताचें प्रेम खात्रीनें लागेल, सुखानें प्रपंच करा, पण त्यामध्यें भगवंताचें अनुसंधान ठेवा. जें संतांनीं सांगितलें आहे तेंच मी आज सांगतों; तें सत्य आहे असें मनापासून समजा, खरोखर राम तुम्हांस सुखी करील.

---

**७८. नुसते जिवंत राहणें, हें कांहीं खरें नव्हें, जगणें दुसरें कशासाठीं तरी असलें पाहिजे ही वृत्ति असावी, जगून अनुसंधानामध्यें राहावे.**

# प्रपंचांत एकमेकांशीं सलोखा किंवा प्रेम कसें वाढेल ?

**१९ मार्च**

निसर्गत:च प्रेम हें प्रत्येक व्यक्तींत आणि प्राणिमात्रांत असतें. फार काय, पण प्रेमाशिवाय मनुष्यप्राणी जिवंतच राहूं शकणार नाहीं. प्रेमानें सर्व जग वश करून घेतां येतें. प्रेम ठेवण्यांत पैसा खर्च होत नाहीं, कष्ट नाहींत; परंतु प्रत्येकाचा अनुभव पाहावा तर प्रेम करणें तितकेंसें सोपें आहे असें दिसत नाहीं; याचें कारण प्रत्येक व्यक्तीचा स्वभाव निराळा, आवड निराळी, आणि दैवयोगानें आलेले ऋणानुबंध निरनिराळे असतात. आपल्या विचाराचे लोक असतील त्यांच्यावर स्वाभाविकच प्रेम जडतें. विरुद्ध असतील त्यांच्याबद्दल प्रेम वाटत नाहीं, किंबहुना द्वेषहि उत्पन्न होतो. द्वेष उत्पन्न कां होतो तर आपला आणि दुसऱ्याचा विचार आणि आवड जमत नाहीं म्हणून. परंतु थोडा विचार केला तर असें दिसतें की, आपण ज्या कारणामुळें दुसऱ्याचा द्वेष करतो, तेंच कारण दुसऱ्यानें आपला द्वेष करण्याला पुरेसें होतें. उदाहरणार्थ, एखादी गोष्ट आपल्याला आवडली आणि तीच दुसऱ्याला न आवडली, तर मला आवडलेली गोष्ट दुसऱ्याला न आवडल्यामुळें दुसऱ्याचा द्वेष करण्याला मला तेवढें कारण पुरेसें होतें. मग त्याच न्यायानें दुसऱ्याला न आवडलेली गोष्ट मला आवडते हेंच कारण त्यानें माझा द्वेष करायला पुरेसें नाहीं का ? " व्यक्ति तितक्या प्रकृति " अशी म्हण आहे, त्याचा अर्थच असा कीं, स्वभावाप्रमाणें प्रत्येकाची आवड ही निराळी असणारच. म्हणून द्वेषबुद्धि नाहींशी करण्याकरितां प्रत्येकाच्या स्वभावाला थोडी सवलत ठेवणें जरूर आहे; आणि प्रेम जडण्याकरितां सर्वांना आवडणारी जी गोष्ट असेल तिकडे लक्ष देणें जरूर आहे. प्रेम करण्याचा धडा गिरवतांना सुरुवात आपल्या घरापासून करावी, घरांतली माणसें, नंतर शेजारी, आणि त्यानंतर आजूबाजूला आपलेपणाची भावना आपल्या कृतीनें वाढवावी; म्हणजे क्रमाक्रमानें प्रेमाची वाढ होऊन सर्व वातावरण प्रेममय होऊन जाईल, सर्वांशीं निष्कपट प्रेमानें वागावें; आपल्या बोलण्यामध्यें, नव्हे पाहाण्यामध्येंसुद्धां प्रेम असावें. आपलें बोलणें अगदीं गोड असावें. प्रेम करायला गरिबी आड येत नाहीं, किंवा श्रीमंती असेल तर फार द्यावें लागत नाहीं. जसें आई आणि मुलाचें प्रेम असतें तसें भगवंताचें प्रेम लागावें. ज्याला भगवंताचें प्रेम येईल तो सृष्टीकडे कौतुकानें पाहील. भगवंताचें प्रेम हें कोणत्याहि साधनाचा प्राण आहे; तें मागण्यासाठीं रोज भगवंताची प्रार्थना करावी व त्याच्या अनुसंधानांत राहण्याचा प्रयत्न ठेवावा.

---

७९. सतत भगवंताच्या नामांत राहिल्यानें जें साधेल तें शतकोटि साधनांनीं सुद्धां साधणार नाहीं.

# प्रपंचाचें दुःख भोगणें । तें मीपणा असल्याची खूण जाणणें

**२० मार्च**

भीति न बाळगावी चित्तीं । रक्षण करणारा आहे रघुपति ॥ भीति न बाळगावी कशाची काहीं । राम रक्षिता आहे हें जाणून हृदयीं राहीं ॥ न करा काळजीला । राम नाहीं तो निजला ॥ सर्वस्वीं झाल्यास रामाचें । राम उभा राहिला तेथें । काळजीचें कारण न उरे साचें ॥ राम म्हणावा दाता खरा । न द्यावा भीति-काळजीला थारा । रामकृपेनें दूर सारा ॥ काळजी करूं नये । प्रयत्न सोडूं नये । कोणत्याहि कारणानें रामास विसरूं नये ॥ म्हणावा प्रपंच रामाचा झाला । मनानें परमात्म्याचें होणें हा उपाय भला । तेथें ठाव नाहीं काळजीला, तळमळीला ॥ देहाशीं ठेवता माझें-मीपण । तेंच होतें दुःखाचें अधिष्ठान ॥ आजवर जें जें काहीं केलें । तें तें मीपणानें झालें ॥ जें जें मीपणानें केलें । तें तें दुःखाला कारण झालें ॥ बाह्य वस्तु जरी मीपणानें सोडली । तरी अभिमानानें वृत्ति बळावली । तेथेंच घाताला सुरुवात झाली ॥ आग्रह आणि हट्टीपण । हेंच अभिमानाचें लक्षण ॥ कर्तेपणाचा अभिमान । हाच दुःखाला कारण जाण ॥ प्रपंचाचें दुःख भोगणें । तें मीपणा असल्याची खूण जाणणें । मी-माझेपणानें जोंपर्यंत धडपड जाण । तोंपर्यंत नाहीं समाधान ॥ जीवास तळमळीची ठाण । हा देहबुद्धीचा अभिमान । देहबुद्धीचें प्रेम । स्वार्थाला वाढवितें जाण । स्वार्थाचें आपलेपण । हेंच घाताला कारण ॥ आजवर जो जो प्रयत्न झाला । तो तो देहबुद्धि वाढवीतच गेला ॥ देहबुद्धीचा भाव । तो मुळींच दुःखाचा ठाव ॥ जोंपर्यंत आपला नाहीं देहभाव विसरला । तोंवर देहदुःखें पस्तावला गेला ॥ म्हणून देहबुद्धि धरून राही । त्याला कोठें सुख नाहीं ॥ रामाविण अन्य प्रीति । उपजे देहबुद्धीचे संगतीं ॥ जग त्यागी आपणास । तरी आपण न त्यागावें जगास । हीच देहबुद्धि खास ॥ म्हणून मीपणाचे न व्हावें आधीन । जेणें भंगेल आपलें समाधान ॥ कारण जेथें मीपणाचें ठाणें । तेथें दुःखाचें साम्राज्य असणें । पाप-पुण्याची भीति । ही देहबुद्धीचीच संगति ॥ वासनेंत जीव गुंतला । कष्टी फार फार झाला ॥ आजवर वासना पोटीं धरून राहिला । आपल्या हिताला नागवला ॥ नदी जशी अखंड वाहते । वासना तशी सारखी वाहते । वासना भोगानें कमी होत नाहीं । त्यागानें नाहींशी होत नाहीं ॥ आपण देहधारी । देहदुःख न सोसवें क्षणभरी ॥ ज्याला म्हणावें मी माझें । त्यावर माझी सत्ता न गाजे ॥ माझें इच्छेनें माझें मलाच ठेवता येत नाहीं । जगानें माझे इच्छेनें वागावें हें म्हणणें खरें नाहीं ॥ सर्व बंधनाचें, दुःखाचें कारण । कर्माचा कर्ता मी होणें जाण ॥ सर्व काहीं देता येतें दान । पण उर्वरित राहतो अभिमान ॥ कर्तेपणाचा अभिमान । हेंच भगवंताच्या आड मुख्य जाण ॥ म्हणून माझें-मीपण । हेंच दुःखाला कारण । रामाचें होण्यानें होईल निवारण ॥

---

८०. म्हणावा प्रपंच रामाचा झाला । मनानें परमात्म्याचें होणें हा उपाय भला ॥

# माणसाला कितीहि मिळालें तरी त्याची हांव कायमच राहते

२१ मार्च

जगांत दोन प्रकारचे रोग माणसाला नेहमीं सतावीत असतात. एक रोग असा कीं त्यानें भूकच लागत नाहीं. कितीहि औषधपाणी करा, कांहीं उपयोग नाहीं. अशा माणसाला पंचपक्वान्नाचें जेवण तयार असूनहि काय फायदा! तो म्हणतो, "खायला खूप आहे, परंतु मला भूकच नाहीं त्याला काय करूं!" दुसरा रोग असा कीं, कितीहि खाल्लें तरी खाण्याची हाव कांहीं पुरी होत नाहीं. कांहींहि खा, त्याचें भस्म होतें. तद्वत् आपलें आहे. आपल्याला एक रोग नसून दोन्ही रोग आहेत. इतका परमार्थाचा हाट भरला आहे, भजनपूजन चालू आहे, परंतु आपल्याला त्याचें प्रेम नाहीं. त्याची आवडच वाटत नाहीं; आपल्याला त्याची खरी भूकच लागलेली नाहीं. आपण दरवर्षी वारी करतो, आणि जन्मभर वारी करीतच राहणार, परंतु परमेश्वराचें प्रेम मात्र कांहीं लागत नाहीं. खरोखर भगवंतानें आपल्याला आपल्या कल्पनेपेक्षां किती तरी जास्त दिलें. बायको, मुलें, नोकरीधंदा, घरदार इत्यादि कितीतरी गोष्टी, कीं ज्यापासून सुख मिळेल असें आपल्याला वाटतें, त्या गोष्टी, पुरविल्या. परंतु अजून आपली हांव कांहीं थांबली नाहीं. या सर्वांना पुरून, या सर्वांचें भस्म करून, आपली हाव कायमच आहे. हें असें किती दिवस चालणार? समजा, एखादा मनुष्य पुष्कळ फुगला, परंतु त्याला जर मधुमेह असेल, तर तो लठ्ठपणा कांहीं खरा नव्हे. त्याचप्रमाणें, मानवी जीवन सुखी झालें तर ती सुधारणा म्हणायची! उलट आजची स्थिति पाहावी, तर सुधारणा जितक्या जास्त तितका माणूस जास्त असमाधानी झाला आहे. आपण नुसते नीतिधर्मानें चालतो. आपली वागणूक वाईट नाहीं हें खरें; पण याचें कारण आपल्याला वाईट वागण्याची भिती वाटते, वाईट वागलों तर लोक नांवें ठेवतील अशी भीति! अशी ही वरवरची सुधारणा, असा दिखाऊ चांगुलपणा काय कामाचा? परमेश्वराचें प्रेम लागल्याशिवाय आणि इतर गोष्टींची हाव कमी झाल्याशिवाय कांहीं फायदा नाहीं. नाहींतर आपण जन्मभर वारीच करीत राहूं. तीर्थक्षेत्रें, पूजा, भजन, वगैरे केल्यानें अंतरंग सुधारेलच असें नाहीं; आणि अंतरंग सुधारलेंच नाहीं तर बाकीच्यांचा उपयोग नाहीं. तीर्थक्षेत्रें हीं परमार्थाची नुसती आठवण ठेवतील. परमार्थ समजून जो त्याचें आचरण करील त्याला तो लवकर साधेल, अशा माणसाला प्रपंच सोडून जाण्याचें कारण उरणार नाहीं.

---

८१. "मी भगवंताचा आहें" या जाणीवेनें जगणाऱ्याला, म्हणजे भगवंताच्या नामांत राहणाऱ्याला, जें समाधान मिळतें तें मीपणानें जगणाऱ्याला मिळत नाहीं.

# भगवंतास स्मरून प्रपंच केल्यास तो नीटनेटका होईल

**२२ मार्च**

नारदांनी एकदां श्रीकृष्णांना विचारलें, "तुम्ही कोठें सापडाल?" त्यावर श्रीकृष्ण म्हणाले, "नारदा, मी वैकुंठांत नाहीं, रखुमाईपाशीं सांपडेन असेंहि नाहीं, तर मी माझ्या भक्तांपाशीं सांपडेन." भक्त नाहीं तरी देवाशिवाय कसे राहणार? देवाला देवपण तरी कोणीं आणलें? भक्त जर नाहींत तर देव तरी कोठचे आले? म्हणून देव आहे असें जें मानतात त्यांनाच देवाचें अस्तित्व समजतें. नास्तिकाला देव कोठला? त्याला विचारलें, "तुझें कोण आहे या जगांत?" तर तो सांगेल, "हें जें सर्व काहीं आहें–आपले भाऊ, बहीण, बायको, मुलें वगैरे नातेवाईक तसेंच प्रपंचांत ज्या कांहीं गोष्टी लागतात, त्या सर्व माझ्या आहेत." परंतु मग देवाघरची वाट काय? ज्यानें जग निर्माण केलें त्याला विसरायचें आणि जें उत्पन्न केलें तें माझें म्हणायचें, हा परमार्थ होईल काय? तेव्हां, 'देव आहे' अशी भावना धरा आणि देवाला दार उघडा, म्हणजे तो सदा सर्वकाळ तुमच्या जवळच आहे. भावनेनें देव आपलासा केला पाहिजे, आपण कोठेंहि गेलों तरी आपल्या रामाला बरोबर घेऊन जात जा; म्हणजे तुम्हांला कांहीं भीति नाहीं. रामाला बरोबर नेणें हें बोलणें लोकांना चमत्कारिक वाटेल, पण ज्यांना देवच नाहीं असें वाटतें त्यांच्याशीं आपल्याला कांहीं कर्तव्य नाहीं. जो देवाच्या नादीं लागला त्यानें प्रपंच बिघडविला असें म्हणतात. परंतु ज्यानें प्रपंच निर्माण केला, त्याला विसरून तो प्रपंच नीट होईल का? कधींहि होणें शक्य नाहीं; तर त्याला स्मरूनच प्रपंच केल्यानें तो नीटनेटका होईल. प्रपंच सोडून परमार्थ होणार नाहीं; प्रपंच करा, पण त्यांतली आसक्ति सोडा म्हणजे झालें. तुम्हां सर्वांना जडभरताची गोष्ट माहीत आहेच. भरत जरी सर्व घरदार सोडून वनांत गेला तरी तेथें हरिणाचीं आसक्ति धरलीच! तर हरिण काय आणि माणसें काय, या दृष्टीनें दोन्ही सारखेंच. जोपर्यंत आसक्ति सुटली नाहीं तोपर्यंत परमार्थ करणें व्यर्थ होय. तरी आसक्ति सोडण्याचा प्रयत्न करा आणि माझा राम सदा सर्वकाळ माझ्या मागेंपुढें आहे ही भावना धरा. एकानें विचारलें, "तुम्ही सर्वांना मानसपूजा करायला सांगतां, पण राम एकटा सर्वांच्याजवळ कसा जाणार?" मीं त्याला सांगितलें, "तूं मानसपूजा कर म्हणजे तुझ्याजवळ तो राहील." तो जर सर्व ठिकाणीं भरलेला आहे तर त्याला जाणें–येणें नाहींच! आपण मात्र त्याला पाहणें जरूर आहे.

---

८२. भगवंताचें नामस्मरण हा उंबरठ्यावरचा दिवा आहे. त्याने भगवंत आणि प्रपंच **दोन्हीकडे उजेड पडेल.**

# प्रपंचांत भगवंताची नड आहे असें वाटलें पाहिजे

२३ मार्च

प्रत्येक माणसाला आपण सुखी असावें असें वाटतें, भगवंताची कृपा आपल्यावर असावी, नामाचें प्रेम आपल्याला यावें असें वाटतें पण हा अनुभव आपल्याला कां बरें येत नाहीं? जगामध्यें पाहतांना, कोणी मनुष्य सुखी आहे, समाधानी आहे, असें आपल्याला का बरें दिसत नाही? अशी अवस्था असायला काय कारण असावें? आपण सर्वजण सदाचारानें वागतों असें आपल्याला वाटतें, भगवंताचें भजनपूजन आपण सर्वजण करतों, पण तरी तें समाधान आपल्याला कां बरें मिळत नाही? तें समाधान न मिळायला खरें कारण कोणतें असेल तर, आम्हांला अजून भगवंताची नड आहे असें वाटत नाहीं, भगवंत नसेल तर माझें चालणार नाहीं, माझ्या समाधानाला त्याची अत्यंत गरज आहे, असें आपल्याला मनापासून वाटतच नाहीं. प्रपंचांत पैसा–अडका असावा, बायकामुलें असावींत; शेतीवाडी, नोकरीधंदा, इतर वैभव असावें, आणि त्याबरोबरच भगवंतहि असावा असे आपल्याला वाटतें. प्रपंचाची स्थिति कशीहि असो, मला भगवंत हवाच, असें आम्हांला तळमळीनें मनापासून वाटत नाहीं. ही नड, ही भगवंताची गरज, आम्हांला कशी निर्माण करतां येईल हा मुख्य प्रश्न आहे. आज, प्रपंचांत आम्हांला समाधान मिळेल या आशेनें आम्हीं प्रपंच करतों, पण इतका प्रपंच करूनहि आम्हांला समाधान किती मिळालें याचा तुम्हीं विचार करा. अगदीं दूर एका डोंगरावर जाऊन बसा, आणि लहानपणापासून आतांपर्यंत केलेल्या खटाटोपांत समाधान किती मिळालें याचा आढावा घ्या, आणि निश्चयानें ठरवा कीं, प्रपंचांत मला किती सुख मिळालें आज इतकीं वर्षें प्रपंच करूनहि तो आम्हांला सुख देत नाही, हें अनुभवाला येऊनसुद्धां तो टाकावा असें आम्हांला वाटत नाहीं. प्रपंचांत आम्हांला सुख मिळेल ही आमची कल्पनाच नाहींशी व्हायला पाहिजे. प्रपंच आम्हांला शाश्वत समाधान देऊं शकत नाहीं हें एकदां निश्चयानें ठरलें, आणि हा निश्चय एकदां दृढ झाला, म्हणजे मग भगवंताची गरज आम्हांला भासूं लागेल, आणि मग त्याच्या प्राप्तीसाठीं आम्हीं केलेल्या प्रयत्नाच्या आड जग, परिस्थिति, वगैरे कांहीं येऊं शकणार नाहीं. भगवंत मला पाहिजेच हें विचारानें ठरविल्यावर, त्याचें प्रेम आम्हांला यावें असें आपल्याला वाटूं लागेल, आणि त्याचीच आपल्याला आज खरी गरज आहे. हें भगवंताचें प्रेम कशानें बरें निर्माण करतां येईल? मला वाटतें, भगवंताचें प्रेम यायला एकंदर तीन मार्ग आहेत; त्यापैकीं ज्याला जो जुळेल तो त्यानें करावा. पहिला मार्ग म्हणजे संतांची संगति करणें; दुसरा मार्ग म्हणजे सद्विचाराची जोपासना करणें आणि तिसरा मार्ग म्हणजे अखंड नामस्मरण करणे.

---

८३. जाणीव जशी सर्व शरीरभर व्यापून असते त्याप्रमाणें भगवंताच्या नामानें प्रपंचाला व्यापून ठेवलें पाहिजे.

# प्रपंच हा परमार्थाला साधन म्हणून वापरावा

२४ मार्च

आपलें खरें समाधान भगवंताजवळ आहे आणि तें मिळण्यासाठीं भगवंताचें प्रेम आम्हांला लागणें जरूर आहे; तें प्रेम आपल्याला कसें मिळेल याचा आपण विचार करूं. वास्तविक आईचें तिच्या मुलावरचें प्रेम स्वाभाविक असतें, तिला मुलावर प्रेम कर म्हणून शिकविण्याची जरुरी नसतें; त्याप्रमाणें भगवंतावर आपलें प्रेम असणें जरूर आहे. **मनुष्यजन्म हा भगवंताच्या प्राप्तीसाठीं आहे**, ईश्वरानें एवढी सृष्टि निर्माण केली, पण मनुष्यदेह निर्माण केल्यावर त्याला फार आनंद झाला. त्याला वाटलें, खरोखर या योनीमध्यें जन्म घेणाऱ्यास माझें प्रेम मिळवितां येऊन मला ओळखतां येईल. असें असतांना मनुष्यप्राण्याला भगवंताचे प्रेम स्वाभाविक कां बरें असूं नये ? मनुष्यप्राणी हा नेहमी आनंदासाठीं धडपडत असतो; मग या धडपडींतून भगवंताचें प्रेम त्याला कां बरें येऊं नये ? मला वाटतें, ज्या ध्येयासाठीं आपण धडपडत असतों तें ध्येय ठरवितांना आम्ही चुकत असलों पाहिजे खास. आमचें ध्येय असें असलें पाहिजे कीं, त्यांतून आम्हांला शाश्वत आनंद मिळवितां आला पाहिजे. तो आनंद जर एवढ्या कष्टानें मेहनतीनेंसुद्धां आम्हांस मिळत नसेल, तर आमचें ध्येयच चुकलें असें म्हणायला कोणती अडचण आहे तुम्ही सांगा ! आज प्रपंच आम्हांला हवासा वाटतो, प्रपंचांतल्या नाना तऱ्हेच्या गोष्टी आम्हांला सुख देतील असें वाटत असतें आणि त्या मिळविण्यासाठीं आम्ही अहर्निश झटत असतों. वस्तूसाठीं चाललेली आमची धडपड ही खरें पाहातां त्या वस्तूसाठीं नसून, त्यांतून मला आनंद मिळेल या कल्पनेनें, त्या आनंदासाठीं, आम्हांला ती हवी असते. त्या वस्तूंत मला समाधान मिळेल ही आमची कल्पना नाहींशी व्हायला पाहिजे. कोणतेंहि कार्य हेतूशिवाय आपण करीत नाही. आज प्रपंचांत मला समाधान मिळेल असें वाटतें, ती माझी कल्पना नाहींशी होणें जरूर आहे. ही प्रपंचाची **आस जोपर्यंत आहे तोंवर भगवंताचे दास आम्हांला होतां येणार नाहीं, आणि शाश्वत समाधान आम्हांला मिळणार नाहीं.** "तूं जगाची आस सोडून दे, मी तुला शाश्वत आनंद देतों." असें भगवंत आम्हांला सांगत आहे. ही जगाची आस, हें प्रपंचाचें प्रेम, आम्हांला कसें सुटेल ? प्रपंच सोडल्याशिवाय भगवंताचें प्रेम आम्हांस येणारच नाहीं कां ? प्रपंच सोडून देण्याची आज आमची तयारी नाहीं. तो न सोडतां भगवंताचें कसें होतां येईल, त्यासाठीं संतांनीं मार्ग सांगितला आहे; त्या मार्गानें आम्हीं जाणें जरूर आहे. भगवंताला अशी प्रार्थना करावी कीं, " देवा ! प्रारब्धानें आलेले भोग येऊं देत, पण तुझें अनुसंधान मात्र चुकूं देऊं नकोस. "

---

८४. दिवा जळायला हवा असेल तर त्यामध्यें सतत तेल घातलें पाहिजे. तसें भगवंताचें अनुसंधान कायम राहण्यासाठीं त्याचें नामस्मरण आपण सतत करीत असावें.

# प्रपंच केवळ कर्तव्यकर्म म्हणून करा; खरें समाधान भगवंतापाशींच आहे

२५ मार्च

एका माणसाला बिडी ओढण्याचें फार व्यसन होतें. तो आजारी पडल्यावर त्यानें डॉक्टरांना सांगितलें, "मला तुम्ही औषध दिलें तरी मी बिडी सोडणार नाही." त्याचा डॉक्टर फार हुशार होता. त्यानें त्याला एक गोळी देऊन, बिडी ओढण्यापूर्वी ती तोंडात धरीत जा म्हणून सांगितलें. त्या गोळीमुळे बिडीच्या तंबाखूचें विष त्याला बाधत नसे. तसें आपण प्रपंच करतांना वागलें पाहिजे. प्रपंच आम्हाला सुख देईल ही आमची कल्पनाच नाहींशी झाली पाहिजे, म्हणजे प्रपंचाची हावहि कमी होईल, आणि नंतर कर्तव्यापुरतेंच आम्ही प्रपंचांत राहूं. जोपर्यंत प्रंपचाकडे आमची दृष्टि आहे तोपर्यंत आम्हाला समाधान कालत्रयींहि मिळणें शक्य नाहीं. प्रारब्धानें प्रपंच आला आहे, तो कर्तव्यकर्म म्हणून करीत जा, पण त्यांत सुख मिळणार आहे या कल्पनेनें तो करूं नका. आपलें खरें समाधान भगवंताजवळच आहे, ही खूणगाठ पक्की बांधून प्रपंचात वागा. ज्याप्रमाणें व्यापारात नफा व्हावा म्हणून व्यापार करतात, तो होत नसेल तर व्यापारात कांहींच तथ्य नाहीं, तसेंच प्रपंचांत समाधान हा फायदा आहे; तो जर मिळत नसेलं तर प्रपंचाचा लोभ धरण्यांत काय फायदा आहे? "आतां तुझ्या असमाधानाचें कारण नक्की सांग," असें जर आपण एखाद्याला विचारलें, तर त्याला खात्रीलायक कारण सांगतां येणार नाहीं. याचा अर्थ असा कीं, तत्त्वदृष्ट्या समाधान व्हायला खरोखरीच कशाची जरुरी नाहीं, पण ही गोष्ट कोणाला पटत नाहीं. आहे त्या अवस्थेमध्यें आपले समाधान टिकत नाहीं, आणि पाहिजे ती वस्तु मिळाली तरी आपण पूर्ण सुखी होत नाहीं. कैदेंतल्या माणसाला 'मी सुखी आहें' असे वाटणें कधीं शक्य आहे का? तशी प्रपंची माणसाची अवस्था आहे. खरोखर प्रपंचांत समाधान, आनंद, मिळत नाहीं हें अगदी सर्वांना कळतें; परंतु शहरांतले लोक केवळ अभिमानामुळें, आणि खेड्यातले लोक अज्ञानामुळें जसें वागायला पाहिजे तसें वागत नाहींत. या प्रपंचात राहून सुद्धां भगवंताचें प्रेम आणि समाधान आम्हाला कसें मिळवितां येईल, याचा आपण आधीं विचार करायला पाहिजे. या प्रपंची लोकांचा स्वभाव फार विचित्र आहे. त्यांना खरे सांगितले तर तें आवडत नाहीं. वास्तविक आपण प्रपंचातले संबंधी लोक कामापुरते एकत्र जमलों आहोंत. ज्याप्रमाणें आगगाडींत पुष्कळ प्रवासी एकत्र जमतात, त्याप्रमाणें प्रपंचात आपण एकत्र जमतो. पांचजण मिळून प्रपंच बनतो. त्यामध्यें प्रत्येकजण स्वार्थी असतो. मग सर्व सुख एकट्यालाच मिळणें कसें शक्य आहे? नुसता प्रपंच तापदायक नाहीं, आकुंचित प्रपंच हा तापदायक आहे.

---

**८५.** नोकरी करीत असतांनाच नामस्मरणाचा अभ्यास करीत जावा, म्हणजे पुढें नोकरी सुटल्यावर जितका वेळ मिळेल तितका तो अनुसंधानात जाईल.

# प्रपंचांतील विषयसुख हें खरें सुख नाहीं

**२९ मार्च**

जगांत कितीहि मोठा मनुष्य असला तरी त्याच्या प्रपंचांत कांहींतरी न्यून असतेंच. न्यूनता नाहीं असा प्रपंचच नाहीं. एखादा प्रापंचिक ' माझा प्रपंच पूर्ण आहे ' म्हणून सांगणारा भेटेल, परंतु " चाललें आहे असेंच चालावें, यांत कमी तर नाहीं ना कधीं पडणार ? " अशी त्याला काळजी असतेच; म्हणजे त्याला खरें सुख असें नसतेंच. एखादा अत्यंत विषयी, त्यालाहि कदाचित काळजी नसेल. दारूच्या धुंदींत असणाऱ्याला राजाचीहि पर्वा नसते, वस्त्राचीही शुद्ध नसते आणि तो आपल्याच धुंदींत आनंदांत असतो; पण हें सर्व त्याची धुंदी उतरली नाहीं तोंपर्यंत. विषयांतलें सुख परावलंबी, विषयांवर अवलंबून असतें. विषय हे नश्वर, आपल्यापासून कधीं तरी जाणार, निदान आपल्याला तरी त्यांच्यापासून एक दिवस जावें लागणार. दुसरी गोष्ट म्हणजे, विषयाचें सुख इंद्रियाधीन असतें. इंद्रियें विकल झालीं म्हणजे सुख कसें मिळणार ? उद्यां आपण मरणार हें समजलें कीं कोणते विषय आपल्याला सुख देतील ? सारांश, विषयांत सुख नाहीं. जें सुख होतेसें वाटतें तें आपल्यांतच असतें, आणि तें विषयापासून मिळतें अशी आपली फसवणूक मात्र होते. तर मग सुख कशांत आहे ? आपल्याप्रमाणें पशूंनाहि विषयसुख आहे. त्यांच्यांत आणि आपल्यांत फरक तो कोणता ? मी कोण, कशासाठीं आलों, असा विचार करणें याला सारासार विचार म्हणतात. प्रपंचांतहि आपण विचार करतोंच; कशांत आपला फायदा आहे, कशांत आपला तोटा आहे, हें बघतों. पण सर्वच असार, त्यांत सार तें कोठून, कसें येणार ? असलेल्या परिस्थितींत आपण समाधान मानीत नाहीं, त्याहून अधिक सुखाच्या स्थितीची इच्छा धरतों, देवाची भक्ति करणें, संतांकडे जाणें, हें सुद्धां विषय मिळविण्याकरितां आपण करतों; मग आपली ही सेवाभक्ति विषयांची झाली का संतांची ? देव, संत, यांचा उपयोग इतर गोष्टींप्रमाणें विषय मिळविण्याचें साधन म्हणून नाहीं का आपण करीत ? मांजर आडवें गेलें कीं, आपलें काम होणार नाहीं, ही भगवंताची सूचना आहे, असें समजून आपण परततों; पण एक बायको मेली कीं दुसरी करण्याच्या विचाराला लागतों ! सारांश, आपलें ध्येयच विषय हें असतें, आणि तें मिळविण्याची आपली खटपट असते; आणि त्या कामीं यशापयशाच्या सूचनेचा आपण विचार करतों. खरोखर, जो मनुष्य प्रपंचांतील आपला अनुभव जमेस धरीत नाहीं, तो कशानेंच शहाणा होत नाहीं.

---

८९. आपण आपला देह आपल्या मनानें चालवतों, आणि तो खड्ड्यांत पडतो, त्याऐवजीं आपण आपला देह भगवंताच्या हातीं द्यावा आणि आपण त्याच्या नामांत राहावें.

# प्रपंचांतील सुख दुःख हें केवळ जाणीवेंत आहे

२७ मार्च

प्रापंचिकाच्या मनांत नेहमीं एक शंका येतें कीं, खोटें करूनसुद्धां जर सुखी होतां येतें तर तसें करायला काय हरकत आहे ! सन्मार्गानें गेला तरी माणूस दुःखी का होतो अशीहि शंका आपल्याला येते. मी देवाला भिऊन वागलों, का तर प्रपंच सुखाचा व्हावा म्हणून; देवाची एवढी खटपट करून जर सुखी होतां येत नाहीं तर काय उपयोग ? किती विचित्र आहे पाहा, खेळांतलें घर बांधायला आपण गवंडी बोलावण्यासारखा हा प्रकार आहे ! प्रपंचांत दक्षता ठेवणें जरूर आहे, तें जर आपण केलें नाहीं तर देवानें काय करावें ! भगवंताचा साधन म्हणून आपण उपयोग करतों, आणि शेवटीं साधनालाच दोष देतों, साध्य बाजूला राहतें. भगवंत विषय देईल; पण त्याबरोबर त्याचें दुःखहि देईल. एकजण मारुतिरायाला सांगून चोरी करीत असे. एकदां तो पकडला गेला आणि त्याला शिक्षाहि झाली; तेव्हां तीहि मारुतीच्या संमतीनेंच झाली असें नाहीं कां ? एक बाई देवाची पूजा करीत होती आणि एकीकडे स्वयंपाकहि करीत होती, तिच्या हातून चुकून खिरींत मीठ पडलें; तेव्हा ती म्हणाली, "देवा, मी तुझीच सेवा करीत होते ना, मग असे कसें होऊं दिलेंस ?" आतां याला काय म्हणावें बरें ! "मी कोण" हें जोंवर आपण ओळखत नाहीं तोंवर, वैभवाच्या शिखरावर जरी गेलों तरी आपल्याला समाधान मिळणार नाहीं. ज्याच्यापासून प्रपंच झाला त्याला ओळखतां आलें पाहिजे. देहच सत्य नाहीं तर त्यावर उभारलेली इमारत कुठून सत्य असणार ? ठिगळें लावून आपण आपला प्रपंच करतो; त्यांत कमतरता आल्याशिवाय नाहीं राहात ! कोळसा उगाळून पांढरा रंग मिळेल हें म्हणणें जसें वेडेपणाचें आहे, तसें प्रपंचांत सुख मिळवीन हें म्हणणे आहे सुखदुःख हें जाणीवेंत आहे, आणि स्मरणानें जाणीव उत्पन्न होते. आपल्याला मिळायचें तेवढेंच मिळतें, पण आपलें हवें नकोपण, म्हणजे आपली वासना गेली कीं सुखदुःख राहात नाहीं. वासना मारायला भगवंताचें अधिष्ठान हाच एक उपाय आहे. वासना ही लाडावलेल्या कुत्र्याप्रमाणें आहे. तिला नुसते हड्हड् करून ती बाजूला जात नाहीं. पण तेंहि बरोबरच आहे, कारण आपणच तिला लाडावून ठेवली आहे; म्हणून भगवंताच्या पूजेच्या वेळीसुद्धां तीं देवघरांत येते. बरें, चांगली वासना तेवढीच आंत येऊं द्यावी असें म्हणावें, तर तिच्याबरोबर वाईट वासनाहि हळूच आंत येते. शिवाय, वाईट वासनेमध्यें चांगल्या वासनेला मारण्याचें बळ आहे, कारण आपण स्वतः वाईट वासनेच्या बाजूचेच आहोंत' **वासना ही कोणत्याहि उपायांनीं तृप्त होण्यासारखी नसून आपण जर भगवंताजवळ 'वास !' ठेवला तरच ती नष्ट होते.**

---

८७. भगवंताच्या अनुसंधानामध्यें नको असला तरी थोडा विषय येणारच, पण तो 'हवे' पणानें भोगला नाहीं तर आपल्याला बाधक होणार नाहीं.

# प्रपंचांत चुकलों कोठें याचा आढावा वाढदिवसाच्या निमित्तानें घ्यावा

२८ मार्च

[ आपल्या वाढदिवसाच्या निमित्तानें आपल्या आयुष्याचा कसा आढावा घ्यावा यासंबंधीं निरूपण :—] प्रत्येक मनुष्य बोलतांना "मी" आणि "माझें" अशा भाषेंत बोलत असतो; म्हणजे प्रत्येक व्यक्तीला ह्या दोन्ही बाबतींत कांहीं कर्तव्यें असतात. 'माझें' या शब्दांत शरीर आणि तत्संबंधीं सर्व गोष्टी येतात. आयुष्यांत 'मी' चें कर्तव्य परमेश्वरप्राप्ति हें आहे; आणि देहाचें कर्तव्य देहाशीं संबंधित असलेल्या प्रत्येक व्यक्तीबद्दलचें असतें. देहाच्या कर्तव्यांत धर्म, शास्त्र आणि नीति यांना धरून संबंधित व्यक्तीशीं करण्याच्या आचरणाचा समावेश होतो. म्हणजेच ज्याच्याशीं जसा आपला संबंध असेल त्याप्रमाणें त्याच्या बाबतींत आपले कर्तव्य चोख पार पाडणें. कर्तव्य याचा अर्थ मोबदल्याची अपेक्षा न ठेवतां ज्या ज्या बाबतींत जें करणें योग्य असेल तें करणें, असा आहे. मनुष्यानें मी आणि देह या दोहोंच्या बाबतींतली कर्तव्यें समान चालीनें करीत राहिलें पाहिजे. 'मी' चें कर्तव्य करीन पण देहानें कसाहि वागेन, असें म्हणून चालणार नाहीं. याचें कारण असें आहे कीं, समजा, एखादा मनुष्य नोकरी करीत आहे; तो ती नोकरी कशाकरितां करतो याचा विचार केला तर असें दिसतें कीं, ती नोकरी करायला दुसरें कोणी नव्हते म्हणून तो ती नोकरी करीत नसतो, तर त्या नोकरींतून मिळणारा पैसा कुटुंबरक्षणाकरितां उपयोगी पडेल म्हणून तो ती नोकरी करीत असतो. समजा, त्यानें नोकरी केली पण मिळणारा पैसा घरांत दिला नाहीं तर त्या नोकरीचा कांहीं उपयोग नाहीं. तसें, 'मीं' चें कर्तव्य, म्हणजे भगवंताचें अनुसंधान केलें, पण देहाचें कर्तव्य, म्हणजे सदाचरण आणि संबंधित व्यक्तीशीं असलेलीं कर्तव्यें न केलीं, तर नोकरी करून पैसे घरीं न दिल्यासारखें होईल. म्हणून प्रत्येक व्यक्तीनें भगवंताची स्मृति आणि कर्तव्याची जागृति ठेवावी; आणि या दृष्टीनें आपलें कुठें चुकतें आहे याचा शोध दर वाढदिवसाच्या निमित्तानें घेऊन प्रत्येकानें आपली उन्नति करून घ्यावी. जेवतांना भोवतीं उदबत्तीचा सुंदर वास आणि तोंडांत गोड घांस जसा असावा, त्याप्रमाणें आपण बाहेर गोड बोलावें आणि आंत भगवंताचें गोड नाम घ्यावें; म्हणजेच आपण आंतबाहेर गोड असावें.

---

८८. भगवंताचे अस्तित्व जागृत ठेऊन त्याच्या नामांत सदैव राहण्याचा प्रयत्न केला तर दरवर्षी जास्त उत्साह वाढेल आणि आनंदाचा वाढदिवस होईल.

# भगवंत सृष्टींत जसा साक्षित्वाने राहतो, तसें प्रपचांत आपण साक्षित्वानें वागावें

२९ मार्च

सत्य वस्तु ओळखणें हा परमार्थ, आणि असत्य वस्तूला सत्य मानून चालणें हा प्रपंच होय. आपल्याला वस्तु दिसते ती खरें असेलच असें नाहीं. पण ती मुळींच नाहीं असें मात्र नाहीं; ती काहींतरी आहे. एका दृष्टीनें खरी वस्तु अशी आहे कीं, प्रत्येकजण जे गुण त्या वस्तूला लावतो ते सर्व गुण तिच्या ठिकाणीं आहेतच, शिवाय आणखी कितीतरी गुण तिच्या ठिकाणीं आहेत; म्हणून ती निर्गुण आहे. दुसऱ्या दृष्टीनें ती अशी आहे कीं, प्रत्येकजण जो गुण तिला लावतो तो कल्पनेनेंच तिच्या ठिकाणीं आहे असें आपण म्हणतो, म्हणून ती वस्तु गुणांच्या पलीकडे आहे. या अर्थानेंसुद्धा ती निर्गुणच आहे. जशी आपल्या देहाची रचना; तशीच सर्व सृष्टीची रचना आहे. देहामधलें पंचकोश सृष्टीमध्येंदखील आहेत. फरक एवढाच कीं, देहामध्यें ते मूर्त आहेत तर सृष्टीमध्यें ते अमूर्त स्वरूपांत आहेत. भगवंताला एकट्याला करमेना म्हणून तो एकाचा अनेक झाला. त्याचा हा गुण माणसानें घेतला. आपण हौसेसाठीं आपला व्याप वाढवितो. पण भगवतानें व्याप वाढविला तरी त्यामध्यें तो साक्षित्वानें राहिला, आणि आपण मात्र व्यापामध्यें सापडलो. भगवंत सुखदुःखाच्या पलीकडे राहिला, पण आपण मात्र दुःखांत राहिलों. व्यापाच्या म्हणजे परिस्थितीच्या बाहेर जो राहील त्याला दुःख होणार नाहीं. खरें पाहिलें तर व्यापांतून वेगळेपणानें राहण्यासाठींच सर्व धडपड आहे. व्याप दुःखदायक न व्हावा असें वाटत असेल तर आपण साक्षित्वानें राहायला शिकलें पाहिजें.

जगणें म्हणजे शरीरांत चैतन्य असणें होय. चैतन्य हें केवळ सच्चिदानंदात्मक आहे. म्हणून जोपर्यंत आपण जिवंत आहोंत तोंपर्यंत स्वाभाविक आनंद असलाच पाहिजे. हा आनंद आपण भोगावा. ब्रह्मानंद आणि सुषुप्ति यांमध्यें फरक आहे. ब्रह्मानंद हा आहेपणानें आहे, तर सुषुप्तिचा आनंद हा नाहींपणानें आहे. आपल्याला झोंप लागली कीं काय ' जाते,' आणि जागे झालों कीं काय ' येतें ' हें नित्याचें असूनसुद्धा आपल्याला कळत नाहीं. भगवंताच्या इच्छेनें सर्व होते व सर्व तोच करतो अशी भावना ठेवणें यासारखें समाधान नाहीं. कृतींमध्यें आनंद आहे, फळांत किंवा फळाच्या आशेंत तो नाहीं. नामस्मरणरूपी कृति केली असता शाश्वत आनंदाचा सहज लाभ होईल.

---

८९. ज्या ठिकाणीं आपल्या ओळखीचें कोणीं नाहीं, आपलें आप्त कोणीं नाहीं, जेथें आपल्याला कोणी मान देत नाहीं, अशा ठिकाणीं राहून अनुसंधानाचा अभ्यास करावा.

# भगवंताचा धरावा आधार । सुखानें करावा संसार

३० मार्च

गृहस्थाश्रमासारखा आश्रम । दुसरा नाहीं खास ॥ नीतिधर्माचें रक्षण । यासाठींच विवाहाचें कारण ॥ ज्या घरात राहते शांति । त्या घरात भगवंताची वस्ती ॥ कृतीवर मनुष्याची परीक्षा । जैसी वासावर पदार्थाची परीक्षा ॥ कोणाचा न करावा घात । ऐसें वागावें जगांत ॥ आपलें आपण करून घ्यावें हित । त्यालाच म्हणतात संभावित ॥ न कधीं व्हावें आपण निराश । व्यवहार हात देईल खास ॥ कोणतेंहि काम करीत असतां । राखावी मनाची शांति । अगदीं व्यवहारबुद्धीनें कामें करावीं सर्वथा ॥ व्यवहारांतील करावा प्रयत्न । प्रपंचात न पडूं द्यावें न्यून ॥ रोगाची भीति । न ठेवावी चित्तीं । रोगाला उपचार करावे जरी बहुत । तरी कष्टी न होऊं द्यावें चित्त ॥ आप्त इष्ट सखे सज्जन । यांचें राखावें समाधान । परी न व्हावें त्यांचें आधीन ॥ सर्वांशीं राहावें प्रेमानें । चित्त दुश्चित न व्हावें कशानें ॥ आपलेपणा ठेवला जेथें । प्रेम लागत असे तेथें । ज्या घरात स्वार्थाचें मान बळावलें । तेथें समाधानाचें मान कमी झालें ॥ मन राखतां आलें । तरच प्रत्येकाला सुख लागलें । सुखानें नांदावें नवराबायकोंनीं । राम आणावा ध्यानीं ॥ दोघांनीं रहावें प्रेमानें ॥ सदा वागावें आनंदानें ॥ एकमेकांनी दुसऱ्यास दुःख होईल असें न करावें । काळजी वाटेल असें न वागावें ॥ घरांतील माणूस मार्गानें चुकलें । त्यास प्रायश्चित हवें खरें । पण तें नसावें जन्माचें । तेवढ्यापुरतें असावें साचें ॥ एखाद्याचे हातून करूं नये असें कर्म झालें । तरी त्याला सुधारण्याच्या मार्गानें सर्वांनीं वागावें ॥ आचरण शुद्ध असावें ॥ एकपत्नीव्रत सांभाळावें ॥ प्राण गेला तरी परद्वार करूं नये । कोणतेंहि व्यसन करूं नये । नीच संगत धरूं नये । भलतें काम करूं नये । गृहछिद्र कोणा सांगूं नये । आपला बोज आपण घालवूं नये । विश्वासघात कोणाचा करूं नये । परदुःखे हसूं नये । देह दुःखें त्रासूं नये । केला उपकार बोलूं नये ॥ मुलाबाळांस सांभाळून राहावें । प्रपंचांत कधीं उदास न व्हावें ॥ प्रेमानें वागावें सर्वांशीं । सुख राहे निःस्वार्थापाशीं ॥ चांगल्या पतींची संगति । हीच भाग्याची खरी प्राप्ति ॥ पतीच्या आज्ञेनें वागावें । त्यांच्या सुखांत आपलें सुख पाहावें ॥ न बोलावीं पतीस दुरुत्तरें । समाधान राखोनी अंतरें । जें सज्जनांस आवडेल खरें ॥ पतीपरतें न मानावें दैवत दुजें जाण । घरांत राखावें नेहमीं समाधान । आईवडिलांची आज्ञा पाळावी । चांगल्याची संगत धरावी ॥ अभ्यासांत लक्ष ठेवून राहावें । भगवंताचें नामस्मरण करावें. ॥

---

९०. ज्या घरात राहते शांति । त्या घरात भगवंताची वसती ॥

# "कर्ता मी नाहीं" म्हटलें म्हणजे प्रपंचांतील अडचणी सुटूं लागतात

३१ मार्च

"आपणच काय ते सर्व करणारे" अशी आपण भावना ठेवतों आणि पुढें दुःख वांट्याला आलें म्हणजें वाईट वाटून घेतों. ज्याचें फळ आपल्या हातीं नसतें तें कर्म 'मी केलें' असें म्हणण्यांत काय पुरुषार्थ आहे ? मी भगवंताचें कृत्य भगवंताला अर्पण करतों असें म्हणतों याचासुद्धां अभिमान आपल्याला होतो. जगांत सात्त्विक वृत्तीनें वागणारें पुष्कळ असतात, पण "मी करतों" हा अभिमान त्यांचाहि सुटत नाहीं. खरोखर नुसत्या कर्मानें परमार्थ साधत नाहीं. "**कर्ता मी नाही**" **हें समजलें म्हणजे सर्व साधतें.** संन्याशानें संन्यास घेतला तरी त्याला कर्म करावेंच लागतें. खोलींतल्या खोलींत जो सुख मानून घेतो तो कैदीं खरा सुखांत असेल असें आपल्याला वाटतें. देहाच्या पलीकडे कांही नाही असें मानूं लागलो आणि विषयांतच सुख पाहूं लागलों, तर तें त्या कैद्याप्रमाणेंच नाहीं का ? पण त्याच्यापलीकडे कांहीं आहे हें त्याला समजलें नाहीं तोपर्यंतच हें सुख वाटेल. एकदां का बाहेरची हवा कैद्याला लागली म्हणजे तो नाहीं म्हणणार कैदीपणाच चांगला म्हणून. त्याचप्रमाणें एकदा भगवंताच्या आनंदाची हवा लागली म्हणजें माणूस नाहीं विषयांत राहणार. चित्त नुसतें निर्विषय करून नाहीं काम होणार. बुजार घोड्याला जसें चुचकारून घेतात, तसें मनाला करावें. वृत्ति जिथें पालटायला लागतें तिथें सावध राहावें. भगवंताचें स्मरण चुकलें कीं, कांही तरी अवघड वाटायला हवें. आज नको वाटणारें नामस्मरण बळजबरीनें करावें, म्हणजे हवेसे वाटणारे विषय जातात. प्रापंचिक अडचणींतून जर आपण मार्ग काढतों तर मग परमार्थांतल्या अडचणींना कां भ्यावें ? जर आज आपल्याला विवेकानें सुखी राहतां आलें नाहीं तर आपल्याला सुख कधींच मिळणार नाही. नुसतें गिरिकंदरांत जाऊन कुठे परमार्थ साधत असतो का ? तसें असतें तर तो माकडांनाहि साधला असता ! खालच्या प्राण्यांना आपले विकार आवरण्याचा विचार नसतो; पण मनुष्याला चांगलें–वाईट कळतें, त्याला सारासार विचार करण्याची शक्ति आहे. ही त्याच्यावर भगवंताची कृपाच आहे. आपण जग सुधारण्याच्या नादीं लागूं नये. त्या कामासाठीं लोक जन्माला यावे लागतात. अगदी आपला मुलगा जरी झाला तरी त्याला योग्य तें सांगून पाहावें, पण "मी त्याला सुधारीनच" हा भ्रम नसावा. स्वतःला सुधारा कीं त्या मानानें जग सुधारेलच.

---

९१. कर्तव्य म्हणून वकील जसा भांडतो त्याप्रमाणें कर्तव्य म्हणून प्रामाणिकपणानें आपण प्रपंच करावा, त्यामध्यें भगवंताला विसरूं नये, आणि अनुसंधान कमी होऊं देऊं नये.

# संगतीचें जीवनांत अतिशय महत्त्व आहे

१ एप्रिल

[अश्वत्थपूर येथें झालेलें प्रवचनः–] मनुष्याच्या आयुष्यांत संगतीला फार महत्त्व असतें. संगतीचा परिणाम विनासायास आणि बराचसा न कळत होत असतो. संतसंगति लाभणें ही अत्यंत भाग्याची गोष्ट आहे. ती पूर्वपुण्याईमुळें लाभते. ज्याच्याशीं आपण संगत धरावी त्याचे गुणधर्म आपल्याला येऊन चिकटतात हें आपण पाहतों. समजा, कांहीं लोकांनीं अश्वत्थपूरला येण्याचे ठरवलें. एकानें विचार केला आपण पायींच जाऊं, दुसरा बैलगाडीनें निघाला, तिसऱ्यानें आगगाडीनें प्रवास केला, तर चौथा, मोटारनें आला. सर्वजण जर एका ठिकाणाहून निघाले तर साहजिकच मोटारीनें येणारा सर्वांत लवकर पोहोचेल; म्हणजे, ज्याच्याशीं संगत केली त्याचे गुणधर्म विनासायास लाभले संगतीची दुसरी गंमत अशी कीं, ज्याच्या संगतींत आपण जातो त्याच्यापुढें आपलें कर्तृत्व लोप पावतें. या अश्वत्थपुरामधून पुष्कळ मुलें शिक्षण घेऊन पुढें गेली. कोणी वकील झाले, तर कोणी डॉक्टर झाले. परत अश्वत्थपूरला आल्यावर त्यांनीं इथल्या मुलींशी लग्नें केलीं. त्या मुली फारशा शिकलेल्या नसतील; परंतु वकिलाशी लग्न केलेली वकिलीणबाई झाली, डॉक्टरशीं लग्न केलेली डॉक्टरीण झाली. ही झाली देहाची संगत. असें जर देहाच्या संगतीनें त्याचे गुणधर्म आपल्यांत येतात, तर संगतीचा परिणाम किती उपयुक्त होत असला पाहिजे ! आपण एखाद्या बागेंत गेलों तर तिथें जीं फुलें असतील त्या प्रकारचा सुवास येतो एखादा साधु-बैरागी असून झाडाखालीं बसला असेल आणि तो स्वतः उपाशी असेल तर त्याच्याकडे येणारी मंडळी पण उपाशी राहतील. समर्थांच्याकडे कोणी गेला तर ते म्हणतील, ' मी भिक्षेची झोळी घेतों आणि तूंहि घे. आपण दोघेहि भिक्षा मागूं आणि जें मिळेल तें शिजवून खाऊं. ' गृहस्थाश्रमी संत असेल तर आपल्याकडे येणाऱ्याला तो वाटेल तें करून खायला घालील. **अन्नानें वासना बनतें, म्हणून संताच्या घरचें अन्न आपण मागून घेऊन खावें.** संतांच्या देहाची संगति सगळ्यांनाच लाभतें असें नाही. कारण तो ज्या आश्रमांत राहात असेल तिथून आपण लांब राहात असूं आणि समजा, जवळ राहात असलों, तरी आपल्याला कामधंदा असतोंच कीं नाही ? तेव्हां चोवीस तासांपैकीं त्याच्याजवळ कितीसें राहतां येणार ? आणि त्यांतूनहि जरी अशी संधि लाभली तरी आपल्याला देह–संगतीचा कितीसा लाभ होईल ? आपण तिकीट काढतों आणि गाडींत बसतो. आपल्या शेजारीं कोण येऊन बसेल हें आपल्या हातीं नसतें. तो विडी ओढणारा असला आणि आपल्याला धूर सहन होत नसला तरी नाइलाजानें तिथेंच बसावे लागतें. व्यसनी किंवा विषयी माणसाची संगत ही घातक होय, तर सत्पुरुषाची संगत ही उत्तम होय. सत्संगतीपासून सद्वासना आणि सद्विचार हीं शिकायचीं असतात. नामाची संगत हीच सर्वांत उत्तम सत्संगत होय.

---

९२. सोडण्याच्या गोष्टीचा अभ्यास करण्यापेक्षां धरण्याच्या गोष्टीचा, म्हणजे भगवंताच्या अनुसंधानांत राहण्याचा अभ्यास करावा.

# सत्संगतीचे दोन प्रकार

२ एप्रिल

सत्संगति अति अपूर्व काम करणारी आहे. ज्याचें भाग्य थोर असेल त्यालाच ती लाभेल. संतांची संगत दोन प्रकारें होऊं शकते. एक संताच्या देहाची; आणि दुसरी, संतांनीं सांगितलेले साधन करीत राहण्याची. यापैकीं पहिली, म्हणजे संताच्या देहाची, संगति लाभणे फार कठीण आणि दुर्मिळ. कारण खरा संत जरी असला तरी त्याला ओळखणें कठीण असतें, आणि पुष्कळदां त्याच्या बाह्य वागणुकीवरून मनांत विकल्प येण्याचा संभव असतो; आणि एखाद्या भोंदूशींच गांठ पडली तर त्याच्या संगतीपासून नुकसान हें ठरलेलेंच; म्हणून पहिला, म्हणजे संताच्या देहाचा संगतीचा मार्ग हा पुष्कळदां धोक्याचा ठरण्याचा संभव असतो. दुसऱ्या मार्गानें जाण्यांत, म्हणजे त्यानें सांगितलेलें साधन करण्यांत बिलकूल धोका नसतो. कारण खरा संत काय किंवा भोंदू साधु काय, कोणीहि झाला तरी तो दुसऱ्याला सांगतांना खरें आणि बरोबर असेल तेंच सांगेल. तो भोंदू असला तरी, आपला भोंदूपणा लपविण्याकरितां जें बरोबर असेल तेंच सांगणें त्याला योग्य असतें. साधकानें शुद्ध भावनेनें तें साधन केलें कीं सत्संगतीचा फायदा मिळून त्याचें काम होतें. खऱ्या संताच्या देहाच्या संगतीचा लाभ जर दैववशात् प्राप्त झाला तर काम मात्र बेमालूम होतें. ज्या वाहनाचा आपण आश्रय करतों त्या वाहनाचा वेग हा आपला वेग होतो; फक्त त्या वाहनांत निश्चल बसून राहणें एवढेंच आपलें काम असतें. तसें आपण खऱ्या संताजवळ नुसतें पडून राहावें. किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं, संगति ही त्यानें सांगितलेल्या साधनांचा आचरणाच्या संगतीपेक्षांहि जास्त महत्त्वाची आहे. संताच्या देहाची संगति हे राजाची पट्टराणी होण्यासारखें आहे, तर दुसऱ्या तऱ्हेच्या संगतींत फक्त राजाच्या प्रेमांतल्या स्त्रीचा दर्जा प्राप्त होईल. म्हणजे दोघींनाहि राजाची संगति लाभली तरी पट्टराणीला मिळणारे विशेषाधिकार दुसरीला मिळत नाहीत, फार काय, पण असेंहि म्हणतां येईल कीं नामापेक्षांहि खऱ्या संताच्या देहाची संगति ही जास्त लाभदायक ठरते; कारण नामांत " मीं नाम घेतों " ही अहंकाराची भावना राहण्याचा संभव असतो; तसें संत संगतींत नाहीं. संताच्या संगतीत आपली कृति अशी कांहींच नसते, नुसतें अस्तित्व असतें; त्यामुळें अहंकाराला वाव न राहून वासनेचा क्षय व्हायला फार मदत होते; संतसंगानें नाम घेण्याची बुद्धि येते; नाम घेतां घेतां बुद्धीला स्थिरता येते; आणि मग मनांत विकल्प न येतां संताच्या देहाच्या संगतीचा खरा फायदा घेतां येतो.

---

९३. आपण भगवंताच्या अनुसंधानांत राहिलों तर आपल्याला नित्य दिवाळीच आहे. सर्व सोडून भगवंताच्या स्मरणांत राहिलें पाहिजे; परंतु व्यवहार नीट करून त्यामध्यें भगवंताचें अनुसंधान ठेवणें हें त्याहिपेक्षां श्रेष्ठ होय.

# संतांना कसें ओळखावें ?

**३ एप्रिल**

**धान्यामध्यें कांहीं खडे असे असतात कीं धान्यापासून ते वेगळे निवडतां येत नाहींत. तांदळांत पांढरे खडे असतात, तें निवडूं गेले तरी निवडले** जात नाहींत. त्याप्रमाणें साधु लोक हे आपल्यांत असतात. त्यांना पाहूं गेलें तर ते आपल्यासारखेच संसारांत वावरत असलेले दिसतात. पण ते आपल्यापेक्षां वेगळे असतात. साधु देहांत नसतात हें खरें; परंतु म्हणून, ज्यास देह आहे तो साधु नाहींच असें होत नाहीं. पुस्तकांतून साधूंचीं लक्षणें पुष्कळ दिलेलीं असतात. पण त्याप्रमाणें आपण पाहूं गेलों तर साधु ओळखतां येईलच असें नाहीं. साधूचे एकच अचूक लक्षण सांगतां येईल, तें हें कीं, जो सर्व ठिकाणीं देवाला पाहतो तो साधु. सर्व चराचर भगवद्रूप जो पाहतों तो साधु. तो आपल्यासारखाच देहधारी असतो, पण म्हणून तो साधु नाहीं असें होत नाहीं. जसें, जनावरें म्हटलीं म्हणजे त्यांत रेडाहि येतो नि गायहि येते, त्याप्रमाणें देहधारी लोकांत सर्वजण येतातच. जो सर्व ठिकाणीं भगवद्रूप पाहतो तो साधु, ह्या वरून आपल्याला तो ओळखतां येईल का ? नाहीं; तर आपण जेव्हां साधु व्हावें, तेव्हांच आपल्याला साधुला ओळखतां येईल.

जगांत आपण कुणाचीच निंदा करूं नये. आपण जेव्हां दुसऱ्याचे दोष पाहतो, म्हणजे ते जेव्हां त्याच्याजवळ आहेत असे दिसतात, त्यावेळेस तेच दोष आपल्याजवळ सूक्ष्म रूपानें असतात असें समजावें; आणि आपण लगेच देवाला शरण जाऊन, 'हे माझे दुर्गुण काढून टाक' म्हणून त्याची करुणा भाकावी. आपण जेव्हां 'जगांत न्याय उरला नाहीं' असे म्हणतों, त्या वेळेस आपल्याजवळच तो दोष आहे असें समजावें. म्हणून आपण कुणाचे दोष पाहूं नयेत. आपण आपल्या स्वतःला आधीं सुधारावें. चित्तशुद्धि केल्याशिवाय आपल्याला सर्व ठिकाणीं भगवद्भाव उत्पन्न होणार नाहीं. म्हणून जेव्हां जेव्हां आपल्याला दुसऱ्याचे गुणदोष दिसतात, तेव्हां आपलेंच चित्त अशुद्ध आहे असें समजून, आपण परमात्म्याची करुणा भाकून त्यास शरण जावें; आणि माझें चित्त शुद्ध कर, अशी त्याला विनंती करावी. असें केलें म्हणजे आपलें चित्त शुद्ध होत जातें आणि मग भगवंताची प्राप्ती व्हायला वेळ लागत नाहीं. ' जगांतील आपलें समाधान, अगर असमाधान, ज्या वृत्तीनें आपण जगाकडे पाहतों, त्यावर अवलंबून आहे. वासनेतून वृत्ति, वृत्तीमधून ऊर्मि आणि ऊर्मींमधून कृति असा क्रम आहे. " माझ्याकरितां मी नसून मी लोकांकरितां आहे, माझ्याकरितां जगत् नसून मी जगताकरितां आहे," ही वृत्ति आपण ठेवावी.

---

९४. एक भगवंताच्या नामांत राहिलें कीं सर्व गुण आपोआप वाढतील. तें कसें घडतें ? शरीराचे अवयव सारख्या प्रमाणांत वाढतात तसें.

# संतांची योग्यता काय आहे ?

**४ एप्रिल**

आपलें शहाणपण बाजूला ठेवून जो संताला शरण जातो तोच खरा साधक. ज्याला सर्व सृष्टि रामरूप दिसते, आणि शिष्यालाहि जो रामरूप पाहातो, तोच खरा गुरु. सद्गुरु कधींहि मिंधेपणानें वागत नाहीं. आणि त्याला भीतीचा लवलेशहि नसतो. आपला शिष्य कोणत्या आध्यात्मिक भूमिकेवर आहे हें संतांना कळतें. शिपाई जसा चोराच्या पुढें पण मामलेदाराच्या मागें चालतो, त्याचप्रमाणें विषय हा देहबुद्धीच्या लोकांवर मालकी गाजवितो, पण संत मात्र विषयावर मालकी गाजवितात. संतांजवळ जें समाधान असतें तें आपल्याला लाभलें, किंवा त्याची आवड उत्पन्न झाली, म्हणजे संतांची प्रचीति आली असें समजावें. **औषध काय आहे हे न कळतांसुद्धां रोग्यानें तें श्रद्धेनें घेतलें तरी त्याला गुण येतो,** एखाद्याला स्वयंपाक करतां आला नाहीं तरी त्याला अन्नाची चव समजते आणि तो पोटभर जेवूं शकतो; हें जसें खरें, त्याचप्रमाणें एखाद्याला ज्ञानाचा अनुभव येईल, पण शब्दानें त्याला तो सांगतां येईलच असें नाही.

नवरा अगदी प्रेमाची गोष्ट जशी आपल्या बायकोजवळ सांगतो; त्याप्रमाणें, ' आपण जगत् कां उत्पन्न केलें ?' हें भगवंत फक्त संतांनाच सांगतो. मीठ खारट आहे याचें जसें आपल्याला दुःख होत नाही; त्याचप्रमाणें जगामधल्या लढाया, हाणामाऱ्या, सज्जनांचा छळ, संकटें, याचें संतांना वाईट वाटत नाहीं, " वाईट वाटत नाहीं ' याचा अर्थ तें त्याला आवडतें असा मात्र मुळींच नव्हे. पण मीठ जसें खारटच असणार, तशा जगातल्या या घडामोडी होणारच, जगाची राहाटीच अशी आहे, हे समजून तो दुःख करणार नाहीं. किंबहुना, मीठ फार झाले तर खारटपणा जसा सहन होत नाहीं, तसें त्यालाहि होईल. इतकेंच नव्हे, तर त्याचा प्रयत्नहि जगांतलें वाईट कमी करण्याकडेच असतो.

विहिरींतल्या बेडकांना जशी समुद्राची कल्पना येत नाहीं, तशी आपल्याला संतांची कल्पना येत नाहीं. संत हे पहिल्यानें आपल्यांतलेच होते, परंतु अनुसंधानाच्या मार्गानें ते वर गेले. **संत शोधण्याच्या फंदांत आपण पडूं नये.** आपल्याला संत " शोधण्याची " मुळींच जरुरी नाहीं. आपली इच्छा बलवत्तर असेल तर संतच आपला शोध करीत आपल्याकडे चालत येतील. आपली भावना कशी आहे इकडे संताचें लक्ष असतें. संत हा गुप्त पोलिसासारखा आहे. तो आपल्यामध्यें आपल्यासारखा राहतो, पण आपल्याला ओळखतां येत नाही; आपल्या सर्व गोष्टी मात्र त्याला माहीत असतात. संताला आपल्या शरीरांत काय चाललें आहे, तें सर्व दिसतें, म्हणून तो रोगाची काळजी करीत नाहीं. संताला कर्म मागेंपुढे करतां येतें, पण तें टाळतां येत नाहीं. ते कोणाला तरी भोगलेंच पाहिजे. ज्याला एका संताचे वर्म कळलें त्याला बाकीच्या सगळ्यांचेंहि वर्म कळेल.

---

९५. मनानें संत बनायला पाहिजे, नुसतें बाहेरून संत बनणें हें पाप आहे.

# संतांच्या संगतीचा परिणाम

**५ एप्रिल**

जडीबुटीवाल्याजवळ एक गोळी असते. ज्याच्या अंगात विष भिनलें आहे अशा माणसाच्या जखमेवर ती गोळी नुसती ठेवतात. ती सर्व विष शोषून घेते. नंतर तिला धुतली कीं ती पूर्ववत् होते. त्याचप्रमाणें सत्पुरुषाच्या संगतींत आपलें पाप शोषून घेतलें जातें आणि पुनः तो सत्पुरुष स्वतः शुद्धच राहतो. सत्संगति मिळेल, पण ती टिकणें फार कठीण काम आहे. साधारणपणें ज्या विषयाची अपाल्याला आवड असते तसलीच संगत आपण बघतों. मीच वाईट म्हणून मी वाईट लोकांची संगत धरतो. विषयात दोष नाहीं; म्हणजेच नुसते विषय बाधक होत नाहींत. विषयी लोकांची संगत मात्र फार बाधक असते. संगतीनें आपल्यावर बरा-वाईट परिणाम होतो. विषयाची गोडी फार, पण तो सुटावा असें वाटूं लागलें, म्हणजे भजनपूजन करणाऱ्याची संगत धरावी. वाईट विचार मनांत आले कीं नामाची जोड ठेवावी. भगवद्भक्ताचें मनोराज्य करावें. संतांची परीक्षा विषयसुखावरून नाहीं करूं. आपला सर्वांठायीं भगवद्भाव वाटूं लागला म्हणजे संतांची प्रचीति येते. भगवंताच्या लीला पाहणाऱ्यांनाच खरा आनंद मिळतो. म्हणून संत नेहमीं भगवंताविषयींच सांगत असतात. ते जें गातील तो संगीतातला रागच समजावा. तुकारामबुवा नुसतें "विठ्ठल, विठ्ठल" म्हणत, पण त्याची गोडी आपल्या गाण्यामध्ये-देखील नाहीं. खरोखर, संतांना आपल्याविषयीं इतकी कळकळ असते, आपल्याला ती कळतहि नाहीं. संतांच्या दर्शनाला गेल्यानें संतांवर मी उपकार करतों असें आपल्याला वाटतें ! संत आपल्या हिताचें सांगतात, पण आपलें मन विषयांत वावरत असल्यानें त्यांचें बोलणें आपल्या मनांत पूर्णपणें ठसत नाहीं. औषध कडू असलें तरी रोग झाल्यावर आपण तें घेतोंच ना ? मग प्रपंचांतल्या व्याधींनीं त्रस्त होऊनहि आपण संतांच्या हितकारक बोलण्याकडे कां दुर्लक्ष करावें ? ज्याला भगवंतांचें अधिष्ठान आहे त्याचें कडक बोलणेंसुद्धां कोणाला लागणार नाहीं. अत्यंत निर्भयता हा संतांचा पहिला गुण आहे. कारण "सर्व ठिकाणीं मीच आहे" ही भावना झाल्यावर भयाचें कारणच उरत नाहीं. आईपण जसें सगळी-कडे सारखें, त्याचप्रमाणें संत सर्व एकच भाषा बोलतात. संतांनीं मिळविलेलें पद मिळविण्याचें साधन आपणहि करतो; पण त्यांचें करणें निःसंशय असतें, तर उलट आपण नेहमीं शंकाच व्यक्त करीत असतों. डोळ्यांत खुपणारा खडा काढण्यासाठीं त्यांत लोणी घालतात; त्यानें न खुपतां खडा बाहेर पडतो आणि डोळा थंड होतो. त्याचप्रमाणें संतांची वाणी गोड, मऊ, हितकारक असते, तसें आपण बोलावें.

९६. भोग आले कीं, आपल्या मनाला चैन पडत नाहीं, म्हणून मनाला भगवंताच्या स्मरणांत गुंतवून ठेवावें, म्हणजे भोग भोगीत असतांनादेखील आपलें समाधान टिकतें.

# संत हे चालते--बोलते देवच आहेत

६ एप्रिल

व्यवहारांत ज्याला चांगलें वागतां येत नाहीं, त्याला नाहीं परमार्थ करतां येणार. व्यवहारांत झालेल्या गोष्टींचा मनावर परिणाम होऊं देणार नाहीं असा निश्चय करावा, आणि सद्गुरुआज्ञा प्रमाण मानून तों पूर्णत्वाला न्यावा. साधनावर जोर द्यावा. स्वतः कोण याची ओळख करून घ्यावी. भगवंतापरतें कोणी नाहीं हें कळलें म्हणजे मी कोण हें कळतें. आम्हीच आपलेपणाला विसरलों मग जगाला कुठलें आपलेपण येईल ! आपली ही मधली स्थिति मोठी वाईट असते. निर्गुण जरी समजलें तरी सगुण नाहीं सोडूं. माझ्या मुखीं राम आला यापरतें दुसरें भाग्य तें कोणतें ? हृदयांत स्फूर्ति येऊनच आपण बोलतों; मग आमच्या मुखांत राम आला तर तो हृदयांत नाहीं असें कसें म्हणावें ? भगवंताला पाहण्यांत जो सुदाम्याला आनंद झाला तो सुदामनगरी पाहण्यांत नाहीं झाला. आम्ही सर्व करतों, पण तुमची कृपा हवी, असें म्हणतो; पण ज्यांनीं ' नामाशिवाय राहूं नको ' म्हणून सांगितलें, त्यांनीं कृपा असल्या-शिवाय का सांगितलें ? बाकीच्या गोष्टींचा विसर पडला कीं भगवंताची आठवण होते.

तुम्हीं मला उपनिषदांतलें सांगा म्हटलें तर कसें सांगू ? ज्यानें जें केलें तेंच तो सांगणार. एक गुरुआज्ञापालन याशिवाय दुसरें कांहींच मीं केलें नाहीं, तर मी दुसरें काय सांगणार ? संतांचा समागम करावा म्हणजे आपण मार्गाला लागलों. आपण साधूला व्यवहारांत आणतों, आणि नंतर तो आपल्याशीं व्यवहारानें वागला म्हणजे त्याच्याजवळ समता नाहीं म्हणून उलट बोंबा मारतों. संत हे देहाचे रोग बरे करीत नसून, त्या रोगाची भीति नाहींशी करतात. संत हे चालते-बोलते देवच आहेत. संतांच्या देहाच्या हालचालींना महत्त्व नाहीं. भगवंताचें नाम सिद्ध करून देणें हाच संतांचा जगावर सर्वांत मोठा उपकार होय. संतांचा कोणताहि मार्ग हा वेदांच्या आणि शास्त्राच्या उलट असणें शक्यच नाहीं. संत सूर्यासारखे जगावर स्वाभाविक उपकार करतात. सूर्याचें तेज कमी होतें आहे असें शास्त्रज्ञ म्हणतात, पण संतांचें तेज मात्र वाढतेंच आहे.

श्रीमंत आईबापांच्या पोटीं जन्माला आलेला मुलगा भीक मागतांना पाहून आपल्याला त्याची कींव येते, त्याप्रमाणें मनुष्य जन्माला येऊन आपण दुःख करतों हें पाहून संतांना वाईट वाटतें. खालच्या योनि इतक्या आहेत कीं त्यामध्यें मनुष्य-जन्म येणें कठीण आहे. मनुष्यजन्म येऊन भगवंताची प्राप्ति झाली नाहीं तर जीवाचें फार नुकसान आहे. म्हणून अत्यंत चिकाटीनें संतांचा समागम करावा, त्यांची कृपा करून घ्यावी. हजारों लोक भगवंताच्या नामाला लावणें हेंच खरें संतांचें कार्य होय.

---

**९७. संतांच्या वचनाचा ओढून ताणून अर्थ करूं नये, त्याचा सरळ अर्थ घ्यावा.**

# जोंवर जग चाललें आहे तोंपर्यंत संत आहेत व पतिव्रताहि असणारच

७ एप्रिल

पुष्कळ वाचलें, ऐकलें, पण कृतींत जर उतरलें नाहीं तर त्याचा काय उपयोग ! कृतीशिवाय समाधान नाहीं. श्रवण कोणी केलें ! तर ज्यांनीं त्याप्रमाणें कृति केली त्यांनीं. संतांच्यावर विश्वास नसेल तर स्वतःचा अनुभव पाहावा. संतांच्या सांगण्याचा आपण विचारच केला नाहीं, त्याचें मननच जर केलें नाहीं, तर पुष्कळ सांगितल्याचा काय उपयोग ? देह हा अनित्य आहे असें सर्व संतांनीं एकदिलानें सांगितलें आहे, तरीसुद्धां आम्हांला देहाचें प्रेम सुटत नाहीं, याला काय करावें ? देहाच्या प्रेमाशिवाय प्रापंचिक गोष्टी चालणार नाहींत हें खरें पण म्हणून देहाच्या सुखाकरितांच जन्मभर आटापिटा करायचा हें योग्य नव्हे. देहापासून सर्व सुख आहे असें आपण विचारानें ठरविलें, पण खरोखर अनुभव काय येतो हें पाहावें. एखादें वेळीं मनुष्य भगवंतावांचून जगात अजिंक्यपद मिळवूं शकेल, **पण शांति मात्र जर तो भगवंताचा झाला तरच त्याला मिळेल.**

कृतीशिवाय जे बोलतात त्यांचा नाश होतो. बोलावें असें वाटतें तोंपर्यंत बोलणें थांबविणें जरूर आहे. विद्या किंवा ज्ञान हें कधीं वाया जात नाहीं; पण त्याचा योग्य उपयोग झाला पाहिजे. विद्वान् हे उंचावर चढलेल्या माणसासारखे आहेत; ते जर कां पडले तर त्यांचे पायच मोडतात. अडाणी माणसांना हा धोका नाहीं. स्वातंत्र्य आणि स्वैरवर्तन बाहेरून सारखींच दिसतात, पण त्यांच्यामध्यें फार फरक आहे. स्वातंत्र्य हें पवित्र आहे, तर स्वैरवर्तन हें अर्थात् घाणेरडें आहे. एका नामांकित सद्गृहस्थाला वाटलें कीं, आतां पतिव्रताधर्म नाहींसा झाला. मला नाहीं हें खरें वाटत. जोंवर जग चाललें आहे, तोंवर संत आहेत, आणि पतिव्रताधर्म पाळणाऱ्या स्त्रियाही असणारच. लग्नाचा पवित्रपणा ज्या वेळीं नाहींसा होईल त्या वेळीं आपल्या धर्माचा पायाच उखडला असें समजावें. लोकांच्या स्वातंत्र्याविषयींच्या कल्पना कांहींतरीच असतात. खरें म्हणजे माणसाला स्वातंत्र्य फक्त स्वतःची उन्नति म्हणजे आत्मोन्नति करण्यापुरतेंच आहे. इतर बाबतींत, म्हणजे देहाच्या वगैरे बाबतींत, त्याला बंधनेंच असतात, आणि तीं आवश्यक आहेत. **झोंप ही जशी श्रीमंतांना आणि गरिबांना सारखीच असते, त्याचप्रमाणें भगवंताची आस ही सर्वांना सारखीच असते.**

---

**९८. जें कार्य प्रत्यक्ष भगवंत करतो तेंच काम त्याचें नाम करीत असतें. अडचणी असल्या तरी नाम घेता येतें; म्हणून न करण्याबद्दल सबब सांगूं नका; सबब सांगितली कीं, त्यापासून लबाडी उत्पन्न होते.**

# मनांतील विषय काढून टाकले म्हणजे संतांची प्रचीति येते

८ एप्रिल

ज्यानें तूपच पाहिलें नसेल त्याला घाणेरडें कोणतें आणि चांगलें कोणतें हें कसें कळणार ? ज्याला भगवंताचें अस्तित्वच मान्य नाहीं त्याला भगवंताची प्रचीति कशी येणार ? जो सरळ मार्गानें जातो त्याला प्रपंचांत प्रचीति आल्याशिवाय राहात नाहीं. जन्माला आल्यापासून दुःखाची प्रचीति आली, पण मी भगवंताचा आहें, आणि प्रपंचांत आनंदरूप भगवानच चोहोंकडे भरून राहिला आहे, हें ठसवून न घेतां, आपलीच कांहींतरी वाट चुकलीं असें समजून पुनः प्रपंच डोहांत बुडी मारून दुःख करूं लागलों, तर या जन्म-मृत्यूच्या फेऱ्यांतून सुटका कशी होणार ? प्रपंचांत आनंदाची प्रचीति यायला भगवंताची तळमळ धरावी लागते. संतसमागम केल्याशिवाय आनंदाचें स्थान आपल्याजवळच आहे हें नाहीं कळणार ! संतांजवळ जें असतें तें मला आलें, किंवा त्याची मला आवड वाटूं लागली, म्हणजे संतांची प्रचीति आली असें म्हणावें. संत चमत्कार करतात तसें मला करतां यावेत अशी इच्छा धरून आपण संतांकडे गेलों, तर खरी प्रचीति कशी येणार ? जगांत भगवंताच्या सेवेशिवाय कांहीं नाहीं हें ज्याला कळलें ती खरी प्रचीति. ज्यानें माझें समाधान टिकेल ती खरी प्रचीति. विहिरी-तळीं बांधून त्यांवर स्वतःचें नांव घातलें आणि लौकिक वाढावा म्हणून त्याचा अभिमान धरला, तर हें सर्व देवाच्या दर्शनाच्या आड येतें म्हणून समजावें. **भगवंताशिवाय जें जें गोड लागतें त्याला विषय म्हणावें.** मनांतले विषय काढून टाकले म्हणजे संतांची प्रचीति येते आणि भगवंताची आवड उत्पन्न होते. ज्या घटकेला चित्त शुद्ध झालें त्या घटकेला प्रचीति येते. मी वाटेल तसें वागावें आणि संतांची प्रचीति यावी हें कसें व्हावें ? ती यायला, संतांची आज्ञा प्रमाण मानणें हेंच एक साधन आहे. मारुतिरायाजवळ जावें आणि संतति मागावी, याला काय म्हणावें ! जे ब्रह्मचारी राहिले त्यांच्याजवळ संतति मागावी हें बरें दिसेल का ? एखादा इसम डॉक्टरकडे गेला आणि त्याला खटला समजावून सांगूं लागला, तर काय प्रचीति येणार डॉक्टरची ! भगवंताची गोडी लागेल तेव्हांच संतांची प्रचीति आली असें म्हणावें. भगवंताच्या प्राप्तीकरितां नरदेहासारखा श्रेष्ठ देह मिळाला असें कळूं लागलें तर ती प्रचीति. सर्वजण उलटले तरी माझा राम खरा असें म्हणावें. राम माझा दाता आणि धनी आहे ही बुद्धि ठेवावी आणि तसें वागावें.

---

**९९. आपण रोज उठल्यावर भगवंताचें स्मरण करण्याचा नियम ठेवावा. स्नान वगैरे गोष्टी झाल्या तर कराव्यात, पण त्यावांचून अडून बसूं नये.**

# संत हे भगवंताची आठवण देण्याचें कार्य करीत असतात

९ एप्रिल

ज्याला सत्याचें ज्ञान झालें तो सर्वज्ञच बनला; आणि जे या सत्याला धरून राहतात ते संत होत. एकजण संतांना म्हणाला, "तुम्ही आमचें नुकसान करतां; अपकार करणाऱ्यावरहि उपकार करायला सांगून तुम्हीं आम्हांला मेषपात्र करतां." वास्तविक संतांची कामगिरी कोणाला दिसतहि नाहीं; आणि आमची फक्त दिसण्यापुरतीच असते, त्यामुळें ती पुरी पडत नाहीं. आमच्या मनाला धीरच कुठें असतो ! मागें पहावें तो राम नाहीं, आणि पुढें पाहावें तों मनाचा धीर सुटलेला. अशा परिस्थितींत संत आपल्याला मार्ग दाखवायला तयार असतात, परंतु आपला अभिमान आपल्या आड येतो, आणि आपण संतांना नावें ठेवतो. 'आपण आजपर्यंत कुणाला भ्यालो नाहीं' पण साहेबाचा मार खाऊन आला होतां तेव्हां तुमचा धीर कोठें गेला होता ?

खरोखर, एखादा पुष्कळ ज्ञानी झाला, पण तें ज्ञान जर वृत्तींत उतरलें नाहीं, तर त्याचा काय उपयोग ? जगाचें खरें स्वरूप समजून घेण्यासाठीं, जो सुखदुःखाच्या जाळ्यांत सांपडला नाहीं त्याच्याकडे जावें तो साक्षित्वानें जगांत राहिल्यानें जगापासून अलिप्त राहातो; आपण मात्र सुखदुःखाच्या जाळ्यांत सांपडतों. संत हे गर्भाशय काढून टाकलेल्या स्त्रीप्रमाणें आहेत. अशी स्त्री विषयभोग भोगूनहि फळ धरीत नाहीं; त्याचप्रमाणें संत कर्म करूनहि त्याच्या फळाच्या आशेनें लिप्त होत नाहींत. साधुसंतांना आपल्यासारखी झोंप नसते. त्यांचें घर म्हणजे दवाखाना किंवा तुरुंग होय; तिथें मानसिक रोगी किंवा गुन्हेगार लोक असायचेच. संतांचें अंतकरण अतिशय शुद्ध असल्यानें त्यांची शिव्याची भाषासुद्धां न बोचणारी असते. अर्थात्, साधु जरी झाला तरी त्याला व्यवहाराला थोडें मानावें लागतेंच. सत्पुरुष विद्वान असतात असें नाहीं; पण अति विद्वान मनुष्य कोणी सत्पुरुष झालेला ऐकिवात नाहीं. कुणी आठव्या वर्षीच घरांतून निघून जातो, कुणी लग्नांतून पळून जातो, कुणाला लिहायला-वाचायलाहि येत नाहीं, असे लोक सत्पुरुष झालेले आढळतात. **संत हे गेल्यानंतरसुद्धां लोकांना फार हवेसे वाटतात.**

लहान मूल बाहेर खेळत असतें, परंतु मध्येंच त्याला आईची आठवण होऊन तें तिच्याकडे धांवतें, याचा अर्थ असा कीं, मुलाला आईचें सूक्ष्म स्मरण असते. तसा भगवंताचा चटका, किंवा तशी त्याच्या अस्तित्वाची जाणीव, किंवा तशी त्याची निष्ठा, आपल्याजवळ पाहिजे. भगवंताची तळमळ लागली कीं मनुष्य वेडा बनतो, आणि कोणी संत भेटला कीं निवांत होतो. अनुभवानें जे शहाणे झाले ते संतच बनले.

---

१००. परमार्थामध्यें कोणत्याहि साधनानें जडाचा निरास करतां करतां शेवटीं ओंकारापर्यंतच येऊन थांबावें लागेल; म्हणजे, प्रत्ययकाला नामाशींच यावें लागेल.

# रामास अर्पण व्हावें कोण्या रीती । त्याचा मार्ग सज्जन सांगती

१० एप्रिल

ज्यानें त्यानें आपलें हित ओळखून वागणें हें जरूर आहे. कल्याणाचा मार्ग कोणीहि दाखवील, पण त्याप्रमाणें वागणें प्रत्येकाकडे आहे. कोठें तरी (एकांतात) जावें असें तुम्ही म्हणता तें योग्य आहे. **बंधनास खरें कारण परिस्थिति नसून आपल्याच मनाची ठेवण हें आहे**. सुखदुःखांचा दाता । सत्य नाहीं दुजा आतां ।। जाणिवेनें जैसे घ्यावें । तैसें मनानें सुखदुःख भोगावें ।। मी-माझेपणाची जोंपर्यंत धडपड जाण । तोंपर्यंत नाहीं समाधान ।। सर्वस्वीं राहावें रामास अर्पण । हाच उपाय सांगती साधुजन ।। रामाला अर्पण व्हावें कोण्या रीती । त्याचा मार्ग सज्जन सांगती ।। प्रयत्नेविण राहों नये । फळाची आशा ठेवूं नये । भगवंताला विसरूं नये ।। कर्तव्य या दृष्टीनें कर्म करावें ।। प्रथम राखावें भगवंताचें अधिष्ठान । तेथें व्हावा प्रयत्नाचा उगम । अखंड राखावें अनुसंधान । येणें कर्म होईल सहज रामार्पण ।। वृत्ति राखावी अत्यंत शांत । हेंच संतांचें मुख्य लक्षण जाण ।। जें जें घडेल कांहीं । तें तें रामइच्छेनें पाहीं ।। असा करावा संसार । परी असावें खबरदार ।। त्राता राम जाणुनी चित्तीं । निर्भय करावी आपली वृत्ति ।। थोर भाग्य उदया आलें । रामराय घरीं आले । आतां व्हावें रामाचें आपण । व्यवहार प्रपंच करावा जतन ।। न दुजाचा दोष पाहावा । त्याचा आपणापाशींच ठेवा ।। देह आहे परतंत्र । मन राखावें भगवंताशीं स्वतंत्र ।। मनानें जो बांधला । परतंत्र वाटेल त्याला ।। शरण गेला रामचरणीं । त्याला नाहीं दुजी हानी ।। सर्वांस सांगावें माझे नमस्कार । चित्तीं असावा रघुवीर ।। अखंड करावें नामस्मरण । नीतिधर्माचें असावें आचरण ।। बायकामुलें लहान थोर । यांनीं न सोडावा रघुवीर ।। काळ कठीण आला फार । बुद्धिभेद त्वरित झाला ।। आतां सांभाळावें सर्वांनीं आपण । रामाविण न जाऊं द्यावा क्षण ।। चाललें तसेंच चालावें । राम ठेवील तसें असावें ।। माझा राम जोडला । हें जाणलें ज्यानें । त्याला न उरली करणी ।। राम ठेवील ज्या स्थितींत । त्यांत समाधान मानावें ।। रामास जें करणें असेल । तें तो करील साचें ।। सदा सर्वकाळ माझ्याशीं वास । हाच धरावा हव्यास ।। त्याला न जावें लागे कोठें । घरबसल्या राम भेटे ।।

---

१०१. अखंड राखावें अनुसंधान । येणें कर्म होईल सहज रामार्पण ।।

# साधनांनी जें साधत नाहीं तें संतसहवासानें साधतें

**११ एप्रिल**

खरोखर संत हे आईप्रमाणें आहेत. ते देह घेऊन आले तरी त्यानेंच ते राहतात हें म्हणणें बरोबर नाहीं. संतांनीं जगातलीं राज्यें मिळवली नाहींत, पण त्यांनीं स्वतःवर राज्य केलें. इतर संत आणि अवतारी संत याच्यामध्यें फरक असतो. अवतारी संत हे ज्ञानेश्वर महाराजासारखे, तुकोबासारखे, किंवा समर्थांच्या-सारखे असतात. ते आपण होऊन येतात आणि आपले काम झालें कीं जातात, मग ते राहात नाहींत. संतांचें वचन पूर्णपणें समजून ऐकत जावें; आपल्याला आवडेल तेवढेंच नाहीं ऐकूं. ध्यान, स्मरण, मनन आणि सद्ग्रंथ–वाचन यामुळें संतांची गांठ पडून त्यांच्याशीं समागम होणें शक्य होईल. संतसमागमांत राहून विषय मागणें हें समागमाचें रहस्य नाहीं. अशानें बुद्धिभेदच होतो. आपण बुद्धीनें, तर्कानें, संतांकडे येऊं लागलों तर पदरांत काय पडणार, विषयच! कर्म तसें फळ. बुद्धीचा उपयोग करूं तसा होतो. आपल्या संतांनीं कर्मांचा ढीग पाडला आहे. त्यांच्या कर्मांमुळेंच तर आज आपण हिंदु म्हणून जगत आहोंत. पण त्यांच्या आणि आपल्या कर्मामध्यें फरक आहे. "राम कर्ता" या भावनेनें त्यांनीं कर्म केलें; आपण आपलेपणानें तें करतों, म्हणून आपल्याला कर्म बंधनकारक बनतें.

एका आईच्या एकुलत्या एका मुलानें अफूच्या गोळीसाठीं हट्ट धरला, तर आई त्याला ती गोळी देईल काय? जर तिनें ती दिली तर ती आई खरी नव्हेच. त्याप्रमाणें **जो विषयाचें प्रेम देईल तो खरा संत नव्हे.** संतांनीं खरें भगवंताला जाणलें. साधनांनीं जें साधत नाहीं तें संतांच्या सहवासांत राहिल्यानें साधतें. मनुष्य जितका निःस्वार्थी तितकी त्याची भाषा व्यापक असते. आपल्या घरांतले लोकसुद्धां आपलें ऐकत नाहींत, पण संतांची वाणी सर्व जगावर परिणाम करते; कारण ती सर्वव्यापक असते. ती अत्यंत तळमळीची असते. याच अर्थानें श्रुति सनातन आहे. जगाचे कल्याण व्हावें म्हणून ऋषि बोलले; म्हणून त्या वाणीनें जगाचें कल्याण व्हायचेंच. शिवाय जगाचें कल्याण व्हावें असें वाटतें तोंपर्यंत ती वाणी रहायचीच. आपण ज्या संताकडे जातों त्याला विषयाचें प्रेम असत नाहीं, इतकेंच नव्हे तर त्याच्या माणसानें विषयामध्यें मग्न राहिलें असतां त्याच्या हृदयाला पीळ पडतो. कुत्रा हाड चघळीत असतां आपल्याच तोंडांतून येणारें रक्त पिऊन तें त्या हाडांतून येतें आहे असें तो समजतो, तसे आपण विषयमग्न असलेले पाहून संतांना फार वाईट वाटतें. जिज्ञासु शिष्य भेटला तर संताला आपले स्वतःचे सार्थक झालें असें वाटतें.

---

१०२. संत हे चालतेबोलते देवच आहेत.

# सद्वस्तु साध्य करून घेण्याचा उपाय म्हणजे सत्संगति

**१२ एप्रिल**

एखाद्या दारुबाजाप्रमाणें विषयी मनुष्य वागत असतो. त्याला सर्व कळतें पण वळत नाहीं. एकीकडे स्वतःला तो परमात्म्याचा अंश म्हणवितो, आणि दुसरीकडे विषयांच्या आहारीं जातो. खरोखर, भक्ती-शिवाय सर्व काहीं वाया आहे. भगवंताची मूर्ति पाहावी आणि तीच आपली गुरुमाऊली मानावी. संताजवळ राहावें आणि भक्तीचें साधन करावें. आपल्याला काहीं करायचें उरलें आहे असें जें वाटतें, तें न वाटूं लागलें म्हणजे साधनांत प्रगति झाली असें समजावें. **भगवंताची भक्ति घडायला गुरुसेवा हें एक मुख्य साधन आहे**. जो शिष्य आज्ञा पाळतो त्याला भेटणें गुरुला भागच पडतें. वास्तविक गुरु मनांत कांहीं इच्छाच येऊं देत नाहीं; म्हणून कामधेनुपेक्षां गुरुच श्रेष्ठ आहे. आपण पोथींतले नुसते शब्द तेवढे वाचतों; त्यांचा अर्थ संतांच्या कृपेवाचून कळणें कठीण आहे. बापाचा निरोप लहान मूल आईला आपल्या बोबड्या शब्दांत आणि स्वतःला कळला असेल तसा सांगत असतें; तितपतच पोथींतल्या शब्दांचा अर्थ आज आपल्याला सांगतां येईल.

अत्यंत तळमळीशिवाय भगवंताचा योग शक्य नाही, पण संतासमागम प्रारब्धानें होतो, " सम "रीतीनें जातां आलें तर खरा समागम घडतो. पण आमचा मार्ग विषम आहे. म्हणून संत भेटूनहि त्याचा ' समागम ' आपल्याला होत नाहीं. विषयांमध्यें धुंद असलेल्या आम्हांला पाहून संतांच्या मनांत कालवाकालव होते; त्याची आपल्याला कल्पनाहि येणार नाहीं. आपली बुद्धि आप-ल्याला समाधानाप्रत नेत नाहीं, तर दुसऱ्याची मदत घेणें अवश्य आहे; अशा वेळीं, ज्यांची मदत आपण घेतों त्यांचें आपण ऐकायला नको का ? भगवंताच्या जिज्ञासेचा मार्ग आक्रमायला संतांनीं सांगितलें. संतांना जिज्ञासा मूळचीच असते. आपल्याला ती नाहीं, म्हणून ती उत्पन्न करणें भाग आहे. **कांहीं केल्याशिवायच सद्वस्तु साध्य करून घेण्याचा उपाय, म्हणजे सत्संगति हा होय.** सत्संगति अति अपूर्व काम करणारी आहे. ज्याचें भाग्य थोर असेल त्यालाच ती लाभेल. एखादा मनुष्य भोंवऱ्यांत सांपडला तर त्याला काढण्याचे दोन मार्ग आहेत. एक मार्ग असा कीं, दुसऱ्या चांगल्या पोहणाऱ्यानें त्या भोंवऱ्यामध्यें उडी मारून तो फोडायचा आणि बुडत्याला बाहेर ओढून काढायचें. पण यासाठीं शक्ति फार लागते. दुसरा मार्ग असा कीं आपणच भोंवऱ्यामध्यें बुडी मारून तळाशीं जायचें आणि खालून बाहेर निघायचें. विद्वत्ता ही भोंवऱ्यासारखी आहे. वरवर पाणी फिरत असतें तरी तळाशीं तें संथ असतें, तसें जे लोक वरवर विद्या शिकतात, ते वादाच्या आणि मत-मतांतरांच्या चक्रांत सांपडतात; पण जे खोल तळाशीं जातात त्यांना खरें काय तें आपोआप कळतें, आणि तें सगळीकडे एकच असतें. विद्येच्या भोंवऱ्यामध्यें सांपडणाऱ्यांना बाहेर ओढून काढण्याचें काम फार मोठ्या संतांचें असतें, शहाण्यानें त्या भानगडींत न पडावें; पण पडावें लागलेंच तर बुडी मारून बाहेर निघावें. हेंच मध्यम शक्तीच्या माणसाचें काम आहे. हजारो लोक भगवंताच्या नामाला लावणें हेंच खरें संतांचें काम होय.

---

**१०२. भगवंताचें अनुसंधान हें आपलें ध्येय. त्याला अनुसरून बाकीच्या गोष्टी आपण करूं या.**

# संतांचा व्यवहार सरळ रोकडा असतो

१३ एप्रिल

( श्रीमहाराजांच्याकडे एकदा एक विद्वान् गृहस्थ आले. त्यांनीं तुकोबाच्या गाथेचा चांगला अभ्यास केलेला होता. त्यांनीं श्रीमहाराजांना असा प्रश्न विचारला कीं, " श्रीतुकारामांच्या गाथेंमध्यें सर्व ठिकाणी वेदांत भरलेला आहे. त्यांचा एक अभंग असा आहे कीं, " पाहिलीं पुराणें । धांडोळिलीं दर्शनें ॥ " याचा अर्थ काय समजावा. " त्यावर श्रीमहाराजांनीं केलेले निरूपण ) मागच्या जन्मीं तुकारामबुवांनीं तें केलेलें असणार यांत शंका नाहीं, पण संतांचें ज्ञानच असें असतें कीं, त्यांना वेदांताचें मर्म आपोआप कळते. अमुक एक ग्रंथ कुणीं लिहिला, केव्हां लिहिला, कुठे लिहिला; त्यामध्यें अमक्या पानावर काय आहे, या गोष्टी संतांना सांगतां येणार नाहींत, पण त्या विषयाचें मर्म त्यांना बरोबर ठाऊक असतें. संतांनीं ग्रंथ लिहिले याचें कारण, ज्यांना बुद्धीनें खात्री करून घ्यावयाची आहे त्यांनीं ती करून घ्यावी आणि परमार्थ करावा. संतांच्या वचनाचा ओढूनताणून अर्थ करूं नये, त्याचा सरळ अर्थ घ्यावा. खरं म्हणजे, संतांचें ग्रंथ वाचून स्वतःला काय करायला पाहिजे तें शोधून काढून तेवढें करणारे लोक थोडेच असतात. ते ग्रंथ वाचून त्यांचा अर्थ नीट समजणारे लोक त्यापेक्षां जास्त असतात. " मोठ्या संताचा ग्रंथ आहे. " म्हणून नुसता वाचणारे लोक त्याहून जास्त असतात आणि त्याहिपेक्षां, ते ग्रंथ मुळीच न वाचणारे लोक फारच जास्त असतात !

जगाच्या प्रवाहाच्या उलट जायला संतांजवळ शिकायचें असतें. संतांना व्यवहारापुरतीच देहाची स्मृति असते. ते देहाला सावलीप्रमाणें मानतात. सावलीला दुःख झाले म्हणणें केव्हांहि अयोग्यच. म्हणूनच संतांच्या मनावर सुखदुःखाचा परिणाम होत नाहीं. संतांच्याकडे लोक कितीतरी कष्ट करतात, आणि ते लोक नात्यागोत्याचेंहि नसतात. संत त्यांना कांहीं देत नसतांना ते इतकें कष्ट करतात, याचें कारण संतांचा त्यांच्याविषयीं असणारा खरा आपलेपणा होय. संत एकांतांत जातात याचें कारण असें कीं, लोकांतात त्यांना भेटणारे निराळे असतात आणि एकांतात भेटणारें निराळें असतात. लोकांतात संतांची शांति बिघडते असें मुळीच नाहीं, पण एकांतांत भेटणाऱ्यांना लोकांतात भेटता येत नाहीं, म्हणून ते एकांतांत जातात. स्वच्छ वाहणाऱ्या पाटामधून चार ओंजळी पाणी इकडे तिकडे टाकलें तर त्या पाटांत काय कमी होणार ! तसा संतांचा संसार असतो. आपल्याला तो अवाढव्य दिसला तरी भगवंताच्या सृष्टीमध्यें तो अगदी एवढासाच असतो.

---

१०४. संतांला ओळखण्यास आपल्या अंगी थोडेतरी भगवंताचे प्रेम असायला पाहिजे.

# आपल्याला जीवनांतील ध्येयाचा विसर पडल्यामुळे संत आपल्याला जागें करतात

१४ एप्रिल

प्रत्यक्ष विषयापेक्षा विषयी माणसाची संगत फार वाईट असते, हें ज्याप्रमाणें संसारात तसेंच परमार्थांतहि लागू आहे. संगतीचा परिणाम नेहमीं मनावर होतो; म्हणून चांगल्या विचाराच्या माणसाची संगत धरावी. चांगलें–वाईट हें नेहमीं आपल्यावरूनच ओळखावें. स्वतःला सुधारण्यापेवजी आपण जगाची सुधारणा करायला जातों हेंच आपलें चुकतें. जगात संत असतील असें पुष्कळांना वाटतच नाहीं. आपल्याला आपल्या ध्येयाचा विसर पडला, परंतु संतांनीं आपल्याला जागें केलें. चुकीची वाट चालत असताना 'अरे, तूं वाट चुकलास,' अशी जागृति संतांनीं आपल्याला दिली. नंतर जिकडे वाट होती तिकडे आपण तोंड केलें आणि पुनः चालूं लागलों, तर आपण योग्य स्थळीं जाऊं.

संत आनंदरूप झाल्यावर स्वस्थ बसत नाहींत. ते ज्या लीला करतात त्या जगाच्या कल्याणासाठीं असतात. खेळ खेळत असताना ते आपल्या मूळच्या आनंदातच असतात. ते स्वस्थ बसलेले दिसले तरी जगाचें कल्याण करीतच असतात. आपण धडपड करून फुकट मरतो, त्यापेक्षां ते स्वस्थ बसून जिवंत राहतात हें केव्हांहि चांगलेंच होय. संत आनंदरूप झालेले असल्यामुळे त्यांच्या कल्पनेनुसार आपण जाऊं या. लोकांना उपदेश करण्यामध्यें संतांचा हेतु एकच असतो, आणि तो हा कीं, "जें मला कळलें आहे तें लोकांना कळून लोक सुखी होऊं द्या." संत आपल्या स्वार्थासाठीं सांगत नसल्यानें त्यांचें म्हणणें आपल्याला खोटें कसें म्हणतां येईल? प्रपंच हा दुःखमय आहे हें कळल्यावर यावर कांहींतरी उपाय केला पाहिजे. तो ग्रंथवाचनानें कळतो. म्हणून संतांनीं आपल्या ग्रंथांत सांगितलेलें आपण करावें. सर्वज्ञ झाल्यावर शब्दांचा खेळ करायला कितीसा वेळ आहे?

मोठे संत ग्रंथ लिहितांना श्रोत्यांची फार स्तुति करतात. 'अहो श्रोते! तुम्ही भाग्याचे आहांत,' असें ते म्हणतात. जो खरा भाग्याचा आहे त्याला पोथी ऐकायची जरूरीच नाहीं! आपल्याला ते इतके चढवितात याचें कारण हेंच कीं, आपण त्यांचें म्हणणें ऐकावें; नाहींतर कुणी ऐकायला उभेसुद्धां राहणार नाहीं! ज्या संतांचा ग्रंथ आपण वाचतों त्यांच्या कृपेवांचून तो नीट समजणार नाहीं. परंतु आपल्यावर कृपा करायला संतांना ग्रंथाचीच जरूर असते असें मात्र नव्हे. ज्यांच्यावर त्यांची कृपा आहे त्याला कांहीं विद्वत्ता नसतांना देखील त्या ग्रंथाचा बरोबर अर्थ अगदीं स्वाभाविकपणें कळेल. विद्वान हा कल्पनेनें सत्यस्वरूपाचें वर्णन करतो, पण संत मात्र निश्चयानें, खात्रीनें, आणि अनुभवानें तें रूप काय आहे हें सांगतात. जे देहात दिसले पण देहात राहिले नाहींत ते संतच होय. संतांची आज्ञा पालन करणें म्हणजे संतसेवाच होय. सत्पुरुषाच्या वचनावर विश्वास ठेवून त्याप्रमाणें वृत्ति बनविणें हा खरा सत्समागम आहे.

---

१०५. लोक नामाबद्दल ऐकूनच घेत नाहींत, जर कोणी ऐकलें तर तें बिंबवून घेत नाहींत, त्याचें मनन करीत नाहींत; आणि मनन करून पटल्यावरहि तें घेत नाहींत, याला काय करावें?

# सत्संगतीच्या योगें मन पैक्यावर गुंतून राहत नाहीं

१५ एप्रिल

जज्ज कोर्टामध्यें चोराला शिक्षा करतो. पण समजा, त्याच्या बायकोनेंच त्याच्या खिशातले पैसे घरामध्यें काढून घेतले, तर तो तिला मात्र काहीं बोलत नाहीं. त्याचप्रमाणें देव हा संतांना गुन्हे माफ करतो. संतांमध्यें प्रचंड सामर्थ्य असतें; ते बोलतील तें खरें होतें. वाचासिद्धि म्हणतात ती हीच. या सिद्धीचा उपयोग आपणसुद्धां करून घेऊं शकतों; परंतु भगवत्सेवा करावी आणि त्याबद्दल पगार घ्यावा तसें आपलें होतें. कामधेनूवर ओझें टाकावें हें बरें वाटेना म्हणून, वाटेनें घोडा येत होता तो घेतला आणि कामधेनु देऊन टाकली, याला काय म्हणावें ! जें सुख चिरकाल टिकणारें नाहीं तें घेऊन काय करायचें ? हाडांचीं काडें करून स्वर्गसुख हातीं आलें, पण कालांतरानें तें नाश पावतें; मग तें घेऊन काय करायचें ? पैक्यासारख्या निर्जीव वस्तूंत आपलें मन किती गुंतून राहतें ! **पैशाचें नांव अर्थ, पण तो करतो मोठा अनर्थ.** पैसा हा भुतासारखा आहे. त्याच्याकडून काम करवून घेतलें तर तो फार उपयोगी आहे, पण तें न केलें तर तो उरावर बसतो. पैसा प्रपंचाला पुरेसा असावा. प्रपंचाला पुरेसा म्हणजे किती ? तर पेन्शन असेल त्यांना रोजच्या निर्वाहापुरता असला म्हणजे पुरेसा झाला; आणि पेन्शन नसेल त्यांना साधारण मध्यम स्थितींत दहा-पंधरा वर्षे पुरेल इतका असला म्हणजे पुरेसा झाला. याला अमुक एक असा हिशेब सांगतां येणार नाहीं. आपल्या प्रपंचाला जेवढा जरूर आहे तेवढा पैसा आपल्याला मिळाला कीं बस्स झालें. श्रीमंतीला पुष्कळ पैसा लागतो असें थोडेंच आहे ? आपल्याला अडचण नाहीं पडली कीं आपली श्रीमंतीच आहे ! पैशाच्या बाबतींत आपण प्रयत्न मात्र आग्रहानें करावा, आणि नंतर होईल तसें होऊं द्यावें. आपण आंतून निष्काम, निर्लोभ आणि निरिच्छ असावें. दुसऱ्याचें द्रव्य मला यावें अशी कधींहि बुद्धि ठेवूं नये. ज्याच्याजवळ पैसा विपुल आहे, त्याला श्रीमंत अगर सावकार म्हणतां येईल; ज्याच्याजवळ विद्वत्ता आहे त्याला विद्वान् म्हणता येईल; ज्याच्याजवळ शेत आहे त्याला शेतकरी म्हणतां येईल परंतु यांच्यापैकीं कोणाला मोठा म्हणतां येईलच असें नाहीं. सावकार कंजूष असेल, विद्वान् गर्विष्ठ असेल, किंवा शेतकरी असाच दुर्गुणी असेल. ज्याच्याजवळ सर्व गुण एकसमयावच्छेदेंकरून असतील तोच खरा मोठा होय. सर्व गुण एका भगवंताच्या ठिकाणींच असूं शकतील. म्हणून त्याला ज्यांनीं आपलासा केला तेच खरे मोठे बनतात. अशा लोकांना संत म्हणतात. आपण संतांचें होऊन राहावें, त्यांत आपलें कल्याण आहे. **सत्संगतीपासून सद्विचार आणि सद्वासना प्राप्त होतात.** ज्याचे विचार चांगले तो मनुष्य खरा चांगला होय; आणि जिथें भगवंताचें अनुसंधान आहे तिथें राहणें हीच खरी सत्संगति होय.

१०६. ज्या वेळीं वाईट विचार मनांत येतील त्या वेळीं भगवंताचें नांव घेतलें तर त्या **विचारांची मजल पुढें जाणार नाहीं.**

# व्यावहारिक वासना तृप्त करण्यासाठीं संत नसतात

११ एप्रिल

नोकरी पाहिजे असेल तर ती देणारा जिथें असतो तिथें आपण जातों; त्याप्रमाणें भगवंताची भेट घ्यायची असेल तर संत जिथें राहातात तिथें आपण जावें. परमेश्वराचें स्वरूप ओळखण्यासाठीं संताकडे जाणेंच जरूर आहे. तुम्हीं सर्व जागा पाहिली, आणि संत जिथें उभें तेवढीच जागा जर नाहीं पाहिली, तर बाकीच्या पाहिल्याचा काय उपयोग? **संतांचें अस्तित्व त्यांच्या देहांत नसून वचनांत आहे.** संतांजवळ निर्विषय चित्त असतें. रात्रीं सर्वजण झोपल्यावर शिपाई जसें गस्त घालतात, तसें साधुसंत आमच्या गैरसावधतेंत जागृत असतात. आपण झोपी गेलों असतांना ते आपली वृत्ति तपासतात. एका बाईला मूल झालें. पण त्याला आंकडीं येऊं लागली, आणि तें पाळण्यांत उगीच निपचित पडून असायचें. तें मूल बरोबर वाढेना, चांगलें हंसेना, खेळेना. मुलाची ती अवस्था पाहून आईला बरें वाटत नसे. अगदी तसेंच संतांना वाटतें. शिष्य केला खरा, पण साधनांत जर त्याची प्रगति होत नसेल तर संतांला वाईट वाटतें. शिष्याची प्रगति होत असेल तर संत स्वतःच्या प्रेमासाठींच शिष्याला सजवील आणि त्याचें कौतुक करील. संतांना फारसें कधीं कोणी चांगलें म्हणत नाहीं. त्यांनीं एकाचें कल्याण केलें तर त्या माणसाचे दहा नातेवाईक त्यांना नांवें ठेवतात. संतांना ओळखण्याकरितां जे गुण सांगितले आहेत ते त्यांची परीक्षा करण्याकरितां सांगितले नसून, त्यांचा त्या दृष्टीनें उपयोगहि होत नाहीं; त्या गुणांचें आपण आचारण करावें म्हणून ते सांगितलेले आहेत. संतांजवळ राहणाऱ्या लोकांना तीन तोटे आणि तीन फायदे असतात. त्यांपैकीं तोटे असेः–एक, वेदान्त बोलायला तवढा उत्तम येतो; दोन, संतांजवळ राहिल्यानें उगीच मान मिळतो, आणि तीन, ते '(म्हणजे संत) सर्व पाहून घेतील' या खोट्या भावनेनें हा वाटेल तसें वागतो. आतां फायदे :– पहिला म्हणजे, तो जर खऱ्या भावनेनें संतांजवळ राहील तर तेवढ्यानेंच, कांहीं साधन न करतांसुद्धां, त्याचा परमार्थ साधेल; दुसरें, त्याला मान मिळेल, पण तो स्वतः मानाच्या अपेक्षेच्या पलीकडे राहील; आणि तिसरें, वेदान्त त्याला बोलायला आला नाहीं तरी त्याच्या आचरणांत येईल. म्हणून संतांजवळ राहाणाऱ्यानें ते सांगतील तसें वागावें, मानाची अपेक्षा करूं नये, आणि फारसा वेदान्त बोलूं नये, तोंडापर्यंत आलें तरी दाबून टाकावें. संतांची आज्ञा प्रमाण मानणें हेंच प्रचीति येण्याचें साधन आहे. व्यावहारिक वासना तृप्त करण्यासाठीं संत नसतात हें ओळखून आपण त्यांची संगत करावी. तेल आणि वात असल्यावर दिवा लावायला जसा वेळ लागत नाहीं, त्याचप्रमाणें आपली भूमिका थोडी तयार असल्यावर सत्संगतीचा परिणाम व्हायला वेळ लागत नाहीं.

---

१०७. संतांना ओळखण्यासाठीं अनुसंधानाशिवाय दुसरें साधन नाहीं.

# संत 'तूं भगवंताचा आहेस' ही जाणीव देतात

**१७ एप्रिल**

कोणतेंहि कृत्य आपण करीत असताना, ज्याकरितां आपण तें कृत्य आरंभिलें तें जसें आपल्या डोळ्यासमोर असतें, त्याप्रमाणें नाम घेताना, आपण नाम कशाकरितां घेतलें त्याची अखंड जाणीव असावी ही जाणीव अखंड ठेवणें, मी भगवंताचा आहें हें जाणणें, याचें नांव अनुसंधान ठेवणें. वास्तविक आपण भगवंताचे आहोंतच, पण भ्रमानें मी विषयाचा आहें असें वाटूं लागलें. संत 'तूं विषयाचा नाहींस, भगवंताचा आहेस' असें सांगतात. हीच संतांची खरी कामगिरी, आणि याकरितां तें नाम घ्यायला सांगतात. नाम घेणें म्हणजे मी विषयाचा नाहीं, भगवंताचा आहें, असें मनाला सांगणें आणि मनांत तशी जाणीव उत्पन्न करणें; आणि ही जाणीव टिकविण्याकरितां पुनः पुनः मनाला तेंच सांगणें, म्हणजे तेंच नाम सतत घेणें. तुम्हांला रामदर्शन पाहिजे म्हणतां. पण राम तुम्हांला ओळखतां कसा येणार? रामदर्शन व्हायला रामाचें अंतर काटतां आलें पाहिजे; रामाला पक्कें ओळखतां आलें पाहिजे. याकरितां अंतःकरणाची पवित्रता पाहिजे, शुद्ध भाव पाहिजे. सर्व कांहीं साधनें केलीं, पण भाव नसेल तर तीं व्यर्थ होतात. कालांतरानें त्यामुळें भाव उत्पन्न होईल हें खरें, पण भाव ठेवून साधनें केलीं म्हणजे प्राप्ति लवकर होते. नवविधा भक्तींमध्यें सोपी आणि मुख्य भक्ति म्हणजे अर्पण करणें ही होय. आपण सर्वस्वी देवाचें होऊन राहावें म्हणजे आपण जें कांहीं करतों तें सर्व अर्पणच होतें. खरी एकाग्रता होण्यासाठीं सर्वांभूतीं भगवद्भाव ठेवला पाहिजे. मी तुमच्याकरितां सर्व कांहीं करतों आहें; तुम्हांला जें कांहीं होईल तें तुम्ही करा, पण तळमळ करूं नका. पण तुमचा यावर विश्वास आहे कुठें? तुम्हांला नेहमीं पेंच पडतो, हें करूं कीं तें करूं! वास्तविक जें जें कांहीं तुम्ही करीत आहात तें मीच करतों आहे, माझीच इच्छा तशी आहे, असें मनीं दृढ धरून वागावें. तुम्ही असे भेदबुद्धीनें कां वागतां? मीच तुमच्या हृदयांत असून तुमच्या बुद्धीला प्रेरणा करतों असें कां मानीत नाहीं?

अग्नीचा उपयोग तो करून घेणाऱ्यावर आहे; तसा देवाचा उपयोग जसा करावा तसा होतो. परमेश्वराच्या ध्यानानें सिद्धि येतात, आणि सिद्धि तर त्याज्य; मग परमेश्वराचें ध्यान करूंच नये कीं काय? **तर सिद्धी मिळविण्याकरितां ध्यान करूं नये, परमेश्वर-प्राप्तीकरितां निष्काम बुद्धीनें ध्यान करावें**; म्हणजे परमेश्वर सिद्धीचे अडथळे दूर करतो. साधु सिद्धींचा उपयोग कधींहि करीत नाहींत. ते परमात्मस्वरूपांत मिळून गेलेले असतात. सर्व गोष्टी ते परमात्म्यावर सोंपवितात आणि त्याच्या इच्छेनेंच केव्हां केव्हां चमत्कार झाल्याचें साधूंच्या चरित्रांत दिसतें. साधूजवळ कधींहि व्यावहारिक गोष्टी मागूं नयेत, त्या प्रारब्धावर सोंपवाव्यात.

---

१०८. प्रारब्ध टाळणें म्हणजे लोकाचे कर्ज बुडविणें होय.

# संत विषयांत देव पाहतात, आपण देवांत विषय पाहतों

१८ एप्रिल

प्रत्येकजण भक्ति करीतच असतो. कारण व्यापक दृष्टीनें पाहिलें तर भक्ति म्हणजे आवड, सर्वांना विषयाची आवड असते. तेव्हां सर्व लोक विषयाची एकपरीनें भक्तीच करीत असतात. परमार्थात भक्ति म्हणजे परमात्म्याची आवड असा अर्थ आहे. विषयाची आवड ही देहबुद्धीला धरून, देहबुद्धि वाढवणारी, आणि स्वार्थी असते. ही कमी झाल्याशिवाय परमात्म्याची आवड म्हणजे भक्ति उपजणें शक्य नाहीं. याकरितां भक्तिमार्गांतली पहिली पायरी म्हटली म्हणजे मोबदल्यारहित; निष्काम, निःस्वार्थी परमात्मस्मरण करणें; आणि शेवटची पायरी म्हणजे आपण स्वतःला विसरणें, देहबुद्धि विचलित होणें. निःस्वार्थी प्रयत्न करावा म्हटलें तर देहरक्षणाकरितां प्रयत्न करावा कीं नाहीं हा प्रश्न उद्‌भवतो, तर देहरक्षण परमात्मप्राप्तीकरितां करावें. केवळ विषयसेवनाकरितांच जगणें असेल तर त्यापेक्षां मेलेलें काय वाईट ?

जयंत्यादि उत्सव आपण करतों ते भगवंताच्या ठिकाणीं प्रेम उत्पन्न व्हावें म्हणून. मुळांत प्रेम नसलें तर, आपण ज्याच्यावर प्रेम असतें त्याला जो उपचार करतो तो उपचार करून प्रेम आणायचें असतें. प्रेम आणि उपचार यांचा अन्योन्य संबंध असतो. या उपचारानें भगवंताशीं संबंध वाढतो आणि त्यामुळें भगवंतावरचें प्रेमहि वाढतें. आई आपल्या लहान मुलाला दागिने वगैरे घालते, त्याचें त्या लहान मुलाला कांहीं सुख नसतें; उलट थोडे दुःखच वाटतें. पण त्यामुळें त्या आईला बरें वाटतें म्हणून ती तसें करते. भगवंताला आपण दागिने वगैरे घातले तर ते स्वतःकरितांच होय. वास्तविक, भगवंताला काय कमी आहे ?

संत विषयांत देव पाहतात, पण आम्हीं मात्र देवांतसुद्धां विषय पाहतो. श्रीरामाची मूर्ति काय उत्तम घडविली आहे, देऊळ किती सुंदर बांधलें आहे, वगैरे आम्ही म्हणतों. आमची वृत्ति विषयाकार बनली, म्हणून आम्हाला जिकडेतिकडे विषयच दिसतो. संतांची वृत्ति राममयच असते, त्यांना सर्वत्र रामच दिसतो. तेरा कोटी जप केला म्हणजे रामदर्शन होते असें म्हणतात. त्याचा अर्थ, तेरा कोटी जप व्हायला रोज दहाबारा तास या प्रमाणांत जवळजवळ बारा वर्षे लागतात; इतका सतत ध्यास लागला म्हणजे तें रूपच तो होतो. नाम कधींच वायां जात नाहीं. केव्हां केव्हां एखाद्याला दर्शन होत नाहीं, तेव्हां त्याचें नाम दुसरीकडे खर्च झालें असेल असें समजावें; मग तें विषयप्राप्तीकरितां असेल, किंवा त्याचें पूर्वपाप घटत असेल. विषयाकरितां नाम खर्च करूं नये. नामाकरितां नाम घ्यावें. नाम आपलें सर्वस्व वाटलें पाहिजे. अगदी खायला मिळेनासें झालें तरी आपली बायको विकून कोणी खात नाहीं, इतकें नाम आपलें सर्वस्व झालें पाहिजे.

तेरा कोटीची मर्यादा कशाकरतां पाहिजे ? सर्व गोष्टींना आपण मर्यादा घालतों ना ? जेवणाची वेळ, उठण्याची वेळ, वगैरेंना आपण मर्यादा नाहीं का घालीत ? कायद्यामध्यें सज्ञान होण्याची मर्यादा आहे, पण परमार्थांत ती नाहीं. एखादा मरेपर्यंत अज्ञानी राहूं शकेल, किंवा उपजतच ज्ञानी असेल. **परमार्थांत मर्यादा एकच, आणि ती म्हणजे भगवंताच्या नामापासून विचलित न होणें.**

---

१०९. आपण नाम घ्यावें, तें आपणच आपल्या कानांनीं ऐकावें, आणि तें घेतां घेतां शेवटीं त्यांत स्वतःला विसरून जावें, हाच आनंदाचा मार्ग.

# भवरोगापासून मुक्ततेचा उपाय-सत्संगति व नामस्मरण

१९ एप्रिल

एका गांवात एक वैद्य राहात होता. त्यानें एक दिवस एका मनुष्यास आपल्या घरावरून जातांना पाहिलें आणि त्याला आंत बोलावलें. त्या वैद्याला कोणाला काय रोग झाला आहे हें तोंडावरून समजत असे. वैद्यानें त्या माणसाला सांगितलें कीं, " तुला एक भारी रोग झाला आहे; तरी मी सांगतो तें औषध घे आणि सांगेन त्याप्रमाणें पथ्य पाळ म्हणजे तुझा रोग बरा होईल." वैद्यानें सांगितलेलें औषध आणि पथ्य त्या मनुष्यानें पाळलें नसतें तर त्यांत त्या वैद्याचें कांहीं नुकसान होतें का ? त्याप्रमाणेंच आपल्याला गुरु सांगत असतो. संतलोक जें आपल्याला करायला सांगतात, त्यांत त्यांना स्वतःला कांहीं मिळवावयाचें असतें का ? तर नाहीं. त्याचें ऐकल्यानें आपलाच फायदा होत असतो. ते आपल्याला भवरोग झाला आहे असें सांगतात, आणि त्याकरितां संतसंग करा आणि नामांत राहा म्हणून सांगत असतात. औषध सोपें असलें म्हणून त्यांत गुण नाहीं असें म्हणून कसें चालेल ? तें जें सांगतात ते स्वतः अनुभव घेऊनच सांगत असतात. तुकारामांनीं आपल्या उपासनेची शपथ घेऊन सांगितलें आहे कीं, नामस्मरणासारखें सोपें साधन नाहीं. तुमचा हल्लींच्या साधूंवर विश्वास नसला तरी समर्थ आणि तुकाराम यांनीं सांगितलें त्यावर तरी विश्वास ठेवायला काय हरकत आहे ? त्यांनीं तुमच्या कल्याणाकरतांच तें साधन सांगितलें आहे. तें तुम्ही न कराल तर त्यांचें कांहीं नुकसान नाहीं, तुमचेंच नुकसान आहे; तरी याचा विचार करा, आपल्याला रोग झाला आहे अशी आपली अगोदर खात्री झाली पाहिजे, म्हणजे निम्में काम झालें। आपल्याला रोग झाला आहे असे पक्कें कळल्यावर आपण औषध घेण्याचें टाळणार नाहीं. आपल्याला संसारांत सुख नाहीं असें दिसत असतांना; ज्या योगानें सुख मिळेल त्याच्या खटपटीस लागलें पाहिजे, आणि त्याकरितां होईल तितकें नामांत राहण्याचा प्रयत्न करा, म्हणजे तुम्हाला खरें समाधान मिळेल.

एका मनुष्यानें तीस वर्षें मनापासून नोकरी केली. तो म्हणाला, " भगवंताची पूजा आणि भक्ति कशी करावी हें मी नोकरीपासून शिकलों." त्याला विचारलें, " कसें ?" तेव्हा त्यानें उत्तर दिलें, " नोकरीमध्यें वरिष्ठाच्या मर्जीप्रमाणें वागावें लागतें. तो जिथें बदली करील तिथें आपल्याला जावें लागतें. मग घरांत अडचण असली तरी तिथें आपलें कांहीं चालत नाहीं. म्हणजे आपलेपण बाजूला ठेवावें लागतें. आतां मी सेवानिवृत्त झाल्यावर मालक तेवढा बदलला. सध्यां मी वरिष्ठाच्या ठिकाणीं भगवंताला ठेवला आहे. **भगवंत हा श्रेष्ठ वरिष्ठ आहे, कारण तो माणसासारखा स्वार्थी नाहीं.** तो अत्यंत निःस्वार्थी असल्यामुळें माझ्या हिताचेंच नेहमीं घडवून आणतो. म्हणून मी आतां अत्यंत आनंदांत आहें." याचप्रमाणें प्रत्येक माणसानें आपल्या प्रपंचापासून परमार्थ करायला शिकलें पाहिजे. हेंच आपल्या जीविताचें सार आहे.

---

११०. भगवंत हा आपल्या आंतमध्येंच प्रकट व्हायचा असल्यामुळें नामस्मरणामुळें हळूहळू तो प्रकट होत जातो। हेंच हिताचें आणि कायमचें असतें.

# संतांचा सहवास । याहून भाग्य नाहीं दुसरें खास

२० एप्रिल

बाह्य प्रपंच प्रारब्ध उपाधी । त्यांसीं त्रासूं नये कधीं । हीच जाणावी उघड समाधी ॥ सांवली मातींत पडली । तिला धुऊन नाहीं घेतली । तसेंच खरें आहे देहाचें । पण तें संतांनाच साधे ॥ वेदशास्त्राचें मंडन । संतसाधुसिद्धांची खूण ॥ सर्व संकल्प वर्ज्य करून । अवस्था असावी बालकवृत्ति समान ॥ सतत विवेक अखंड चित्तीं । रामनामीं मनोवृत्ति । हेचि तुम्हां परमप्राप्ति ॥ मारुनी खोटीं कल्पनावृत्ती । रामनाम अखंड चित्तीं । समाधान संतोष शांति देवासी सर्व करी अर्पण । करी स्वानंदयुक्त परमात्मचिंतन । हीच सिद्ध साधूची खूण ॥ वासना जाळून शुद्ध चित्त । अहंभाव सोडून होई निभ्रांत ॥ आता मी रामाचा । राम माझा । हें जाणावें पूर्ण ॥ मुलींनीं खेळ मांडला । न्यूनता कांहीं भासूं न दिली । परी असत्य मानून सत्यासारखी वागली । तैसा वस्तुधर्म जाणून । जगीं वागावें आपण । रामरूप झालें मन । त्याला दिसे जग शून्य ॥ संतसहवास त्याला पाहीं । जो देहबुद्धि टाकून राहीं ॥ संतास न पाहावें देहांत । आपण देहापरतें होऊन पाहावें त्यास ॥ नामांत ठेवा प्रेम । हीच संताची खूण ॥ जे जे आपले संगती आले । संतानें त्यांचें सार्थकच केलें ॥ साधूनें देह ठेवला । तरी सत्तेनें जागृत राहिला ॥ त्याची ठेवावी आठवण । सेवा करावी रात्रंदिन ॥ **संतांचा सहवास । याहून भाग्य नाहीं दुसरें खास ॥ संतचरणीं विश्वास । त्यानें भगवंत जोडला खास** ॥ लक्ष ठेवावें संताकडे । देह लावावा प्रपंचाकडे ॥ संत संतुष्ट होईल खास । नाम घ्यावें श्वासोच्छ्वास ॥ सांगावें संतास नमस्कार । जो जगताचा आधार ॥ संताच्या देहाची प्रारब्धगति संपली । काया आज दिसेनाशी झाली । परि अजरामर राहिली ॥ राम कर्ता हे जाणून चित्तीं । जगांत संत ऐसें वर्तती । जेणें दुसऱ्यास मार्गदर्शक होती ॥ संतांचें करावें अनुकरण । घ्यावें त्यांचें दर्शन ॥ सांगावें आलों आहें आपण, विचाराव्या कठिण वाटा । जेणें सुलभ होईल व्यवहारी चालतां ॥ रामापरता नाहीं लाभ । हें धरलें ज्यानें चित्तीं । त्यास लाभली खरी संतांची संगती ॥ रामापरतें न मानावे हित । हें सर्व संतांचें मनोगत । त्यांचा आदर्श ठेवावा पुढें । कधीं न होईल वांकडें ॥ स्वतःचें पावावें समाधान । त्यानें लोकांस आणण्याचा प्रयत्न करावा जाण ॥ संताशीं व्हावें अनन्य शरण । दुसरीकडे जाण्याचें नाहीं कारण ॥ भाग्यानें संत घरीं आला । अभागी न मानी त्याला ॥ सूर्याचा प्रकाश झाला । आंधळ्याला उपयोगी नाहीं आला । तैसी विषयी झाली ज्याची वृत्ति । संताची संगत त्याला न लाभती । रामनामावांचून ज्याचा वेळ जात नाहीं । तोच जीवन्मुक्त पाहीं ॥ देहाचे ठिकाणीं विरक्त । विषयाचे ठिकाणीं नसे अहंममत्व । त्यालाच म्हणताते मुक्त ॥ जो करी रामपदांबुजचिंतन । तयास नाहीं यमाचें बंधन ॥ संताची सेवा केली । महद्भाग्य घरीं आलें ॥ एका परमात्म्याशिवाय नाहीं कोणास शरण । तोच खरा धन्य धन्य ॥ संताचे मर्जीनें वागल्यास । कल्याण होईल खास ॥ जो सर्वांस आवडता । तो रामास होय आपलासा ॥ जेथें नाम तेथें राम, हा ठेवावा विश्वास । कृपा करील रघुनाथ खास ।

---

**१११. रामापरतें न मानावें हित । हें सर्व संतांचें मनोगत ॥**

# सत्समागम म्हणजे संत सांगतील त्याप्रमाणें वागणें

२१ एप्रिल

कोणत्याहि मंगल कार्यांत सर्वांआधीं गणपतीचें आवाहन करतात आणि सगळें कार्य संपले कीं सर्वांचें शेवटीं त्याचें विसर्जन करतात. त्याप्रमाणें अनुसंधानानेंच पोथीला सुरुवात करावी आणि अनुसंधानानेंच पोथीची समाप्ति करावी. लौकिक कार्यामध्यें गणपतीचें विसर्जन झाल्यावर आपण शिल्लक उरतो, पण अनुसंधानाचें विसर्जन करतांना आपणहि त्यांत नाहींसें व्हावें. " जसें ठेवायचें असेल तसें ठेवा, पण आपला विसर पडूं देवूं नका, एवढी भीक घालावी, " अशी गुरूच्या चरणीं प्रार्थना करावी. भगवंत प्राप्त करून घ्यायला कांहीं मिळवायचें नाहीं, फक्त आहे तें घालवावयाचें आहे.

समर्थांना आपलें हित कशांत आहे तें कळलें, आणि त्यांनी ते जगाला सांगितलें. ज्याला जें झेंपण्यासारखे आहे तेंच त्यांनीं सांगितलें. प्रपंच मोडका ठेवा असें नाहीं त्यांनीं सांगितलें. तर तूं ज्या मार्गानें तो करतोस त्या मार्गानें तो नेटका होणार नाहीं हें सांगितलें. भगवंताला विसरून भजन करूं नका; भगवंताची आठवण ठेवून भाजी जरी आणली तरी त्याचें श्रेय जास्त आहे. जगाच्या लाजेला भिऊन भगवंताला अंतर देऊं नये. मी कोण याचा विचार करावा, आणि तो करण्यासाठीं मी नाहीं कोणाचा हें बघावें. मी आप्तेष्टांचा, बायकामुलांचा, आईबापांचा तर नाहींच, पण मी देहाचा आणि मनाचाहि नाहीं, असें करतां करतां जो राहील तो मी. खरें समाधान एकपणांत आहे, अद्वैतांत आहे. द्वैताचा जनक जो अभिमान तो कमी कसा होईल हें बघावें, यांत मी कर्ता नसून देव कर्ता आहे असें मानावें. सर्वांभूतीं भगवद्भाव पाहावा. सत्समागम करावा म्हणजे सत्याचा समागम. संत सांगतील त्याप्रमाणें वागावें. त्यांच्या समागमांत दैन्य मानूं नका, त्यांच्या चालीनें चाला. जे तुमची एकसारखी विषयांतली नडच भागवतील ते संत नव्हेत. खरे संत विषयाची आसक्ति कमी करतात; अशा संताला शरण जावें. निर्विषय चित्त संतांनाच करतां येतें. जग संताशिवाय असणेंच शक्य नाहीं. आम्हांस त्यांना ओळखतां येत नाहीं याला काय करावें ? नामाच्या योगानेंच संत ओळखतां येतात, जोडतां येतात, आणि टिकवितां येतात.

---

११२. चांगल्या संतांच्या पदरांत पडावें कीं तो आपली लाज राखतो.

# सत्समागम म्हणजे सर्व साधनांचा राजा

२२ एप्रिल

मनुष्यजन्माला येणें, संतांची भेट होणें आणि त्यांना ओळखून त्यांचा सहवास होणें, या तिन्ही गोष्टी फार दुर्घट आहेत. म्हणूनच संतसमागमासारखा लाभ नाही असें म्हणतात. **सर्व साधनांचा राजा म्हणजे सत्समागम होय.** कांहीं मागण्याची इच्छाच संत नष्ट करतात, मग मिळावयाचें कुठे राहतें ? संताला मरण नसतें. रडणारा चेला आणि मरणारा संत काय कामाचा ? ज्याला पुनर्जन्म नाहीं तोच संत बनतो; परंतु संत बनणें व्यावहारिकदृष्ट्या कांहीं सुखाचें नसतें. एखाद्या स्नानसंध्याशील आणि सदाचरणी माणसाच्या अंगावर तेज दिसते, कारण देहाला धरून झालेल्या कर्मांचें तें तेज असतें; पण एखाद्या सत्पुरुषाच्या देहावर बाहेर तसें तेज दिसणार नाहीं. आंत वावरणाऱ्या भगवंताच्या ज्ञानाला योग्य असा सत्पुरुषाचा देह असतो. भगवंताविषयींचें ज्ञान जसजसें वाढत जाईल तसतशीं देहाची शक्ति वाढत जाते. देहाच्या आधारानें भोगण्याची या जगामधलीं जीं सुखें आहेत त्यांचे मार्ग सत्पुरुषापेक्षां आपण प्रापंचिक लोक जास्त जाणतो. परंतु देहाच्या पलीकडे असणारें आणि कायमचें टिकणारें, आणि देहाला विसरून आणि देवाला स्मरून जें मिळवायचें, असें भगवंताचें सुख आहे; तें प्राप्त होण्याचा मार्ग समजावून घेण्यासाठी आपण सत्पुरुषाकडे गेले पाहिजे. भगवंताच्या अस्तित्वाचें मूर्त स्वरूप म्हणजें संतांची भक्ति होय. संत आपल्याला सत्यस्वरूपाची ओळख करून देतात.सत्पुरुषानें आखून दिलेल्या मार्गानें कायावाचामनाने जें कर्म केलें जातें तें पौरुषच होय. आगगाडीत बसणारीं सर्व माणसें, मग तीं कोणत्याहि क्लासामध्ये बसणारीं असोत, इतकेच नव्हे तर विनतिकिटाची माणसेदेखील, गाडीबरोबर सरळ म्हणजे शेवटच्या स्टेशनापर्यंत जाऊन पोचतात; त्याचप्रमाणें संतांची संगत करणारी सर्व माणसें भगवंतापर्यंत पोंचतात. इतकेच नव्हे; तर त्यांच्यामधलीं बिनतिकिटाची, म्हणजे दुष्ट, पापी, दुराचारी, त्याज्य आणि अयोग्य, अशी माणसेंसुद्धां तरून जातात; मात्र कोणीही गाडी तेवढी सोडता कामा नये. हाच सत्संगतीचा महिमा. अद्वयता ही सत्संगतीनेंच प्राप्त होते. परमार्थ साधण्यासाठी सत्संगति फार उपयोगी पडते. ही संगति तीन प्रकारची असते : ( १ ) संतांचा प्रत्यक्ष देहामध्यें सहवास. ( २ ) संतानें सांगितलेल्या मंत्राचा सहवास. ( ३ ) संतांच्या विचारांची संगत. **संगतीचा परिणाम जितका नकळत होतो, तितका कशाचा होत नाहीं. म्हणून सत्संगती धरावी.** आपण ज्याकरितां जन्माला आलो तें कारण फक्त संतच उमगले; म्हणून त्यांना शरण जाऊन त्यांची आरती करावी. संत स्वतः समाधान मिळवून ते दुसऱ्याला देतात हे त्यांचें आपल्यावर केवढे उपकार आहेत !

---

**११३. संत हे चालते-बोलते देवच आहेत.**

# संतांनी लिहिलेले ग्रंथ हे त्यांच्या मृत्युपत्रासारखे आहेत

**२३ एप्रिल**

आजवर सृष्टींत अनुकरणानेंच सर्व होत आलें आहे. आपल्याला आपल्या-परीनें जो मोठा वाटतो त्याचें अनुकरण करण्याचा आपण प्रयत्न करतों. जगांत नाना प्रकारचें लोक असतात. जगांतलें सर्व सुख आपल्यारितांच आहे, कशाचेंहि आपल्यावर बंधन नको, असें एकजण म्हणतो. दुसरा म्हणतो, शास्त्राप्रमाणें राहावें आणि आपलें हित साधावें; कुणाचेंहि नुकसान करूं नये. तिसरा म्हणतो, लोकांचें नुकसान झालें तरी चालेल, पण आपलें हित साधावें; तर चौथा म्हणतो, प्रपंच परमार्थाची पायरी आहे आणि भगवंत आपला कसा होईल हें पाहावें. एकंदरींत, **कोणीहि माणूस असूं द्या, ' मीं आनंदांत असावें ' असें प्रत्येकाला वाटतें**. ज्याला पुढें जायचें नसतें तोच मतांचा गलबल्यांत पडतो. ज्याला कांहीं तरी विशेष साधायचें आहे तो नाहीं त्यांत सांपडत.

तुम्हांला असें वाटतें काय कीं, नाथांनीं आणि समर्थांनीं ज्ञानेश्वरीचीं पारायणें करून नंतर आपले ग्रंथ लिहिले ? संतांना ग्रंथ लिहिण्याची मुळींच हौस नसते. नाइलाज म्हणून ते ग्रंथ लिहीत असतात. त्यांचें ज्ञान स्वतंत्र असतें आणि तें साक्षात् भगवंतापासून आलेलें असतें; त्यामध्यें अर्थात् मागील ग्रंथकारांनीं सांगितलेल्या कांहीं गोष्टी येणारच, **संतांनीं लिहिलेले ग्रंथ हे त्यांच्या मृत्यु-पत्रासारखे आहेत**. आपले मुलगे चांगले वागतील अशी ज्या बापाला खात्री वाटते तो कशाला मृत्युपत्र लिहील ! तशी खात्री ज्याला नसते तो नाइलाजानें मृत्युपत्र लिहितो ! त्याचप्रमाणें संतांनी हौसेनें किंवा विद्वत्ता दाखविण्यासाठीं ग्रंथ लिहिले नाहींत; तर आपल्यासारख्या जड जीवांचें कल्याण व्हावें ही तळमळ त्यांना होती, म्हणून त्यांनीं ग्रंथ लिहिले. अशा ग्रंथांची पारायणें करायला सांगितलीं तर 'तेंच तेंच काय वाचावें ?' असें आपण म्हणतों, याला काय करावें ? पोथी, पुराणें, सत्पुरुषांचे ग्रंथ, यांचा आपल्या जीवनाशीं निकट संबंध असतो. असल्या ग्रंथांमध्यें, ज्याचा व्यवहारामध्यें उपयोग करतां येतो असा वेदान्त सांगितलेला असतो. परमार्थ न ऐकणारा दोषी आहे, पण तो ऐकत नसतांना त्याला सांगणारा त्याहूनहि दोषी समजावा। हा दोष पत्करूनहि संत जगाला परमार्थ सांगत असतात, त्याचा फायदा आपण करून घ्यावा.

---

**११४. संत हे सूर्यासारखे स्वाभाविक उपकार करीत असतात.**

# संतांचे होणें म्हणजे त्यांच्या आज्ञेंत राहणें

२४ एप्रिल

मी जिवंत राहावें हें जितकें जरूर आहे, तितकेंच परमात्म्याची ओळख करून घेणें जरूर आहे. जगांत नांवें ठेवीत नाहींत कोणाला? परमार्थाला बाहून घेतलें तर प्रपंच नीट करीत नाहीं म्हणून नांवें ठेवतात तिकडे लक्ष देऊं नये. **मनाच्या विषादाला कारण एकच असावें कीं, मी अजून भगवंताचा झालों नाहीं.** जो भगवंताच्या इच्छेनें वागतों, त्याचें चांगलें होतें. भगवंत ठेवील त्यांत समाधान मानून राहावें. सिंहाचे बच्चे असतात. त्यांना सिंहाची नाहीं भीति वाटत; तसेंच संतांचे झाल्यावरच त्यांची ओळख होते. भगवंताचे रूप आनंदमय आहे आणि सृष्टीचा क्रमच असा आहे कीं तो माणसाला आनंदाप्रत पोंचवीत असतो. **अत्यंत दारिद्र्यालासुद्धा आनंदाची जागा असतेच. आनंदाशिवाय मनुष्य जगणेंसुद्धां शक्य नाहीं.** मी मुळांत आनंदरूप असतांना मग दुःखाचें गाडें कुठून आलें? मला दुःख होतें तें माझें कुठे तरी चुकते म्हणून? मी चुकलों का बरोबर ही शंकासुद्धां मुक्ताला येत नाहीं, कारण तो आणि देव एकच असतात. बद्धालाहि शंका येत नाहीं कारण तो देव जाणवतच नाहीं सर्व काहीं मी करतों आणि देव नाहींच, म्हणून म्हणतो. **मुमुक्षुला मात्र ही तळमळ लागते. जेव्हां ही तळमळ तीव्र असते तेव्हां संतांची भेट होते.** काहीं पूर्वीचा ठेंवा असल्याशिवाय अशी तळमळ लागणार नाहीं. आपण संतांचें होऊन राहावें. त्यांचें झालों म्हणजे त्यांच्याशिवाय आपल्याला कोणी नाहीं असें वाटलें पाहिजे. संतांचें होणें म्हणजे त्यांच्या आज्ञेंत वागणें, ते सांगतील तसें करणें. ते वागतील तसें नाहीं; वागूं. सत्याची संगत धरली म्हणजे सत्संगति मिळते. कशाचीही आसक्ति न धरतां जगांत वागणें हेंच मुक्तांचें लक्षण. **हवेंपण नाहींसें झालें म्हणजे मग दुःखाचें कारणच राहत नाहीं.** देव सर्वव्यापी म्हणावें, आणि माझ्यांत नाहीं असें कसे म्हणावें? तुम्हाला जिथें तुम्ही राहतां तिथें सद्गुरु आहेतच असे वाटतें आणि समाधान होतें, हीच त्यांची खरी कृपा होय. श्रद्धेनें जें काम होतें ते दुसऱ्या कोणत्याहि तपश्चर्येनें होत नाहीं. आपल्या गुरूंनीं सांगितल्याप्रमाणें वागणें हाच आपला परमार्थ समजा. गुरु म्हणजे साक्षात् परमात्मा. त्याची आज्ञा पाळणें हीच आपली तपश्चर्या. याहून वेगळे काहीं करण्याची गरज आहे असे न वाटावें.

**११५. जग संतांशिवाय असणेंच शक्य नाहीं, आपणास त्यांना ओळखतां आलें पाहिजे.**

# संत हे आपला संबंध भगवंताशीं जोडतात

२५ एप्रिल

ज्याच्यावर आपण प्रेम करतों त्याच वस्तूवर दुसऱ्यानें प्रेम केलें तर आपण त्याला नांवें ठेवतों. आपलें हृदय विषयानें इतकें भरलें आहे कीं, तिथें भगवंताच्या प्रेमाला जागाच राहिली नाहीं. बरें, भगवंताचें प्रेम मुद्दाम तिथें घातलें, तर तें आंत न राहतां बाहेर पडतें आणि वाऱ्यावर उडून जातें. सामानानें गच्च भरलेली जशी एखादी खोली असते तसें आपलें हृदय आहे. या हृदयाचा संबंध भगवंताशीं जोडण्यासाठीं, आपल्या हृदयांतलें सामान ( म्हणजे विषय ) खालीं करून त्याच्या जागीं भगवंताचें प्रेम भरणें जरूर आहे. साधारणपणें आपला अनुभव असा आहे कीं, एखादी वस्तु आपल्याला पुष्कळ आणि पुनः पुनः मिळाली तर तिचा वीट येतो; म्हणून जी वस्तु आपल्याला कितीही मिळाली तरी तिचा वीट येणार नाहीं अशी वस्तु आपण मिळवावी. अशी अवीट असणारी वस्तु एकच आहे; ती म्हणजे भगवंत होय.

राजानें आपल्या नांवाचा शिक्का केला आणि जो अति प्रामाणिक होता त्याच्याजवळ दिला; त्याप्रमाणें भगवंतानें आपलें नाम संतांना दिलें. त्यामुळें संत जें करतील त्याला मान्यता देणें भगवंताला जरूरच आहे. आपण आणि संत यांच्यामध्यें मनुष्य या दृष्टीनें फरक नाहीं; पण फरक आहे तो हा कीं, संत हा जसें बोलतो तसें वागतो. आपण बोलतो चांगलें आणि वागतो मात्र त्याच्या उलट. आपल्या स्वार्थाच्या आड कोणी आलें कीं आपण वाईट बोलतों. आपण नुसतीं नीतीचीं तत्त्वें जेव्हां सांगतों तेव्हां अगदीं चांगलें बोलतों; पण वागतांना मात्र उलट वागतों; कसें तें पाहा. आपण सुख हवें असें म्हणतों आणि प्रपंच करतों, म्हणून नेहमीं दुःखानें रडतों. यासाठीं आपण अशी कृति करूं या कीं आपल्याला नंतर तसें बोलतां येईल.

अगदीं नास्तिक जरी झाला तरी त्याला हें कबूल करावें लागेल कीं, " मला जेवढें कळलें आहे. त्याच्या पलीकडे आणखी जगत् आहे. " त्याला संत सांगतो कीं, " मी दाखवितों त्या मार्गानें जर तूं गेलास तर मीं जें पाहिलें तें तुलाहि दिसेल. " गाडींत बसायला मिळावें म्हणून काहीं कोणी गाडींत बसत नाहीं, तर आपल्या स्टेशनवर जाण्यासाठींच मनुष्य गाडीचा आधार घेतो; तसा मोठमोठ्या संतांनीं प्रपंच केला खरा, परंतु तो सुखासाठीं केला नाहीं. आपल्या वृत्तीपासून न ढळतां इतरांना तारण्याचें काम संतांनीं केलें. बुडणाऱ्या माणसाला जसा दोरीचा आधार द्यावा, त्याप्रमाणें संतांनीं आपल्याला परमात्म्याचा आधार दिला. चंदनाच्या झाडाजवळच्या झाडांना जसा चंदनाचा वास लागतो, त्याप्रमाणें जो संताजवळ राहतो तोहि संतच बनतो. काहीं कष्ट न करितां परमार्थ साधणें हेंच सत्संगतीचें महत्त्व आहे. ज्याचें चित्त आणि वित्त भगवंताकडे असतें तोच खरा संत होय.

---

११६. प्रापंचिक लोकांना परमार्थाला लावण्यास संसारी संतच खरा उपयोगी पडतो.

# संतांनींच भगवंताला सगुणांत आणलें

२६ एप्रिल

**सर्वांत अर्पणभक्ति श्रेष्ठ आहे.** पूजा करितांना "मी तुझा दास आहे" असें म्हणावें, म्हणजे प्रेम येतें. यांत लाज वाटायचें कांहींच कारण नाही. आधी भगवंताचे दास व्हावें आणि मग पूजा करावी. आम्ही इतर कित्येकांचे दास होतो, आणि इतक्यातून उरेल तेव्हां भगवंताचे दास होणार; मग पूजेंत अर्पणभक्ति कशी येणार ! आपल्याला जें जें आवडतें तें तें मनानें भगवंताला अर्पण करावें. इथें सर्व कांहीं मनानेंच करायचें असतें. शरीरानें काबाडकष्ट केले म्हणजे प्रेम येतेच असें नाहीं. चित्त विषयाकडे ठेवून सेवा करणें म्हणजे अंगचोरपणा आला. असा अंगचोरपणा करूं नये. भगवंताकडे मन लागायला सगुणोपासना उत्तम होय. सर्व लोक या ना त्या रूपानें सगुणाचीच उपासना करणारे असतात. ठरलेली वेळ आणि ठरलेलें साधन असावें, म्हणजे त्यामध्यें प्रेम येतें. आपण ज्याची उपासना करतों तो तरी सगुणामध्येंच असतो ना ! म्हणून त्यालासुद्धां मग ती संवय लागते. आपण ज्या मूर्तीची उपासना करतो त्या मूर्तीमध्यें तेज वाढत असतें, ज्या मूर्तीची उपासना एखाद्या साधूनें केलेली असेल त्या मूर्तीमध्यें फार तेज असतें, आणि तें पुष्कळ काळ टिकतें. शिवाय तें इतरांनाही उपयोगी पडतें. जगाचें खरें स्वरूप कळण्यासाठीं सगुण उपासनाच कारणीभूत आहे. उपासनेचें खरें स्वरूप म्हणजे आपले दोष आपल्याला दिसणें हें होय. **सर्व भोग भोगून काळजी नसणें हें उपासनेचें खरें बीज आहे.** उपासनेचें तेज कसें झळकलें पाहिजे ! हें तेज फार विलक्षण असतें. पैशाचें किंवा विद्वत्तेचें तेज तितकें नसतें. ज्याच्या मागें उपासनेचा जोर आहे तोच जगांत खरें काम करतो.

एक बाई डोळे झांकून बसलीं म्हणजे तिला एक देवी दिसे. त्या बाईशीं देवी बोलत असे, आणि प्रपंचातल्या वगैरे सर्व गोष्टी कशा कराव्यात हें सांगत असें; परंतु बाईनें ध्यान करणें सोडून दिल्यानें तिला देवी दिसणें बंद झालें. तसेंच एक मुलगा डोळे झांकून बसला म्हणजें त्याला पांढरी दाढी असलेला एक साधु दिसें. कसे वागावें, काय करावें वगैरे सर्व गोष्टी तो त्या मुलाला सांगत असें; परंतु मुलानें ध्यान करणें सोडून दिलें, आणि तो दाढीवाला दिसेनासा झाला. या गोष्टीचा अर्थ असा कीं, आपल्याला सांभाळणाऱ्या शक्ति आपल्या मागें असतात, त्यांची उपासना आपण सोडूं नये. **भगवंताला सगुणामध्यें आणला हा संतांचा आपल्यावर फार मोठा उपकार आहे.** संतांनीं आपल्याला सांगितलें कीं, "ही दृश्य मूर्ति तुझी आहे, तुला हव्या असणाऱ्या सर्व वस्तु देणारा भगवंत तोच आहे," ही जाणीव आणि कल्पना आपल्या ठिकाणीं वाढत गेली तर त्यामुळें "भगवंत दाता आहे" ही जाणीव उत्पन्न होईल. "भगवंत दाता आहे, तो माझ्यामागें आहे, तो माझ्या सुखाचा आधार आहे, तो माझें कल्याण करणारा आहे," ही जाणीव झाली कीं, जें मिळालें तें भगवंताच्या इच्छेनेंच मिळालें ही भावना होऊन, आहे त्या परिस्थितीमध्यें समाधान टिकेल.

---

११७. कलियुगांत सगुण अवतार नसला तरी "नामावतार" आहे आणि तोच खरा तारक आहे.

# नामधारकानें टाळण्याच्या गोष्टी

२७ एप्रिल

आपले विचार स्वार्थाचे नसावेत. स्वार्थामध्यें अभिमान नेहमी जागृत असतो. स्वार्थी मनुष्याला जगांत सुख मिळणें कधींहि शक्य नाहीं. नीतीचीं बंधनें पाळून परस्त्री मातेसमान माना, परस्त्रीइतकें जगांत वाईट दुसरें कोणतेंहि नाहीं. प्रपंचांत एकपत्नीव्रतानें राहणारे गृहस्थ लोक ब्रह्मचारीच होत. परद्रव्याचा अभिलाष धरूं नका. त्याला विष्टे-समान माना. दुसऱ्याच्या पैक्याचा अभिलाष धरण्यांत आपला किती घात आहे याची नुसती कल्पनाच केलेली बरी. परस्त्री, परद्रव्य, यांच्याप्रमाणेंच परनिंदा हीहि अत्यंत त्याज्य गोष्ट आहे. परनिंदेनें न कळत आपण आपलाच घात करीत असतों. परनिंदेमध्यें दुसऱ्याच्या दोषांचें चिंतन होत असल्याकारणानें ते दोष आपल्याकडे येत असतात. या सर्व गोष्टी सांभाळून तुम्ही नाम घ्या, नामाचें प्रेम तुम्हांला अगदीं खात्रीनें येईल. हें सर्व करीत असतांना तुमचे आईवडील, बायकामुलें, यांच्या बाबतींत असलेलें कर्तव्य करायला चुकूं नका आणि त्या कर्तव्यांत आसक्ति राहूं देऊं नका. **कोणत्याही मोबदल्याची अपेक्षा न ठेवतां केलेलें कर्म हें कर्तव्यच होय**. तें कर्तव्य सांभाळून नीतिधर्मानें वागून आपला प्रपंच करा आणि भगवंताचें स्मरण ठेवा; मग तुमचा प्रपंचच परमार्थरूप बनून भगवंताचें प्रेम तुम्हांला मिळेल, हा माझा भरंवसा तुम्ही बाळगा.

प्रपंच हा मिठासारखा आहे. भाकरींत मीठ किती घालायचें असतें ? तर अगदीं थोडे– फक्त चवीपुरतें ! परंतु आपण मिठाची भाकरी करतों, आणि त्यांत परमार्थाचें चिमूटभर पीठ टाकतों; मग ती भाकरी खातां येईल का ? जो मनुष्य प्रपंचांतला आपला अनुभव जमेस धरत नाहीं, तो कशानेंच शहाणा होत नाहीं. खरें समाधान मिळविल्यावर मनुष्य खेळासारखा प्रपंच करतो, त्यामध्यें तो वर चढला किंवा खालीं पडला तरी सारखाच राहील; दुसऱ्यानें डाव टाकल्यावर तो आपणहि डाव टाकील ! पण डाव हरला किंवा जिंकला तरी त्याची त्याला पर्वा राहणार नाहीं.

प्रपंचांत अनेक वस्तु आहेत, पण भगवंताजवळ एकच वस्तु आहे. प्रपंचात कितीहि वस्तु आणल्या तरी त्या पुऱ्या पडत नाहींत, कारण एका वस्तूच्या आणण्यामध्येंच दुसऱ्या वस्तूच्या आण-ण्याचें बीज आहे; पण भगवंताचें तसें नाहीं. भगवंताची वस्तु एकदां आणली कीं पुन्हा ती आणायला नको. समजा, एका दुकानांत पुष्कळ माल भरलेला आहे, पण आपल्याला पाहिजे ती वस्तु तेथें नाहीं; म्हणजे आपल्या दृष्टीनें तेथें कांहींच नाहीं ! त्याचप्रमाणें सर्व प्रकारच्या मानसिक शक्ति असून तेथें भगवंत नसेल तर त्या असून नसून सारख्याच समजाव्यात. परमात्म्याला प्रपंचरूप बनविण्याऐवजीं आपण प्रपंचाला परमात्मारूप बनवावा यांतच जन्माचें सार्थक आहे.

---

११८. तुकोबांना, ज्ञानेश्वर महाराजांना सुद्धां संसार, प्रपंच होता, पण त्यामध्यें त्यांची आसक्ति नव्हती, म्हणून त्यांना तो बाधला नाहीं.

# खरी तळमळ लागली म्हणजे संत भेटतो

२८ एप्रिल

असंताची आवड नाहींशी होईल तेव्हांच संत हवासा वाटेल. विषय आपल्याला त्रास देतात, पण ते सोडावे कसे हें समजत नाहीं. जंगलांत सांपडलेल्या माणसाप्रमाणें आपलें झालें आहे. आपली वाट चुकली आहे असें ज्याला वाटेल तोच जंगलांतून बाहेर पडण्याची वाट विचारतो. **आतां वय फार झालें, काळाच्या स्वाधीन होण्याची वेळ आली, "रामा, आता तूंच तार," अशी तळमळ लागली तरच संतसहवास लाभेल.** संतांची संगत हवी असें आपण म्हणतो खरें, पण मागतों मात्र 'असत्.' मग आपल्याला सत्संगत कशी मिळेल? स्वतःला कसें विसरावें हें कळण्याकरतांच संताला शरण जावें.

मला जोपर्यंत चिमटा घेतलेला कळतो तोपर्यंत कर्ममार्गानेंच जाणें जरूर आहे. कर्ममार्ग सांभाळतांना 'कर्ता मी नव्हे' ही भावना सांभाळणें जरूर आहे. जो खरा अनुभवी आहे तो बोलणारच नाही, आणि बोललाच तर अगदी थोडें बोलेल, तो उत्तम होय. अनुभवी खरा, पण नाइलाज म्हणून जो बोलतो, तो त्याच्यापेक्षां थोडा कमी समजावा. कोणीतरी बोलल्याशिवाय लोकांना कळणार कसें, म्हणून हे लोक कमीपणा पत्करूनहि पुष्कळ बोलतात. परंतु अनुभव नसतांना उगीच शब्द-पांडित्य करणारे हे अगदी खालच्या दर्जाचें होत. ज्याला अनुभव कमी त्याला शब्दपांडित्य फार असते. जो जगाला फसविणार नाही आणि स्वतःहि फसणार नाहीं असाच मनुष्य जगाला मार्गाला लावूं शकेल.

कित्येक साधु दगड मारतात किंवा शिव्या देतात तरी लोक त्यांच्या मागें लागतात, कारण त्यांच्या शिव्यादेखील आशीर्वादाप्रमाणें असतात, हें कित्येक लोकांच्या ध्यानीं येत नाहीं. एखादा मुलगा बापाला म्हणूं लागला कीं मी इतका जवळचा पण मला मिळतो मार; आणि तो लांबचा पोर त्याचे मात्र लाड! पण तो मारच आपल्या हितासाठी असतो हें त्याला नाहीं समजत! साधूंच्या बोलण्यामध्यें किंवा मारण्यामध्येंसुद्धां दुष्ट बुद्धि नसते. एखाद्या गाईची कांस मालकाने पिळली तरी दूध येतें, आणि चोराने पिळली तरी दूधच येतें, त्याप्रमाणेंच संत जें कांही बोलतील तें जगाच्या कल्याणाकरतांच असतें. संताच्या ग्रंथाचा खरा अर्थ आचरणानेंच कळेल.

---

**११९. संतांच्या संगतीत आपण गेलो कीं, आपले कर्तृत्व संपले.**

# संतांत संतपण दिसत नाहीं, कारण आमच्यांत तळमळ नाहीं

**२९ एप्रिल**

एखाद्या मुलाला विचारलें, "तुला आईवडीलांपैकीं कोण आवडतें ?" तर तो म्हणेल की, "मला दोघेहि आवडतात." पण त्याला पुनः विचारलें कीं, "त्यातल्या त्यात तुला जास्त कोण आवडते ?" तर तो सांगेल कीं, "मला आई (किंवा वडील) जास्त आवडतात." हें जसें खरें त्याप्रमाणें, कामवासना आणि पैसा ही दोन्ही परमार्थाला विघातक आहेत; पण मला जर कोणीं विचारलें कीं "त्यातल्या त्यांत जास्त घातक कोणतें तें सांगा," तर मी सांगेन कीं, "पैसा हा त्यांतल्या त्यांत परमार्थाला जास्त हानिकारक आहे." भगवंतानें आपल्याला पैसा दिला आहे, तो आपण सत्पात्र आहोंत म्हणून का दिला आहे ? यासाठीं, भिकाऱ्याला पैसा देतांना उगीच असले वाद घालूं नयेत. तसें करणें म्हणजे कांहीं न करण्याची बुद्धि होय. **एखादा त्यागी मनुष्य सर्व देईल पण "स्व" देणार नाहीं.** "स्व" देऊन मग "सर्व" ठेवलें तरी चालेल, पण "सर्व" देऊन "स्व" ठेवला तर मात्र तें चालणार नाहीं; म्हणजेच, "मी देतों" ही भावना राहिली तर सर्वच देणें वायां जातें. मुख्य म्हणजे त्यांतली वासना गेली पाहिजे तर खरें सुख लागतें. जोपर्यंत "आपलेपणा" आहे तोपर्यंत ब्रह्माच्या गोष्टी बोलणें फोलपणाचें आहे.

देह हा पाया धरून त्यावर इमारत बांधूं लागलो तर इमारत पक्की कशी होणार ? 'मी माझा देह' म्हणतो, पण ताप येणें न येणें, इजा होणें न होणें, हें आपल्या हातांत आहे कां ? मी माझे रक्षण करीन असें म्हणतों, पण वाटेंत ठेंच लागून पडल्यावर लोकांनीं मला घरीं आणावें लागतें; म्हणजे किती परस्वाधीन जीवित आहे ! देहानें कितीहि कार्य केले तरी तें कळसाला नाहीं पोंचणार. अभिमानानें केलेलें कार्य कसें कळसाला पोचणार ? एक भगवदिच्छेनें कार्य केले तरच तें शेवटाला जातें. समर्थांनी देहबुद्धि नष्ट करून, रामाचें अधिष्ठान ठेऊन कार्य केले म्हणून त्यांना एवढें कार्य करतां आलें. जो भगवंताचा झाला त्याचेंच कार्य पूर्ण झालें, व त्यालाच खरें समाधान मिळालें.

राजाच्या पोटीं आलेले देखील भिकारी होऊन जातात, मग मीं संपत्तीचा कुठें गर्व करावा ! पैशानें प्रेमांत बिघाड येतो आणि अगदीं जवळचे नातेवाईकसुद्धां दूर होतात. मी खरें सांगतो, पैशाच्या आसक्तींत तुम्हीं राहूं नका. ही आसक्ति नाहींशी करण्याचा सोपा उपाय म्हणजे संतसमागम हाच होय. आज खरे संतच कुठें आहेत असें आपण म्हणतों, पण आम्हांला संत भेटावा ही तळमळच खरी लागलेली नसते. संतात संतपणा दिसत नाहीं याचें कारण आमच्यांत तळमळ नाहीं. सत्ययुगांत जो राम होता तोच आजहि आहे, पण माझा भावच कमी झाला त्याला काय करावें ! संतांना आपण खोटेपणा देतों, पण माझा भाव शुद्ध नाहीं हें नाहीं जाणत. विषयांत सुख आपल्या इच्छेप्रमाणें मिळत नाहीं म्हणून आपण संतांकडे जातों, पण संताला अर्पण करून घेण्याकरितां कितीजण संतांकडे जातात ! देवाकरितां देवाकडे जाणारे किती वरें निघतील !

---

**१२०. देवाला देतां येईल असें एक नामच आहे. तें देऊन आपल्याला तो समाधानांत ठेवतो.**

# जेथें भगवंताचें नामस्मरण । तेथें सर्व संतांचें ठाण

३० एप्रिल

**जोंवर धरिली जगाची आस । तोंवर परमात्मा दूर खास ॥ परमात्म्याची प्राप्ति । न होई राखतां विषयासक्ति ॥** जग विषयाकार राहिलें । तेथें प्रेम केलें । तरी घातासी आलें ॥ विषयीं एकजीव झालों जाण । सुटतां न सुटे आपण जाण ।। मान अपमान जगाचें सुखदुःख । हें स्वार्थाचेंच मूळ आहे जाण ।। अभिमानांत परमात्म्याचें विस्मरण । हें जीवपणाचें मुख्य लक्षण ।। सुखदुःख विपत्ति आपत्ति ।। हीं माया प्रपंचाची ओहोटी भरती ।। आत्मनिश्चय बाणल्यावांचून । माया न हटे न सुटे जाण ॥ आतां करी शूर मन । मायेसी हटवावें आपण ॥ माझें कोणी नाहीं । मी कोणाचा नाहीं । जग आणि देह अगदीं माझें नाहीं । तूं सोडोनी माया भ्रांतिमळ । ब्रह्मरूप होई केवळ ।। भ्रम हीच जीव माया । सोडोनि ब्रह्मरस घेई राया ॥ वृथा वासना अज्ञानपण ! वासनारूपी जन्ममरण ॥ वासना दृढ होऊन मी बद्धमार्गानें जातों । आणि जन्ममरणास पात्र होतों ।। जैसें जैसें बाहेर दिसलें । त्याचें बीज आपणाशींच उरलें ॥ एकच वस्तूची ओळखण जाण । पूर्ण होतें समाधान ॥ असत्य वस्तु सत्य जाणली ज्यानें । सत्य वस्तु प्रगट होईल तेणें ॥ मुलींनीं खेळ मांडला । परी नाहीं कामाला आला । तैसा प्रपंचीं थोर झाला । परमात्म्याचा तो न म्हणावा भला ।। **ज्याच्यांत मानावें मीं सुख । त्याच्यांतच उद्भवतें** दुःख ॥ आपला घात आपणच करील । त्याला कोण मुक्त करील ! ॥ नराचा होय नारायण । जर न चुकला मार्ग जाण ॥ **जेथें ठेवावी आस । त्यांचें बनावें लागतें दास** ।। देह तो पंचभूतांचा । त्याचा भरंवसा न मानावा फारसा ।। जगांत जें जें दिसतें बरें । तें तें सर्वच नाहीं खरें ।। असत्यांत आपलेपणा पाही । त्याचें मन दुःखी राही ।। ज्याला जें झालें दुःख । तें पर्वताहून मानलें जास्त ।। मी तुम्हांस सांगतों हित । दृश्यांत न ठेवावें चित्त ।। दृश्य वस्तु नाशिवंत असतें ।। भगवत्कृपेनें समाधान येतें ॥ परिस्थिती नसे बंधनास कारण । असे आपलेच मनाची ठेवण ।। जें जें कांहीं दृश्य पाहावें । त्याचें रूपांतरच व्हावें । हा नेहमींचा अनुभव हें ठेवितां चित्तीं । समाधानाची होय प्राप्ती ।। देवास पाहावें ज्या रीतीनें । तसाच तो आपणांस दिसतो जाण ।। विषयाचा नाहीं झाला जोंवर त्याग । तोंवर रामसेवा नाहीं घडत सांग ।। आपलें आत्यंतिक हित । हेंच खरा स्वार्थ जाण ।। देहासकट माझा प्रपंच । रामा केला तुला अर्पण । ऐसें वाटत जावें चित्तीं । कृपा करील रघुपति ।। चित्तीं जें विषयापासून सुटले । ते आनंदासी आले ।। रामनाम प्रेमयुक्त चाले धणी । त्यासी म्हणती ब्रह्मज्ञानी ।! द्रव्यदारावर्जित जाण । ही खरी संताची खूण ।। सृष्टि पाहावी भगवत्कारी । प्रेम ठेवील त्याचेवरी । त्याला नाहीं दुसरी सरी ।। आल्यागेल्यास द्यावें अन्नदान । मुखानें भगवंताचें नाम । हृदयांत रामाची प्राप्ति । यासच थोर म्हणती जीवन्मुक्ति ।। न धरावी जगाची आस । तोच होऊं पाहे रामदास ।। नामांत संत । नामीं भगवंत । वृत्ति राखावी अत्यंत शांत । हेंच संतांचें मुख्य लक्षण जाण ।। जेथें भगवंताचें नामस्मरण । तेथें सर्व संतांचें ठाण ।। अगरबत्ती जळून गेली । परी सुवासानें राहिली । तैसें रामचरणीं झाले जे लीन । तेच खरे जिवंत जाण ।। संतचरणीं झाला लीन । त्याला भाग्यास नाहीं दुजें उणे ।। संताची संगति । भगवन्नामानें साधते ।।

---

१२१. देहासकट माझा प्रपंच । रामा केला तुला अर्पण । ऐसें वाटत जावें चित्तीं । कृपा करील रघुपति ।।

# साधनाची जोपासना-कोणत्याहि कृतींत हेतु शुद्ध पाहिजे

१ मे

तमोगुण हा तिन्ही गुणांत जास्त जड असल्यानें याचा परिणाम या जगामध्यें लगेच दिसून येतो. दुष्ट बुद्धि हा तमोगुणाचा परिणाम आहे. परंतु भगवंताच्या नामानें बुद्धि स्वच्छ करण्याची सोय माणसाच्या ठिकाणीं आहे. यासाठीं पुष्कळ नामस्मरण करावें, म्हणजे सत्त्वगुणाचा उदय होतो आणि बुद्धि शुद्ध बनते. **देहाला कष्ट दिले असतां भगवंत वश होतो हें कांहीं खरें नाहीं.** असें जर असतें तर रस्त्यांत उन्हामध्यें खडी फोडणाऱ्यांना भगवंत लवकर वश झाला असता ! **भगवंताचें लक्ष आपल्या देहापेक्षां मनाकडे असतें.** आपल्या मनामध्यें प्रापंचिक हेतु ठेवून भगवंताच्या नांवानें उपवासासारखे कितीहि कष्ट केले तरी ते पाहून लोक फसतील, पण भगवंत फसणार नाहीं. प्रापंचिक गोष्टीकरितां उपवास करणें ही गोष्ट मला तितकीशी पसंत नाहीं. "**उपवास घडावा**" यांत जी मौज आहे ती "**उपवास करावा**" यामध्यें नाहीं. भगवंताच्या स्मरणामध्यें इतकें तल्लीन व्हावें कीं आपण नेहमीं त्याच्याजवळ वास करतों आहोंत असें मनाला पटावें। मग देहानें अन्न खाल्लें म्हणून कुठें बिघडलें ! उलट आपल्या चित्तांत भगवंताचें नाम नसतांना आपण देहानें पुष्कळ उपवास केले तरी अशक्तपणाशिवाय दुसरें कांहीं पदरांत पडणार नाहीं. कांहीं लोक वेडे असतात, त्यांना आपण उपासतापास कशासाठीं करतो आहोंत हेंच समजत नाहीं. कोणत्याहि कृतीला वास्तविक मोल तिच्या हेतुवरून येतें. हेतु शुद्ध असून एखादे वेळी कृति बरी नसली तरी भगवंताच्या घरीं चालतें; पण हेतु चांगला नसून कृति मात्र फार चांगली असली तरी भगवंत त्यापासून दूरच राहतो. माणसानें केलेला उपवास निष्काम असून तो केवळ भगवंताच्या स्मरणांत राहावें म्हणून केलेला असला तर फारच उत्तम आहे. निष्काम कर्माचें फार फार महत्त्व आहे. "भगवंतासाठींच भगवंत हवा" अशी आपली वृत्ति असावी किंबहुना, नाम घेत असतांना प्रत्यक्ष भगवंत समोर उभा ठाकला, 'आणि तुला काय पाहिजे?" असें त्यानें विचारलें, तर "तुझें नामच मला दे" हें त्याच्याजवळ मागणें याचें नांव निष्कामता होय. कारण, रूपानें व्यक्त झालेला भगवंत केव्हांतरी नाहींसा होईल, पण त्याचें नाम मात्र अखंड टिकेल आणि त्याचें नाम घेतलें कीं त्याला आपल्याकडे येणें जरूर आहे. म्हणून देहाला कष्ट देण्याच्या भानगडीत न पडतां भगवंतासाठींच नाम घेत असावें. त्याची कृपा झाल्याशिवाय राहणार नाहीं. जेथें नाम तेथें राम हा ठेवावा विश्वास । कृपा करील रघुनाथ खास ॥

**पैशाची वासना आणि लौकिकाची लालसा माणसाला भगवंतापासून दूर नेतात.** त्याच्या तावडींत सांपडतां कामा नये. देहाच्या उपचारांना जो भुलतो तो भगवंताला अगदीं विसरलेलाच असतो; पण ज्याचें **अनुसंधान मजबूत असतें त्याला जगांतल्या ऐश्वर्याची किंमत नसते.** लोकेषणा आणि धनेच्छा या दोन्ही गोष्टींचा संबंध प्रपंचात वावरत असतांना येणारच. तो टाळतां येणें कठीण आहे. पण ज्याला भगवंताचें प्रेम पाहिजे आहे त्यानें त्याचा गुणधर्म ओळखून त्यांना वापरावें, म्हणजे त्यांच्यापासून उत्पन्न होणारे दोष त्याला बाधणार नाहींत.

१२२. एखाद्या वाड मुलाप्रमाणें मनाला वाटेल तिकडे जाऊं द्यावें; आपण नामस्मरण केल्यानें तें नामांत आपोआप येईल.

# साधनाची जोपासना-साधनांत अत्यंत सावधगिरी पाहिजे

२ मे

शेताची मशागत झाली, बीं उत्तम पेरलें, पाऊस चांगला पडला, आणि रोपहि जोरानें वर आलें, तरी काम झाले असें नाहीं. कारण जसजशी एकेक पायरी पुढें जाईल तशतशी जास्त काळजी घेण्याची गरज असते. शेत वाढलें तरी त्याचा नाश दोन कारणांनी होऊं शकतो. एक म्हणजे गुरेंढोरें शेतात घुसून नाश करतील, किंवा दुसरें म्हणजे कीड पडून किंवा टोळधाडीसारखा कांहीं उपद्रव होऊन शेत साफ नाहींसें होईल. यांपैकी पहिलें कारण थोडें स्थूल आहे तर दुसरें थोडें सूक्ष्म आहे. शेतांत गुरेंढोरें शिरलीं तर वरवर दृष्टि टाकूनहि सहज समजतें आणि त्यांना हाकलताहि येतें. पण कीड पडली तर जरा जवळ जाऊन बारकाईनें पाहावें लागेल. शेताला कुंपण घालून ढोरें आंत शिरणार नाहींत असा बंदोबस्त करता येतो, आणि राख, शेण, औषधें, वगैरे टाकून कीड न लागेल अशी तजवीज करतां येते. हें सर्व करतांना शेतकऱ्याला सतत जागृत राहावें लागतें; म्हणजेच एकसारखें शेतावर लक्ष ठेवावें लागतें; हाच नियम परमार्थांतहि लागू पडतो. साधकानें अत्यंत काळजीनें वागणें जरूर आहे. शेताचें रक्षण व्हावें म्हणून जसें कुंपण, तसा संसार हा परमार्थाला कुंपण म्हणून असावा. कुंपणालाच जर खतपाणी मिळाले तर कुंपणच शेत खाऊन टाकतें. तसें न होईल इतक्या बेतानें संसाराला खतपाणी घालावें. शेताला कीड लागली कीं काय हें जसें बारकाईनें पाहावें लागतें, त्याप्रमाणें आपली वृत्ति कुठें गुंततें कीं काय याकडे बारकाईनें लक्ष असावें. अशा सावधगिरीनें वागलें तर पीक हातात येईपर्यंतचें काम झालें. पण 'पीक हातांत आलें, आतां काय काळजीचें कारण!' असें म्हणून भागणार नाहीं. पीक हातांत आलें तरी त्याची झोडणीं झाली पाहिजे. पुढें, दाणे दास्तानांत जपून ठेवले पाहिजेत. नाहींतर उंदीर, घुशी धान्य फस्त करतील. नंतर पुढें जरूर लागेल तेव्हां तें काढलें पाहिजे. काढतांनासुद्धां दाणा फुटणार नाहीं इतक्या बेतानें तें काढले पाहिजे. अशा तऱ्हेनें आरंभापासून शेवटपर्यंत अगदीं जागरूकतेनें वागलें पाहिजे. तरच साधकाची शेवटपर्यंत तग लागेल. नाहींतर मध्येंच निष्काळजीपणामुळें, आणि सर्व कांहीं हातीं आलें अशा भ्रमानें वागल्यास प्रगति थांबेल. अशी उदाहरणें फार आढळतात. म्हणून अतिशय सावधगिरीनें वागावें.

जो साधक प्रपंचामध्यें असेल त्याला प्रपंचीं लोकांच्या संगतींत राहावें लागणार, पण त्यानें फार सांभाळून राहायला पाहिजे. आपली वृत्ति केव्हां बदलेल याचा नेम नसतो. खरोखर, परमार्थ ही एक कठीण शिकारच आहे. शिकार अशी मारली पाहिजे की, आपल्या मीपणाला मारून आपण जिवंत राहिलें पाहिजे आणि आपल्याला नको तेवढेंच गळून पडलें पाहिजे.

---

१२३. भगवंताचे आहेत ते सिंहासारखे आहेत. ते अहेतुक नाम घेतात. सिंह जसा गवत खात नाहीं, तसे संत विषयासाठीं नाम घेणार नाहींत.

# साधनाची जोपासना-निश्चयपूर्वक नामस्मरण आणि चित्तशुद्धि

३ मे

मला अजून अमुक करायचें आहे ही कल्पना सोडून द्यावी. आतां मी परमेश्वराचा झालों, आतां मला कांहीं करायचें राहिलें नाहीं, अशी मनाची स्थिति झाली पाहिजे. हे परमेश्वरा, आतां तुझ्याकरतांच मी जगेन, तुझ्या नामस्मरणाशिवाय मला कांहीं कर्तव्य उरलें नाहीं, असा निश्चय केला तर मनाला समाधान झालेंच पाहिजे. नामस्मरण होत नाहीं, कारण वयामुळें मन थकलें, हें म्हणणें बरोबर नाहीं. शरीर थकेल, कारण लहानपणीं वाढणें आणि वृद्धपणीं थकत जाणें हा शरीराचा निसर्गक्रमच आहे. परंतु मन थकलें हें मात्र संयुक्तिक नाहीं. मन हा परमेश्वराचा अंश आहे, असें आपल्या दिव्य विभूति सांगतांना भगवंतांनी सांगितलें आहे. मनाची अत्यंत क्षीणतेची अवस्था म्हणजे मृत्युसमयींची; परंतु त्या समयींहि माझें स्मरण ठेवावें असें भगवंतांनीं सांगितलें असतांना, त्यापूर्वी केव्हांहि मन थकलें आणि स्मरण करूं शकत नाहीं, असें होणें शक्य नाहीं. पूर्वी सहा-सहा तास बसून जप केलेला असेल, तितका आतां होत नसेल, तितकें बसवणार नाहीं, मध्यें-मध्यें झोंप लागत असेल, हें मान्य आहे; पण स्मरण राहूं शकत नाहीं असें नाहीं होणार. मन थकलें ही खरी अडचण नसून, मनाचा इतर व्याप फार आहे हें खरें कारण आहे. तेव्हां सर्व व्यापांतून आणि काळजींतून लक्ष काढून तें भगवंताकडे लावणें जरूर आहे. पैसाअडका; प्रपंचांतल्या सर्व गोष्टी, यांचा मनानें त्याग करावा. असा त्याग केला तर कार्यभाग निश्चित होतो हें मी खात्रीनें सांगेन.

देहाची स्थिति । कायम न राहे निश्चित ॥ ते सांभाळणें आहे जरूर । न विसरतां रघुवीर ॥ रामा तुझ्याकरितां राहिलों । हा भाव ठेवावा निश्चितीं । शक्य तों स्मरावा रघुपति । नामाची धरावी कांस । देहादिक प्रपंचांत व्हावें उदास । हें सर्व साधें राखतां अनुसंधान ॥ आतां करण्याचें उरलें कांहीं । हें किंचितहि न आणावें मनीं ॥ मनानें व्हावें रामार्पण । सर्व सत्कर्म-साधनाचा कळस जाण ॥

धर्माचरण, भगवद्भक्ति, नामस्मरण, आणि सत्संग, हे चित्तशुद्धीचें उपाय होत. किंवा एकाच शब्दांत असें म्हणतां येईल कीं सत्संग हाच याला तोडगा आहे. चित्तशुद्धीचें लक्षण हें कीं आपल्यासारखेंच सर्व जग सुखी असावें ही भावना असणें. ही भावना वाढण्यासाठीं सर्व जग सुखी असावें अशी प्रार्थना करण्याचा नेहमीं परिपाठ ठेवावा, म्हणजे हळूहळू भगवत्कृपेनें साधेल. अभिमान हा मात्र चित्तशुद्धींत बिघाड करणारा आहे, आणि तो केव्हां डोकें वर काढील आणि घात करील याचा पत्ता लागणार नाहीं. पण भगवंताच्या स्मरणामध्यें अभिमानाचें मरण आहे, म्हणून आपण भगवंताचें स्मरण अखंड टिकवूं या आणि आनंदानें राहूं या.

---

१२४. इतर साधनें जरी केलीं तरी नामसाधन केल्यावरच आत्मस्वरूपाची प्राप्ति होते.

# साधनाची जोपासना-सत्संगतींत राहाणें

४ मे

नेहमीं संतांचीं संगत धरावी. **परमार्थाला संतांचें अधिष्ठान आवश्यक आहे.** संत आपल्याजवळच असतात, त्यांना पाहायला कुठें जावें लागत नाहीं. चित्त शुद्ध नसेल तर संतांच्या जवळ जाऊन तरी काय उपयोग होणार ? त्यांना आपण देहांत पाहूं नये. संत हे कांहीं देहांत नसतात. ते जें कांहीं सांगतात त्या साधनांत ते असतात. आपली विषयलालसा सोडल्याशिवाय त्यांची भेट होणें शक्य नाहीं. संतांकडे एखादा चोर गेला तर त्याला त्याची खरी भेट होईल का ? तो ज्या हेतूनें जातो त्या हेतूनें त्याला फार तर तेथें चोरी करतां येईल, परंतु संतापासून जें खरें मिळवायचें तें साधेल का ? वास्तविक आपलें आपल्याजवळच असतें. आपण जर चित्त शुद्ध करून गेलों तर आपल्याला त्यांची भेट होते; आणि भेट झाल्यावर, जें त्रिभुवनांतहि मिळणार नाहीं तें ते देतात. संत सांगतील तेंच करणें हीच त्यांची खरी सेवा होते.

एकजण एका संताकडे नेहमीं दर्शनाला येत असे. तेथें इतर मंडळींहि पुष्कळ असत, पण कुणाशींहि तो बोलत नसे. कोणी कांहीं विचारलें तरी उत्तर देत नसे, सदा मुद्रा खिन्न असे. कुणालाहि त्याच्याशीं बोलावें असें वाटत नसे. असे कांहीं दिवस गेले. पुढें एके दिवशीं ते सद्गुरु म्हणाले, "माझा तो वेडा कुठें आहे ? तो आज कां आला नाहीं ?" हें त्यानें ऐकतांच तो आनंदानें उड्या मारूं लागला, आणि जो तेथून गेला तो पुनः आलाच नाहीं ! तो कशाला येईल ? गुरूनें एकदा आपल्याला "आपलें" म्हणावें हेंच शिष्याला मिळवायचें असतें आणि जें शिष्यानें ओळखायचें असतें तें त्या गृहस्थानें ओळखलें आणि म्हणून त्याचें काम झालें. गुरु तुम्हांला, "तुम्ही माझे झालां" असें म्हणत असतांनासुद्धां तुम्ही तें ओळखत नाहीं, कारण तुम्ही विषय बरोबर घेऊन आलेले असतां आणि विषयाची प्राप्ति व्हावी असा मनांत हेतु असतो. याउलट, गुरु तुम्हांला निवृत्ति देतात. निवृत्ति दिल्यावर विषयाची प्राप्ति व्हावी ही आठवणच जाते; जसें तहान लागल्यावर पाणी हवेंसें वाटतें पण तेंच पाणी पोटभर प्याल्यावर नकोसें वाटतें, म्हणजे त्याची निवृत्ति होते, आपला यावर आज विश्वास बसायचा नाहीं; पण हा विश्वास बसायला भगवंताचें नामस्मरण केलें पाहिजे म्हणजे विश्वास वाटूं लागतो नामानें तें कार्य होतें, म्हणून नामस्मरण करीत जावें. नामानें काळजी वाटणें नाहींसें होतें आणि मग तळमळहि आपोआप जाते. **सत्समागम आणि भगवंताचें नाम। हींच करतात परमार्थाचें काम ॥**

---

१२५. विस्तवाजवळ तूप ठेवलें कीं तें विरघळतें, तसें नामाची शेगडी ठेवली कीं अभिमान वितळलाच पाहिजे.

# साधनाची जोपासना-अभिमान न धरतां कर्तव्यकर्म करणें

५ मे

'मला कळत नाहीं असें वाटणें' ही परमार्थाची पहिली पायरी आहे. आपण अभिमानानें 'मला सर्व समजतें' असें मानून जगांत वावरत असतों. खरोखर अभिमानासारखा परमार्थाचा दुसरा मोठा शत्रु नाहीं अभिमान हा हरळीसारखा नाश करणारा आहे असें म्हणणेंसुद्धा थोडें अपुरेंच पडेल. कारण हरळी वाढली तर ती दिसते आणि म्हणून ती उपटून तरी टाकतां येते. तशी अभिमानाची गोष्ट नाहीं, तो दिसत नाहीं, आणि म्हणून तो केव्हां आणि कसा डोकें वर काढील याचा पत्ताच लागणार नाहीं. चित्तशुद्धीच्या मार्गांत मोठी धोंड कोणती असेल तर ती अभिमानाची आहे; आणि स्वतःच्या कर्तबगारीनें आपण त्याच्या तावडीतून सुटूं असें म्हणणेंहि वेडेपणाचें होईल. त्याच्या कचाटयांतून सुटण्याचा मार्ग म्हणजे सद्गुरूला अनन्यभावें शरण जाऊन अभिमानाच्या तावडींतून सोडविण्याबद्दल त्याची सतत प्रार्थना करणें हाच होय.

चित्तशुद्धि झाली कीं शेताची मशागत पुरी झाली असें म्हणायला हरकत नाहीं. पुढें प्रश्न बीं उत्तम असणें जरूर आहे. उत्तम बी कोणतें हें कदाचित् आपल्याला समजणार नाहीं, परंतु फळ चांगलें कोणतें हें सहज समजतें. उदाहरणार्थ, आंबा गोड लागतो, पण कारलें कडू लागतें. ह्यावरून आंबा हवासा वाटला तर आंब्याचें बीं शोधतां येतें आणि त्याची पेरणी करतां येते. आतां असा विचार करूं कीं, जीं फळें गोड लागलीं त्यांचीच लागवड केली. पण पुढें असें अनुभवाला येतें कीं, कांहीं काळ लोटल्यानंतर कालमर्यादेप्रमाणें तें झाड मरतें आणि अर्थात् फळें मिळायचीं बंद होतात, आणि त्यामुळें मन कष्टी होतें. यावरून असें दिसतें कीं, आतां गोड लागलेली फळें ही कालांतरानें दुःखालाच कारणीभूत होतात. तर मग बीं निवडतांना असें पाहणें जरूर आहे कीं, ज्याचीं झाडें कायम टिकणारीं आहेत आणि फळें अक्षय सुखाचा लाभ देणारी आहेत. जगांत उत्पन्न झालेली अशी कोणती वस्तु आहे कीं जी अक्षय टिकेल? "कोणतीहि नाहीं" असेंच उत्तर येईल म्हणून विनाशी फलाशेनें केलेलें कोणतेंहि कार्य सुखाला नेत नाहीं असें म्हणावें लागतें. याकरितांच भगवंताशिवाय दुसऱ्या कोणत्याहि फळाची आशा न ठेवतां कर्तव्यकर्म करीत राहणें हाच सुखाचा मार्ग आहे, आणि हीच उत्तम बीजाची पेरणी आहे. भगवंताची मनोभावें प्रार्थना करावी कीं, 'हे देवा, तुझी भक्ति तुझ्याशिवाय इतर कोणत्याहि फळाच्या आशेनें न होईल अशी कृपा कर." आणि त्या दृष्टीनें आपण प्रयत्नहि करणें जरूर आहे. ज्याप्रमाणें सडकें आणि चांगलें एकत्र झालेलें धान्य आपण सुपांत घालून पाखडतो आणि सडकें धान्य बाहेर उडवून लावून मागें उत्तम धान्य शिल्लक ठेवतो, त्याप्रमाणें भगवंताची भक्ति करतां करतां भगवत्प्राप्तिशिवाय इतर होणाऱ्या इच्छा काढून टाकण्याचा क्रम ठेवावा, म्हणजे कालांतरानें भगवंताकरितांच भगवत्प्राप्ति अशी भावना दृढ होत जाईल.

१२६. भगवंताच्या अस्तित्वाची जाणीव ठेवण्यासाठीं भगवंताला सांगून काम करावे. जी जी गोष्ट घडेल ती आपण भगवंताला सांगावी.

# साधनाची जोपासना-स्वार्थाला आळा घालणें

६ मे

भगवंताच्या प्रेमाशिवाय सर्व कांहीं वायां आहे. तें प्रेम आतून यावें लागतें. आपल्याला ज्याचा विसर पडत नाहीं त्याचें प्रेम आपल्याला असतें; म्हणजेच आपल्याला ज्याचें प्रेम नाहीं त्याचा लवकर विसर पडतो. आपल्याला भगवंताचें प्रेम नाहीं म्हणून त्याचा विसर पडतो. म्हणून भगवंताचें नित्य स्मरण राहण्यासाठीं आणि त्याचें प्रेम वाढविण्यासाठीं कांहीं गोष्टी करणें आवश्यक आहे. एक, बारीक-सारीक गोष्टींकडे दुर्लक्ष करून प्रत्येकाच्या स्वभावाला थोडी थोडी सवलत ठेवावी; म्हणजे द्वेष वाढणार नाहीं. दुसरें, सर्वांना प्रेमाची अशी जी एखादी जागा असेल त्याकडे दृष्टि ठेवावी. तिसरें, कोणतीहि गोष्ट अगर सूचना म्हणून सांगायची झाली तर त्या व्यक्तीविषयक न बोलतां नम्रतेनें आणि गोड शब्दांत सूचना सांगावी. चौथें, अत्यंत महत्त्वाची गोष्ट, आणि जींत या सर्वांचा बऱ्याच प्रमाणांत अंतर्भाव होतो अशी बाब, म्हणजे स्वार्थाला आळा घालणें. आणि शेवटची, तितकीच महत्त्वाची गोष्ट म्हणजे, विषयांवर सर्व बाजूंनीं हल्ला चढविणें. **बाहेरून इंद्रियांना वळण लावावें आणि आंतून मनाला अनुसंधानांत ठेवावें.** स्वार्थाला आळा घालणें म्हणजे, मी स्वतः जितका माझ्याकरितां आहें असें वाटतें; त्याच्याहिपेक्षां जास्त मी दुसऱ्याकरितां आहें असें वाटणें हें होय; आणि ही जाणीव ठेवून त्याचप्रमाणें वागणें हेंच प्रेम वाढवायला मदत करतें. आतां स्वार्थाचा विचार करतांना असें सहज वाटतें कीं, मी कुठें स्वार्थी आहें ? मी कुठें कोणाजवळ काय मागतों ? पण एवढ्यानें " स्वार्थदृष्टि नाहीं " असें म्हणतां येणार नाहीं. अहंकाराइतकाच स्वार्थ जबरदस्त आहे. त्याच्या मुळ्या इतक्या खोल आणि सूक्ष्म असतात कीं त्यांचा पत्ताच लागत नाहीं. स्वार्थ तीन प्रकारचा असूं शकतो; कायिक, वाचिक आणि मानसिक देहाला दुसऱ्यानिमित्त कष्ट न होतील इतक्या काळजीनें वागणें हा कायिक स्वार्थ म्हणतात. माझ्या बोलण्याला सर्वांनीं मान डोलवावी, मी कोणाला कांहीं कमीजास्त बोललों तरी तें त्यानें निमूटपणें सहन करावें, अशा तऱ्हेच्या वृत्ताला वाचिक स्वार्थ म्हणतां येईल. आणि माझ्या मताप्रमाणें सर्वांनीं वागावें, माझे विचार बरोबर आहेत अशी जाणीव इतरांनी ठेवावी, अशा तऱ्हेची आपली इच्छा, त्याला मानसिक स्वार्थ म्हणतां येईल. आतां, मी माझ्याकरितां जितका असेन त्याहून जास्त मी दुसऱ्याकरितां आहे, असा विचार केला तर असें दिसून येईल कीं, मी जेवढी मला स्वतःला सवड ठेवतो, तेवढीच किंवा त्याच्याहून थोडी जास्त सवड दुसऱ्याला ठेवणें जरूर आहे. म्हणजेच, जें दुसऱ्यानें आपल्या बाबतींत करणें आपल्याला बरें वाटत नाहीं. तें आपण दुसऱ्याच्या बाबतींत न करणें, आणि त्याच्याच उलट. जें दुसऱ्यानें आपल्याला केलें तर बरें वाटतें तेंच आपण दुसऱ्याच्या बाबतींत करावें, हेंच सर्वांचें सार आहे आणि हाच खरा धर्म आहे.

---

१२७. जगांतील आपलें समाधान अगर असमाधान, ज्या वृत्तीनें आपण जगाकडे पाहतो. त्यावर अवलंबून आहे.

# साधनाची जोपासना-देहबुद्धीचा त्याग

७ मे

मानाला कारण अभिमान होय. मी मोठा असें मनानें घेतलें म्हणजे मानाची गरज लागते. हा अभिमानच भगवंताच्या आणि आपल्यामध्यें आड येतो. हा अभिमान घालवायला, गुरुआज्ञेंत राहणें, त्यांना शरण जाणें, त्यांनीं सांगितलेलीं साधनें करणें हे उपाय आहेत. पण हीं साधनें निरभिमानाचीं झालीं पाहिजेत. हा अभिमान फार सूक्ष्म असतो. मी गुरुआज्ञेंत राहतों, त्यांनीं सांगितलेलीं साधनें करतों, आतां माझा अभिमान गेला, हें म्हणणेंसुद्धां अभिमानाच्याच उक्ति होत. खरें पाहतां, अभिमान बाळगण्यासारखें आपल्याजवळ आहे तरी काय? शक्ति, कीं पैसा, कीं कीर्ति? जगांत आपल्यापेक्षां किती तरी लोक मोठे आहेत. पण मौज अशी कीं, भिक्षा मागणाऱ्यालासुद्धां मोठा अभिमान असतो. " मी अमक्याच्या इथें भिक्षेला गेलों होतों, त्यानें मला हट् म्हटलें तेव्हांपासून त्याचा उंबरठा नाहीं चढलों मीं, " असें तो म्हणतो. तेव्हां हा अभिमान आणि अपमान ही काय चीज आहे याचा शोध आपण घ्यायला पाहिजे. याला अगदीं मूळ कारण देहबुद्धि. ही देहबुद्धि नाहींशी झाली पाहिजे. एखाद्या झाडाला खत घालीत गेलें तर तें मरेल कसें? मला लोकांनीं बरें म्हणावें, मान द्यावा, शिव्या दिल्या तर वाईट वाटतें, हें देहबुद्धीला खत घालण्यासारखें आहे. चांगलें, वाईट, मान-अपमान, सर्व देवाला अर्पण करावा. वस्तुतः कर्तेपणच त्याचेकडे सोंपवावें; म्हणजे त्या कृत्याचे परिणाम मनावर होऊं देऊं नयेत. व्यवहारांत थोडा अभिमान लागतोच, पण तो केवळ कारणापुरता असावा. वरिष्ठानें नोकरांशीं वागतांना अभिमान पाहिजे, पण तो तितक्याचपुरता. त्याचा मनावर परिणाम होऊं देऊं नये. ही देहबुद्धि, हा अभिमान जायला सद्गुरूचें होऊन राहावें. निदान बळजबरीनें तरी " मी त्यांचा आहें " असें म्हणावें. सद्गुरु तुम्हांला नकळत तुमचा अभिमान दूर करतील. परमार्थांत संतांचेंच ऐकण्यांत महत्त्व आहे. तेथें आई-बापांचें का ऐकूं नये? तर ज्याचें मन त्याच्या ताब्यांत आहे, ज्याचें मन स्थिर झालें आहे, किंवा ज्याचें मन नेहमीं भगवंतापाशीं आहे, अशांचेंच ऐकण्यांत विशेष आहे.

आपल्या देहबुद्धीची तऱ्हा मोठी विलक्षण असते. सगुणोपासना आपल्या सवयींच्या आड येते म्हणून मनुष्य ती करीत नाहीं। फारच सोपें म्हणून तो भगवंताचें नाम घेत नाहीं। आणि फुकट काय जेवायला घालायचे म्हणून तो अन्नदान करीत नाहीं। असा मनुष्य फुकटच जायचा! देहबुद्धीला ताळ्यावर आणण्यासाठीं संतांच्या ग्रंथांच्या वाचनाची गरज आहे. पहांट झाली कीं थोडा उजेड, थोडा अंधार असतो, त्याप्रमाणें सध्यां आपली स्थिति आहे, देहबुद्धीच्या अंधारांत भगवंताच्या स्मरणाचा किंचित् उजेड आहे. हा देहबुद्धीचा अंधःकार जाऊन पूर्ण प्रकाश दिसायला भगवंताच्या अनुसंधानासारखा दुसरा कोणता उपाय असणार!

---

**१२८. तेलाची चूळ घेऊन पाण्यात सोडली तर प्रकाश पडतो, तसें नामाची ' चूळ ' घेऊन संसार करावा, म्हणजे त्यात प्रकाश पडेल.**

# साधनाची जोपासना–सर्वत्र भगवंताची इच्छा पाहावी आणि अनुसंधान राखावें

८ मे

[ एका वृद्ध गृहस्थांना वारंवार काहींतरी शारीरिक त्रास होत असे व त्यामुळें तब्येत बरी राहात नसे. त्यावर श्री. म्हणाले :– ] फार दिवस वापरून जोडा फाटला कीं तो कितीहि दुरुस्त केला तरी पुनः पुनः फाटतोच. तसेंच शरीराचें आहे. शरीर जीर्ण झाल्यावर त्याला कांहीं ना कांहीं तरी होतच राहतें. दुरुस्त केलेल्या जोड्यांतला एखादा खिळा जर पायाला टोंचूं लागला तर मात्र त्याला जपावें. तसें, आजारामुळें मनाला टोंचणी लागली तर जपावें आणि त्याचा मनावर परिणाम होऊं देऊं नये. जेथें नाम तेथें माझे प्राण : ही सांभाळावी खूण ।।

कोणतीहि गोष्ट एकदां ओळखली कीं मग तिची नाहीं भीति वाटत. विषय जोंवर ओळखले नाहींत तोंवरच ते आपल्याला त्रास देतात. याकरितां, ज्या ज्या गोष्टी होत असतात त्या त्या भगवंताच्या इच्छेनेंच होत आहेत ही जाणीव ठेवून वृत्ति आवरण्याचा प्रयत्न करावा. परमार्थाच्या आड आपले आपणच येत असतों. आपली वृत्ति जिथें जिथें वावरते तिथें तिथें भगवंताची वस्ती असते. म्हणून वृत्ति जरी कोणतीहि उठली तरी तिथें भगवंताची आठवण केली तर ती चटकन मावळते। याचसाठीं भगवंताला शरण जाणें जरूर आहे. आपण नेहमीं आपल्या उपास्य देवतेचें स्मरण करीत असावें, त्याच्या पायावर मस्तक ठेवावें, आणि त्याची अनन्य भावानें प्रार्थना करावी कीं, " हे भगवंता, तुझ्या आड येणारे हे विषय तुझ्या कृपेशिवाय नाहीं दूर होणार. आजवर जगाचा मीं अनुभव पाहून घेतला. तुझ्या प्राप्तीशिवाय कशांतहि सुख नाहीं असें भासूं लागलें तरी वृत्ति आड आल्याशिवाय राहात नाहीं. माझ्या अज्ञानानें मी आज स्वतःच्याच आड येत आहें. तरी तुझी, म्हणजे पर्यायानें माझी ओळख मला पटावी आणि त्यांत मीं तुला पाहावें, हीच माझ्या जीवितांतली शेवटची इच्छा आहे. ही इच्छा तुझ्या कृपेशिवाय पूर्ण होणें शक्य नाहीं. तरी हे भगवंता, माझें मन तुझ्या चरणीं राहो असें कर. यापेक्षां मला जगांत दुसरें कांहींहि नको. '

अनुसंधानांत असलें कीं, प्रपंचांत मजा आहे। अडचणी आणि संकटें यांचीसुद्धां मजा वाटेल. पोहायला येणाऱ्या एखाद्याला नुसतें सरळ पोहायला सांगितलें तर आवडणार नाहीं. तो बुड्या मारील, उड्या मारील, वांकडातिकडा पोहेल। तसें, भगवंताच्या अनुसंधानांत राहिलें तर प्रपंचाची मजा वाटेल. आपल्या आजाराचा, म्हातारपणाचा, आपण फायदा करून घ्यावा. एखादी शहाणी सुग्रण बाई ज्याप्रमाणें कोंड्याचा मांडा करते त्याप्रमाणें आपण आपल्या दुखण्यामधून भगवंताचें अनुसंधान टिकवायला शिकलें पाहिजे.

---

१२९. जसें इमारतीच्या पायाला दगड आणि कळसालाहि दगडच असतो. तसें साधकाला आणि सिद्धालाहि नामच साधन आहे.

# साधनाची जोपासना-शुद्ध वातावरण व पवित्र आचरण

९ मे

**आपल्या घरांतलें वातावरण शुद्ध, शांत आणि पवित्र असावें.** आपल्याकडे येणाऱ्या माणसाला परत जाऊंच नये असें वाटावें. अगदीं भगवंताच्या इच्छेनें प्रपंच चालला आहे असें समजून त्या प्रपंचांत विद्या, वैभव, घरदार, इत्यादि सर्व कांहीं यश संपादन करा; अगदीं एखाद्या राजयोग्याप्रमाणें प्रपंचात ऐषआरामांत राहून गाद्यागिरद्यांवर लोळा; पण हें करीत असतांना तुमचें **अंतःकरण मात्र भगवंताच्या प्रेमानें ओथंबलेलें राहूं द्या. कोणाशी वाद घालीत बसू नका. जगाचा मान फार घातक आहे.** त्याची चटक लागली कीं मनुष्य त्याच्या मागें लागतो, नंतर मान मिळविण्याची कृति थांबते, आणि मानहि नाहींसा होतो. जगांतले अजिंक्य पुरुषसुद्धां कुठेंतरी विषयांत गुंतलेले असतात, तिथें त्यांचा घात होतो. जगाला ते भारी असतील, पण त्या विषयापुढें त्यांचें कांहींच चालत नाहीं, **प्रेमांत गुंतूं नका, तसेंच द्वेषमत्सरांतहि गुंतूं नका; दोन्हीं सारखेंच घातक आहेत.** आपण ज्याच्यावर दावा लावला आहे तो भाऊबंद मेला, आणि आपला प्रिय नातेवाईक मेला, दोघेहि मेल्याचें सुतक सारखें! त्याचप्रमाणें, मनुष्य प्रेमानें गुंतला काय आणि द्वेषानें काय, नुकसान सारखेंच होतें. भगवंताचा विसर हा कोणत्याहि कारणानें झाला तरी बरा नाहीं; मग प्रपंचांत सुखसोयी असल्यानें तो होवो किंवा प्रपंचांत दुःख झाल्यामुळें होवो. ढोंग, बुवाबाजी, इत्यादींच्या भानगडींत तुम्ही पडूं नका। अगदीं कांहींहि न केलेंत तरी चालेल, पण ढोंग मुळींच करूं नका; आणि सर्वांनीं माझ्यावर कृपा करा. अगदी अनुभवानें मी सांगतों, कीं बुवा होण्याच्या फंदांत तुम्ही पडूं नका. **आपलें कर्तव्य भगवंताच्या स्मरणांत करून त्याचें अनुसंधान अखंड टिकूं द्या.** आमची अशी वृत्ति बनण्यासाठीं संतांच्या संगतीची आपल्याला जरूरी आहे. आपण सर्वजण सत्संगतीमध्यें आहोंत असें म्हणतों, मग आमची वृत्ति कां न सुधारावी ? तर संतांना ज्याची आवड आहे तें आम्ही धरलें नाहीं, म्हणून आमची वृत्ति सुधारत नाहीं.

श्रीकृष्णानें उद्धवाला ज्ञान देऊन त्याला गोपींकडे पाठविलें. भगवंताच्या नामामध्यें त्या रंगून गेल्या होत्या. गोपींचें नामावरचें प्रेम पाहून उद्धवालाहि आश्चर्य वाटलें. नामामध्यें भगवंत त्यांना दिसत असे, तें पाहून उद्धवानें देवाला सांगितलें, ' देवा, तूं मला ज्ञान दिलेंस खरें, पण तुझ्या भक्तीचें प्रेम त्याहून श्रेष्ठ आहे तें तूं मला दे, ' खरोखर, **त्या नामाचें माहात्म्य देवाच्या वर्णनापेक्षांहि कठीण आहे.** तुम्ही सर्वजण इथें आला आहात। **येथून रामाजवळून कांहीं मागून न्यायचेंच असेल तर त्या नामाचें प्रेम तुम्हीं सर्वांनीं मागा. सर्वांनीं नामस्मरण करा आणि आनंदांत राहा. राम कृपा करील हा भरंवसा बाळगा.**

---

१३०. उत्तम आंबा पाहिजे तर उत्तम आंब्याची कोय पेरली पाहिजे. अशी कोय म्हणजे भगवंताचें नाम होय. तें ज्यानें आपल्या हृदयांत ठेवलें त्याच्या झाडाला उत्तम फळ आलेंच पाहिजे.

# साधनाची जोपासना–देहमनानें व्हावें रामार्पण

१० मे

भगवंताची उपासना। दूर करी सर्व यातना॥ चित्ताची स्थिरता। भगवंताच्या उपासनेंत निश्चितता॥ देह जरी जीर्ण फार। तरी वासनेचा जोर अनिवार। हें जाणून चित्तीं। एक भजावा रघुपती॥ हृदयीं करतां भगवंताचें ध्यान। नामविण उच्चार दुजा न जाण। त्यांत व्यवहाराचें जतन। न दुखवावें कोणाचें अंतःकरण। असा नेम ज्याच्यापाशीं। राम तेथील रहिवाशी॥ आपलें मन ठेवावें रामापाशीं। याहून दुजी गोष्ट नाहीं हिताची॥ मी रामाचा, रामा तूं माझा। हाच अखंड असावा हव्यास॥ ऐसें घ्यावें रामाला। कीं जे जीव प्यार झालें मला॥ देहमनानें व्हावें रामार्पण। तेंच संतकुळांत आल्याचें दर्शन॥ आतां याहून दुजें न सांगणें कांहीं। रामाविण जगूं नाहीं॥ **जें जें होणार तें होतच जातें। तें भगवंताच्या इच्छेनें घडतें। ऐसें आणणें मना। याचें नांव उपासना॥** अखंड रामसेवा ज्याला लाभली। धन्य धन्य त्याची माऊली॥ स्वार्थरहित रामसेवा। याहून लाभ दुजा न जीवा॥ राम ठेवा मनीं। तो ध्यात जावा मानसपूजनीं॥ वाचेनें भगवंताचें नाव। कायेनें भगवंताची सेवा। चित्तीं भगवंताचें ध्यान। आपण राहावें रामार्पण। याहून अन्य सेवा कोणतीहि न जाण॥ मनाला लावून घ्यावें सुंदर वळण। जेणें राम साहाय्य करील जाण॥ सर्वांभूतीं पाहावा भगवंत। हेंच उपासनेचें खरें श्रेय॥ उपासना असावी बळकट। तेथें नसावी कशाची अट॥ उपासनेचा असावा जोर। ज्यानें होईल मन स्थिर॥ **आपलें जीवन ज्याचे हातीं। त्याची नेहमीं ठेवावी संगति॥** उपाधिरहित आपलें जीवन। हेंच भगवंताचें अधिष्ठान॥ व्यवहारांतील गोष्टी जरूरीपुरत्याच कराव्या। उपासना दृढ बाळगावी॥ जें जें कांहीं मीं करावें। त्याला परमात्मा साक्षी हें जाणावें। मनीं न सोडावा धीर। आहे म्हणावें माझा रघुवीर॥ करावें भगवंताचें चिंतन। होईल स्वतःचें विस्मरण॥ सर्व आहे रामाधीन। आपण निमित्ताला कारण॥ रामावर ठेवावें चित्त। जैसें प्रपंचीं असावें वाटतें वित्त॥ उपासनेचे नर। त्यांनीं राहावें खबरदार॥ आजवर केली भगवंताची उपासना। पुढें त्यांत न येऊं द्यावा उणेपणा॥ सर्वांचें ऐकावें। परी उपासनेपासून दूर न व्हावें॥ जागृति ठेवावी चित्तीं। आपला मानावा रघुपती। राम माझा देता घेता। राम माझ्या भोवता॥ रामाविण जगीं दुजें। न ठेवावें आणिक परतें॥ **एक सद्गुरुआज्ञा प्रमाण। हीच रामसेवा जाण॥** थोर थोर ऋषिमुनी। यति संत साधु यांनीं। एकच केलें खास। रामावाचून न राहूं दिलें जीवास॥ ठेवावा रामावर पूर्ण विश्वास। न करावे उपासतापास॥ उपासापुढील ठाण। उपासना मुख्य जाण। उपासनेंत राहावें आपण। हेंच रामाचें सान्निध्य जाण।॥ स्वार्थरहित सेवा। तीच पावे देवाधिदेवा॥ ऐसी घडो रामसेवा। हेंच मागावें देवा॥ **जें जें होतें कांहीं। तें तें राम करतो पाहीं। हा एकच विश्वास। समाधानाचा मार्ग सत्य खास॥** सर्व कांहीं रामाचें हातीं। त्याचे सत्तेनें चालत आहे जगती॥ जेथें परमात्म्याची सत्ता। तेथें न चाले कोणाचें सर्वथा। म्हणून परमात्मा ठेवील त्यामध्यें। समाधान राखीत जावें॥

---

१३१. चित्तीं भगवंताचें ध्यान। आपण राहावें रामार्पण। याहून अन्य सेवा कोणतीहि न जाण।

# साधनाची जोपासना–थोडें वाचावें पण कृतींत आणावें

११ मे

पुष्कळ लोकांना खूप समजून घ्यावें, ज्ञान संपादन करावें, असा हव्यास असतो आणि त्याच्याशिवाय त्यांना चैन पडत नाहीं. हें एक प्रकारचें व्यसनच आहे. अफू खाणाऱ्याला कैफ आल्याशिवाय चैन पडत नाहीं. थोडी अफू पचनीं पडली कीं, कैफ येत नाहीं म्हणून तो आणखी अफू कैफ येईपर्यंत खातो, असें होतां होतां अधिकाधिक अफू पचनीं पडत जाते. आणि शेवटीं इतकी अफू खाण्याची वेळ येते कीं त्यांतच त्याचा अंत होतो. असेंच ज्ञानसंपादनाच्या हव्यासाचें आहे; म्हणून थोडेंच वाचून समजून घ्यावें आणि तें कृतींत आणावें. नाहीं तर जन्मभर ज्ञान संपादण्यांत वेळ जातो आणि कृति न झाल्याकारणानें पदरांत कांहींच पडत नाहीं. मनुष्याला पोटभर जेवायला पंचवीस-तीस मिनिटें पुरेशीं होतात, पण जेवलेल्या अन्नाचें पचन होण्यासाठीं पांचसहा तास जावे लागतात. मनुष्य एकसारखा जर खातच राहिला तर त्याला अजीर्ण होऊन तब्येत बिघडेल, आणि त्यांतच त्याचा अंत होईल. म्हणून नुसतें वाचीतच बसूं नये. थोडेंच वाचावें, पण तें कृतींत आणण्याचा प्रयत्न करावा. नुसत्या वाचनानें किंवा विषय समजावून घेण्यानें प्रगति होत नसून, तें कृतींत आणण्यानें प्रगति होते. म्हणून केवळ समजावून घेण्यापेक्षां तें कृतींत आणण्यावर भर असावा. आपलें आकुंचित मन विशाल करणें, आपण स्वार्थी आहोत ते निःस्वार्थी बनणें, हेंच खऱ्या वेदान्ताचें मर्म आहे. नुसत्या विचारानें तत्त्वज्ञान होणार नाहीं, त्यासाठीं साधना करायला पाहिजे. जग सुधारायच्या नादीं लागूं नका; स्वतःला सुधारा कीं त्या मानानें जग सुधारेलच. आपण सुधारलों नाहीं तर मग जग सुधारलें नाहींच !

वस्तु ही सुखाचें 'साधन' असून आपण भ्रमानें तिलाच सुखरूप मानतों. याचा परिणाम असा होतो कीं, वस्तूच्या साहाय्यानें सुख मिळविण्याचा प्रयत्न करण्याऐवजी आपण वस्तूच जास्त जास्त मिळविण्याच्या मागें लागतों आणि शेवटीं दुःखी बनतों. जगांत परोपकारी म्हणून नावाजलेले पण भगवंताचें अधिष्ठान नसलेले मोठेमोठें लोकसुद्धां मानाबिनांत कुठेतरी अडकून बसतात. कर्मास सुरुवात करतांना, फळ मिळेल किंवा नाहीं म्हणून काळजी आणि दुःख होतें; कर्म करीत असतांना, फळाकडे चित्त लागल्यानें कर्माचे कष्ट होतात म्हणून दुःख होतें; कर्म संपून, फळ मिळालें नाहीं तर दुःख होतें, आणि फळ मिळालेंच तर त्यांतून नवीन आशा उत्पन्न होऊन फळ मिळाल्याचा आनंद ती मारून टाकते म्हणून दुःख होतें. सारांश, अथपासून इतिपर्यंत दुःखच पदरांत पडतें. यासाठीं फळाची अपेक्षा सोडून कर्म करूं लागलो कीं तें कर्म करीत असतांनाच मनाला समाधान प्राप्त होतें, म्हणून परमार्थामध्यें रोकडा व्यवहार आहे, उधारीचा नाहीं, असें सर्व संतांचें सांगणें आहे.

---

१३२. नाम नुसतें घेतल्यानंतरसुद्धां काम होईलच, पण आपण तें समजून घेतल्यानें काम लवकर होईल.

# साधनाची जोपासना-कोणत्याहि परिस्थितींत वृत्ति स्थिर ठेवावी

१२ मे

अमानित्व हा देहाचा धर्म आहे. दुसऱ्याचा मोठेपणा राखून आपला मोठेपणा वाढवावा. दंभ हा मनाचा धर्म आहे. तो दुसऱ्याला फसविण्याकरिता नसावा. स्वतःचें कल्याण करून घेण्यापुरताच दंभ असल्यास हरकत नाहीं. अहिंसा हा देहाचा आणि मनाचा धर्म आहे. अहिंसा ही हेतूवर अवलंबून असते. **वाचेनें कोणाचें मन दुखवूं नये आणि देहानें परपीडा करूं नये. दुसऱ्याचे दोष सांगणें हें हीनपणाचें** लक्षण आहे. लौकिकांतला मोठेपणा एका जन्माचा घात करतो, पण दंभ आणि हिंसा अनेक जन्मांचा घात करतात. **द्वेषामुळें हिंसा घडते, म्हणून आपण कोणाचाहि द्वेष करूं नये. स्वार्थामुळें द्वेष** घडतो, **पण स्वार्थ जायला नामाशिवाय दुसरें साधन नाहीं**. आपली वाचा दुसऱ्याला शिकविण्यासाठीं आणि मोठेपणा बाळगण्यासाठीं नाहीं. वाचेनें म्हणजे जिभेनें बोलतां येतें आणि खातां येतें. **नेहमीं सत्य आणि गोड बोलावें, आणि खाण्याच्या बाबतींत जीभ आपल्या ताब्यांत ठेवावी**. स्वतःची चित्तशुद्धि करून घेऊन संतांचे गुण आपल्या आचरणांत आणण्याचा प्रयत्न करावा. अभिमानाचें विष जिथें येतें तिथें नामाची आठवण ठेवावी. **देवापेक्षांसुद्धां नामाचा महिमा अधिक** आहे. नाम जन्मभर टिकावें असें वाटूं लागावें, आणि वृत्ति उठूं लागली कीं तिला नामाची जोड देऊन ठेवावी. हिरण्यकश्यपूच्या ठिकाणीं देखील भगवंत नव्हता. असें नाहीं; कुंपण फार वाढल्यानें शेत दिसेनासें व्हावें, तसें हिरण्यकश्यपूचें झालें. स्वतःच्या ठिकाणीं भगवंत आहे हें हिरण्यकश्यपु अभिमानामुळें विसरला, त्यामुळें भगवंताला खांबांत दिसावें लागलें. अभिमान जरूरीपुरताच ठेवावा. "**मी रामाचा आहें" असा अभिमान धरावा. नामाची कांस धरावी.** 'नारायणाचें दर्शन व्हावें' **असें नाहीं** प्रल्हाद म्हणाला, 'नाम नाहीं सोडणार' असें म्हणाला, दुसऱ्याचा अभिमान दूर करायला, आमचा अभिमान गेला आहे कीं नाहीं हें प्रथम पाहावें. तो आमचा आम्हांला पुरून उरला आहे; तो आधीं घालवावा. स्वतः आहांत तसेंच राहणें एकवेळ चालेल, पण स्वतःला फसवूं नका.

लहानपणाची वृत्ति चांगली असते; लहानपणांत चूक नाहींच, आणि सगळा फायदाच असतो. भगवंताजवळ आपण लहान मूल झाल्याशिवाय त्याला कृपेचा पान्हा फुटायचा नाहीं; म्हणून आपण भगवंतापाशीं लहान व्हावें. लहानपण हें वयावर अवलंबून नसून आपल्या वृत्तीवर अवलंबून असतें. **कोणाविषयींहि वाईट विचार मनांत आणूं नये. त्यापासून आपलेंच मन गढूळ होतें.** कोणत्याहि परिस्थितींत वृत्ति कायम राहणें हेंच योगाचें सार आहे. **माझा प्रपंच जसा व्हायचा असेल तसा होवो, पण तुझा विसर मला पडूं देऊं नको, असें परमेश्वराला अनन्यतेनें म्हणावें**. मला खात्री आहे, तो तुमच्या साहाय्याला आल्यावाचून राहणार नाहीं.

१३३. नामानें दुरित नाहींसें झालें कीं भगवंत हवासा वाटले, आणि मग त्याच्या नामांत प्रेम येईल. नामांत प्रेम आल्यावर समाधान आपोआप लाभेल.

# साधनाची जोपासना-स्वतःलाच सुधारण्याचा प्रयत्न करावा

**१३ मे**

आपला अहंपणा खरोखर किती खोल गेला आहे पाहा ! समोर दिसत असलेल्या गोष्टींकडे बेमालूम डोळेझाक करून, आपण आपल्या दोषांचें खापर बिनदिक्कत दुसऱ्यावर फोडायला तयार होतों. अमक्यातमक्याच्या नादानें आपला मुलगा बिघडला असें आपण म्हणतों, कारण आपलाच मुलगा खराब हें म्हणवत नाहीं ! तें म्हणण्याची लाज वाटते म्हणून दुसऱ्याच्या मुलाला आपण वाईट म्हणतों. आपला मुलगा आपल्या डोळ्यांदेखत संगतीच्या योगानें एवढा बिघडतो, तर मग संगतीचा परिणाम केवढा असला पाहिजे ! संगतीचा परिणाम जर एवढा मोठा आहे, तर संतसंगतीत असतांना आपल्यांत सुधारणा कां दिसू नये ? संतसंगतीनें मग आपण निश्चित सुधारायला पाहिजे ! पण तसें तर दिसत नाहीं; मग नडतें कोठें ? याचें मुख्य कारण म्हणजे आपण स्वतःला सुधारण्याचा प्रयत्नच करीत नाहीं. आपलें होतें कसें पाहा ! एक मुलगा होता, तो एकदा एका पाटलाकडे गेला. पाटील अत्यंत चिकट होता. तो मुलगा पाटलाला म्हणाला कीं, " मला कांहींतरी काम द्या, तुम्ही सांगाल तें काम मी करीन; तुमच्या इच्छेला येईल तो पगार मला द्या, अगर कांहींहि देऊं नका. माझी फक्त एकच अट आहे. ती म्हणजे, माझी आई आतां फार म्हातारी झाली आहे, तिला माझ्याजवळ राहूं द्यावी. तुम्ही सांगाल तें काम मी करीन. मला दुसरें कांहीं नको. " पाटलाला फार बरें वाटलें. दोघांना फक्त जेवायलाच घालायचें आहे, आपल्याला फुकटांत गडी मात्र मिळेल ! पाटील म्हणाला, " ठीक आहे, पण तूं काम काय काय करणार ? " मुलगा म्हणाला, " माझ्या आईनें लहानपणापासून मला वाढविलें. ती उद्योगधंदा करी, आणि तिला उद्योगधंदा करायला सवड मिळावी म्हणून मला झोंपवून ठेवी. मी जागा झालों कीं मला खाऊं घालून परत झोंपवून ठेवी. त्यामुळें माझें असें झालें आहे कीं मला जाग आली कीं खायला पाहिजे, आणि खाल्लें कीं मला झोंप येतें. " तसें आपलें होत आहे. आपल्याला सर्व समजतें, परंतु प्रयत्न करायला नको. आळसच आपल्यांत फार भरलेला आहे. त्यामुळें वासनेंतच आपण जन्माला येतो आणि वासनेंतच आपला अंत होतो. वासनेच्या जाळ्यांतून बाहेर पडण्याचा आपण प्रयत्नच करीत नाहीं. याकरितां एकच खात्रीचा उपाय आहे, आणि तो म्हणजे भगवंताला अनन्यभावें शरण जाणें. " रामा ! तुझ्यावाचून माझी यांतून सुटका नाहीं. तूं ठेवशील त्यांत मी आनंद मानीन, तुझें मला प्रेम लागूं दे. " असें कळकळीनें रामाला सांगावें, आणि सदैव त्याचें नाम हृदयांत ठेवावें. तो उदार परमात्मा तुमच्यावर कृपा केल्याशिवाय राहणार नाहीं याची खात्री बाळगा.

---

१३४. विषयरूपी सापाचें विष उतरलेलें नसल्यामुळें भगवंताचें अमृतासारखें नाम आपल्याला गोड लागत नाहीं.

# साधनाची जोपासना-विषयाची व लौकिकाची आस सोडावी

१४ मे

आपण रामाचे झालों म्हणजे आपली काळजी त्याला लागते. आपण रामाचे व्हायला अडचण आमचीच. आवडच मुळीं आपण विषयाची आणि लौकिकाची ठेवतों. साहजिकच एकाची आसक्ति ठेवल्यानें दुसऱ्याची विरक्ति येते. नोकरीच्या वेळेस आम्ही बायकामुलांना बाजूला सारून कामावर जातोंच ना? मग साधनाच्या वेळीं बायकामुलें आड येतात हें कां कारण सांगावें? बायका आणि पैका या दोन गोष्टी आमच्या आड येत असतात असें आजवर अनेक संतांनीं सांगितलें. मग या निर्माण तरी कां केल्या असें कोणी विचारतील. त्याला उत्तर म्हणजे, काड्याच्या पेटीनें विस्तवहि पेटविता येतो आणि घरहि जाळतां येतें; त्याचा जसा आपण उपयोग करावा तसा तो होतो. खरें म्हणजे आम्हांला भगवंताची तळमळच लागत नाहीं. एकजण मला म्हणाला कीं, "मला प्रपंच टाकावासा वाटतो." मी त्याला म्हटलें, "नुसता प्रपंच टाकल्यानें तुला वैराग्य कसें येईल? वैराग्याला नेहमीं विवेकाची जोड लागते. तूं आपला मीपणा टाकलास तरी खूप झालें." चांगलें कर्म आड येत नाहीं असें थोडेंच आहे! वाईट कर्म कुणाला सांगण्याची तरी आपल्याला लाज वाटते. पण सत्कर्म आपण अभिमानानें ज्याला त्याला सांगत सुटतों. 'मागील जन्मीं पाप केलें होतें म्हणून या जन्मीं हें भोगतों' असें म्हणतों; आणि 'आतां चांगलीं कर्में करतों म्हणजे पुढल्या जन्मीं सुख लागेल' असें म्हणतों म्हणजे जन्म-मरणाच्या फेऱ्यांतून सुटण्याऐवजीं त्याच्यांत गुंडाळलें जाण्यासारखेंच झालें! दुष्कर्मांमुळें पश्चात्ताप होऊन एकदां तरी भगवंताची आठवण होईल, परंतु सत्कर्मांचा अहंकार चांगल्या माणसालाहि कुठें नेऊन सोडील त्याचा पत्ता लागणार नाहीं. राजासुद्धां योग्य मार्ग दाखविण्यासाठीं आपल्या संगतीला चांगला माणूस ठेवतो. भगवंतानें उद्धवालाहि 'सत्समागम कर' म्हणून सांगावें, याहून अधिक काय पाहिजे? कडू कारलें खाल्लें तर कडूपणाचीच प्रचीति येते, मग विषयाच्या प्राप्तीनें जीवन गोड असें होईल? 'प्रेम येईल तेव्हां भगवंताची भक्ति करीन' असें म्हणूं नये. विषयासाठीं आपण मरमर काम करतों आणि तेवढें करूनहि सुख लाभत नाहीं; मग भगवंताचें नांव न घेतां प्रेम येत नाहीं हें म्हणणें किती वेडेपणाचें आहे! लग्नाआधीं मुलीला दहापांचजणांना दाखविली तरी, लग्न झाल्यावर त्याप्रमाणें त्यांतला एकच नवरा असतो आणि बाकीच्यांची तिला आठवणहि राहात नाहीं. त्याप्रमाणें आम्ही एकदां रामाचे झालों म्हणजे त्याच्याशीं लग्न लावलें, म्हणजे मग विषयांचें प्रेम कुठें आलें? संचिताला थाप द्यावी आणि क्रियमाण भगवंताच्या नामांत घालावें हें आयुष्याचें खरें सार आहे.

---

१३५. भगवंताच्या नामाची गरज दोन तऱ्हेनें आहे. एक प्रपंचाचें स्वरूप कळण्यासाठीं, आणि दुसरी, भगवंताच्या प्राप्तीसाठीं

# साधनाची जोपासना–कोणाचेंहि मन न दुखवतां सर्वांशीं प्रेमानें वागणें

१५ मे

ज्याला चार पैसे शिल्लक टाकावेत असें वाटत असेल त्यानें पहिली कोणती गोष्ट करायची ती हीं कीं, कोणाचेंहि कर्ज होऊं देऊं नये. हें साधलें कीं मग थोडा खर्च कमी करण्याचा प्रयत्न करावा, म्हणजे सहजच शिल्लक पडूं लागते. तोच नियम प्रेमाला लागूं असतो. प्रेम वाढावें वाटत असेल तर प्रथम द्वेष-बुद्धीला मूठमाती देणें जरूर आहे. नंतर, प्रेम कसें वाढेल याच्या उद्योगाला लागावें. **चुकूनसुद्धां कोणाचें मन दुखवणार नाहीं अशी दक्षता घेणें जरूर आहे**. एखाद्याला काठी मारली किंवा अन्य तऱ्हेनें देहाला दुखापत केली तर ती थोड्याफार वेळानें भरून निघेल, आणि त्याच्या हातापायां पडून माफी मागितली तर तो मनुष्य क्षमाहि करील. **पण मन दुखविण्याइतकी वाईट गोष्ट दुसरी नाहीं. मन दुखविणें म्हणजे प्रत्यक्ष परमेश्वराला दुखविण्यासारखें आहे**. कारण भगवंतानें ज्या आपल्या विभूति सांगितलेल्या आहेत त्यांत " मी मन आहें " असें सांगितलें आहे.

सत्याचें व्रत चांगलें आहे हें खरें, पण सारासार विचार हा प्रत्येक ठिकाणीं अवश्य लागतो. एखादा मनुष्य जर असें म्हणाला कीं, मी एक सत्य तेवढेंच जाणतों, आणि सत्य बोलतांना आई, बाप, माणसें, देव, गुरु, वगैरे कुणालाच ओळखत नाहीं, तर त्याला काय म्हणावें ? एक सत्य पाळण्याच्या नांवाखालीं जर असल्या पूज्य विभूतींचें अवमान करण्याचे दहा गुन्हे होत असतील, तर त्या सत्याला चांगलें तरी कसें म्हणावें ? तसेंच चोरी करण्याकरितां आलेल्या चोराला, त्याला चोरी करूं दिली नाहीं तर त्याचें मन दुखावेल म्हणून चोरी करूं देणें हें योग्य म्हणतां येईल कां ? सारांश, प्रत्येक गोष्टींत सारासार विचाराची गरज आहे. समजा, एका बापाला चार मुलगे आहेत. त्या चारांपैकीं एकाला गोड आवडतें, दुसऱ्याला आंबट आवडतें, तिसऱ्याला तिखट आवडतें आणि चौथ्याला तेलकट आवडतें. आतां प्रत्येकाच्या या रुचिवैचित्र्यामुळें जर ते भांडूं लागले तर भांडण कधींच मिटणार नाहीं. म्हणून भांडण मिटवायचें असेल तर चौघांनींहि एकमेकांच्या रुचीकडे दुर्लक्ष केलें पाहिजे हें पहिलें काम; आणि पुढें प्रेम वाढविण्याकरितां, ज्या एका बापाचीं आपण चार मुलें आहोंत, त्याच्याकडे दृष्टि ठेवणें हें दुसरें काम; म्हणजे साहजिकच पहिल्या गोष्टीचा विसर पडून, आपण सर्व बंधु आहोंत ही एकच जाणीव डोळ्यांसमोर राहून प्रेमाचें पोषण होईल. **कशाहि परिस्थितींत एकमेकांशीं सलोख्यानें आणि प्रेमानें राहणें या सारासार विचाराचें पालन प्रत्येक भावानें केलें, तर कोणाचेंहि मन न दुखवितां कुटुंबांत समाधानाचें आणि आनंदाचें वातावरण निर्माण होईल**. आपण पुष्कळांच्यावर प्रेम केलें तर आपण एकटेच त्यांचें करतों, पण प्रसंगाला ते सर्व आपल्याला मदत करतात. **जो पुष्कळांचा झाला तोच भगवंताचा झाला असें समजावें.**

---

**१३६. आवड आणि दुःख एकाच ठिकाणीं तयार होतात; म्हणून जिथें आवड उत्पन्न होतें तिथेंच तिला नामानें मारणें जरूर आहे.**

# साधनाची जोपासना–देह हा परमार्थाचें साधन समजून वागावें

१८ मे

संतांचें काम तुम्हाला देहबुद्धीपासून सोडविणें हें आहे। तुम्हाला मुलगा देणें, तुमचें दुखणें बरें करणें, म्हणजे विषय देणें, हें नव्हे. एका बाईनें तिच्या अंगात येत होतें म्हणून नाम घेतलें; तसें नसतें तर घेतलेंहि नसतें. हा तिच्यावर त्या भुताचा उपकारच नाहीं का ? जों जों परमार्थाला लागावें तों तों देहबुद्धि तिथून ओढण्याचा जास्त जास्त प्रयत्न करते. विद्येची बुद्धि ही देहबुद्धीला धरून आहे। ती मारून आपण शुद्ध केली पाहिजे. याकरितां भगवंताच्या स्मरणासारखा दुसरा उपाय नाहीं. कुत्रा हा आपल्याला रात्रींच्या पहाऱ्याकरितां उपयोगी पडतो, पण तो कितीहि चांगला आणि उपयोगी असला तरी आपण त्याला पानात जेवायला घेऊन बसत नाहीं, त्याप्रमाणें देहाचेंहि आहे. आंतल्या खोबऱ्याच्या रक्षणाकरितां ज्याप्रमाणें करवंटी, त्याप्रमाणें देहाला मानावें. देह हा परमार्थाकरितां साधन आहे; पण मनुष्य 'हा देहच मी आहे,' असें मानून व्यवहार करतो. वास्तविक आपण देहसंघापासून निराळे आहोंत असें पदोपदीं दाखवीत असतों; माझा हात, माझा पाय, माझा डोळा, माझें मन, फार तर काय, माझा जीव असेंहि म्हणतों; पण वागतों मात्र मी तोच आहे असें समजून. देहाशीं संबंध जास्त येईल असेंच आपण भगवंताजवळ मागतों; असें न करावें.

प्रेम बसायला आपल्याला आपल्यासारखाच देहधारी लागतो. कुत्रें रडत असलें तर आपल्याला नाहीं वाईट वाटत; पण एखादें लहान मूल रडत असलें तर वाईट वाटतें. आपल्या देहावरचें प्रेम कमी होण्यासाठीं दुसऱ्यावर प्रेम करायला लागावें. देवावर प्रेम करायला देवाला आपल्यासारखाच देहधारी कल्पावा लागतो. म्हणून आपलें देहावरचें प्रेम कमी व्हायला, देहबुद्धि कमी व्हायला सगुणमूर्तीचें, सद्‌गुरूचें ध्यान करावें लागतें. तें जसजसें दृढ होत जाईल तसतसें आपण स्वतःला विसरून जातों, आणि आपण देहाच्या पलीकडे गेलों म्हणजे सद्‌गुरूचें खरें स्वरूप हें देहातीत आहे असें प्रत्ययाला येतें. देहबुद्धि नष्ट होईल तसतशी सद्‌गुरूची खरी ओळख होईल. ज्यानें देहाभिमान नष्ट केला त्याचा मोठा ज्ञानीसुद्धा हेवा करतो. 'मी देह' म्हणावें यापलीकडे दुसरें अज्ञान कोणतेंहि नाहीं. मी भगवंताचा असून देहाचा म्हणणें यासारखें दुसरें खोटें नाहीं. प्रपंचात संकटें येतात, तरी पण तो सोडावासा वाटत नाहीं। याहून भगवंताची माया ती कोणती ? अतिसहवासामुळें देहाचें ममत्व सुटत नाहीं. परमात्म्याचा सहवास (उदाहरणार्थ, देवाला जाण्याचा वा जप करण्याचा नेम) केला म्हणजे देहाचें ममत्व थोडें थोडें कमीं होतें. देहाच्या सहवासानें आपण देहाचे होतों, नामाच्या सहवासानें आपण परमात्म्याचे होऊं.

---

१३७. रोज थोडें पण अगदीं मनापासून आणि मोबदल्याची अपेक्षा न करता नाम घ्यावें; तें फार फार काम करील.

# साधनाची जोपासना–मी भगवंताचा आहें ही अखंड जाणीव

१७ मे

आपल्याला कांहीं हवें असें वाटलें आणि तें तसें झालें नाहीं म्हणजे तळमळ लागते. परंतु सर्व परमात्माच करतो आहे असें मानलें म्हणजे काळजीचें कारण उरत नाहीं. आपण देव आहे असें म्हणतों, पण आपला तो विश्वास खरा आहे का? एखादा मनुष्य बुडायला लागला म्हणजे दगड जरी त्याच्या हाताला लागला तरी हा आपल्याला तारील असा विश्वास असतो, आणि तो त्याला धरून आपणहि त्याच्या बरोबर बुडतो. म्हणून म्हणतो देव आहे असा आपला खरा विश्वास नसतो, आपण नुसतें तोंडानें म्हणतों एवढेंच! नाहीं तर आपल्याला काळजी कां वाटावी? प्रत्यक्ष देव पुढें उभा राहिला तरी आपल्या मागची काळजी आणि सुखदुःखें संपणार नाहींत. याचें कारण म्हणजे परमेश्वरावरचा आपला विश्वासच डळमळीत असतो. वास्तविक, परमेश्वराची इच्छा प्रमाण मानल्यावर सुखदुःख मानण्याचें कारण नाहीं. परमेश्वर सर्वव्यापी आहे, तो जसा माझ्यांत आहे तसा दुसऱ्यांतहि आहे म्हणून दुसऱ्यानें कांहींहि केलें तरी आपल्याला त्याबद्दल कांहीं वाटण्याचें कारण नाहीं, तरी अशी भावना ठेवून वागावें कीं मी देवाचा आहे, तो माझा पाठीराखा आहे, आणि म्हणून कांहीं झालें तरी मला काळजी करण्याचें कारण नाहीं. हें सर्व नामस्मरण केल्यानें साधतें. म्हणून मी आजपासून सतत नामस्मरण करीत राहणार असा निश्चय करावा, आणि त्या दृष्टीनें प्रयत्न चालू ठेवावा. परमेश्वराला शरण जाऊन, 'मला तसें वागण्यची बुद्धि द्यावी' म्हणून त्याची प्रार्थना करावी. मनाला पहिल्यानें थोडी बळजबरी करावी लागेल. लहान मुलांना शाळेंत जाण्याकरितां सुरुवातीला थोडी बळजबरी करावी लागते. मुलीला सासरीं प्रथम पाठवितानाहि तसेंच करावें लागतें. आपण थोडा तरी नियम करावा; उदाहरणार्थ, जेवायच्या आधीं, रात्रीं निजतांना, सकाळीं उठतांना, नाम घ्यायचेंच, भगवंताची आठवण करायचीच; असें केलें तर तें आयुष्यांत फार उपयोगी पडेल. प्रपंचाचा प्रयत्न आज जो चालू आहे तसाच करीत जावा, पण "मला भगवंत हवा" असें म्हणत जावें. मनामध्यें भगवंताची आस ठेवावी, म्हणजे ती हळूं हळूं वाढत जाईल, आणि तिचें पर्यवसान ध्यासामध्यें होईल. समजा, एखाद्या माणसाला घर बांधावयाचें आहे. "मला घर बांधायचें आहे," असें तो म्हणत जातो, आणि त्यासाठीं पैसा शिल्लक टाकतो; दागिने करण्याची वेळ आली तर ते नको म्हणतो, कारण पुढें घर बांधायचें आहे. हें जसें खरें, त्याचप्रमाणें "भगवंत मला हवा" असें नुसतें म्हणत गेल्याने देखील मनुष्य निव्वळ प्रपंचातच गुरफटून न जातां विषय बेतानें भोगेल. खरा ध्यास लागल्यावर ती वस्तु मिळाल्यावांचून चैन पडणारच नाहीं.

---

१३८. सगुण मूर्ति नेहमींच आपल्याजवळ राहणें शक्य नसतें, पण तिची खूण भगवंताच्या नामांत आहे; म्हणून आपण नाम घेतल्यावर भगवंत आपल्याजवळ असल्यासारखाच आहे.

# साधनाची जोपासना–वृत्ति भगवंताच्या ठिकाणीं स्थिर ठेवावी

१८ मे

माझा देह परमार्थाच्या आड येतो हें म्हणणें खरें नाहीं. तो मदत करतो किंवा आड येतो या दोन्हींत विशेष तथ्य मानूं नये. माझी वृत्ति कुठें गुंततें हें पाहावें. भगवद्भजनात दिवस घालवावा असें वाटूं लागलें, पण संगत मिळाली खेळ खेळणाऱ्याची, तेव्हां त्याचें मन कशाला मोडा, असें म्हणून खेळूं लागला, भगवंताच्या स्मरणात राहण्याच्या वृत्तीपासून ढळूं लागला, तर कसें होणार ? आईनें आजवर खस्ता खाल्ल्या, लहानाचें मोठें केलें, तीच आई लग्न झाल्यावर विषयाच्या आड येऊं लागली, आणि म्हणून वैऱ्यासारखी वाटूं लागली. वास्तविक दोघांच्याहि देहांत फरक होण्यासारखें असें कांहींच झालें नाहीं; पण वृत्तींत बदल झाला. विषयांतच मी गुंतून राहूं लागलों याला काय करावें ?

"मी सुखी कशानें होईन" हें आपण आपल्या कल्पनेनेंच ठरवलें; पण या जगात पूर्ण सुख किंवा पूर्ण दुःख असें कांहीं आहे का ? जे खरें असेल किंवा खोटें असेल याची आपल्याला खात्री नाहीं, त्या बाबतींत आपण रिकाम्याच कल्पना करीत बसतो. दुसरा मनुष्य ज्या वेळीं आपल्याला त्रास देतो, त्या वेळीं त्यामध्यें पन्नास टक्के आपली कल्पना असते. बाकी उरले पन्नास टक्के; त्याबद्दल "त्यानें दिलेला त्रास मी करून घेणार नाहीं" ही वृत्ति असावी म्हणजे संपलें; आपली वृत्ति सारखी बदलतें आहे आणि जगहि सारखें बदलतें आहे, त्यामुळें अमुक परिस्थितीमुळें सुख किंवा अमूक परिस्थितीमुळे दुःख होतें हें वाटणें खरें नव्हे. कारण सुखदुःख अस्थिर असतें. शास्त्रांचें नियम हे वृत्तीला स्थिर करतात. भजन, पोथीवाचन, मंदिर बांधणें, वगैरे गोष्टी जर वृत्ति सुधारण्यासाठीं न केल्या तर ती नुसती करमणूक होते, त्यापासून खरा फायदा होत नाही. आगगाडी रोज काशीला जाते, पण तिला कांहीं काशीयात्रा घडत नाहीं. यात्रा घडते ती आंत बसलेल्या लोकांना; गंगास्नान, विश्वेश्वराचें दर्शन, वगैरे आंतल्या लोकांना घडतें. **त्याचप्रमाणे देहानें नुसता पूजापाठ वगैरे करून परमार्थ घडत नाहीं. आपली वृत्ति भगवंताच्या ठिकाणीं चिकटली पाहिजे.** त्याचप्रमाणे भगवंताचें रूप सारखें समोर ठेवता येणार नाहीं पण त्याचें रूप लक्षात आलें नाहीं तरी आपण त्याचें नाम घेतो हें लक्षांत राहिलें तर वृत्ति सुधारेल. आपल्या डोळ्यांत अगदी बारीक कण गेला तरी तो खुपतो, त्याहिपेक्षां वृत्ति सूक्ष्म असते. ती भगवंतालाच कळते, म्हणून त्याच्यापाशीं लबाडी चालत नाहीं. **वृत्ति स्थिर होणें, शांत होणें, याचें नांव समाधान; आणि भगवंताकडेच वृत्ति सारखी राहणें याचें नांव समाधि होय.** विषयाचा भोग आला असता जो त्यामध्येंच गुंतत नाहीं, त्याच्यावर भगवंताची खरी कृपा झाली हें समजावें. भगवंतापासून वेगळें न राहाणें, त्याचें विस्मरण न होऊं देणें, त्याच्या स्मरणात राहणें, त्याच्या नामांत राहणें, यांतच खरें समाधान, शांति आणि सुख आहे.

---

**१३९. ज्याला भगवंताचें प्रेम यावें असें वाटतें त्यानें नाम घेणें हाच एक मार्ग आहे.**

# साधनाची जोपासना-भगवंताचें प्रेम वाढविण्याची कृति करावी

१९ मे

जगांत देवाणघेवाण हा नियमच आहे. लांकडाचे दोन तुकडे जोडायचे असतील तर प्रत्येकाचा थोडा थोडा भाग तासून नंतर एकमेकांत बसवितात, आणि मग उत्तम रीतीनें सांधा बसतो. त्याप्रमाणें प्रत्येक माणसानें आपापलें दोष जर थोडे थोडे तासून टाकले तर परस्पर प्रेमाचा सांधा खात्रीनें उत्तम बसेल. याकरितां विचारानें आणि काळजीनें वागणें जरूर आहे. घरामध्यें काय किंवा बाहेर काय, प्रेमाचा धाक असावा, भीतीचा धाक असूं नये. जसें आई आणि मुलांचे प्रेम असतें तसें भगवंताचें प्रेम लावावें आणि त्याप्रमाणें आपण वर्तन ठेवावें. **असा नियम आहे कीं, ज्याला आंतबाहेर** भगवंताचें प्रेम आलें, **तो भजनामध्यें नाचत असतां त्याचा स्पर्श दुसऱ्याला झाला कीं तोहि भगवंताच्या प्रेमानें नाचूं लागतो**. भगवंताचें प्रेम हें एक मोठें वेड आहे, तें ज्याला लाभेल तो भाग्याचा खरा! एक भगवंताचें प्रेम लागलें, कीं वाणीमध्यें सर्व गुण चांगलें येतात. पुस्तकें वाचून किंवा दुसऱ्या बुद्धीनें जगाची अशाश्वतता केव्हांहि कळणार नाहीं. भगवंताचें प्रेम वाढलें कीं ती आपोआप कळूं लागते. एखाद्या माणसाचें तोंड आल्यावर पोटामध्यें भूक असूनसुद्धां त्याला खातां येत नाहीं किंवा अन्नाला चव लागत नाही. त्याचप्रमाणें आंतमध्यें भगवंताचें प्रेम असूनसुद्धां आपण बाहेर प्रपंचामध्यें आसक्त असल्यामुळें भगवंताच्या नामाची गोडी वाटत नाहीं. तोंड बरें व्हायला जसें प्रथम औषध घ्यावें, त्याचप्रमाणें भगवंताचें प्रेम यायला आपण प्रपंचाची आसक्ति कमी करावी. ही प्रपंचाची आसक्ति सोडणें किंवा कमी करणें हें फार कठीण काम आहे; कारण गंमत अशी कीं "काहीं न करण्याची" कृति करणें हें आपल्याला फार अवघड जातें; काहीं तरी करण्याची कृति करणें हें त्या मानानें खूपच सोपें आहे. म्हणूनच आपण भगवंताचें प्रेम वाढविण्याची कृति करावी. त्याकरितां आपलेपणा, अनुसंधान आणि सत्संग हेच तीन उपाय आहेत. भगवंत हा बहुरूपी आणि अनंत ठिकाणी नटणारा असा आहे, म्हणून त्याच्या प्राप्तीसाठीं अनंत साधनें असलीं पाहिजेत. ज्याच्या त्याच्या मनोरचनेप्रमाणें जो तो आपलें साधन करील, पण या सर्व साधनांच्यामध्यें भगवंताचें प्रेम हें सर्वसामान्य असलें पाहिजे. **भगवंताचे प्रेम हें कोणत्याही साधनाचा प्राण आहे, तें प्रेम मागण्यासाठीं रोज भगवंताची प्रार्थना करावी.** ज्याला भगवंताचें प्रेम येईल तो सृष्टीकडे कौतुकानें पाहील. खरोखर, भगवंताचें प्रेम एकदा चिकटलें कीं त्याच्याआड दुसरें काहीं येऊं शकत नाहीं. **भगवंताच्या नामाला नीति हें पथ्य आहे.** असें जो वागेल त्याचें भगवंतावरचें प्रेम वाढेल. **भगवंतावर** अत्यंत निष्ठा ठेवा, प्रेम ठेवा. **भगवंत हा कष्टसाध्य नसून सुलभसाध्य आहे. जो हीनाहून हीन, आणि अडाण्यांतला अडाणी आहे. त्यालासुद्धां मिळणारा असा भगवंत** आहे. मूल जसें आईच्या अंगावर नाचतें त्याप्रमाणें आपण भगवंतापाशीं मूल होऊन त्याचें प्रेम लुटावें.

---

१४०. पाणी हें जसें शरीराचें जीवन आहे, तसें नाम हें मनाचें जीवन आहे.

# साधनाची जोपासना-भगवंताच्या स्मृतींत प्रपंच करावा

२० मे

दुःखाचें मूळ कारण । स्मरणांतून गेला रघुनंदन ।। रोगाचें मूळ पाहिल्या-विण । औषध न घ्यावें आपण ।। सर्व दुःखाचें मूळ । भगवंतापासून झालों दूर ।। रामावांचून प्रपंचात नाहीं सुख । कारण प्रपंच मूर्तिमंत आहे दुःख ।। कोळशानें हात काळा झाला । त्यानें दुःखी कष्टी झाला । ज्याचा जो धर्म तो त्यानें पाळला । आपण मात्र नाहीं ओळखला । तैसा प्रपंच दुःखाचा झाला । भगवंतावांचून वायां गेला ।। देहाचें सुखदुःखाचें कारण । एक परमात्म्याचें विस्मरण ।। जगातील ऐश्वर्य मानाची प्राप्ति । रामरायाविण समाधानाला न देती ।। जें जें वैभव जगतीं । तें तें आलें हातीं । वायां सर्व जातें । हातीं न येतां रघुपती ।। बीं एकच पेरलें । त्याला आलीं मुळें, फांदी, फुलें, फळें । एकच बीज खरें । विस्तारानें तें वाढलें त्वरें । तैसी झाली आपली गती । हेंच प्रचीतीला येती ।। परमात्म्याचें विस्मरण । हेंच बीज जाणावें मूळ कारण ।। काळजी चिंता अहंकार । भीति तळमळ फार । हा झाला त्याचाच विस्तार । तात्पर्य, कडू बीं पेरलें । त्याचें गोड फळ नाहीं आलें । परमात्म्याचें विस्मरण ।। याहून दुजें न कडवट जाण । काळजी आणि भीति । भगवंताच्या विस्मृतींत जन्मतीं ।। अंकित विषयाचा झाला । परमात्मा बाजूला सरला ।। म्हणून प्रपंचांतील लाभ आणि हानि । परमात्म्याला दूरच करतील दोन्ही ।। व्यवहार, सद्वासना, सदाचरण । लौकिक, संतति, संपत्ति, शास्त्राचें मनन । सर्व काहीं रामाविण वाटे शून्य ।। खरें सुख भगवंतपायीं । जें विषयभोगानें मिळालें नाहीं ।। झाल्याशिवाय भगवंताचें विस्मरण । करतां न ये विषयाचें चिंतन ।। संतति, संपत्ति, लौकिकाची प्राप्ति । सर्व वैभव जरी आलें हातीं । तरी रामाविण आहे फजिती ।। म्हणून अखंड असावें भगवंताचें स्मरण । तोच दूर करील दुःखाचें कारण ।। प्रपंचीं ठेवतां दक्षता । न विसंबे रघुनाथा । तोच प्रपंचीं सुखी जाणा ।। प्रपंच करावा सर्वांनीं जपून । पण रामाचें स्मरण राखून ।। सर्वस्वी व्हावें भगवंताचें । मी-माझें सोडोनि साचें ।। 'मी कर्ता नव्हे' जाणून करी कर्म । त्याला बाधेना कलीचा मार्ग ।। दुष्ट अभि-मानाला न पडावें बळी । त्याचा मालक होईल कली ।। कली जेथें शिरला । त्यानें राम दूर केला ।। भगवंताचें स्मरण सांभाळून । कोणताहि करावा व्यवसाय जपून । हेंच प्रापंचिकास मुख्य साधन ।। कर्ता मी नव्हे, कर्ता राम । ही मनांत जाणून खूण । करावा व्यवहार जतन ।। प्रपंचीं ज्याचा राम सखा । भय चिंता दुःख नाहीं देखा ।। रामापरतें हित । मानी त्याचा होई घात । जोंवर 'कर्ता मी' हें ध्यानीं । तोंवर मन न लागलें राघवचरणीं । मीपणा टाकावा । अभिमान सोडावा । सुख येईल त्याचे मागें । हा विश्वास बाळगावा ।। ज्यानें केलें सर्वच रामास अर्पण । तेथें मीपणास नाहीं ठाव ठिकाण ।। पापाचे न व्हावें आपण धनी । कर्ता राम हें जाणून मनीं ।। रामसेवेपरतें हित । सत्य सत्य नाहीं या जगांत ।। म्हणून रामास व्हावें अनन्य शरण । दुःख दूर व्हावयास मुख्य साधन ।। मनानें होऊन जावें भगवंताचें । त्यानें खास केलें सार्थक जन्माचें ।। म्हणून त्याचें भाग्य थोर जाणा । ज्यानें जोडला रामराणा ।। ज्यानें देह केला रामास अर्पण । धन्य धन्य त्याचें जीवन ।। म्हणून भगवंताचें होऊन राहणें । याहून दुजें कांहीं न करणें ।।

---

१४१. अखंड असावें भगवंताचें स्मरण । तोच दूर करील दुःखाचें कारण ।।

# साधनाची जोपासना-अट्टाहासानें नामस्मरण करावें

२१ मे

नामाइतकें सूक्ष्म आणि स्थूल साधन नाहीं, एखादी गोष्ट अगदीं कळकळीनें सांगायची झाली म्हणजे 'अगदी बेंबीच्या देठापासून सांगतो' असें आपण म्हणतों, त्याप्रमाणें नामहि बेंबीच्या देठापासून घ्यावें. कारण सर्व वासनांचा उगम तिथेंच आहे. आपण नामाचीच वस्ती तिथें ठेवून दिली म्हणजे आपोआप वासनाक्षय होईल. उगीच वरवर नामस्मरण करूं नये. तें अट्टाहासानें आणि अंतःकरणपूर्वक घ्यावें, यांतच खरें हित आहे. आता वासनाच मेली तर आम्ही विषय कसें भोगूं; याचीं नाहीं काळजी करूं. भगवंताची सत्ता जाणली कीं, त्याला सहज जाणतां येते. जो जाणेल भगवंत तयास म्हणावें संत. आपण खेड्यांत गेलों कीं तिथले सभ्य आणि प्रतिष्ठित कोण याची चौकशी करतों. पाटील आम्हाला दिसतो, लोक सांगतात, म्हणून आम्ही त्याची भेट घेऊं शकतों. पण परमात्मा निर्गुण, निराकार, त्याची ओळख कशी करून घ्यावी कळत नाहीं. आम्हाला कळत नाहींत त्या सर्वच गोष्टी आम्ही कधीं खोट्या मानतों का !

आपल्याला भगवतानें निर्माण केलें ही जाणीव होईल तेव्हां " मी जे बोलतों, चालतों, पाहतों, तें सर्व त्याच्या आधीन आहे, " हें अनुभवाला येईल. ज्याप्रमाणें सदऱ्यामध्यें शिरलेली पिसू डोळ्याला दिसत नाहीं, आणि हातालाही लागत नाहीं पण चैन मात्र पडूं देत नाहीं आणि स्वस्थ झोपहि येऊं देत नाहीं, त्याचप्रमाणें प्रत्येक जीवाला भगवंताची गरज असल्यामुळें त्याच्याशिवाय त्याला चैन पडत नाहीं, आपण आपले विषय कितीहि बदलले तरी आपल्याला समाधान मिळत नाहीं. प्रपंचांत कुठेंतरी कमतरता नेहमी असायचीच. त्याची पूर्तता भगवंताशिवाय होत नाहीं. आपल्याला असणारी तळमळ ही भगवंताची म्हणजे पूर्णत्वाची तळमळ आहे. नास्तिकाचासुद्धां पूर्णत्वाकडे ओढा असतो. तेव्हां या तळमळीला भगवंत हेच औषध आहे. जगामध्यें असे कोणतेंहि दुःख नाहीं कीं जें भगवंताच्या आनंदाला विरजण घालील. प्रत्येकाला आनंद पाहिजे आहे. आनंद हेंच भगवंताचे स्वरूप आहे. म्हणून मुळामध्यें असलेली गोडी आपण अभ्यासानें वाढवावी. भगवंत हा जर आपलें मूळ स्वरूप आहे तर मग त्याचा अभ्यास करण्याचें काय प्रयोजन ? तर त्याचें कारण हेंच कीं आपल्याला भगवंताची विस्मृति झाली आहे. भगवंत हा प्रेममूर्ति आहे, म्हणून मंदिरात जिकडे तिकडे प्रेम भरून टाकावें. दुसरा काय करतो हें न पाहातां आपण काय करायला पाहिजे याचा अगोदर विचार करावा. आपण आपलें मागलें पुढलें सर्व भगवंताला अर्पण करावें, मग पुढच्याची जबाबदारी त्याच्यावर पडते.

---

१४२. भगवंताचें नाम घेणें हें ज्ञान होण्याचेंच लक्षण आहे. भगवंताकडे लक्ष लागलें कीं, आत्मज्ञान आपोआप होतें.

# साधनाची जोपासना–गुरुवर अत्यंत श्रद्धा ठेवावी

२२ मे

कुस्त्या खेळून, झगडून, शरीरबल वाढतें; अवघड उदाहरणें सोडवून बुद्धिबळ वाढतें; तसेंच आलेल्या परिस्थितीला तोंड देऊन समाधानानें राहण्यानें आत्मिक बळ वाढतें. आत्मिक बळ वाढणें म्हणजे देहबुद्धि कमी होणें, आणि तें करण्याकरितांच परमेश्वर संकटें धाडतो; पण तुम्ही त्यांना भितां याला काय म्हणावें ? अशा स्थितींत संकटें परत घेणें म्हणजे तुमचें अनहित करणें होय. त्याला तुमचें हित कशात आहे हें उत्तम कळतें. **भोग समाधानानें भोगण्यांत पुरुषार्थ आहे.** दुखणें आलें असतां औषध घ्यावें. पण औषधांत गुण तरी परमात्म्यानेंच ठेवला ना? औषधानें तरी गुण हमखास येतोच असें थोडेंच आहे? एकाला येतो, एकाला नाहीं; ज्याचें ज्यांत हित होणें असेल तसें तो परमात्मा करतो हें लक्षांत ठेवावें. तुम्हीं एकच करावें, परमात्म्याला शरण जाऊन, ' हा भोग भोगण्याची मला ताकद दे, समाधान भंगूं देऊं नकोस, तुझें सतत स्मरण व्हावें,' असें मागावें. दुखणें भोगायचें आहे तर तें समाधानानें का नाहीं भोगूं ? प्रारब्धाचें तुमच्या डोक्यावरचें ओझें ( कर्ज ) तेवढ्या प्रमाणात कमी नाहीं का होणार ? दुखणें आलें असतां त्याची उपेक्षाच करावी, म्हणजे आपोआप तें कमी होईल.

मी म्हणजे अमुक एक, अशी आपल्या अस्तित्वाविषयीं जशी खात्री असतें, तशी देव आहे अशी खात्री पाहिजे. आपले सद्गुरु देवच आहेत अशी याप्रमाणें आपली खात्री झाली म्हणजे आपला सद्गुरुंच्या ठिकाणीं भाव आहे असें म्हणतां येईल. माझी सेवा तुम्ही जी करतां ती तुम्हीं आपल्या देहबुद्धीची केली; तुम्हांला जें पसंत पडेल तसें तुम्हीं केलें. **वास्तविक माझी सेवा म्हणजे मला जें आवडतें तें करणें, माझ्या आज्ञेत राहणें, नामस्मरण करणें, सर्वांभूतीं भगवद्भाव ठेवून कोणाचें मन न दुखवणें, परमात्माच सर्व करतो अशी भावना ठेवणें.** माझ्या सांगण्याचा परिणाम न होण्याचीं दोन कारणें असतील. एक कारण असें कीं, तुमच्या मनामध्यें परिवर्तन घडवून आणण्याची शक्तीच माझ्यामध्यें नसेल; किंवा दुसरें कारण असें कीं, तुम्हीं अभ्यास करीत नसाल. पण परमार्थांत एकदम फरक होणें बरें नव्हे. समजा, एखाद्याला आज १०५° ताप आहे आणि उद्यां तो एकदम ९५° झाला, तर तें बरें नाहीं. तसेंच, मनुष्य आज रागीट तर उद्यां एकदम शांत झाला तर तेंहि बरें नव्हे. आपल्यामध्यें हळूहळू परिवर्तन व्हावें, आणि तें विवेकानें घडवून आणावें.

---

**१४३. भजन, पूजन, नामस्मरण, इत्यादि आपण जें करतों तें आपल्या मनापर्यंत पोचलें पाहिजे, तरच त्याचा योग्य तो परिणाम लवकर दिसूं शकेल.**

श्रीराम

# साधनाची जोपासना–देवाकरितां स्वतःला विसरावें

२३ मे

तुम्हीं स्वतःला दिवसांतून एकदां तरी विसरतां कीं नाहीं ? हल्लीं आपण आपल्याला विसरतों, पण तें विषयाकरितां विसरतों. स्वतःला विसरावें, पण तें विषयाकरितां विसरूं नये. एखादे वेळेस असें होतें कीं एखादी आनंदाची बातमी समजली म्हणजे आपण काय करतों हें आपलें आपल्यालाच समजत नाहीं. अशा वेळीं देह भानावर नसतो हेंच खरें. त्याचप्रमाणें दुःखाची बातमी कळली म्हणजे होतें. थोडक्यांत म्हणजे, आपण जेव्हां विषयाच्या आधीन होतों तेव्हां आपण देहाला विसरून विषय भोगतों; त्याचप्रमाणें क्रोधाचें होतें. विषयासाठीं देहभान विसरणें हें केव्हांहि वाईटच. **परंतु देवाकरितां जर आपण आपल्याला विसरलों तर तें फारच उत्तम.** भजन करीत असतांना देहभाव विसरून भजन करावें. आपण आतां तसें करतों का ? भजन म्हणत असतांना कोणी ताल चुकला कीं लगेच आपण रागावतों, तर तें खरें भजन होत नाहीं. म्हणून **भजन करतांना, मी देवापुढें आहे आणि तो आणि मी याच्याशिवाय दुसरे कोणी नाहीं, असें मानूनच भजन करावें** आणि तशी संवय ठेवावी, म्हणजे देहभाव विसरतां येईल. संसारांत आपण कोण हें न विसरतां संसार करावा; म्हणजेच, विषयाच्या आधीन केव्हांहि न होतां संसार करावा. स्वतःची आठवण ठेवून प्रपंच केला तर तो आपल्याला बाधक व्हायचा नाहीं. व्यवहारांत काम, क्रोध, लोभ, वगैरे सर्व कांहीं असावें, पण आपण त्यांच्या स्वाधीन न होतां, त्यांना आपल्या ताब्यांत ठेवून वागावें; म्हणजे देहभाव आपोआप नष्ट होऊन जाईल. हें सर्व साधायला, परमेश्वराला शरण जाणें हा एकच सोपा मार्ग आहे; आणि त्याकरितां नामस्मरणांत राहणें हेंच साधन आहे. कोणी बारा अन् बारा चोवीस वर्षें साधनांत राहूनहि कांहीं काम झालें नाहीं असें म्हणतात, आणि यांत कांहीं अर्थ नाहीं म्हणून सोडूनहि देतात; तेव्हां अशा लोकांतच अर्थ नसतो, कीं गुरूंत कांहीं नसतें ? तर आपले आपणच याला कारणीभूत असतों हें पक्कें समजावें. संन्यास घ्यायचा असेल तर बायकोला बरोबर घेऊन संन्यास घेतां येईल का ? त्याप्रमाणें, विषय बरोबर घेऊन गुरूकडे गेलों तर गुरूची खरी भेट होईल का ? तें शक्य नाहीं. याकरितां, ते सांगतील तें साधन आधीं करावें म्हणजे चित्त शुद्ध होतें, आणि तें झाल्यावर त्यांची खरी भेट होते; मग आपल्याला त्यांच्यापासून जी जी प्राप्ति मिळावयाची ती मिळते. म्हणून आपण त्यांच्याजवळ खरें समाधान मागावें आणि तें मिळाल्यावर आणखी काय मिळवण्याचें राहतें ? मग तो ज्या स्थितींत ठेवील त्यांतच समाधान होतें. देहभोगाची अशा वेळीं कांहींच किंमत राहात नाहीं, आणि मग त्याला कंटाळण्याचेंहि कारण उरत नाहीं. संतांच्याकडे जाऊन "वस्तु" मिळवावयाची नसून समाधान मिळवायचें असतें.

---

१४४. ज्याचें समाधान भगवंतावर अवलंबून आहे, त्याचें समाधान कोणत्याहि परिस्थितीमध्यें टिकेल.

# साधनाची जोपासना-प्राणाबरोबर नाम सांभाळावें

२४ मे

समजा, ब्राह्मणांकरितां पंचपक्वान्नांचें जेवण तयार केलें, आणि तें ढोरांना घातलें; तर त्याचा उपयोग बरोबर केला असें होईल का ? तर नाही. **तसें आपल्याला जिव्हा दिली आहे ती जर नामस्मरण करण्याव्यतिरिक्त वापरली तर तें चांगलें होईल का ?** जें करण्यानें देवाची प्राप्ति होतें तें न करतां इतर गोष्टी बोलून वेळ घालविला तर कसें चालेल ? तुम्ही अभ्यास करतां; अभ्यासाकरितां जीं पुस्तकें घेतलीं तीं जर नुसतीं उशाला घेऊं लागलांत तर अभ्यास होईल का ? म्हणून म्हणतों, आपल्याला जिव्हा दिली आहे तिचा उपयोग नामस्मरण करण्याकरितां करा. प्रकृति चांगली सुदृढ आहे। चांगलें धट्टेकट्टे पाय आहेत, ते जर देवाच्या प्राप्तीकरितां वापरलें नाहींत, तर पाय नसलेले काय वाईट ? गाय देऊन गाढव घेऊं नका. तुमच्यापुढें ब्रह्मानंदबुवांचें प्रत्यक्ष उदाहरण असून असें का करतां ? त्यांनीं काय केलें पाहा ! त्यांनीं नामस्मरणाशिवाय दुसरें कांहींच केलें नाहीं. **त्यांनीं प्राणाबरोबर नाम सांभाळलें.** तुम्हांला जितकें देहाचें प्रेम आहे, तितकें त्यांचें नामावर प्रेम होतें. तुम्हांला तितकें जरी करता आलें नाहीं तरी, जसें तुम्ही देहावर प्रेम करतां तसें तरी नामावर ठेवा आतांच्या दिवसांत तर कलीचा एक एक दिवस देवावरचा भाव घालविण्याला कारण होतो; तरी यावेळेस सांभाळा. अश्रद्धा उत्पन्न झाली तर आपलें पापच आड येतें असें समजा; आणि त्या वेळेस नामस्मरण करीत जा. माझ्यावर व्यवहाराबाबत पाहिजे तर विश्वास ठेवूं नका, पण नामस्मरण करायला सांगतों त्यावर विश्वास ठेवा.

**नाम व्यवहाराकरितां उपयोगांत आणूं नका. नामस्मरण नामाकरताच करीत जा; म्हणजेच खरा आनंद तुम्हांला मिळेल.** दिवसांतून किती वेळ आपण नामांत घालविला त्याचा रोज विचार करीत जा, आणि कांहीं वेळ तरी नामांत घालविण्याचा निश्चय करा; म्हणजे विश्वास वाढत जाईल. खरें समाधान तुम्हांला नामांतच मिळेल. **भगवंताचें नाम हें स्वयंभू आणि स्वाभाविक आहे.** नामाबद्दल संशय किंवा विकल्प आले तरी तें तसेंच आग्रहानें घ्यावें, सर्व संशय आपोआप नाहींसे होतील. खरोखर भगवंताचें नाम हें बँकेंत ठेवलेल्या पैशाप्रमाणें आहे. वेळप्रसंगीं तें खास उपयोगी पडतें. **विकल्पांच्या उच्चाटनाची गुरुकिल्ली म्हणजे नाम होय.**

---

**१४५.** सगुण अवतारानें वासना किंवा बुद्धि पालटण्याचें कार्य होऊं शकत नाहीं. सद्‌बुद्धि **उत्पन्न करण्याचें सामर्थ्य फक्त भगवंताच्या नामांतच आहे.**

# साधनाची जोपासना-वासना भगवंताकडे वळवावी

**२५ मे**

घरामध्यें सर्वांनीं कसें हंसूनखेळून मजेंत असावें. आपली वृत्ति अशी असावी कीं, ज्याला आनंद पाहिजे असेल त्यानें आपल्याकडे धांव घ्यावी. इतर संपत्ति कितीहि दिली तरी पुरें पडत नाहीं, पण वृत्तीचा आनंद देऊन कधी संपत नाहीं. **जीवन हें मूलतः आनंदमय आहे. सृष्टिक्रमावर सोडलें तर ते सुखी होईल.** आनंद अत्यंत विशाल आहे. देहबुद्धि मेली म्हणजेच त्याची प्राप्ति होत असते. आनंद मिळविणें हें सोपें आहे; पण हें समजून आपण सोपें झालें पाहिजे. आपण उपाधीनें जड झालों आहोंत, म्हणून आपण हलकें झालें पाहिजे. **सर्व जगाला आनंद हवा असतो.** अत्यंत दुःखाचा प्रसंग आला असतां मनुष्य जें मोठ्यानें रडतो ते सुद्धां तो आनंदासाठींच करतो. म्हणून कोणत्याहि परिस्थितींत आनंद राखावा. **आनंद हा शाश्वत आहे; पण आपण विषयांतच आनंद मानतो. त्यामुळें खरा शाश्वत आनंद आपल्याला मिळत नाहीं.** फोड आला म्हणजे खाज सुटते, आणि खाजवल्यावर रक्त आलें तरी एक प्रकारचा आनंद आपल्याला होत असतो; पण म्हणून खाजवतच राहणें योग्य होईल का? कुत्र्याच्या तोंडांत हाड असतांना स्वतःच्या तोंडांतलें रक्तच तो चघळत असतो; त्यांतलें कांहीं रक्त जमिनीवर पडून कमी होत असतें, परंतु तो हाडूक कांहीं सोडीत नाहीं. विषयाचा आनंद हा असाच असतो. कोणतीहि वस्तु अस्तित्वांत नसतांहि होणारा जो आनंद तें परमात्म्याचें व्यक्त स्वरूप आहे, हास्य हें अत्यंत सूक्ष्म आहे. भगवंताच्या हास्यमुखाचें ध्यान करावें. वासना भगवंताकडे वळविली कीं मग आनंदाशिवाय दुसरा कोणता लाभ होणार? खरोखर वासना ही विस्तवासारखी आहे. ज्या विस्तवानें सुंदर स्वयंपाक करून कढत आणि ताजें अन्न खायला मिळतें, तोच विस्तव जर घरावर ठेवला तर घर जाळून टाकतो. त्याप्रमाणें, **वासना भगवंताकडे वळली तर माणसाला आनंदरूप बनविते; पण ती जर विषयाकडे वळली तर त्याला दुःखामध्ये लोटते.** वासना रोज नवीन नवीन खेळ आपल्याला दाखविते; म्हणजे खेळ जुनेच असतात, पण आपली वासना, मात्र नवी असते. वासना, म्हणजे अभिमान किंवा मीपणा हा मनुष्याचा शत्रु असून तो त्याच्या आनंदावर विरजण घालतो. वासनेमुळें चित्ताला समाधान नाहीं हें कबूल असूनसुद्धां, वासनेचा जोर इतका विलक्षण असतो कीं तो शेवटच्या श्वासापर्यंत जात नाहीं. **ज्यानें वासनेला जिंकलें त्याच्यावर भगवंताची कृपा झाली म्हणून समजावें. वासनेला जिंकायला भगवंताच्या नामांत राहण्यासारखा दुसरा उपाय नाहीं. वासना न ठेवतां कर्म करणें याचेंच नांव संन्यास. जिथें वासना संपली तिथें आनंदच आहे.** जें जपावें असें आम्ही म्हणतों तें काढून घेणें म्हणजे चोरीच झाली. वासनेमुळे माझ्या आनंदाचा भंग होतो, म्हणजे वासना माझ्या आनंदाची चोरीच करते; ज्या समाधानाकरितां माझी खटपट चाललेली असतें तें समाधानच वासना हिरावून नेते. नामस्मरणानें या वासनेला योग्य दिशा मिळते. म्हणून सदासर्वकाळ नामांत राहिलें तर हळूहळू तिचा अंत होऊन केवळ आनंदच आपल्याजवळ राहील.

१४६. नाम घेणारा जो "मी" त्या एकाचा अंत होणें म्हणजे खरा एकांत होय. नाम **घेतां घेतां इतकें रंगून जाणें जरूर आहे कीं त्याचें पर्यवसान एकान्तात झालें पाहिजे.**

# साधनाची जोपासना–भगवंताचे स्मरण ही सद्बुद्धीच

२६ मे

परमेश्वर सर्व ठिकाणीं भरलेला आहे, सर्व विश्व व्यापून आहे। मग त्याच्या अस्तित्वाची जाणीव प्रत्येकाला कां होत नाही? आवाज कुठेंहि झाला तरी तो सर्व जगांत पसरतो, पण तो सर्वांनाच कांहीं ऐकूं जात नाहीं, हा अनुभव सर्वांना आहे. ज्याच्याकडे रेडिओ आहे, त्याला पृथ्वीच्या पाठीवर कुठेंहि झालेला आवाज ऐकूं येतो, तसा तो इतरांना येत नाहीं. तसेंच, ज्याची भावना प्रगल्भ झाली असेल त्यालाच परमेश्वराचें अस्तित्व जाणवेल, इतरांना नाहीं; म्हणून तशी भावना असणें जरूर आहे, आणि ती उत्पन्न होण्यासाठीं परमेश्वराच्या स्मरणाची आवश्यकता आहे. **मी नामस्मरण करतों असें जो म्हणतो तो माझ्यावर उपकार करतो असें मला वाटतें. कारण जी व्यक्ति नामस्मरण करते ती स्वतःचा उद्धार करून घेत असते, म्हणजे पर्यायानें माझ्यावर उपकारच करीत असते.**

दुसरी एक शंका बुद्धिवाद्यांना अशी येते कीं, परमेश्वर हा जर बुद्धिदाता आहे तर मग दुर्बुद्धि झाली तर तो दोष माणसाचा कसा म्हणतां येईल? याला उत्तर असे कीं, बुद्धिदाता परमेश्वर आहे हें अगदीं खरें, पण त्या बुद्धिची सद्बुद्धि–दुर्बुद्धि कां होते हें पाहणें जरूर आहे. प्रकाश-काळोख या दोहोंलाहि कारण सूर्यच असतो. सूर्याचें अस्तित्व हें उजेडाला आणि नास्तित्व हें काळोखाला कारण आहे. तसें भगवंताचें स्मरण हें सद्बुद्धिला आणि विस्मरण हें दुर्बुद्धिला कारण आहे. म्हणून बुद्धिदाता परमेश्वर हें जरी खरें असलें, तरी सद्बुद्धि वा दुर्बुद्धि ठेवणें हें मनुष्याच्या हातांत आहे. **भगवंताचे स्मरण ठेवलें म्हणजे दुर्बुद्धि होणार नाही; म्हणून नेहमीं भगवंताच्या स्मरणांत राहावे; आणि याला उपाय म्हणजे नामस्मरण.** सर्व सोडून भगवंताच्या स्मरणात राहिलें पाहिजे; परंतु व्यवहार नीट करून त्यामध्ये भगवंताचें अनुसंधान ठेवणें हें त्याहिपेक्षां श्रेष्ठ होय. भगवंताच्या कृपेनें प्राप्त झालेला आजचा दिवस आपण त्याच्याकडेच लावणें जरूर आहे. भगवंताचें अनुसंधान ठेवलें म्हणजे दिवस त्याच्याकडेच लागतो. अशा रीतीनें आजचा दिवस भगवंताच्या अनुसंधानांत घालविला तर आपल्याला नित्य दिवाळीच आहे. अनुसंधानात स्त्री-पुरुष, श्रीमंत-गरीब, हे भेद नाहींत. इतर साधनांनीं जे साधायचें तें नुसत्या अनुसंधानानें साधतें हाच या युगाचा महिमा आहे. **इतर विषय मनांत न येतां एकाच विषयावर मन एकाग्र होणें याला अनुसंधान असें म्हणतात.** भगवंताचें अनुसंधान हेंच खरें पुण्य होय, आणि हीच आयुष्यांत मिळविण्याची एकमेव गोष्ट होय. एका भगवंताचें अनुसंधान ठेवा म्हणजे इतर सर्व गुण आपोआप मागें चालत येतील. भगवंताला अनन्यभावें अशी प्रार्थना करावी कीं, "देवा, प्रारब्धानें आलेले भोग येऊं देत, पण तुझें अनुसंधान मात्र चुकूं देऊं नको."

---

१४७. नाम घेता घेतां "मी नाम घेतों" हेंहि स्मरण जेव्हां राहात नाहीं, तेव्हां त्याला एकान्त असें म्हणतात, मग अशा स्थितींत चित्त भगवंताकडे आहे कीं नाहीं असा प्रश्न करायला वावच कुठें राहतो?

# साधनाची जोपासना-भगवंताची सेवा या भावनेनें परोपकार करावा

२७ मे

प्रत्येक मनुष्याला परोपकाराची बुद्धि असणें अत्यंत जरूर आहे. पण तो कोणाला शक्य आहे आणि तो कोणीं करावा याचा विचार करायला पाहिजे. ज्या शेतांत पाणी भरपूर पुरून उरत असेल त्याच शेतातलें पाणी बाहेर टाकतां येतें, आणि तें हितावहहि होतें. इतर शेतांच्या बाबतींत तें होत नाहीं; कारण ज्या शेतांत स्वतःच्या पिकालाच पुरण्यापुरतें पाणी नाहीं, त्यानें पाणी बाहेर टाकण्याचा विचार करणें हास्यास्पद होईल. अशा शेताला पुरेसें पाणी कसें मिळेल याचाच आधीं विचार करणें जरूर आहे. हीच दृष्टि परोपकार करणाऱ्या व्यक्तीनें ठेवावी. ज्या महात्म्यांनीं स्वतःचा उद्धार करून घेऊन जगाच्या कल्याणाकरितांच जन्म घेतला त्यांनाच परोपकाराचा अधिकार. मग प्रश्न असा येतो कीं, इतरांनीं परोपकाराची बुद्धि ठेवूं नये आणि तसा प्रयत्नहि करूं नये कीं काय? तर तसें नाहीं. परोपकाराची बुद्धि आणि प्रयत्न असणेंच जरूर आहे. परंतु परोपकार म्हणजे काय, आणि त्याचा दुष्परिणाम न होऊं देतां तो कसा करतां येईल, हें पाहणें आवश्यक आहे. भगवंताची सेवा या भावनेनें दुसऱ्याकरितां केलेली मेहनत याला परोपकार म्हणतां येईल आणि त्यापासून नुकसान होण्याची भीति नाहीं; परंतु हें वाटतें तितकें सोपें नाहीं; कारण मनुष्याची सहज प्रवृत्ती अशी कीं, थोडेसें कांहीं आपल्या हातून झालें कीं तें मीं केलें, मी असा चांगला आहें अशा तऱ्हेचा विचार येऊन अभिमानाला बळी पडावें; आणि यासाठींच परोपकार न झालेला बरा असें म्हणावें लागतें. सबब, ज्या ज्या वेळीं दुसऱ्याकरितां काहीं करण्याची संधि मिळेल त्या त्या वेळीं तिचा फायदा घेऊन मनाला अशी शिकवण द्यावी कीं, "देवा, तुझ्या सेवेचा लाभ मला दिलास ही माझ्यावर कृपा झाली आणि अशीच कृपा ठेवून आणखी सेवा करून घे." ही विचारसरणी जागृत राहिली तरच परोपकाराच्या फंदांत पडावें, नाहीं तर आपला कसा घात होईल याचा पत्ताच लागणार नाहीं. म्हणून अत्यंत जपून वागणें जरूर आहे. परोपकार याचा सरळ अर्थ असा कीं, पर-उपकार; म्हणजे दुसऱ्यावर केलेला उपकार. यावरून असें लक्षात येईल कीं, परोपकाराला दोन व्यक्तींची गरज लागते. एक उपकार करणारा, आणि दुसरा उपकार करून घेणारा. जगांतल्या सर्वसाधारण व्यक्ति पाहिल्या तर आपल्या स्वतःवरून असें दिसतें कीं, मी एक निराळा, आणि प्रत्येक व्यक्ति आणि वस्तुमात्रागणिक सर्व जग निराळें. मनाच्या या ठेवणीमुळेंच, जर आपल्या हातून दुसऱ्याचें कधींकाळीं एखादें काम होण्याचा योग आला, तर 'मी दुसऱ्याचें काम केलें' ही जाणीव होऊन अहंकार झपाट्यानें वाढूं लागतो. म्हणून परोपकाराच्या बाबतींत अत्यंत सावध राहण्याची सूचना सर्व संतांनीं दिली आहे. **नामांत राहिलें म्हणजे अहंकार नाहींसा होऊन सावधानता येते आणि चित्त शांत होतें.**

१४८. बाईला मूल झालें कीं, त्याच्यावर ती आपोआप प्रेम करते, तसें नाम मुखीं आलें कीं सत्कर्मे आपोआपच होऊं लागतात.

# साधनाची जोपासना–प्रपंच देवाचा मानून करावा

२८ मे

**अमुक एक हवें किंवा अमुक एक नको असें न वाटणें याचें नांव वैराग्य. संकटकाळीं, हें संकट नसावें असें न वाटतां परमेश्वराचें स्मरण असावें, आणि त्याच्याजवळ हें मागावें कीं, " देवा, मला तुजजवळ कांहींहि मागण्याची इच्छा देऊं नको."** संकटें मीं मुद्दाम तुमच्या परीक्षेकरितां पाठविलेलीं असतात. आणि मलाच तुम्हीं तीं दूर करा अशी प्रार्थना करतां, याला काय म्हणावें ? **देहास मुद्दाम कष्ट देऊं नयेत, पण जेव्हां ते आपोआप येतात तेव्हां मात्र ते आनंदानें सोसावेत.** पुरूरव्यानें दुष्कृत्य केलें आणि त्यामुळें त्याला वैराग्य प्राप्त झालें. तेव्हा त्याला दुष्कृत्य म्हणावें कीं सत्कृत्य ? वैराग्यप्राप्तीचा वास्तविक हा कांहीं मार्ग नाहीं, आपण शास्त्राविरुद्ध कर्म करूं नये आणि दुसऱ्यानें केलें तर नांवें ठेवूं नयेत. न जाणो, परमात्म्याची इच्छा असल्यास त्यांतूनच चांगलें होण्याचा संभव आहे. प्रपंच मिथ्या मानावा, आणि जो मिथ्या तो बरा असें वाटण्यांत काय अर्थ ? तो जसा असेल तसा असेल; नाटकांत नट जसें काम करतो त्याप्रमाणें प्रपंचांत आपण आपलें काम करावें. तुमचा परमार्थहि तुमच्या स्वाधीन नाहीं, तो सद्‌गुरूच तुमच्याकरितां करीत असतात; तेव्हां तुम्हीं कशाचीहि काळजी करूं नये. जें होईल त्यांत आनंद मानीत राहावें, **सद्‌गुरुदर्शनानें पूर्वकर्में–पापें जळून जातात, तुमची पुढची काळजी सद्‌गुरु घेतात; तेव्हां पाठीमागची आठवण काढीत बसूं नये आणि काळजी करूं नये, समाधानांत आणि आनंदांत असावें. प्रपंच देवाचा मानून अभिमानरहितपणें तो करणें हा परमार्थ. परमेश्वराचें स्मरण ठेवून तोच कर्ता आहे असें मानणें, आणि सर्व कांहीं त्याच्याकरितां करणें, म्हणजे देवाला अर्पण केल्यासारखेंच आहे.** फक्त कर्माच्या शेवटींच कृष्णार्पण म्हणणें, म्हणजे इतर वेळ त्याला विसरला असें नाहीं का होत ? देवापाशीं " भला तूं आपला म्हण, मन तुझ्या चरणीं अर्पण केलें, मला तुजजवळ कांहींहि मागण्याची इच्छा न होवो, " असें मागावें, नाहीं तर, जो राज्य देण्याला समर्थ आहे त्याच्याजवळ केरसुणी मागितल्याप्रमाणें होईल. भगवंताची मनापासून प्रार्थना करावी, आपल्याला तो बरोबर मार्ग दाखवितो. आपण अंधारामध्यें वाट चालत असतां एक क्षणभरच वीज चमकते, परंतु त्यामुळें पुढचा सगळा रस्ता आपल्याला दिसतो. त्याचप्रमाणें मनापासून भगवंताचें स्मरण केलें असतां पुढच्या मार्गाचें आपल्याला आपोआप ज्ञान होतें. " तूं जें देशील तें मला आवडेल, " असें आपण भगवंताला सांगावें, आणि भगवंताचें अखंड स्मरण ठेवावें, यापेक्षां भगवंताच्याजवळ जायला दुसरा मार्ग कोणता असणार ?

---

१४९. नाम घेणाऱ्याला सत्कर्म टाळूं म्हटलें तरी टाळतां येणार नाहीं.

# साधनाची जोपासना-भगवंताची तळमळ लागायला पाहिजे

२९ मे

ज्याला जें आवडतें तें आपण केलें तर त्याला गोड लागतें. भगवंताला प्रेमाशिवाय दुसऱ्या कशाचीच गरज नसते. भगवंताचें प्रेम यायला त्याच्याशीं आपलेपणा लावून ठेवावा. भगवंत जोडल्याशिवाय नाहींच राहणार असें ठरवावें. निश्चय आहे तिथें सर्व काहीं सुचतें. तळमळ लागलीं म्हणजे मार्ग दिसतो. साधुसंत मार्ग दाखवायला सतत तयार असतात; मात्र आपण आपली देहबुद्धि बाजूला ठेवून त्यांना शरण जावें. भगवंत जोडावा हें ठरल्यावर, मला लोक नांवें ठेवतील याचा कशाला विचार करावा ! सर्व जग जर भगवंताचें आहे तर मग काळजीचें कारण काय ! उपाधि कोणीं लावून घेतली माझी मीच ! मी निर्दोष होईन तेव्हांच लोक मला तसे दिसतील. आपल्या सर्व अवगुणांना कारण म्हणजे 'मी रामाला विसरलों' हेंच आहे. **परमात्म्याचा विसर पडतो हेंच खरें पाप.** कोणी पाहात नसेल तिथें वाईट कर्म आपण करतों, **पण भगवंत चोहोंकडे पाहतो अशी जाणीव ठेवली म्हणजे असें पाप घडणार नाहीं. कोणतेंहि कर्म करतांना फळाची आशा धरली तर तें घातुक होतें. ज्यानें भगवंत जवळ आणला जातो तेंच चांगलें कृत्य.** स्नानसंध्या केली आणि खोटीं कर्में केलीं तर त्या संध्येचा काय उपयोग ! **कोणत्याहि स्थितींत वृत्ति कायम राखणें हेंच योगाचें सार आहे. मनांत कोणताहि हेतु न धरतां परमेश्वरावर श्रद्धा ठेवून वागावें. मन परमेश्वराला अर्पण करावें, तें दुसरीकडे गुंतवूं नये.** एकदा अर्पण केलेल्या मनाला जर पुनः विषयाचा आनंद झाला तर तें अर्पण झालें नाहीं असें समजावें. माझा प्रपंच व्हायचा असेल तसा होवो, पण तुमचा विसर पडूं देऊं नका, असें अनन्यभावानें भगवंताला म्हणावें. कोणत्याहि गलबल्याला नाहीं भिऊं. एका वेड्याला आकाश डोक्यावर पडेल असें वाटत असे; पण कुठेंहि गेलें तरी आकाश डोक्यावर राहणारच ! त्याप्रमाणें रानांत गेलें तरी मनाचा गलबला असणारच. प्रत्येक कृतींत, 'मी भगवंताचा आहे' ही जाणीव ठेवावी. **पडत्या काळांतहि जो भगवंताचा होऊन राहतो त्याला कशाचीच भीति नाहीं वाटत.** पांडवांच्याजवळ प्रत्यक्ष भगवंत असतांना त्यांना कितीं संकटे सोसावीं लागलीं ! संकटे येऊं देऊन मग त्यांतून बाहेर काढण्यापेक्षां भगवंतानें संकटें टाळलींच का नाहींत ! याचें उत्तर देणें सोपें आहे. पुष्कळ वेळां आपल्यावर येणारें संकट कोणीं टाळलें तर तें संकट येणारच नव्हतें असें आपण समजतों. शिवाय "असें केलें असतें तर बरें झालें असतें" अशा प्रकारचे तर्क लढवतों. खरें सांगावयाचें म्हणजे संकटे हीं आपल्या कर्मांचेंच फळ असतात, संकटांमध्यें भगवंताच्या अस्तित्वाची जाणीव राहिली तर ती आपल्याला समाधान देते. ज्यांना सर्व अनुकूल आहे त्यांनादेखील समाधान हें नसतेंच; म्हणून ज्यांना तितकी अनुकूलता नाहीं त्यांनीं त्याबद्दल असमाधान ठेवण्याचें कारण नाहीं. कारण समाधान हें त्यामध्यें नाहींच नाहीं. **असमाधान हा रोग सर्वांचा एकच आहे,** आणि **भगवंताचें स्मरण हें औषधहि सर्वांना एकच आहे;** आणि **समाधान हा गुणहि सर्वांचा तोच आहे.**

---

१५०. ज्याचें समाधान भगवंतावर अवलंबून आहे, त्याचें समाधान कोणत्याहि परिस्थितीमध्यें टिकेल.

# साधनाची जोपासना–सर्वांचें विस्मरण करून रामच आठवावा

३० मे

**अकर्तेपणें करीत राहावें कर्म । हाच परमात्मा आपलासा करून घेण्याचा मार्ग ।।** न करावा कोणाचा द्वेष मत्सर । सर्वांत पाहावा आपला रघुवीर ।। परनिंदा टाळावी । **स्वतःकडे दृष्टि वळवावी ।।** गुणांचें करावें संवर्धन । दोषांचें करावें उच्चाटन ।। मन करावें घट्ट जसें कांहीं पाषाण । बाहेरील सृष्टीचे आघात । हेच दगडावरील टांके जाण ।। जेथें जेथें जावें । चटका लावूनच यावें ।। याला उपाय एकच जाण । रघुनाथावांचून न आवड दुजी जाण ।। देहाचें दुःख अत्यंत भारी । रामकृपेनें त्याची जाणीव दूर करी ।। कर्ता राम हें जाणून चित्तीं । जगांत वर्तावें निश्चिती ।। मनावर कशाचाहि न होऊं द्यावा परिणाम । हें पूर्ण जाणून, कीं माझा त्राता राम ।। प्रपंचाचा व्यास । गेला । त्यानें राम जवळ केला ।। अभिमान नसावा तिळभरी । निर्भय असावें अंतरीं ।। जें दुःख देणें आलें रामाचें मनीं । तें तूं सुख मानीं ।। देह टाकावा प्रारब्धावर । आपण मात्र साधनाहून नाहीं होऊं दूर ।। मी असावें रामाचें । याहून जगीं दुसरें न दिसावें साचे ।। प्रपंचांतील सुखदुःख ठेवावे देहाचें माथीं । आपण न सोडावें रघुनाथा । आपण नाहीं म्हणूं कळलें जाण । ज्ञानाचे दाखवावें अज्ञान ।। दोष न पाहावें जगाचें । आपले आपण सुधारून घ्यावें साचे ।। कोणास न लावावा धक्का । हाच नेम तुम्ही राखा ।। एक रामसेवा अंतरीं । सर्वांभूतीं भगवद्भाव धरीं ।। राम ज्याचा धनी ।। त्यानें न व्हावें दैन्यवाणी ।। नका मागूं कुणा कांहीं । भाव मात्र ठेवा रामापायीं ।। **वाईटांतून साधावें आपलें हित । हें ठेवावें मनीं निश्चित ।।** भगवंताचें विस्मरण । हें वस्तूच्या मोहाला कारण ।। **म्हणून भक्ति व नाम । याशिवाय ऐकूं नये कोणाचें ज्ञान ।।** परिस्थितीचा निर्माता परमात्मा जाण । त्यांतच त्यास पाहावें आपण ।। सर्व भलेंबुरें रामाचे हातीं । हें आहे निश्चित । आपण राहावें सुखदुःखातीत ।। सर्व कर्ता राम हा भाव ठेवता चित्तीं । खऱ्या विचारांची जोडेल संगति ।। रघुनाथस्मरणांत असावें आनंदात । तेथें न चाले कोणाची मात ।। व्यवहारांतील लाभ आणि हानि । मनापासून आपण न मानी ।। मी आहें रामाचा ही जाणीव ठेवून मनीं । सुखानें वर्तत जावें जनीं ।। **एकच क्षण ऐसा यावा । जेणें सर्वांचे विस्मरण करून रामच आठवावा ।** रामाविण उठे जी जी वृत्ति । त्यासी आपण न व्हावें सांगाती ।। मी रामाचा हें जाणून । वृत्ति ठेवावी समाधान ।। धन्य मी झालो । रामाचा होऊन राहिलों । ही बनवावी वृत्ति । जेणें संतोषेल रघुपति ।। वृत्ति बनविण्याचें साधन । राखावें परमात्म्याचें अनुसंधान ।। जोंवर देहबुद्धि राहिली । तोंवर वृत्ति नाहीं स्थिरावली ।। शरीरसंपत्ति क्षीण झाली । तरी वृत्ति तशी नाहीं बनली ।। म्हणून वृत्ति राखावी रामापाशीं । दुजी उठूं न द्यावी त्या परती ।। विषयाधीन जरी होय वृत्ति । तरी दुरावेल तो रघुपति ।। संतांची जेथें वसति । तेथें आपली ठेवावी वृत्ति ।। सतत विवेक अखंड चित्तीं । रामनामीं मनोवृत्ती । हेचि तुम्हां परम प्राप्ती ।। **नामामध्यें ऐसी सत्ता । जेणें जोडे रघुनाथा ।।** अखंड रामनामीं निजध्यास चित्तीं । तेथें कांहींच न राहे भ्रांति ।। **नामापरतें न मानावें हित । हेंच आजवर सांगत आलों सत्य ।। सर्वस्वाची सोडावी आवडी ।** नामस्मरणें राम लवकर जोडी ।। भगवंताला आपलें होणें आवडतें फार । श्रीरामनामीं राहावें खबरदार ।।

---

**१५१. रघुनाथ स्मरणात असावें आनंदात । तेथें न चाले कोणाची मात ।।**

# साधनाची जोपासना–भगवंताला शरण जाऊन त्याचें होऊन राहावें

३१ मे

**मी जें जें करतों तें तें भगवंताकरतां करतों असें जो म्हणतो तो खरा आणि उत्तम भक्त होय.** कर्तेपण घालवायला उत्तम भक्त व्हावें लागतें. **भगवंतप्राप्तीशिवाय दुसरें कांहींहि नको असें वाटणें हें भक्ताचें लक्षण आहे.** चांगलें कार्य हेंसुद्धां बंधनाला कारणीभूत होत असतें; याकरितां कोणतेंहि कृत्य भगवंताला स्मरून करावें. भगवंताच्या स्मरणामध्यें स्नानाची आठवण झाली नाहीं तर त्याला पाप कसें म्हणावें ? **जो काळ भगवत्स्मरणांत जातो तोच काळ सुखांत जातो.** विषयासाठीं आपण स्वतःला विसरतो, मग भगवंताला आठवण्यांत नाहीं का स्वतःला विसरूं ? मला सगुणांत प्रेम येत नाहीं असें जोंपर्यंत वाटतें; तोंपर्यंत सगुणभक्ति करावी. गुरु-आज्ञाप्रमाणाचें बीज निर्गुणांतच आहे हें लक्षांत ठेवावें. गुरूच्या इच्छेप्रमाणें आपण वागलें म्हणजे माझी इच्छा नाहींशीच नाहीं का झाली ! यामध्यें अभिमान अनायासें मारला जातो. मीपणा टाकल्याशिवाय गुरुआज्ञा नाहीं पाळतां येत. गुरुआज्ञा प्रमाण मानून माझी इच्छा मी दाबूं लागलों तरीसुद्धां ती आपलें डोकें मधूनमधून वर काढतेच, पण तिला एकदा कळलें कीं हा ऐकत नाहीं की मग ती हळूहळू नाहींशी होत जांते. **देह अर्पण करण्यापर्यंत मजल आली तरी गुरुआज्ञा मोडूं नये.** देहातीत व्हायला गुरुआज्ञेप्रमाणें वागणें यापरतें दुसरें काय आहे ! " मी देही नाहीं " असें म्हणत राहिला तर माणूस केव्हांतरी देहातीत होईल.

दुसरा मार्ग म्हणजे " भगवंत माझा " असें म्हणावें, म्हणजे देहाचा विसर पडतो. **समर्थांचें नांव घेऊन मी सांगतो कीं तुम्ही नामाची वाट कधी सोडूं नका.** आपला धर्म आणि नीति सांभाळावी आणि सत्संगतीनें राहण्याचा प्रयत्न करावा. संत आणि प्रापंचिक दोघेहि प्रपंच करतात; पण प्रापंचिक कर्तेपणा आपल्याकडे घेतात, तर संत " राम कर्ता " असें म्हणून प्रपंच करतात. कर्तेपण तुम्ही आपल्याकडे घेतलेंत तर सुखदुःख भोगावें लागेल. बायको आजारी पडली तर रात्रंदिवस जागतो आणि स्वतःला विसरतो, मग भगवंताकरितां नाहीं का तसें करतां येणार ! तळमळ असली पाहिजे कीं मग सर्व कांहीं होतें. ' किती दिवसांत मुक्ति मिळेल ' याला समर्थांनीं फार चांगलें उत्तर दिलें आहे : " ज्या क्षणीं भगवंतस्मरणांत स्वतःला विसरला त्या क्षणीं मुक्ति मिळेल. " स्वतःला विसरणें म्हणजे निर्गुणांत जाणें. कृति करणाऱ्याचाच वेदान्त खरा असतो. मी विद्वान् आहें असें वाटूं लागलें कीं भगवंताचें भजन करण्याची लाज वाटते. याकरितां सतत भगवंताच्या नामाचा सहवास ठेवा. सहवासानें माणसाचेंसुद्धां प्रेम जर वाढतें तर भगवंताचा सहवास केला तर प्रेम नाहीं का येणार ! नाचावें, बागडावें, पण भगवद्भजनाला विसरूं नये. भगवंताला शरण जावें आणि त्याचें होऊन राहावें यांतच सर्व धर्मांचें आणि शास्त्रांचें सार आहे.

---

**१५२. नामांत प्रेम कां येत नाहीं ? तर नाम घेत नाहीं म्हणून !**

# कर्तेपणा टाकून भगवंताच्या स्मरणांत कर्तव्य करणें हाच परमार्थ

**१ जून**

दोरीला जो साप म्हणून समजला तो बद्ध, पण दोरीला दोरी म्हणून ज्यानें ओळखलें तो मुक्त समजावा. "देही मी नव्हे" हें ज्याला समजलें तो मुक्तच. सत्यज्ञान करून घेणें म्हणजेच मुक्तावस्था आहे, बद्धदशा आमची आम्ही निर्माण केली. माझें मजजवळच आहे, पण तें ठाऊक नाहीसें झालें आहे. जागें होणें म्हणजे मुक्तदशेला येणें आहे. भगवंताला विसरल्यानें 'मी देही' असें म्हणू लागला. देह तर माझ्या ताब्यांत नाहीं, तेव्हां मी देही नाहीं हें सिद्ध झालें. मला सुख नाहीं आणि दुःखहि नाहीं असें ज्याला वाटेल तो मुक्त समजावा. आपण कर्तेपण आपल्याकडे घेतों, आणि त्याबरोबर सुखदुःखहि आपल्याकडे येतें. कर्तेपण घातुक असतें. मीं एवढा मोठा वाडा बांधला, प्रपंच चांगला केला, असा प्रापंचिकाला अभिमान वाटतो, तर संन्यासी मठाचाच अभिमान धरून बसतो. म्हणजे या कर्तेपणाच्या बाधेतून दोघांचीहि सहजी सुटका होत नाहीं. हें कर्तेपण सोडावेंसें वाटलें तरी तें आपल्याला सुटत नाहीं. याचा आपल्याला नेहमीं अनुभव येतो. भगवंताचें अस्तित्व पटल्यानेंच कर्तेपण कमी होतो; म्हणून **भगवंत ठेवील त्यांत समाधान मानावें आणि भगवंताच्या अखंड स्मरणांत राहावें. भगवंताच्या स्मरणाशिवाय जेथें आपल्याला सुख होतें, तो विषय समजावा. विषयाच्या संगतींत परमात्म्यापासून वेगळें असणें याचें नांव प्रपंच; आणि परमात्म्याच्या संगतींत विषयांत राहणें याचेंच नांव परमार्थ.** काळजी, तळमळ आणि दुःख हीं बद्धपणाचीं लक्षणें होत, तर कोणत्याहि परिस्थितींत आनंदांत राहाणें हें मुक्तपणाचें लक्षण आहे. **फळाची अपेक्षा ठेवून आपण जी कृति करतों तें कर्म होय, पण फळाची कांहींहि अपेक्षा न ठेवतां आपण जें कर्म करतों तें कर्तव्य ठरतें; आणि असें कर्तव्य भगवंताच्या स्मरणांत करीत राहाणें हाच परमार्थ. हें करीत असतांना भगवंताला दृष्टिआड न होऊं देणें याचेंच नांव अनुसंधान होय.** समजा, आपण एखादें चांगलें पुस्तक वाचीत बसलों आहोत. इतक्यांत आपल्या पायाला एक मुंगी चावली. त्याची जाणीव आपल्याला कशी चटकन् होते! ती जाणीव सर्व शरीरभर व्यापून असते. त्याचप्रमाणें भगवंताच्या अनुसंधानानें प्रपंचाला व्यापून ठेवलें पाहिजे. प्रपंचांतला कोणताहि उद्योग करतांना अनुसंधान टिकवावें. ज्या ठिकाणीं आपल्या ओळखीचें कोणी नाहीं, आपलें आप्त कोणी नाहीं, जिथें आपल्याला कोणी मान देत नाहीं, अशा ठिकाणीं राहावें आणि अनुसंधानाचा अभ्यास करावा. जिथें कोणी आपल्या ओळखीचें नाहीं असें स्थान आपल्या अभ्यासाला फार चांगलें असतें. **भगवंताचें अनुसंधान आपल्याला भगवंताकडे घेऊन जातें. मी अनुसंधान टिकवीन असा मनाचा निश्चय करावा.** आपण प्रयत्न करीत असतां, भगवंत माझ्यामागें आहे ही भावनाच आपल्याला प्रपंचांतून उद्धरून नेईल याची खात्री बाळगा, आणि भगवंताच्या नामांत आनंदांत कालक्रमणा करा.

---

१५३. इतर साधनांनीं जें साधायचें तें नुसत्या अनुसंधानानें साधतें, हाच या युगाचा महिमा आहे.

# भगवंतावर अकारण प्रेम करणें म्हणजे परमार्थच

२ जून

जो प्रपंचात उबगला तो भगवंताला शरण गेला. मी ज्याला शरण गेलों तो मला बुडवील असें कधींहि मनात आणूं नये. आपलें असें आहे कीं, साध्वी बाईनें सांगितलेलें आपल्याला पटत नाहीं, पण बाहेरच्या बाईनें "आता तुमच्याजवळ पैसा नाहीं तेव्हां चपलेनें मारतें" असें सांगितलें तेव्हां आपल्याला पटतें. त्याप्रमाणें, साधुसंत सांगतात तें नाहीं पटत आपल्याला. आपण नामांत प्रेम आहे असें म्हणतों. आणि नामाची उत्पत्ति केव्हां झाली असें विचारतों ! अशा एका माणसाला मी विचारलें, "लग्नाची पद्धत केव्हां उत्पन्न झाली; आणि विषयांत सुख मिळतें हें केव्हांपासून झालें तें सांगावें."

खरोखर जगांत आणि लौकिकांत आपण अडाणी राहिलों तर कांहीं वाईट नाहीं. भगवंताच्या मार्गामध्यें त्याचा फायदाच होईल. आपण अडाणी झाल्याशिवाय, म्हणजे आपली विद्या आणि मोठेपण विसरल्याशिवाय, परमार्थ साधत नाहीं. मुलगा गांवाला जातांना ज्याप्रमाणें आई त्याला फराळाचें देतें, त्याप्रमाणें परमात्मा आपल्याला ज्या परिस्थितींत जन्माला घालतो त्या परिस्थितींत राहाण्यासाठीं लागणारें समाधानहि तो आपल्याला देत असतो. तें घ्यायची आपली लायकी मात्र पाहिजे. जिथें असमाधान फार तिथें दुष्ट शक्तींना काम करायला वाव मिळतो. याच्या उलट, जिथें खरें समाधान आहे तिथें चांगल्या शक्ती मदत करतात. देहाचा मनाशीं संबंध आहे, आणि मनाचा हृदयाशीं संबंध आहे. म्हणून मन नेहमीं अगदीं समाधानांत ठेवावें, म्हणजे प्रकृति चांगली राहून आयुष्य वाढेल.

स्वार्थ सुटतांना पहिल्या पहिल्यानें मनुष्य व्यवहाराच्या चौकटींत बसणार नाहीं. जो येईल त्याला तो आपलाच म्हणेल, पण परमार्थ मुरला कीं तो व्यवहार बरोबर करून शिवाय निःस्वार्थी राहील. खरोखर परमार्थ हें एक शास्त्र आहे; त्यामध्यें सुसूत्रपणा आहे. ज्यानें व्यवहार तपासून केला त्याला परमार्थ साधलाच. **भगवंतावर अकारण प्रेम करणें याचें नांव परमार्थ.** परमार्थाला डोकें शांत पाहिजे. एका गृहस्थाला सगळीकडे रामाची मूर्ति दिसूं लागली. झालें ! त्याला वाटलें कीं, देव आपल्याला भेटला; पण हें कांहीं खरें भगवंताचें दर्शन नव्हे. तो सर्व ठिकाणीं आहे अशी भावना झाली पाहिजे. परमार्थाची काळजी करूं नये. ती काळजीच प्रगतीच्या आड येते. वय वाढूं लागलें कीं आपले सर्व अवयव जसे प्रमाणांत आपोआप वाढतात, तसेंच परमार्थाला लागणाऱ्या गुणांचें आहे. आपण साधन करीत असतांना आपली प्रगति किती झाली हें सारखें पाहूं नये. समजा, आपण आपल्या परसांत एक झाड लावलें, आणि तें किती वाढलें हें पाहाण्यासाठीं रोज त्याच्या मुळ्या उपटून आपण जर पाहूं लागलों, तर तें झाड वाढेल का ! अगदीं तसेंच परमार्थाच्या प्रगतीचें आहे. मनुष्याला परमार्थ किती साधला हें त्याच्या बोलण्यावरून आणि दृष्टीवरून ओळखतां येतें.

**१५४. परमार्थ हा लोकांना उपदेश करण्यासाठीं नाहीं. तो निव्वळ स्वतःकरितां आहे.**

# परमार्थ कसा साधेल?

३ जून

असें पाहावें कीं, ज्याप्रमाणें घसा सुजला असताना, माठांतलें पाणी प्यायला कीं गूळ अधिक खाल्ला, अशी चौकशी करून मग वैद्य औषध देतो, त्याप्रमाणें सद्गुरु शिष्याच्या दुःखाचें मूळ जाणून मग त्याप्रमाणें कोणतें साधन करावें हें सांगतात. आमचा सद्गुरु एवढा अवतारी, मग माझ्यावर संकटें का आणतो, असें आपल्याला वाटतें. वास्तविक या मायाजालांतून सुटका व्हायला किंवा हा भवसागर पार व्हायला वशिला नाहीं चालत; त्याकरितां आपण स्वतः साधन करायला हवें.

**ज्याच्यापासून माया उत्पन्न झालीं त्याला शरण जावें.** त्याला शरण जाण्याच्या आड काय येतें तें पाहावें. **कर्तेपण टाका म्हणजे शरण जातां येतें.** आपण संतांच्या दर्शनाला जातों; आणि बायकोचें दुखणें बरें व्हावें असें म्हणतों; मग तें दर्शन खरें झालें म्हणायचें का? पोरांबाळां-करतां, बायकोकरतां, संतांकडे नाहीं येऊं. संतांनी नामस्मरण करायला सांगितलें, परंतु मुलगा वांचत नाहीं असें पाहिलें कीं आपली रामावरची, नामस्मरणावरची, श्रद्धा उडते; म्हणजे मी विषयाकरितां नाम घेतों असेंच झालें! विषय सुटावेत असें वाटतें, पण ते सुटतच नाहींत. याचें कारण आमची तशी बलवत्तर इच्छाच नसते. संन्यास घ्यायला निघाला तर बायको पोर घेऊन आडवी येते; तिला दूर सारून निघाला, पण पुढें मोहांत पडून परस्त्री करण्याची वेळ येते! व्यसनाकरितां माणूस हें सर्व करतो, परंतु परमार्थाकरितां विषय आणि मोह दूर करून साधन कर म्हटलें तर निरनिराळ्या सबबी आपल्या डोळ्यांसमोर उभ्या राहतात. चोवीस वर्षें अभ्यास केला तरी पोटभर खायला मिळत नाहीं, मग परमार्थ मात्र दोन वर्षांत साध्य व्हावा असें कसें म्हणावें? माझेंपणाने मिरवितां आणि अभिमान कायम ठेवतां, मग भगवंताला शरण कसें जाता येईल? शरण येतांना, मी कोण, माझा धर्म, माझें कर्म, वगैरे सर्व विसरावें.

**ज्याला व्यवहार फारसा कळत नाहीं त्याला परमार्थ सोपा जातो. शांति ही परमार्थाची पहिली पायरी** आहे. **परमार्थ हा समजुतीचा आहे. उगीच कष्ट करण्याचा किंवा पारायणाचा नाहीं.** बद्रीनारायणाची यात्रा करूनहि तो साधणार नाहीं; त्यापेक्षां भगवंताच्या अनु-संधानांत राहिल्यानें जास्त फायदा होईल. **कांहीं खेळ जसे एकट्यानेंच खेळायचे असतात, तसा परमार्थ हा आपल्याशींच करायचा खेळ आहे,** तो आपल्याशींच करायचा अभ्यास आहे. खेळांत कांहीं बाह्य साधन तरी लागतें, पण या अभ्यासांत त्याचीहि जरूरी नसते. परमार्थ हा वृत्ति सुधारण्याचा अभ्यास आहे. अंतर्यामीं स्थिर होणें, स्वस्थता येणें, सावधानता ठेवणें, दगदग सोडणें हाच परमार्थ होय. **सतत आनंद मिळावा यासाठीं प्रयत्न करणें याचेंच नांव परमार्थ. 'जग काय म्हणेल' म्हणून वागणें याचें नांव व्यवहार, आणि 'भगवंत काय म्हणेल' म्हणून वागणें हाच परमार्थ. कर्तव्यांत भगवंताचें स्मरण हेंच परमार्थाचें** सार.

१५५. हृदयीं ठेवावा राम। मुखीं सदा त्याचें नाम। हातांत प्रपंचाचे काम। हेंच खरें **परमार्थाचें वर्म जाण ॥**

# प्रपंच सचोटीचा असूनहि, त्यांत अभिमान असल्यास तो परमार्थ नव्हे

**४ जून**

नेहमीं भावार्थाच्या नादीं लागावें. शब्दाच्या मागें गेला तो वायां जातो. शास्त्रांत दोन गोष्टी सांगितल्या आहेत : इहलोक आणि परलोक कसे साधावेत हें दोन्ही स्पष्ट केलें आहे; **परंतु आपण प्रपंच तडीचा आणि परमार्थ सवडीचा मानतों.** या दोन्ही गोष्टींत जाणत्याची संगत लागते. परलोक साधून देणाऱ्याला सद्‌गुरु म्हणतात. जो मनुष्य आपल्याला कळत नाहीं हें कबूल करतो त्यालाच सद्‌गुरूकडे जाण्याचा रस्ता मोकळा होतो. आपण भगवंताला शरण जात नाहीं. कारण आपला अभिमानच या शरण जाण्याच्या आड येतो. गंमत अशी कीं, व्यवहारांतसुद्धा आम्हीं अभिमान सोडून ज्याला जें समजतें त्याच्याकडे जातों. इहलोक अनुभवाचा आणि परलोक अनुमानाचा, अशी आपली कल्पना असते. पण इहलोकाचा अनुभव दुःखाचा येतो तरी तो आम्ही सोडत नाहीं. मग परमार्थाचा अनुभव नाहीं म्हणून तो करीत नाहीं हें म्हणणें लबाडीचें आहे. 'प्रपंचात आम्ही कांहीं पाप करीत नाहीं, मग परमार्थ तरी दुसरा कोणता राहिला ?' असें कांहींजण विचारतात. **प्रपंच सचोटीचा जरी असला तरी त्यांत अभिमान असेल तर नाहीं तो परमार्थ होणार.** जो विषयांना चिकटून राहातो त्याला त्यांचे सुखदुःख सोसणेंच भाग असतें. राम कर्ता म्हटल्याशिवाय किंवा अभिमान सोडल्याशिवाय, परमार्थ नाहीं साधणार. या अभिमानाची वस्ती तरी कुठे आहे ? कळकळीनें 'माझा अभिमान दूर कर' असें म्हणणारे लोक आहेत; पण अभिमान 'माझा' म्हणतो आणि नाहींसा करायला भगवंताला सांगतो, याला काय म्हणावें ! **आपण खरोखर वरवरच उपाय करीत असतों.** 'मी देही' म्हणूं लागलों यांत अभिमान आला. देहबुद्धीला कारण म्हणजे वासना. वासना हें सर्वांचें मूळ आहे. माझा जन्मच जर वासनेंत आहे तर ती बाजूला काढल्यावर आम्ही जिवंत कसे राहूं असें वाटतें. जों या वासनेचा खून करतों तोच परमार्थाला लायक होतो. अंतीं जी मति ती जन्माला कारण होते. हें सगळें ज्ञानाचें बोलणें झालें, पण प्रचीतीनें हें सर्व जाणावें. समर्थांनीं याची स्वतः प्रचीति घेऊन मगच सर्व लोकांना सांगितलें. बायकापोरांचा त्रास होतो, मन एकाग्र होत नाही, म्हणून बुवा झाला; मठ केला, लोक येऊं लागले, त्यांना जेवायला घालण्याकरितां भिक्षा आणूं लागला, पण भगवंत सर्वांना खायला घालतो हें विसरला ! छप्पर गळूं लागलें तें नीट करण्याचीच काळजी करूं लागला. मग घरादारांनीं काय केलें ? असा बुवा होण्यापेक्षा प्रपंचांतच राहिलेलें काय वाईट ! थोडक्यांत म्हणजे, **परमार्थ समजून जो त्याचें आचरण करील त्याला तो लवकर साधेल.** त्या माणसाला प्रपंच सोडून जायचें कारणच उरणार नाहीं. परमार्थांत महत्त्व बाहेरचें ऐश्वर्य किती आहे याला नसून वृत्ति स्थिर होण्याला आहे। आणि **भगवंताचें सतत अनुसंधान हाच वृत्ति स्थिर होण्याचा एकमेव उपाय आहे.**

---

**१५६. देहानें नुसता पूजापाठ वगैरे करून परमार्थ घडत नाहीं. आपली वृत्ति भगवंताच्या ठिकाणीं चिकटली पाहिजे.**

# परमार्थात शुद्ध हेतु ठेवून स्वतःपासून सुरुवात करावी

५ जून

एखाद्या रोग्याच्या अंगातील ताप निघाला कीं, त्याला शक्तीचें औषध लागूं पडतें, कारण शक्ति येणें हें स्वाभाविक आहे, पण ताप गेल्याशिवाय शक्तीचें औषध उपयोगाचें नाहीं, तसें, अवगुण गेल्याशिवाय साधन आपली सुधारणा करीत नाहीं. अंतःकरण शुद्ध झालें कीं परमार्थ सोपा बनतो. परमार्थात मनाचे कष्ट आहेत, कारण आपल्या मनाच्या आजपर्यंतच्या संवयीच्या उलट जायचें आहे, आणि म्हणूनच परमार्थाला अगदीं स्वतःपासून सुरुवात करायची असते. नेहमीं सद्हेतु ठेवून कर्म करावे. मनातला हेतु चांगला असला तर हातून जरी वाईट गोष्ट घडली तरी त्याचा दोष नाहीं लागत. एखादी सवाष्ण बाई आहे, तिनें सर्व दागदागिनें घातले पण कुंकू लावायला विसरली, त्याप्रमाणें आपण निर्मळ हेतूशिवाय भजन केलें तर त्याचा उपयोग काय? आपण पगार एकाचा खाणार आणि काम दुसऱ्याचें करणार, हें कसें चालेल! संतांनीं आम्हाला नामाचें भांडवल दिलें. पण तें आम्हीं विषयाकडेच खर्च केलें, तर कसें होईल!

आस्तिक हा भगवंत सर्व ठिकाणीं भरलेला आहे हें जाणतो. या उलट नास्तिकाला भगवंताचा कुठेंच प्रत्यय येत नाहीं. खरोखर ज्याला भगवंताचें प्रेम येईल तो सृष्टीकडे कौतुकानें पाहील. नामस्मरण केव्हांपासून सुरू झालें, असें एकानें मला विचारलें. मी म्हटलें, "नामस्मरण जगाच्या उत्पत्तीपासून सुरू झालें, पण नामाचा अनुभव यायला त्याचा उत्पत्तिकाल कळून काय उपयोग!" भगवंताच्या प्रेमाशिवाय सर्व वाया आहे, तें प्रेम आंतून यावें. आजारी माणसाला प्रेमाचा एक शब्द हा शंभर डॉक्टरांपेक्षां जास्त महत्त्वाचा वाटतो. आपण त्याच्यावर प्रेम करतों याची जाणीव ज्याला असेल त्याचे दोष काढलेले त्याला बोंचत नाहींत. पक्ष्यांचीं पिलें त्यांच्या पंखाखालीं वाढतात त्याप्रमाणें घरातल्या माणसांना आपण प्रेमाच्या आश्रयांत ठेवावें. आईनें मुलाचें दोष त्याला सांगितलें तरी त्याला त्याचें वाईट वाटत नाहीं. जगांत प्रेम ही अत्यंत मोठी शक्ति आहे. प्रेम निःस्वार्थी मात्र असावें. आईबापाच्या श्राद्धाला हजार ब्राह्मण घालणाऱ्यापेक्षां जो आईबाप जिवंत असतांना त्यांची सेवा करतो तोच खरा पुत्र. प्रेम ही भगवंताची वस्तु आहे आणि प्रेम करायला आपण आपल्या घरापासून सुरुवात करावी. एकजण घरीं नेहमीं म्हणे कीं, मी संन्यास घेतों. घरच्या बाईला फार वाईट वाटे. एक युक्तिबाज बुवा शेजारी होते, त्यांनीं सांगितलें, "तूं धन्य आहेस माऊली. मीं सांगतों त्याप्रमाणें तुम्ही करा. त्याच्या पाया पडून सांगा कीं, तुम्हीं खरोखरच संन्यास घ्या, आणि मी अन्नपाणी सोडून भगवंतस्मरणांत राहीन." त्यानंतर संन्यास घेईन असें तो पुनः कधींहि म्हणाला नाहीं.

खरोखर, आंतमध्यें भगवंताचें अनुसंधान ठेवून बाहेरून वृत्ति आवरण्याचा जो प्रयत्न करील, त्याला परमार्थाचा अनुभव फार लवकर येईल.

---

१५७. भगवंताचें प्रेम एकदा चिकटलें कीं, त्याच्याआड दुसरें कांहीं येत नाहीं.

# "मला कळत नाहीं" ही परमार्थाची पहिली पायरी व "मी आणि भगवंत एकच" ही शेवटची पायरी

६ जून

समुद्राचा फेंस खरा आहे असें वाटलें तरी त्याच्याखालीं पाणीच असतें. असत्य हें नेहमीं सत्याला धरूनच राहातें. जें नाहीं तें तोंडानें सांगणें ही माया. तिला आपण खरे मानतों. मायेला असत्य मानलें कीं ब्रह्माला सत्यत्व येतें. आपण मायेच्या पाठीमागें जातों. पण माया ही मृगजळाप्रमाणें आहे असें समजतें तेव्हां आपण स्वस्थ होतों. जन्माच्या वेळेस "सोऽहं" म्हणत होता, नंतर "कोऽहं" म्हणूं लागला, आणि शेवटीं देहच मी म्हणूं लागला! वास्तविक सूर्य आणि त्याचे किरण हे जसे वेगळे नाहींत, त्याप्रमाणें "भगवंत" आणि "मी" वेगळे नाहींत. सत्याची जाणीव झाल्याशिवाय भगवंताची ओळख होत नाहीं. सत्य वस्तूला उपाधि फार असते, पण मुख्य सत्य अगदीं थोडें आणि हलकें असतें. आपलें शरीर एवढें मोठें असतें, पण आपला जीव किती लहान असतो! त्याप्रमाणें भगवंत अगदीं लहान आहे. हें एवढें मोठें जग ही त्याची उपाधि आहे. स्वर्ग, मृत्यु आणि नरक या अवस्था निर्माण करणारा परमात्मा अर्थात् या अवस्थांच्या पलीकडे असला पाहिजे. परमात्मतत्त्व हें सर्वांच्या पलीकडे आहे. जो या जगांतच परमात्म्याचा झाला तो या तीन अवस्थांच्या बंधनापलीकडे सरळ भगवंताकडे गेला. सत्य म्हणजे अखंड टिकणारें तें, म्हणजे परमात्मस्वरूप होय. **सच्चिदानंद-स्वरूपाच्या ठिकाणीं मन चिकटून राहणें यालाच अनुसंधान असें म्हणतात.** भगवंतावांचून इतर सर्व म्हणजेच उपाधि होय. "मला कळत नाहीं" असें वाटणें ही परमार्थाची पहिली पायरी आहे. "जें जें घडतें त्याचा कर्ता परमात्मा आहे, मी फक्त कर्तव्यापुरता आहें" असें वाटणें यालाच निष्काम कर्म असें म्हणतात; आणि "आलें तर भोगलें, गेलें तर सोडलें" हें सहजकर्म होय. दोष बाधूं नयेत अशा रीतीनें केलेलें कर्म तें ज्ञानयुक्त कर्म होय; आणि ईश्वराच्या स्मरणांत केलेलें कर्म त्याला निरासक्त कर्म असें म्हणतात. "अमुकच फळ मला मिळावें" ही वृत्ति सोडणें याचें नांव निरासक्ति होय. विषयाची विरक्ति झाली कीं त्याला ज्ञान झालें असें म्हणतात. थोडक्यांत म्हणजे, जें कर्म बंधनाला कारण होतें तें अज्ञान, आणि जें मोक्षाला कारण होतें तें ज्ञान समजावें. कर्ममार्ग, उपासनामार्ग, नवविधाभक्ति, इत्यादि सर्वांनीं गांठण्याचें ध्येय एकच असतें. लग्नांत ज्याप्रमाणें अमुक एक खर्च मी जास्त करीन, दुसरा कमी करीन, असें माणूस म्हणतो, पण मुख्य कार्य हें कीं मुलीला नवरा गांठून देणें, त्याप्रमाणें भगवंताची भेट होणें हें मुख्य होय. आपली देहबुद्धि संतांच्या संगतीच्या आड येऊं देऊं नये. भगवंताच्या स्वरूपदर्शनाच्या आड माझ्या देहबुद्धीचा पर्वत येतो. **सर्व साधनांचा उपयोग अभिमान नाहींसा करण्यासाठीं असतो. नामस्मरणानें हें काम लवकर होतें. आणि म्हणूनच सर्व साधनांचें सार भगवंताचें नाम हेंच आहे. तें आपण श्रद्धापूर्वक घ्यावें आणि भगवंताशीं एकरूप व्हावें.**

**१५८. आज तुम्हांला जेवढा वेळ रिकामा मिळतो, तेवढा सगळा भगवंताच्या नामांत घालवण्याचा प्रयत्न करा.**

# परमार्थ आपोआप वाढावा, त्याला ताण देऊन वाढवूं नये

७ जून

नित्यनेम म्हणजे काय ? नित्याचा जो नियम तो खरा नित्यनेम होय. नित्य कोण ? जो कधींहि बदलत नाहीं तो. याचा अर्थ, जो पूर्ण शाश्वत आहे तोच खरा नित्य होय. म्हणून नित्य म्हणजे भगवंत समजावा. त्याचा नियम करावयाचा म्हणजे काय करावयाचें ? नियम करणें याचा अर्थ नियमन करणें, निग्रह करणें, वश करून घेणें, स्वाधीन ठेवणें, हा होय. आपलें मन भगवंताच्या स्वाधीन करणें, त्याच्या ठिकाणीं तें नेहमीं ठेवणें, याचें नांव नित्यनियम होय. आजच्या आपल्या मनाच्या अवस्थेमध्यें तें सर्वस्वीं भगवंताच्या स्वाधीन करतां येत नाहीं; आणि देह हा जड, अशाश्वत असल्यामुळें देहानें, नित्य आणि शाश्वत अशा भगवंताचा नियम घडणें शक्य नाहीं. म्हणून देहानें घेतां येत असून देहाच्या पलीकडे असणारें आणि सूक्ष्म असल्यामुळें भगवंताशीं शाश्वत संबंध असणारें असें भगवंताचें नाम अखंड घेणें **हा आपला खरा नित्यनियम आहे. इतर सर्व गोष्टी-शास्त्राचीं बंधनें, पोथी वगैरे वाचणें, स्नानसंध्यादि नित्यकर्मे, वगैरे पाळावीं; पण त्याचा हट्ट वा आग्रह असूं नये. कोणत्याहि अवस्थेमध्यें भगवंताचें नाम मात्र सोडूं नये. एवढाच हट्ट क्षम्य आहे. शुद्ध भावनेनें नाम घेतले कीं भगवंत दर्शन देतो.** शुद्ध भावनेचें फळ फार मोठें आहे. पुष्कळ वेळां गरीब आणि अशिक्षित लोकच याबाबतींत श्रेष्ठ असतात. आपण नाम घेत जावें नामानें भावना शुद्ध होत जाते. नामानें प्रपंचांतले प्रसंग निवळतात यांत बिलक्षण असें कांहींच नाहीं. खरें म्हणजे मनुष्याला जिवंत राहण्यासाठीं हवेची जितकी जरूरी आहे, तितकीच, किंबहुना त्याहूनहि जास्त जरूरी परमार्थामध्यें भगवंताच्या नामाची आहे. भगवंताच्या नामाशिवाय न राहण्याचा संकल्प प्रत्येक माणसानें केला पाहिजे. **भगवंत हट्टानें किंवा उगीच केलेल्या कष्टानें साध्य होत नाहीं, तो एका प्रेमानें वश होतो.** प्रेमामध्यें हट्ट आणि कष्ट झाले तर ते शोभतात, आणि हिताचे होतात. आपण भक्ताचें प्रेम न पाहतां त्याचा हट्ट आणि कष्ट तेवढे बघतों. **परमार्थ आपोआप वाढावा, त्याला ताण देऊन वाढवूं नये.** जो मनुष्य साडेतीन कोटी रामनामाचा जप करील त्याला भगवंताच्या प्रेमाचा अनुभव आल्यावांचून राहणार नाहीं. शंका या फार चिवट असतात, त्या मरतां मरत नाहींत; शिवाय कांहीं शंका आचरणानें आणि अनुभवानेंच नाहींशा होतात. म्हणून मनात शंका असल्या तरी नाम सोडूं नये. **सतत नाम घेत गेल्यानें मन स्वच्छ होत जातें आणि सर्व शंका आपोआप विरून जातात.** ज्याच्यावर भगवंताची पूर्ण कृपा झाली आणि ज्याला भगवंताशीं अनन्य होण्याची युक्ति साधली त्याला चमत्कारांची किंमत राहणार नाहीं; असें जरी खरें तरी त्याच्या हातून चमत्कार घडणार नाहींत असेंहि नाहीं. परंतु मी अमुक चमत्कार करीन, किंवा मी तो करतो, असें मान-अभिमानाचें चिन्ह त्याच्याजवळ असणार नाहीं लंकेमध्यें रावणाच्या बंदीवासामध्यें अशोकवनांत सीता असतांना, तिच्या सान्निध्याच्या प्रभावामुळें तिथलीं झाडें, पक्षी आणि दगड या सर्वांना रामनामाचें प्रेम लागलें होतें असें वर्णन आहे. रामनामाचें प्रेम आणि भगवंताचें प्रेम हीं दोन्हीं एकच आहेत. **नामांत शेवटचा श्वास गेला पाहिजे ह्यांतच जीवनाचें सर्वस्व आहे.**

१५९. ध्रुवासारखी नामावर निष्ठा पाहिजे। प्रत्यक्ष भगवंत समोर आलें तरी त्यानें नाम **सोडलें नाहीं.**

# आपला विषयाकडचा ओढा भगवंताकडे लावला कीं परमार्थ साधला

८ जून

**प्रपंचात ज्याला विश्वास म्हणतात त्यालाच परमार्थात श्रद्धा म्हणतात** उणीव हें प्रपंचाचेंच रूप असल्यामुळें, तो पूर्ण झाला असें कधींच होणार नाहीं. समाधान हा मात्र पूर्णत्वाचा स्वभाव आहे. निर्हेतुक कर्म करण्यानें खरी सात्त्विकता उत्पन्न होईल, आणि पुढें पूर्णाहुति दिली जाईल. अशा प्रकारें " सर्वस्व " अर्पण करणें याचेंच नांव यज्ञ होय. **त्याग आणि भगवंताचें स्मरण हा यज्ञाचा खरा अर्थ होय**. परमार्थ साधला कीं बुवाचा देह पुष्ट होतो. तो काय दुधाचा रतीब लावतो ? छेः; भगवंताच्या आनंदानें त्याचा देह भरलेला असतो. परंतु साधकावस्थेमध्यें त्याचा देह कष्टामध्येंच ठेवलेला असतो. खरें म्हणजे परमार्थी माणसानें दैन्यवाणें राहायचें कारणच नाहीं. पैसा असेल तर त्यानें रोज श्रीखंडपुरी खावी; पण उद्यां जर उपास पडला तर मात्र आजच्या पक्वान्नाची आठवण होतां कामा नये. सर्वांत गृहस्थाश्रम श्रेष्ठ सांगितला आहे. ज्याला हित करून घ्यायचें आहे त्याला गृहस्थाश्रमासारखा आश्रम नाहीं. पण लग्न करून सर्व काळ विषयांत घालवूं लागलों आणि प्रपंचाचीं कर्तव्यें करायचीं राहिलीं तर मग लग्न करून काय साधलें ? उद्योग करून पोट भरायचें हें खरें, पण नोकरी करून मालकाला सर्वस्व मानूं लागलों आणि देवाला विसरलों तर नाहीं उपयोग. देवाला स्मरून नोकरी करावी. वाईट लोक समाधानांत दिसतात पण खरें ते तसें नसतात. वाईट कृत्यें करणाऱ्याला कधीं ना कधीं तरी पश्चात्ताप झाल्यावाचून राहात नाहीं. सांठा करावा पण लोभ असूं नये, उद्योग करावा पण लोकांचें नुकसान करूं नये. गृहस्थाश्रमांत देव भेटणार नाहीं असें जो म्हणेल त्याचें खरें मानूं नये; देव भेटेल याची खात्री बाळगावी. आपला भार सर्वस्वी भगवंतावर टाकावा. अर्पणबुद्धीनें सर्व कर्में करावींत. ज्यांत माझें मन मला खात नाहीं तें काम चांगलें असें समजावें. गृहस्थाश्रमांत मी जें करतों तेंच परमार्थांत करायचें असतें; पण त्यांत माझेंपण सोडून तें केलेलें असतें इतकेंच. **संकट, आनंद दोन्हीं भगवंताला सांगावींत. ज्या स्थितींत भगवंतानें ठेवलें आहे त्या स्थितींत समाधान मानावें.** एखादी बाई आपल्या सावत्र मुलाला ज्याप्रमाणें खायला-प्यायला घालते, पण आंतून तिचें त्याच्यावर प्रेम नसतें, त्याप्रमाणें आपण परमार्थाला वागवतों. खरें म्हणजे आपलें इथेंच चुकतें, आपला ओढा जो विषयाकडे आहे तो भगवंताकडे लावला कीं परमार्थ साधला. भूक लागली कीं खावेंसें वाटणें, किंवा विषयाचीं वासना होणें हें सार्वत्रिक आहे. कोणत्याहि मनुष्याला जोंपर्यंत यामध्यें सर्व कांहीं आहे असें वाटत असतें तोंपर्यंत तो परमार्थापासून दूर असतो. ज्यानें विषयांतलें सुख भगवंताकडे लावलें, म्हणजे भगवंताच्या स्मरणांत ज्याला सुखसमाधानाचा लाभ झाला, त्याचें जन्माला येऊन खरें कल्याण झालें.

**१६०. नाम घेतां घेतां त्याच्याशीं इतकें तादात्म्य व्हावें कीं " मी नाम घेतों आहे. " हें सुद्धां विसरून जावें.**

# अंतर्यामी स्वस्थता येणें हाच परमार्थाचा मूलोद्देश आहे

**९ जून**

पुष्कळदां भक्ति म्हणजे काय, किंवा परमार्थ कशाला म्हणतात, हेंच आपल्याला कळत नाहीं. ज्याला प्रपंच नीट करतां येत नाहीं त्याला नाहीं परमार्थ करतां येणार. प्रपंचाला कंटाळून भक्ति नाहीं येणार. **कंटाळा प्रपंचाचा येण्यापेक्षां विषयांचा आला पाहिजे.** मला सुख व्हावें हा प्रत्येक जीवाचा मुख्य हेतु असतो. **मोक्ष म्हणजे निरतिशय सुखाचा अनुभव होय. 'जिवंतपणीं मिळालेली आत्यंतिक सुखाची स्थिती' अशी मोक्षाची व्याख्या करतां येईल.** खरोखर भगवंताजवळ काय कमी आहे ? एक आपलें मन त्याला द्यावें आणि त्याचीं श्रद्धायुक्त भक्ति करावी. **काळजी करणें म्हणजे भगवंतावर भरंवसा नसणें होय. प्रारब्धावर देह टाकणें ही खरी संन्यासवृत्ति होय.** वासना न ठेवतां आपल्या हातून कर्मच होत नाहीं त्याला काय करावें ? माझें समाधान माझ्याजवळ असतांना दुसरीकडे मिळेल असें आपल्याला वाटतें हेंच आपलें चुकतें. हवेंपण संपलें नाहीं तोपर्यंत समाधान नाहीं. आशेची निराशा झाली नाहीं तोंपर्यंत भगवंताचा दास नाहीं होतां येणार. हव्यास मरेपर्यंत सुटतच नाहीं हें सर्व रोगाचें मूळ आहे; आणि म्हणूनच, ज्याची वासना नाहींशी झाली तो मोक्षत्वाला गेला खरा. आशा जेव्हां मनांत उठेल तेव्हां ती भगवंताला अर्पण करावी. प्रत्येकाला वाटतें मी श्रीमंत व्हावें. पण कितीजण तसे होतात ? म्हणजे ही निराशाच नाहीं का ? प्रपंच खरोखरीच नाटकासारखा आहे. नाटकामध्यें एखादा मनुष्य राजा झाला काय किंवा भिकारी झाला काय, प्रत्यक्ष जगामध्यें त्याला किंमत नाहीं. उलट, भिकाऱ्याचें काम करणाऱ्यानें जर तें उत्तम केलें तर लोक त्याचें कौतुक करतात. तसें, प्रपंचामध्यें कोणी श्रीमंत असला काय आणि कोणी गरीब असला काय, त्याला महत्त्व नसून, त्यानें भगवंताचें अनुसंधान किती ठेवलें याला खरें महत्त्व आहे. विषयावर जोपर्यंत तुमचें सुख अवलंबून आहे तोपर्यंत भक्तीचें खरें सुख मिळत नाहीं. एक भगवंतच मनापासून हवा असें वाटलें म्हणजें तो प्राप्त होतो. 'मी करतों' असें कधींच म्हणूं नये. मी आपल्या तपश्चर्येनें भगवंताला पाहीन असें जो म्हणतो त्याला भगवंताचें दर्शन होणें कठीणच असतें. विषय मिळाला नाहीं म्हणजे तळमळ लागते, त्याप्रमाणें भगवंत भेटला नाहीं तर तळमळ लागावी. आजच्या आपल्या स्थितींत आपल्याला काय करतां येणें शक्य आहे हें प्रथम पाहावें. आपण पैसा सांठविला तर गैर नाहीं; पण त्याचा आधार न वाटावा, अनुसंधानाच्या आड त्याला येऊं देऊं नये. "रामा, एकच कर, कीं माझें समाधान कधीं भंगूं देऊं नकोस." अशी अनन्यभावानें त्याच्याजवळ प्रार्थना करावी आणि त्याला शरण जावें. तो खात्रीनें तुमच्या पाठीशीं उभा राहील. अंतर्यामी स्वस्थता येणें हाच परमार्थाचा मूलोद्देश आहे. परमार्थ हा समजुतीचा आहे, उगीच कष्ट करण्याचा नाहीं.

---

१६१. साध्या शब्दांचा देखील आपल्या वृत्तीवर परिणाम होऊन तो तो भाव आपल्या मनात जागृत होतो, मग भगवंताच्या नामानें भगवंताचें प्रेम का येणार नाहीं ?

# आपला व्यवहार, परमार्थ, घडतो तो सर्व त्याचे इच्छेनें चालतो

१० जून

असें झालें असतें तर बरें झालें असतें । हें म्हणणें नाहीं खरें ॥ जें होणें योग्य तें घडलें । व तेंच रामइच्छेनेंच घडलें ॥ परमात्म्यानेंच जी इच्छा केली । त्याचे आड नाहीं कोणी आलें ।। कशास म्हणावें बुरें भलें ! । परमात्म्याच्या हातीं सर्व चालें ।। जें जें कांहीं घडलें । तें भगवंताच्या इच्छेनें घडलें । हा ठेवितां विश्वास । मनाला धीर वाटेल खास । दुःखाचा तेथें नाहीं वास ।। राम देईल समाधान खास । असा करावा मनाचा निर्धार ।। माझे सर्व कर्मांचा गुरूच सूत्रधार । सर्व सत्ता गुरूचे हातीं । तेथें न चाले कोणाची गती ।। आपलें जगणें जेथें भगवंताच्या हातीं । तेथें बाकीच्या गोष्टींची काय मिती ? ।। परिस्थिति कोणाचीहि । कितीहि असली भली किंवा बुरी । तरी परमात्म्याचेच हातीं त्याची दोरी ।। उच्च-नीच स्थिति । सुखदुःख न मानावें त्याप्रति ।। न पडावें अभिमानाला बळी । रामइच्छा जाणावी सगळी ॥ जें जें घडतें तें तें कांहीं । रामसत्तेवांचून नाहीं ।। हा जरी असेल सिद्धांत । तरी जपून वागावें व्यवहारांत ॥ आपला व्यवहार, परमार्थ, घडतो । तो सर्व त्याचे इच्छेनें चालतो ॥ म्हणून होणें जाणें भगवंताच्या हातीं । आपण त्याला जावें शरणागती ।। सर्व कर्ता राम । हें ठेवितां चित्तीं समाधान येते त्या परतीं ।। सर्व करणें रामाचें । हें मनीं आणावें साचें ॥ चित्तांत ज्याच्या राहिलें समाधान । तोच भगवंताचा आवडता जाण ।। ज्याचा विश्वास रामावरी । त्याला समाधान स्वीकारी ।। माझें हित रामाचें हातीं । हा धरितां विश्वास । समाधान मिळत असे जीवास ।। आपण होऊन रामाचें जाण । सदा राखावें समाधान ।। मी-माझें करावें रामार्पण । तेथें समाधानाचा अनुभव पूर्ण ।। आस ठेवावी रामापायीं । आनंदी समाधानी राहीं ॥ अंतरी समाधान । हेंच आपलें साधन जाण ।। संसारांत न पाहावें उणें पुरें । ठेवावें त्यांत समाधान खरें ।। दाता राम हें जाणतां चित्तीं । सहज मिळते ही मति ॥ जशी जशी ज्या वेळीं जी परिस्थिति । तशी तशी असावी समाधान वृत्ति ।। ज्या स्थितीत ठेवील राम । त्यांत राखावें समाधान ।। चिंता, अहंता, ममता, कोणी कारणावांचून । केले छळ कपट अपमान । अथवा बोलिले शब्दबाण । त्यांत राखावें समाधान ।। समाधान देणें नाहीं दुसऱ्याच्या हातीं । ईश्वर-कृपेनेंच त्याची प्राप्ती । जोवर संशयी झालें मन । तोंवर न होई समाधान ।। विषयास घातलें खत पाणी । तरी कसें पावावें समाधान ? ।। जोवर दृश्याचें भान । तोंवर मनीं न राहे समाधान ।। 'मी करतो' हें ठेवलें ज्यानें । समाधान दूर केलें त्यानें ।। समाधानाची स्थिति । उपाधिरहित असावी वृत्ति ।। कोठे ठेवावें मन । जेणें मिळेल समाधान ? ।। समाधान नव्हे देहाचा गुण । मनानें व्हावें भगवंताचें आपण ।। "आतां झालो मी रामाचा" । हा विचार ठेवावा साचा ।। ऐसें होऊन राहीं । समाधान तेथेंच पाहीं । पांडव झाले वनवासी । पण अखंड राहिले भगवंतापाशीं ।। पांडव भगवंताचे भक्त झाले । वनवास नाहीं चुकवितां आले । त्यांनीं केलें भगवंताचें स्मरण । जेणें राखिलें समाधान ॥

१६२. सर्व कर्ता राम । हें ठेवितां चित्तीं । समाधान येतें त्यापरतीं ।।

# अपेक्षा न करणें हें परमार्थाचें बीज आहे

११ जून

जिथें रोग असेल तिथेंच औषध लावलें तर उपयोग होईल. दुःखाचें मूळ कोठें आहे हें प्रथम पाहावें. प्रपंचांत कांहीं न्यूनता पडली कीं दुःख होतें. श्रीमंताच्या किंवा गरिबाच्या सुखदुःखांत तसा फरक तो कोणता? एखाद्याजवळ पैसा पुष्कळ आहे, परंतु मूलबाळ नाहीं, म्हणून तो दुःखी असतो; तर दुसऱ्याला संतति बरीच आहे पण पैसा नाहीं; म्हणून तो कष्टी होतो. तिसऱ्याला संतति, संपत्ति वगैरे सर्व आहे, परंतु पोटदुखीच्या विकारानें तो बेजार आहे. एकंदरीत सुखदुःखें कोणालाहि सुटलीं नाहींत. जितक्या गोष्टी कमी पडल्या तितक्या प्रयासानेंसुद्धां आणल्या, पण न्यूनता कांहीं सरत नाहीं. दुःखावर आपण वरवर उपाय करतों, परंतु आपल्या दुःखाच्या मुळाशीं आपलें मनच आहे हें नाहीं आपल्या ध्यानांत येत. खरोखर, सुखदुःख हें वस्तूंत नसून आपल्या मनःस्थितीवरच अवलंबून आहे. वस्तु चोरीला गेली त्या वेळी झोपेंत, आनंदात होतों; पण जागे झाल्यावर, वस्तु गेल्याचें समजल्यावर दुःखी झाला. म्हणजे दुःखीं होते तें मन. तेव्हां औषध द्यायचें तें मनाला द्या. संतांनीं मनाला शिकवण दिली. आजवर आम्हीं विषयसुख सख्ख्या मुलाप्रमाणें भोगलें, आणि परमार्थ सावत्र मुलासारखा केला. सावत्र आईप्रमाणें आम्ही मनाला शिकविलें. ज्याचा सहवास झाला, त्याप्रमाणें मनावर परिणाम होऊं लागलें. विषयाचा सहवास गर्भापासून आपण ठेवतों, म्हणून विषयापासून आनंद खरा असें मानूं लागलों. चोराला तो चोरी करतो हें पाप वाटत नाहीं असें आपण म्हणतो; पण त्याच्याहि मनांत भीती असतेच. ज्याचें बीज लावावें त्याचीं फळें खावीं. आपण विषयाचें बीं पेरतों, आणि विषयाचीं फळें दुःखदायक आहेत म्हणून मग शोक करतों, याला काय करावें! व्यापारी दरवर्षी आढावा घेतात त्याप्रमाणें, आपण माझे विषय किती कमी झाले हें पाहावें. जितकी प्रपंचाकरितां तळमळ करतों तितकी भगवंताकरितां करावी. प्रपंचांतल्या अनुकूल परिस्थितीपेक्षां प्रतिकूल परिस्थिति हीच परमार्थाला जास्त उपकारक आहे. अपेक्षा न करणें हें परमार्थाचें बीज आहे. परमार्थ हा परिस्थितीवर, श्रीमंती गरिबीवर, रोगीनिरोगीपणावर; वगैरे कशावरहि अवलंबून नाहीं. मनाची स्वस्थता, अंतःशुद्धता, आचरणाची पवित्रता, यांवर तो अवलंबून आहे. प्रपंचांतल्या सोयी आणि गैरसोयी या दोन्हीं परमार्थाच्या आड येतात. आपण रस्त्यांतून चाललों असतां एखादें अत्तराचें दुकान पाहून थांबलों काय किंवा मिरच्यांचें दुकान पाहून थांबलों काय; रस्ता चालण्याच्या दृष्टीनें दोन्ही घातकच ठरतात. प्रपंच मुळांत चांगलाहि नाहीं आणि वाईटहि नाहीं. आपण आपली आसक्ति त्यांत कालवतों म्हणून आपल्याला तो सुखदुःख देतो. ही आसक्ति काढणें याचेंच नांव परमार्थ होय.

---

१६३. परमार्थ हा लोकांना उपदेश करण्यासाठीं नाहीं. तो निव्वळ स्वतःकरतां आहे.

# प्रपंचाच्या दिशा दहा आहेत पण परमार्थाची दिशा एकच आहे

**१२ जून**

एकादशी म्हणजे अकरा, म्हणजे एकावर एक, म्हणजे एकच एक होय. द्वैतामध्यें दुःख आहे तर एकामध्यें सुख आणि आनंद आहे. आपण एकामध्यें राहिलो तर आनंद मिळेल. एकच आकडा पुष्कळ वेळा लिहिला तरी तो एकच असतो. त्याप्रमाणें हें जगत् पुष्कळ भासलें तरी तें एकच आहे. प्रपंचाच्या दहा दिशा आहेत पण परमार्थाची मात्र एकच दिशा आहे. तिच्याकडे आपण लक्ष लावावें. कांहीं न करणें अर्थात् मनानें, हा खरा परमार्थ होय. परमार्थामध्यें उपाधि मुळींच नाहीं म्हणजे किती नाहीं; तर 'मी' सुद्धां तिथें नाही. प्रपंच हा द्वैत आहे, त्याचें अवडंबर मोठें असणारच. आपल्याला आपल्या जगण्याचा हेतु जोंपर्यंत माहीत नाहीं तोंपर्यंत प्रपंच करणें हेंच ध्येय आपण समजतों. वास्तविक मनुष्यप्राणी हा देह आणि मन दोन्हीं मिळून आहे, म्हणून त्यानें ऐहिक आणि परलौकिक दोन्हीं गोष्टी साधल्या पाहिजेत. परमार्थ साधणें हाच आपल्या जन्माचा खरा हेतु आहे. व्यवहारांत द्वैताशिवाय आनंद नाहीं. म्हणून परमार्थांत, मानसपूजेंत पहिल्यानें 'मी', 'परमात्मा' अशा द्वैतानें सुरुवात करावी लागते. जोंपर्यंत परमार्थ आपल्या हाडींमासीं खिळला नाहीं, तोंपर्यंत आपल्याला वाचनाची गरज आहे. त्यापासून साधनाला जोर येतो. मन भगवंताकडे गुंतविण्यासाठीं काय करावें हें पाहावें. एक बाप आपल्या मुलाला पोहायला शिकवीत होता. बापानें मुलाला पहिल्या प्रथम घोट्याइतक्या पाण्यांत आणलें, नंतर ढोपराइतक्या पाण्यात आणलें, नंतर थोडें आणखी पुढें आणलें; आणि एक दिवस त्यानें मुलाला पाण्यांत खेंचून घेतलें. त्याप्रमाणें आपले गुरु आपल्याला परमार्थ शिकवीत असतात. आपण पाण्यांत उतरलें मात्र पाहिजे. देहानें प्रपंच केला पण तो फळाला येत नाहीं, म्हणून संतांनीं नामस्मरणाचा मार्ग सांगितला; पण आमचें शहाणपण, आमचा अभिमान, नाम घेण्याच्या आड येतो त्याला काय करावें ? हा अभिमान दुसरा कुणी उत्पन्न करतो असें थोडेंच आहे ? आपल्याला कळत नाहीं असें वासनेचें सूक्ष्म बीज आपल्यात कुठें तरी दडलेलें असतें; त्यामुळें लौकिक सुटत नाहीं. **याकरितां संतांनीं स्वतः एक मार्ग सुचविला आहे, आणि तो म्हणजे नामस्मरणांत राहून विषयाची ऊर्मि उठूं न देणें.** आपण कांहीं न करतांच संतांना दोष देतो. प्रपंचातली विघ्नें हीं सूचनावजा असतात, तीं आपल्याला जागें करतात, जन्माला आलों तो भगवंताला ओळखण्याकरितां, हें विसरूं नये. म्हणून विघ्नांची योजना असते. सोळा वर्षांच्या एका उपवर मुलीच्या लग्नाकरितां तिचे आईबाप रात्रंदिवस काळजी करीत होते. मुलगी म्हणाली, "तुम्ही कां मला या घरांतून दुसऱ्याच्या घरी घालविण्याकरितां दुःख करतां ?" आतां बाप तिला काय बरें उत्तर देईल ? 'दूर जाण्यातच तुझें हित आहे' असेंच तो तिला सांगेल ना ? त्याप्रमाणें विघ्नें हीं आपण भगवंताच्या जवळ जाण्याकरितांच येत असतात. तेव्हां त्यांना न घाबरतां भगवंताच्या नामांतच स्वतःला विसरून जावें हाच परमार्थाचा सोपा मार्ग आहे.

---

१६४. जेथें आळस माजला, तेथें परमार्थ बुडाला.

# आनंदाचा, समाधानाचा, भगवत्प्राप्तीचा मार्ग म्हणजेच परमार्थ

१३ जून

जें ज्यानें केले तें त्याला आवडत असतें. एक ब्राह्मण सरळ बुद्धीनें चालणारा होता. त्याचा मुलगा वाईट निघाला. तेव्हां 'कशाला मुलाकरितां भगवंताला व्यर्थ नवस केला' असें म्हणाला. प्रपंच आणि परमार्थ आपण सारख्याच मापानें पाहतों हेंच आपलें चुकतें. आपल्या इच्छेविरुद्ध जो जातो तो आपला नाहीं असें आपण म्हणतों. जो वर म्हणून मागितला तोच दुःखाला कारणीभूत झाला, याला काय करावें? भगवंताच्या स्मरणांत राहावें म्हणून गृहस्थाश्रम घालून दिला. ज्यांनीं आम्हांला एवढी सवलत दिली त्यांना विसरून कसें चालेल? समजा, एक लग्न झालेली सुशील स्त्री आहे, आणि एक वाईट चालीची स्त्री आहे. दोघींच्या आहारविहारामध्यें कांहींच फरक नसतो. पण पहिलीला जे सात्त्विक समाधान असतें तें दुसरीला नसतें. 'मी भगवंताचा आहे' या जाणीवेनें जगणाऱ्याला, म्हणजे भगवंताच्या अनुसंधानात जगणाऱ्याला, जे समाधान मिळतें तें मीपणानें जगणाऱ्याला, मिळत नाहीं.

फार दिवस नोकरी केली कीं माणसाच्या मनाला गुलामगिरीची संवय लागते; हें चांगलें नाहीं. कांहीं दिवस तरी माणसानें मालकीहक्कानें राहायला शिकलें पाहिजे. नोकरी करीत असतांनाच अनुसंधानाचा अभ्यास करावा. म्हणजे पुढें नोकरी सुटल्यावर, जितका वेळ मिळेल तितका अनुसंधानांत जाईल. प्रत्येक मनुष्य जन्माला आल्यापासून परमार्थाचा अभ्यास करतो आहे. प्रत्येक मनुष्याला आनंद किंवा समाधान हवें आहे, आणि त्यासाठीं त्याची खटपट चालू असते; इतकेंच नव्हे, तर नास्तिकसुद्धां आनंदमय होण्यासाठींच 'देव नको' असें म्हणतो. खरोखर परमार्थाला दुसऱ्याची गरजच नाहीं; मग दुसरा कोणीं आपला परमार्थ बिघडवील कसा? जगांत जें आहे तें सर्व चांगलें आहे, आपणच तेवढे बरे नाहीं. दरवाजे, खिडक्या, हें जसें घराचें साधन आहे, किंवा आपल्या गांवीं जाण्यासाठीं आगगाडी हें जसें साधन आहे, त्याप्रमाणें परमार्थ साधण्यासाठीं, किंवा परमात्म्याच्या प्राप्तीसाठीं, प्रपंच हें साधन आहे, नुसत्या प्रपंचामध्यें सुख नाहीं, परमार्थात अधिकार कुणी कुणाला देऊन येत नसतो. आपला अधिकार आपल्या कृतीवर अवलंबून असतो. परमार्थाची जाणीव जेवढी दुःखात होते तेवढी सुखात असतांना होत नाहीं. तें सुख शेवटीं दुःखांतच लोटतें. ज्या जाणीवेनें आपण सर्व ज्ञान मिळवितो, ती काय आहे हें जाणण्याचा कुणी प्रयत्न करीत नाहीं. वैषयिक बुद्धि विकारांना सामील झाली म्हणजे ते प्रबळ होऊन घातक ठरतात; अशा वेळीं मनांत येईल तसें वागण्याचें टाळलें तर विकार दुबळे होतात. विकारांना वश न होतां, प्रारब्धानें आलेले विषय भोगावे म्हणजे त्यांचें कांही चालणार नाहीं. आपल्यासारखें दुसऱ्याला ओळखणें आणि त्याच्याशीं तसें वागणें हाच परमार्थ म्हणजेच भगवत्प्राप्तीचा मार्ग.

---

१६५. ताकांत लोणी असतें, तें वर दिसत नाही। पण ताक घुसळल्यावर जसें तें वर येतें तसें भगवंताचें नाम आपण घेतलें की, त्याचें प्रेम आपोआप वर येतें.

# व्यवहारांत सौख्य कर्तव्यानें मिळते, परमार्थांत सौख्य निष्ठेनें मिळते

**१४ जून**

भगवंताच्या नामापुढें बंधनच असूं शकत नाहीं. भगवंत जोडत असेल तर अधर्महि करावा. भगवंत जोडणें हाच एक धर्म. अभिमानानें कोणतेंहि कृत्य केलें तर तें नाहीं भगवंताला पोंचत. दानधर्म केला, धर्मशाळा बांधल्या, हें सर्व नांव होण्याकरितां जर केलें, तर त्याचा तुमच्या कल्याणाला काय उपयोग झाला ! भगवंत जवळ न येतां त्यामुळें अभिमान मात्र वाढतो. बाभळीचीं झाडें लावलीं तर त्यांना आंबे कसे येतील ! मीपणानें केलेलें काम नाहीं उपयोगी पडत. शरणबुद्धीनें केलेलें काम हाच खरा धर्म. मी भगवंताच्या हातचें बाहुलें आहे असें समजावें. ' राम कर्ता ' असें म्हणावें, म्हणजे देवाजवळ शरण-बुद्धि धरावी. संतांना शरण गेला तो मला येऊन सहज मिळतो. खरें म्हणजे भगवंताची निष्ठा कोणत्याहि वयांत आणि कोणत्याहि अवस्थेंत वाढवतां येतें. ही निष्ठा कधीं कुणाला हार जाणार नाहीं किंवा कधीं कुणापुढें मान लवविणार नाहीं. एकदां भगवंतावर पूर्ण निष्ठा ठेवल्यावर मग काळजीचें कारणच काय ! काळजीनें कार्याचा नाश होतो आणि कर्तव्याचा विसर पडतो. आपण भगवंताचा वशिला घ्यावा आणि त्याचा उपयोग करावा; भगवंतावर श्रद्धा ठेवून प्रयत्न करावा; जें फळ मिळेल त्यांत समाधान मानावें. व्यवहारांत सौख्य कर्तव्यानें मिळतें, तसें परमार्थांत सौख्य निष्ठेनें मिळतें. जिथें आळस माजला तिथें परमार्थ बुडाला. परमार्थ हा बावळ्या माणसाचा नाहीं, तसा तो लबाड आणि भोंदू माणसाचाहि नाहीं. परमार्थ करणाऱ्यानें कोणाचेंहि अंतःकरण दुखवूं नये. व्यवहारांत उगीच कोणाला फसवूं नये आणि कशाला भुलूं नये. व्यवहारांत आपल्या हातामध्यें जितका पैसा असेल त्या मानानेंच देवघेव करावी. पण कोणत्याहि परिस्थितींत मी राहीन " असें जो म्हणेल त्याला कधींच अडचण पडत नाहीं. आपण श्रीमंतांचा द्वेष करूं नये आणि गरिबांना कमी लेखूं नये, अशी वृत्ति बनायला भगवंताची निष्ठा पाहिजे. प्रत्येकाला खायला प्यायला भरपूर मिळालें पाहिजे, ही संपत्तीची समान वांटणी होय. मोबदला न देतां आपण पैसा घेतला, तर तो ज्याचा घेतला त्याची वासना त्याला चिकटून बरोबर येते. काय गंमत आहे बघा, इतर बाबतींत मनुष्यवचन पाळण्याची पराकाष्ठा करतो, पण तो पैशाचें वचन देतो सहज आणि तें मोडतोहि सहज; तेवढेंच वचन पाळण्यांत तो कुचराई करतो. पैसा नसून अडतें आणि तो असून नडतें, अशी आपली परिस्थिति आहे. संन्याशानें एक दिवसाचा संग्रह करावा. गृहस्थानें तीन दिवसांचा संग्रह करावा. आपल्याजवळ तीन दिवस खायला आहे असें पाहिल्यावर आपण मुळींच काळजी करूं नये. ' मी कर्ता आहे ' ही प्रपंचातली पहिली पायरी, तर ' राम कर्ता आहे ' ही परमार्थांतली पहिली पायरी, जो सद्हेतूनें कर्म करतो तोच खरा परमार्थी समजावा.

---

१६६. जो नामस्मरण करील आणि अनुसंधान ठेवील त्याला भगवंताची जिज्ञासा आपोआप उत्पन्न होईल.

# नामानें सत्संग व सत्संगतीनें भगवंताचें प्रेम, हेंच परमार्थाचें तत्त्व

१५ जून

मनुष्य कितीहि मोठा असला, उत्तम पुराण आणि प्रवचन सांगणारा जरी असला, तरी तो जर नामांत राहात नसेल, किंवा त्याच्या संगतींत परमेश्वराचें प्रेम लागत नसेल, तर तो कदापीहि संत म्हणून समजला जाणार नाहीं. संतांचे नातेवाईक संतच असतात असें नव्हे. आपण नोकरी केली तर आपला मुलगा नोकरीच करील असें काहीं नाहीं; तसेंच जो भगवंताचा आहे त्याचा मुलगा भगवंताचा असेलच असें नाहीं. संत जरी झाला तरी त्यानें चार माणसांसारखें वागावें. काहींतरी वागणें हें संताचें वागणें नव्हे. अत्यंत निर्भयता हा संतांचा पहिला गुण होय; कारण 'सर्व ठिकाणीं मीच आहें' ही भावना झाल्यावर भयाचें कारणच उरत नाहीं. साधूच्या अंतःकरणामध्यें भयाचा संकल्प नसल्यामुळें वाघ, सिंह, साप त्याला त्रास देत नाहींत. अगदीं जंगली वाघाकडे देखील निर्भयतेनें नजरानजर केली तर तो अंगावर येत नाहीं; याशिवाय, साधूच्या शुद्ध अंतःकरणाचाहि त्याच्यावर परिणाम होतो. अशा रीतीनें संतांच्या अंतःकरणाची प्राणिमात्रांनासुद्धां जाणीव असते. अशा संतांचा सहवास मिळणें ही फार भाग्याची गोष्ट आहे. संतांच्या संगतींत राहून, परमेश्वराचें प्रेम लागणें किंवा सतत मुखांत नाम येणें हेंच साधायचें असतें. संतांची अखंड संगत नामानेंच ठेवतां येईल. जिथें नाम आहे तिथें संतांचा सहवास आहे. तुकाराममहाराजांसारखे संतसुद्धां देवापाशीं मागतांना 'तुझा विसर न पडावा' हेंच मागतात. तसेंच रामदासस्वामी देवाला म्हणतात, "तुझा योग, म्हणजे तुझा सहवास, मला नित्य घडूं दे." '**योग असणें' म्हणजे दुसरें कांहीं नसून, मन जेव्हां अनुसंधानापासून अलिप्त होऊन इतर विचारांत भरकटतें तेव्हां त्याला आंवरून परत अनुसंधानांत लावणें; हीच योगशक्ति.** संतपुरुषांनीं आपल्यावर फारच उपकार केले आहेत. विशेषतः रामदासांनीं मातींतून अत्तर काढून दाखविलें आहे; प्रपंचांत राहूनहि कशी परमेश्वरप्राप्ति होते हें त्यांनीं दाखवून दिलें. हुकूम कितीहि कडक असेना का, परंतु त्याच्याखालीं जर सही नसेल तर त्या हुकुमाला महत्व नाहीं; साहेबाच्या सहीच्या कागदाला महत्त्व आहे. **नाम हें सर्व साधनांत सहीसारखें आहे.** एका मुलाला अत्यंत राग येत असे. रागाच्या भरांत तो आपलें डोकें आपटून घेई. त्याला मी सांगितलें, "रोज स्नान झाल्यावर आपल्या पोटावर गंधानें रामनाम लिहून ठेव, आणि ज्या ज्या वेळीं राग येईल. त्या त्या वेळीं त्या नामाकडे पाहा;" आणि त्या प्रयोगानें त्या मुलाचा राग आपोआप शांत झाला. खरोखर नामांत किती प्रचंड शक्ति आहे ! अनुभव घेऊनच पाहा. मी आजपर्यंत सर्वांना नामच सांगत आलों आहें. मी इथें नाहीं, मी तिथें नाहीं, मी गेलों नाहीं, मी जात नाहीं; मी फक्त एका नामांतच आहें. ज्याच्याजवळ भगवंताचें नाम आहे, त्याच्या मागें-पुढें मी आहेंच.

**१६७. भलतेच विचार नामाच्या प्रेमाला आडकाठी करतात, म्हणून विचार आले कीं त्यांना नामाची जोड देऊन ठेवावी.**

# परमार्थ पूर्ण समजून तरी करावा नाहीं तर अंधश्रद्धेनें करावा; अर्धवटपणानें करूं नये

१६ जून

आपण मनुष्यजन्माला आलों ते भगवंतप्राप्तीकरतांच आलों. आत्तांपर्यंत मी पुष्कळ योनि हिंडलों, भगवंतानें आतां मला मनुष्ययोनींत आणलें. 'भगवंता, आतां नाहीं तुला विसरणार' असें कबूल करूनहि, आपण जन्मास आलों नाहीं तर लगेच 'तूं कोण?' असें म्हणूं लागतों! संत आपल्याला 'तोच मी' असें भगवंताजवळ कबूल करून आल्याची आठवण करून देतात. पण संतांनीं जागें केलें तरी आम्ही मात्र पुनः तोंडावरून पांघरूण ओढून घेतों, याला काय करावें? झोपेचें सोंग घेतलेल्याला जागें करणें कठीणच जातें. पुष्कळ तीर्थयात्रा केल्या, पण होतो तसाच राहिलों, यांत दोष गंगेचा का माझा? भगवंताच्या पायाला हात लावला कीं पाप पळून जातें आणि खरा मार्ग समजतो; परंतु भगवंताच्या पायाला हात लावण्याची मला बुद्धीच होत नाहीं याला काय करावें? 'गंगेच्या कांठीं कितीतरी लोक येतात. स्नान करतात, पूजाअर्चा करतात, मग हें कलियुग आहे असें कसें म्हणावें?' असें एकाने म्हटलें. त्यावर दुसरा म्हणाला, 'याचें प्रत्यंतर समोरच दाखवतों. समोर एक रक्तपिती माणूस बसला आहे, त्याला जो पापी नसेल त्यानें कवटाळावें म्हणजे त्याची रक्तपिती जाईल. पण एवढें होईल कीं, जर कवटाळणारा पापी असेल तर त्याला त्या माणसाची रक्तपिती होईल.' असें समजल्यावर जो तो हळूहळू तिथून पसार होऊं लागला! म्हणजे, एवढे नेमनिष्ठ विद्वान् गंगामाईचें रोज स्नान करणारे, तरी आपलें अंतरंग शुद्ध झालें असें त्या कुणालाच वाटलें नाहीं! तेवढ्यांत वऱ्हाडकडला एक गरीब शेतकरी घोंगडी पांघरून, हातांतली काठी टेकीत टेकीत येत होता. त्याची निष्ठाच अशी कीं गंगेत स्नान केलें कीं सर्व पापें नष्ट होतात. त्यानें गंगेत बुडी मारली आणि वर येऊन त्या रोग्याला कडकडून भेटला; आणि आश्चर्य म्हणजे त्या रोग्याचा रोग एकदम बरा झाला! असे हे जे गोरगरीब-भोळेभाळे लोक, त्यांच्याजवळ अंधश्रद्धेनें जें येतें तें मोठ्या विद्वानांनाही साधत नाहीं. आपण व्यवहारांत पुष्कळ ठिकाणीं अंधश्रद्धा ठेवतों. घरून कचेरीला निघतांना वेळेवर आपण पोहोंचूं अशी (अंध) श्रद्धा आपली असतेच. कधीं कधीं आकस्मिक कारणानें आपण कचेरीला पोंचूंहि शकत नाहीं; तरी पण आपण भरंवसा ठेवतोच! परमार्थ पूर्ण समजून तरी करावा, किंवा अडाण्यासारखा श्रद्धेनें तरी करावा. पण आपण आहोंत अर्धवट; म्हणजे, पूर्ण कळलेलें नसून आपल्याला तें कळलें आहे असें वाटतें. अशा माणसाला शंका फार आणि त्यांचें समाधान करणेंहि फार कठीण जातें. अमुक एक खरें आहे असें कळूनसुद्धा ज्याला आचरणांत आणतां येत नाहीं तो मनुष्य खरा अज्ञानी. जे अनुभवानें सुधारलें तेच शहाणें भलें!

---

१६८. व्यवहारांत तुम्ही एकमेकांवर जेवढी निष्ठा ठेवतां तेवढी जरी भगवंतावर ठेवलीत तरी भगवंत तुम्हाला समाधान देईल.

# पेन्शन घेतल्यावर परमार्थ करूं हें म्हणणें बरोबर नाहीं

१७ जून

समर्थांना सामर्थ्य येण्याचें कारण, कोणी कसाहि असो, त्याला त्यांनीं मार्गाला लावलें. पापी, दुष्ट असला तरी त्यांनीं त्याला धिक्कारलें नाहीं. वाईट लोकांना सुधारणें हेंच खरें कार्य आहे तेंच समर्थांनीं केलें. जसा जो भेटला त्याप्रमाणें त्याला उपदेश केला. प्रपंच धरून परमार्थ कसा करावा याची युक्ति त्यांनीं सांगितली. सुखानें जर राम घरीं येत असेल तर कुठें बिघडलें ! साधुसंतांकडे आपण जे जातों ते स्वतःच्या स्वार्थाकरितां जातों. समर्थांनीं सर्व जगाचा स्वार्थ पाहिला. प्रपंच सावधानपणें पण दक्षतेनें करावा असें त्यांचें म्हणणें असे. कोर्टांतली शपथ ज्याप्रमाणें लोक खरी मानत नाहींत, त्याप्रमाणें प्रपंचांत कांहीं लोक लबाडीनें वागतात, आणि त्याला 'हा व्यवहारच आहे' असें म्हणतात, हा कांहीं नेटका प्रपंच नव्हे. प्रपंचांत जर समाधान झालें नाहीं तर तो नेटका नाहीं झाला. प्रपंचाची दिशा ज्याची चुकली त्यानें नाहीं परमार्थ साधला. ज्याला प्रपंच करतां येत नाहीं त्याला बुवापणाहि नाहीं करतां येणार ! लग्न केलें तर 'इतके दिवस ब्रह्मचारी राहिलों' या म्हणण्यांत काय अर्थ आहे ! कर्ज फार झालें म्हणून प्रपंच सोडला, यांत कोणता स्वार्थत्याग आहे ! प्रपंचाचा त्याग केला म्हणजे काय केलें, तर जंगलांत जाऊन बसला. थंडी वाजूं लागली तेव्हां काटक्या गोळा करून शेकोटी केली, जागा साफ केली, तुळशी लावल्या, झोपडी बांधली; पण भिक्षेला जातांना झोपडीची काळजी केली, तर मग घरादारानेंच काय केलें होतें ! प्रपंचाचें बंधन सुटावें लागतें; जबरदस्तीनें सोडून कुठें सोडतां येतें !

पेन्शन घेतल्यावर परमार्थ करूं हें म्हणणें बरोबर नाहीं. या गडबडींतच, प्रपंचाच्या झटापटींतच, परमार्थ साधावा. सावधानता कशाची ठेवायची ! तर मी जन्माला आलों तेव्हां जें कबूल केलें तें करण्याची सावधगिरी ठेवायची. प्रपंच करतांना लक्ष भगवंताकडे ठेवा. विषयांत गुंग झालों, भगवंताचा विसर पडूं लागला, ही संधि साधावी आणि त्या वेळीं भगवंताचें स्मरण ठेवावें. आपण विषयाला जसें शरण गेलों तसें भगवंताला शरण जावें. चित्त शुद्ध करून विचार करावा आणि मी विषयाला किती शरण गेलों हें पाहावें. विषयापासून वेगळें व्हावें म्हणजे हें पाहतां येतें. व्यसनी माणसानें, व्यसनापूर्वीं मी कसा वागत होतों याचा विचार करावा. मारुतिरायाच्या दर्शनाला पूर्वीं मी जात होतों, आतां विषयांत त्याची आठवणहि येत नाहीं, याला काय करावें ! नोकरींत नाहीं का तुम्ही वरिष्ठाला शरण जात ! मग जें पोटाकरतां करतां तें भगवंताकरतां का नाहीं करीत ! सर्वांत सोपें भगवंताला शरण जाणें आहे। त्याला निराळ्या कोणत्याहि वस्तूची जरूरी नाहीं लागत. माझ्या मनांत येईल तेव्हां भगवंताला शरण जातां येईल. भगवंताला शरण जाणें म्हणजे 'मी त्याचा झालों' असें म्हणणेंच होय. "मी रामाचा झालों, जें जें होतें तें रामइच्छेनें होतें" असें जो म्हणतो त्याला निराळी सावधगिरी ठेवावी लागत नाहीं.

---

१६९. नाम हें त्याच्या शत्रूलासुद्धां जर मदत करतें तर तें आपल्याला मदत करीलच. अत्यंत गुह्यांतलें गुह्य जें आहे तें मी तुम्हाला सांगतों—नामाचें प्रेम हेंच तें गुह्य होय.

# परमार्थांत गुप्ततेची जरूरी असते

१८ जून

वासनेच्या तावडींतून सुटणें फार कठीण आहे, कारण वासनेच्या पोटींच प्राणी जन्माला येत असतो. त्या वासनेला जिंकणें म्हणजे आपण मरून जाण्याइतकें कठीण आहे. वासनेच्या पोटीं जन्म आणि जन्मानंतर अहंकार, ह्या जोडप्यापोटीं कामक्रोधादि विकार जन्माला येतात. या जोडप्याचें वैशिष्ट्य असें कीं, त्यामध्यें बायको नवऱ्यापेक्षा वडील असते, कारण आधीं वासना आणि त्यांतून पुढें अहंकार. भगवंताजवळ ' वास ' ठेवला तरच वासना नष्ट होते. प्रपंच मुळांत चांगलाहि नाहीं आणि वाईटहि नाहीं. **प्रपंचांतली वासना बाहेर काढणें याचेंच नांव परमार्थ.** प्रपंचांत प्रसिद्धीची जरूरी वाटते. त्याच्या उलट परमार्थांत गुप्ततेची जरुरी लागते. समजा, एखाद्या बाईनें दागिने हवेत म्हणून नवऱ्याजवळ हट्ट धरला, आणि नवऱ्यानें तिला हवे असलेले सर्व दागिने देण्याचें कबूल केलें; पण अट अशी घातली कीं, जेव्हां दागिने अंगावर घालायचे असतील त्या वेळीं ते घालून खोलीचीं दारें-खिडक्या बंद करून आंत बसले पाहिजे, आणि तेवढ्या वेळांत कोणी भेटायला आलें तर सर्व दागिने अंगावरून उतरून ठेवून मग दार उघडून त्याला भेटावें. अशी अट पाळून कोणती बाई दागिने घालायला कबूल होईल ? कारण दागिने लोकांनीं पाहण्यांतच तिला समाधान आहे, तें गुप्त ठेवण्यांत नाहीं. ही झाली प्रपंचातली रीत. परमार्थांत याच्या उलट गुप्ततेची गरज आहे. आपलें साधन कोणाच्याहि नजरेस न येईल अशी खबरदारी घ्यावी, कारण परमार्थाला दृष्ट फार लवकर लागते. ती केवळ इतर लोकांचीच लागते असें नसून, आपली स्वतःची लागण्याचा फार संभव असतो. म्हणून परमार्थांत गुप्तता असावी; आणि आपल्या हातून जें साधन होतें आहे तें सद्‌गुरु किंवा परमात्मा यांच्या कृपेनें माझ्याकडून करवून घेतलें जात आहे ही जाणीव ठेवावी. परमार्थांत अगदीं ज्याचा तोच असतो. तुकारामबुवांच्या विमानांत बायकोला जागा नव्हती असें नाहीं, त्यामध्यें ती सामावलीच असती, पण तें शक्य नव्हतें.

आजारी माणसानें उसतें पडून राहावें, पण औषध मात्र नियमानें घ्यावें. बाकीच्या गोष्टी इतर लोक करतात; अर्थात् औषध मात्र आपण स्वतःच घेतलें पाहिजे. एखादा मोठा राजा जरी झाला तरी कडू औषध दासीला देऊन कांहीं त्याचा रोग बरा होत नाहीं; त्याचप्रमाणें परमार्थांत भगवंताचें स्मरण ठेवण्याचें काम आपल्या स्वतःलाच करायला पाहिजे. उगीच कुणाच्या नादीं लागूं नये परमार्थ म्हणजे काय करायला पाहिजे हें नीट समजावून घ्या आणि मग त्या मार्गानें जा. कोणाला फसूं नका, कारण स्वतः फसणें हें जगाला फसविण्याइतकेंच पाप आहे. **ज्याच्या प्रपंचात पाठीराखा परमात्मा आहे त्याचा तो प्रपंचच परमार्थ होतो.** उलट ज्याचा पाठीराखा अभिमान आहे त्याचा परमार्थदेखील प्रपंचच म्हटला पाहिजे.

---

**१७०. भगवंताचा विसर कोणत्याहि कारणानें झाला तरी तो बरा नाहीं. मग प्रपंचांत सुखसोयी असल्यामुळें तो होवो किंवा प्रपंचात दुःख झाल्यामुळें तो होवो.**

# "मी कोणीतरी आहे" ही देहबुद्धि परमार्थाला घातकच

१९ जून

पुष्कळ लोकांच्या अडचणी ऐकून असा विचार मनात आला कीं, जगातल्या सर्व दुःखाचें मूळ देहदुःख आणि पैशाची टंचाई ह्यांत मुख्यतः साठविलेलें आहे. या दोन गोष्टींत जर मदत करता आली तर पुष्कळ लोकांना सुखी करता येईल असें वाटूं लागलें, आणि त्या दृष्टीनें विचार सुरू झाला. पैशाचा विचार करता असें दिसलें कीं, आपण लंगोटी घातलेली, जवळ पैसा नाहीं, आणि त्याचा लोभहि नाहीं. आता दुसऱ्याला पैसा द्यायचें म्हटलें म्हणजे त्याचा प्रथम आपल्या ठिकाणीं लोभ उत्पन्न केला पाहिजे, तरच तो मिळवावा अशी बुद्धि उत्पन्न होईल; नंतर पैसा मिळविणें, आणि त्याच्यानंतर तो गरजवंताला देणें. पण हें करणें वाटतें तितकें सोपें नाहीं; कारण दुसऱ्याला देण्याकरिता पैसा मिळवावा म्हणून जो लोभ प्रथम आपल्या ठिकाणीं उत्पन्न केला, तोच पैसा सोडतांना आपल्या आड येईल, आणि दुसऱ्याला पैसा देण्याची बुद्धि मारील. म्हणजे परिणाम असा होणार कीं, दुसऱ्याला पैसा तर देतां आला नाहींच, पण आपल्या ठिकाणीं मात्र आधीं नसलेला पैशाचा लोभ उत्पन्न झाला. ह्यांत दुसऱ्याचें काम तर नाहींच, आणि स्वतःचें मात्र नुकसान झालें. दुसरी बाब देहदुःखाची. ज्याची देहबुद्धि मेलेली आहे त्याला दुसऱ्याच्या देहदुःखाची जाणीव होऊं शकत नाहीं. म्हणजे दुसऱ्याचें देहदुःख नाहींसें करावें अशी बुद्धि होण्याकरिता स्वतःच्या ठिकाणीं देहबुद्धि जागृत करावी लागेल. समजा, इतकेंहि केलें आणि दुसऱ्याचें देहदुःख निवारलें, तरी त्याला पुनः देहदुःख भोगावें लागणारच नाहीं असें कसें होईल ? आज झालेली पोटदुखी बंद केली तरी कालांतरानें त्याला ताप किंवा इतर आजार येणारच नाहीं असें कसें होऊं शकेल ? म्हणजे देहदुःख कायमचें टाळता येत नाहीं, आणि पैसाहि देता येत नाहीं. अशानें जगाला सुखी करता तर येत नाहींच, पण आपल्या स्वतःच्या ठिकाणीं मात्र नसते दोष उत्पन्न केल्यामुळें स्वतःची अवनति केल्यासारखें होऊन नुकसान मात्र पदरात पडतें. म्हणून रामाची प्रार्थना केली कीं, असल्या गोष्टी करण्याची शक्ति आणि बुद्धि मला देऊं नकोस.

बालपणाची सरल वृत्ति नाहींशी व्हायला दोन मोठी कारणें आहेत. एक पैसा, आणि दुसरें विद्या. दोन्हींपासून "मी कुणी तरी (श्रेष्ठ) आहें" ही वृत्ति उत्पन्न होते, आणि ती घातक असते. जगातले अत्याचार, अनीति, अधर्म, असमाधान, या सर्वांचें कारण हें कीं, मनुष्य जास्त लोभी झाला आहे. नीतिधर्माचें आचरण ठेवता यावें, मुलाबाळांचें रक्षण करता यावें, अब्रूनें जगता यावें, इतका पैसा जवळ असला कीं, तो मनुष्य श्रीमंत समजावा. देवाची ज्याच्यावर कृपा आहे त्याला तो पोटापुरता पैसा देतो, पण ज्याची परीक्षा पाहायची त्याला भगवंत जास्त पैसा देतो.

---

१७१. देवासमोर पैसा ठेवताना आपण आपलें पैशातलें प्रेम त्याला अर्पण करतों आहों ही भावना असली पाहिजे.

# ज्याला प्रपंच नाहीं करतां आला। त्याचा परमार्थ ढिला पडला ॥

२० जून

मातापिता यांचें न पाहावे दोष। हें सत्पुत्राचें लक्षण सत्य ॥ माता-पितरांचें समाधान। हेंच सुपुत्राचें खरें लक्षण जाण ॥ त्यांचें राखून समाधान। जें करणें असेल तें करावें जाण ॥ आईचें अंतःकरण अत्यंत कोवळें असतें। आपले दुःखीपणानें तें दुःखी होतें। आपली आनंदी वृत्ती आईला आनंदी बनविते ॥ म्हणून मुलानीं असावें नेहमीं आनंदांत। काहूर न माजूं द्यावें चित्तांत ॥ शब्दानें करावें त्यांचें समाधान। उत्तरीं अपशब्दाचें न मानावें दुःख जाण ॥ नोकरी चाकरी उद्योग धंदा। पोटाकरितां करणें आहे सदा ॥ आपण पैका मिळवावा पुष्कळ। पण तें सुखाचें साधन न मानावें सकळ ॥ प्रपंचांत वृद्धपणीं फारसें न पाहावें। मुलास मार्ग दाखवून सुखी राहावें ॥ वयामानानें शरीर होतें क्षीण। तरी वागावें फार जपून ॥ औषध पथ्यपाणी सांभाळावें। पण दुःखीकष्टी कधीं न व्हावें ॥ प्रपंचांत नुकसान होईल असें काम करूं नये। तसे शब्द बोलूं नये। आल्या अतिथा अन्न द्यावें। कोणास विन्मुख न पाठवावें ॥ निरुत्साही बनूं नये। निराशा वाढूं देऊं नये। अगदीं व्यवहाराच्या मार्गानें जावें। त्यांत रामाचें अधिष्ठान राखावें ॥ ज्याला प्रपंच नाहीं करतां आला। त्याचा परमार्थ ढिला पडला ॥ प्रपंचाची काळजी। हीच परमार्थाला वाळवी ॥ परमात्म्याचा आधार ज्याला। ठाव नसे काळजीला ॥ सर्व कर्ता राम। हा भरंवसा ठेवावा ठाम। मग काळजीचें उरलें नाहीं काम ॥ न सोडावा धीर। मागें उभा रघुवीर। हा ठेवितां विश्वास। काळजी न लागे खास ॥ शेजार असतां रामाचा। दुःखाची काळजीची काय वार्ता ? मी कोण हें जाणलें ज्यानें चित्तीं। त्याला काळजी न राहे अशी होईल वृत्ति ॥ राम त्राता हा भाव ठेवावा चित्तीं। निर्भयता होईल याच रीती ॥ कळकळीनें सांगणें सर्वांस। काळजी दुःख न करी खास ॥ ज्यानें देह केला रामाला अर्पण। त्याला नाहीं काळजीचें कारण ॥ कर्ता राम हें आणतां चित्तीं। पापपुण्याची नाहीं त्याला भीति ॥ संसाराचा ताप न होईल मनास। असें वागत असावें खास ॥ माझें हित त्यांत आहे असें न मानतां। मनावरचा परिणाम येतो चुकवितां ॥ रामरायाचें सान्निध्य राखतां। भय चिंता शोक यांची नाहीं वार्ता ॥ ज्याचा परमात्मा झाला सखा। त्याला नाहीं कोठें धोका ॥ काळजी सर्व सोडावी। रामाचे पाय धरावे हृदयीं ॥ "कर्ता मी" म्हणे आपण। हें सर्व दुःख-काळजीचें कारण ॥ नाहीं करूं काळजीला। राम कर्ता मानावा भला ॥ राम कर्ता हा ठेवितां विश्वास। काळजीचें कारण उरत नाहीं खास। झालें तें होऊन गेलें। होणार तें चुकेना कोणाला भलें। म्हणून नाहीं करूं काळजीला। राम साक्षी आहे त्याला ॥ जें जें कांहीं माझें। तें तें जाणावें रामाचें ॥ राम त्यास सांभाळतां। काळजीस कारण नाहीं उरलें आतां। मुलाबाळांची न करावी काळजी। रामराय करावा राजी ॥ आपला प्रपंच हा रामाचा जाणून चित्तीं। काळजी चिंता करणें ही योग्य नाहीं रीती ॥ शक्य तों करावें नामस्मरण। आपली काळजी न करावी आपण ॥ रामाचा म्हणून प्रपंच केला। काळजीचें कारण उरत नाहीं आपल्याला ॥ भगवंत असतां पाठीराखा। काळजीची काय कथा ? ॥ म्हणून मुखानें नाम चित्तांत राम। त्याचे मनाला होईल आराम ॥ सतत ठेवावें एक चित्तीं। न सोडावा रघुपती ॥ सर्व सारांचें सार। एक भजावा रघुवीर ॥ नेमांत नेम उत्तम जाण। रामावांचून न राहावें आपण ॥

---

१७२. सर्व कर्ता राम। हा भरंवसा ठेवावा ठाम। मग काळजीचे उरले नाहीं काम ॥

# "भाव" असल्याशिवाय परमार्थ होत नाहीं

२१ जून

प्रपंचात जसा पैसा लागतो त्याप्रमाणें परमार्थात भाव लागतो. प्रपंचात पैशाशिवाय चालूंच शकत नाहीं. परमार्थहि भाव असल्याशिवाय होत नाहीं. जसा तुमचा भाव असेल त्याप्रमाणें तुम्हाला देवाची प्राप्ति होईल. प्रल्हादाला खांबातहि देवाची प्राप्ति झाली, तर नामदेवानें दगडाच्या मूर्तीलाहि जेवूं घातलें. तुम्हा सर्वांना गोपीची गोष्ट माहीत असेलच. त्या गोपीला श्रीकृष्णाला जेवण घालायचें होतें, पण तिचा नवरा तिला जाऊं देईना, त्यावर तिनें सांगितलें कीं, हा देह तुझा आहे, परंतु मनावर तुझा ताबा नाहीं; असें म्हणून ती त्याच्याजवळ देह ठेवून श्रीकृष्णाकडे गेलीच कीं नाहीं! त्याप्रमाणें आपण परमार्थात भाव ठेवणें जरूर आहे. पण असें आपण नुसतें म्हणून काय उपयोग? तो सर्वव्यापी आहे, सर्वसाक्षी आहे, असें आपण म्हणतों, पण आपण पापाचरण करायला भितों का? तो आपल्याला पाहातो आहे असें पक्कें वाटलें तर आपल्याकडून कधींतरी पाप होईल का? पण आपल्याला तसें वाटतच नाहीं. आपल्यासारख्या आस्तिकाला देव 'हवा' असें वाटतें, पण 'हवाच' असें वाटत नाहीं. आपल्या प्रपंचाच्या मदतीसाठीं देव हवा असें वाटतें. प्रपंच 'असावाच' असें आपल्याला वाटतें. आणि भगवंत मात्र 'असला तर बरा' असें वाटतें. याच्या उलट, भगवंत असावाच आणि 'प्रपंच असला तर बरा' असें वाटायला पाहिजे. प्रपंचाची आवड असूं नये, पण प्रपंचातल्या कर्तव्याची आवड असावी. देहानें तें कर्तव्य करावें, आणि मनाने मात्र अनुसंधान ठेवावें. ज्या गोष्टी आपल्या मनाला खातात त्या न केल्या कीं आपला आपल्या विकारांवर ताबा येईल. भगवंताच्या देखत आपल्याला करायला लाज वाटणार नाहीं अशीच कृति आपण करावी. खाणींतल्या दगडामध्यें जसें सोनें असतें तसा आपल्यामध्यें परमात्मा आहे. दगडातली माती अनेक यंत्रांनीं आणि चाळण्यांनीं चाळून काढून टाकतात आणि नंतर सोनें हातीं लागतें, त्याचप्रमाणें अनेक वासना नष्ट झाल्यानंतर परमात्मा आपल्या हातीं लागतो. आपण मीपणानें मेल्यानंतर शेवटीं परमात्मा प्रकट होतो.

ज्यांना व्याप आहे ते लोक रडतात, आणि ज्यांना व्याप नाहीं तेहि लोक रडतात; मग सुख कशांत आहे? सुख हें समजुतीमध्यें आहे, आणि भगवंताचें होणें हीच समजूत तेवढी खरी आहे. आपल्या देहावर आपली सत्ता नाहीं, आपल्या पैशावर आपली सत्ता नाहीं, आपल्या माणसांवर आपली सत्ता नाहीं, म्हणून आपण आपलें कर्तव्य तेवढें करावें, आणि तें करीत असताना आपलें मन दूषित होऊं देऊं नये. भगवंताजवळ पोटापुरतें मागायचा आपल्याला हक्क आहे, पण आपण लोभांत सांपडतां कामा नये. एखाद्या शेतापेक्षां कुंपणालाच जास्त खर्च यावा, त्याप्रमाणें आपण आपल्या मूळ स्वरूपापेक्षां आपल्या उपाधींचीच जास्त आरास करतों. आमच्या इच्छेनुसार सर्व गोष्टी घडत नाहींत ही भगवंताची कृपाच आहे.

---

१७३. आपल्याला हव्या त्या गोष्टी देण्यामध्यें भगवंताची खरी कृपा नसून असेल त्या परिस्थितीमध्यें आपलें समाधान टिकणें ही त्याची खरी कृपा होय.

# विषयांत सुख पाहणारा तो प्रपंची, परमात्म्याच्या इच्छेंत समाधान मानणारा तो परमार्थी

२२ जून

[ " आशायाः परमं दुःखम् । नैराश्यं परमं सुखम् ॥ " यावरचे निरूपणः—] अमुक हवें असें वाटलें आणि तें मिळालें नाहीं म्हणजे दुःख होतें. अमुक हवें असें वाटूंच देऊं नये. परमात्मा ठेवील त्यात समाधान मानावें, याचेंच नांव वैराग्य. आपण विषयात बुडतों आहोंत, आणि पुनः विषयाचीच कास धरली तर आपण अधिकाधिक नाहीं का बुडणार ? विषयाची आस धरणें म्हणजे त्याचे दास होण्यासारखेंच आहे. मनुष्य सुखाकरिता धडपड करतो, आणि अंतीं दुःखमय अशा विषयाची आशा करतो. सुख त्यागांत आहे, भोगांत नाहीं, हें पुष्कळांना पटत नाहीं.

परिसाला लोखंड लागलें म्हणजे त्याचें सोनें होतें, पण रुप्याचें कांहीं सोनें होत नाहीं, तसें आपण दीनाहून दीन, म्हणजे अभिमानरहित झालें पाहिजे, आणि असें झालें म्हणजेच, परमात्म्याला अनन्य शरण जाता येईल. हें व्हायला त्याची कृपाच पाहिजे, आणि ती नित्य भाकावी. एखाद्या गोष्टीनें आपलें मन अस्वस्थ होतें तें का बरें ? त्या गोष्टीला आपण नित्य सत्यत्व देतों म्हणून तर हा सर्व खेळ आहे, हें मिथ्या आहे, असें जाणून, ज्याप्रमाणें नट आपली नाटकांतील भूमिका अगदी खऱ्यासारखी करतो, त्याप्रमाणें व्यवहार करावा. सुख, समाधान, सत्यांत असतें, मिथ्यांत नसतें. आजपर्यंत आपण विषय उपभोगले पण त्यांत आपल्याला सुख झालें नाहीं. मग विषय मिथ्या आहेत याची भगवंतानें तुम्हांला प्रचीति नाहीं का दिली ? तरीसुद्धा तुम्हीं या विषयांतच प्रपंच कसा सुधारेल असें मला विचारतां, याला काय म्हणावें ? जें दुःखमयच आहे त्यांत सुख कुठून मिळणार ? दोन लहान मुली भातुकली खेळल्या; जी मुलगी गरीब होती तिनें पोळ्या आणि गुळांबा केला, पण जी श्रीमंत होती तिनें मात्र श्रीखंड आणि बासुंदी केली. पहिलीचा गुळांबा जितका पोट भरण्याला उपयोगी नाहीं, तितकेंच दुसरीचें श्रीखंडहि उपयोगी नाहीं. तसें प्रपंचाचें खरेंपण आहे. आपला प्रपंच हा मोडक्या वस्तु नीट करण्याचा कारखाना आहे, तिथें मोडक्या वस्तु जितक्या जास्त असतील तितकी शिकणाऱ्याला संधि जास्त असते. प्रपंच असण्यासाठीं बायको आणि मुलें यांची गरज आहेच असें नाहीं; जो दुसऱ्यावर अवलंबून असतो तो प्रपंचीच असतो. म्हणून मनुष्य एकटा असला तरी प्रपंचीच असतो. दुसऱ्यापासून सुख मिळविण्याचा प्रयत्न करणारा मनुष्य हा प्रपंची होय. पांचजण मिळून प्रपंच बनतो. त्यामध्यें प्रत्येकजण स्वार्थी असतो मग सर्व सुख एकट्यालाच मिळणें कसें शक्य आहे ?

---

१७४ " अमुक एक वस्तु आहे म्हणून मी सुखी आहे. " या वृत्तीत राम नसून कांहीं नसताना वृत्तीचें समाधान टिकलें पाहिजे.

# शुद्ध हेतु-शुद्ध कृति-परमार्थाची आवड-परमात्माच सर्वस्व माना

२३ जून

मनुष्यानें शुद्ध हेतु ठेवण्याचा प्रयत्न करावा. हेतु शुद्ध असला कीं स्वाभाविकच कृति त्याला अनुरूप होऊं लागते आणि प्रगतीला मदत होते. हेतु हा विहिरींत असणाऱ्या झऱ्याप्रमाणें आहे. झरा गोड पाण्याचा असला म्हणजे विहिरीचें पाणी स्वाभाविकच गोड असतें. म्हणून हेतु शुद्ध ठेवण्याची दक्षता घ्यावी, आणि त्याकरितां रामाची प्रार्थना करावी. माणसाला देहरक्षणापुरतें अन्न, वस्त्र, आणि नाम घेण्याची बुद्धि असली की असमाधानाला जागा नाहीं. "**नको दैन्यवाणें जिणें भक्तिउणें**" हेंच रामरायाजवळ मागावें. पर्वकाळांत भगवंत कामधेनूचा अवतार घेऊन येतो; जें ज्याला पाहिजे तें तो देतो. पर्वकाळांत सज्जन तसेच दुर्जनहि आपलीं कामें करून घेतात. जारण-मारण हीं देखील पर्वकाळांत शीघ्र साध्य होतात. आपण मात्र भगवंताचें कसें व्हावें हें पाहावें. शुभेच्छा धरावी, भावना जागृत करावी. 'काहींहि कर, पण भगवंता, तुझा विसर पडूं देऊं नकोस,' असें भगवंताजवळ मागावें. 'आजवर कळत न कळत जें पाप झालें असेल तें नाहींसें कर, पुढें पुनः नाहीं करणार,' असें म्हणावें, म्हणजे मागलीं पापें नष्ट होतात. ज्याला विषयाची गोडी असते त्याला नाहीं परमार्थाची गोडी लागत. नरकांतल्या किड्यांना नाहीं किळस येत. विषयी लोक प्रपंचांत रंगून जाऊन साधुसंतांची निंदा करतात; त्यांना मीच एक तो शहाणा, मोठा, असा अभिमान असतो; पण त्याच्यापेक्षां लक्षावधि शहाणे आणि श्रीमंत जगांत आहेत हें तो जाणत नाहीं. तो खालच्या लोकांकडे पाहतो. आणि त्यांच्याहून मी श्रेष्ठ आहें असें म्हणतो. माझें चुकतें आहे एवढें कळलें तरी चालेल. विषयी लोकांना 'मला कुठें दुःख आहे?' असें वाटतें, पण दारूप्रमाणें विषयाची धुंदी उतरली म्हणजे पश्चात्ताप होतो.

भाड्यानें राहिलेलें घर आपलें म्हणणें म्हणजे सर्व संपत्ति लक्ष्मीपतीची असूनहि आपली म्हणणें होय. आपण परमेश्वराचा मुनीम म्हणून काम करावें. जो खरा कर्ता आहे त्याचें मोठेपण खरें असतें. खरें कर्तेपण भगवंताचें असल्यानें त्याच्याकडे तें द्यावें, म्हणजे मोठेपण त्याच्याकडे जातें. आयुष्यांत काहीं दिवस तरी "मी कुणाचा नोकर नसून मी भगवंताचा आहें" असें माणसाला वाटावें. याकरितां भगवंत ज्या ठिकाणीं आहे तिथें त्याला शोधा. तो सर्वांच्या हृदयांत आहे, म्हणून तिथें त्याला पाहा. 'देव आहे' असें खऱ्या अर्थानें वागणारे जगामध्यें थोडेंच असतात. सद्विचार, सच्छास्त्र, आणि सद्बुद्धि हीं प्रत्येक माणसाला याच जन्मांत भगवंताकडे नेण्यासाठीं आहेत. प्रपंचाचा अनुभव कष्टमय आहे, पण भगवंताचा अनुभव आनंदमय आहे. तापानें आजारी असलेल्या माणसाला आपल्याला घाम यावा असें वाटत असतें. पण नुसत्या वाटण्यानें काहीं तो येत नाहीं, त्यासाठीं डॉक्टरचें औषध घ्यावें लागतें. **तसें ज्याला भगवंताचें प्रेम यावें असें वाटतें त्यानें नाम घेणें हेंच एक औषध घ्यावें.** भगवंताचें प्रेम एकदा चिकटलें कीं, त्याच्या आड दुसरें काहीं येत नाहीं.

१७५. नामाबद्दल संशय किंवा विकल्प आले तरी तें तसेंच आग्रहानें घ्यावें, सर्व संशय आपोआप नाहींसे होतील.

# नीतिधर्मावर आधारलेलें, व एकमेकांबद्दल प्रेम व आदर व्यक्त करणारें ज्ञान परमार्थास पूरकच ठरतें

२४ जून

[एका कानडी मासिकाचें उद्घाटन केलें त्यावेळचें निरूपण:]

लोककल्याणाच्या तळमळीनें जो ग्रंथ लिहितो तो खरा ग्रंथकार होय। वाचनांत आलेलें आचरणांत आणून जो लोकांना सांगतो तो खरा वक्ता होय आणि सांगितलेलें जो आचरणांत आणतो तोंच खरा श्रोता आणि साधक होय. अलीकडे ज्ञान-प्रसारचीं अनेक साधनें उपलब्ध झालीं आहेत, त्यामुळें नको त्या ज्ञानाचाहि विस्तार झपाट्यानें होतो आहे. ज्ञान हें एक प्रकारचें दुहेरी शस्त्र आहे. युद्ध एकीकडे लांबच्या ठिकाणीं चालू असतें, तर युद्धाची खलबतें कागदपत्रांवर दूरच्या ठिकाणीं केलीं जातात. प्रत्यक्ष लढाईपेक्षांहि या कागद-पत्रांना जास्त महत्त्व असतें. तेव्हां या प्रकारें कोणत्याहि ज्ञानाचा बरावाईट उपयोग तो करणाऱ्यावर अवलंबून असतो. ज्ञान हें मुळांत पवित्र आहे. जें ज्ञान नीति आणि धर्म यांच्या पायांवर उभें असतें तें जास्त प्रभावी ठरतें. तुम्ही हें मासिक तुमच्या समाजाच्या विकासाकरितां छापतां आहांत हें फार उत्तम आहे. तुमचा समाज लहान का असेना; एखादा लहानसा समाजहि जर एकमतानें चालत असेल तर तो जगताला मार्ग दाखवूं शकेल. आपण पुराणांत वाचतोंच ना कीं, कौरव अनेक होते, परंतु नीति आणि धर्म यांच्या आधारानें चालणारे पांचच पांडव त्यांना भारी पडले. तुम्ही जे कांहीं विचार मासिकाच्या रूपानें प्रसिद्ध कराल त्याचा परिणाम द्वेष वाढविण्यांत किंवा नीतिधर्माची निंदा करण्यांत होऊं नये याची काळजी घ्या. सर्वांचें एकमेकांवर प्रेम वाढेल आणि सर्वजण एकत्र येतील असें ज्ञान असावें. श्रीमंत, गरीब, विद्वान, अशिक्षित, लहान, थोर, स्त्रीपुरुष, या सर्वांना एकमेकांबद्दल प्रेम, आदर आणि आपुलकी वाटेल असें ज्ञान व्यक्त झालें पाहिजे. द्वेषमत्सर वाढवील, नीतिधर्माला फाटा देईल, असें ज्ञान पुस्तकांत नसावें. आपल्या मनामध्यें विचार आणि विकार हे दोघेहि आहेत. **विचार हा पोलीस तर विकार हा चोर आहे.** जिथें विचार आहे तिथें विकार राहूं शकत नाहीत; पण विकार जर तिथें आलाच तर तो विचारांच्या ताब्यांत राहील इतके विचार प्रभावी पाहिजेत. असें प्रभावी विचार तुम्हीं आपल्या मासिकांत मांडायला पाहिजेत, म्हणजे त्याचें वाचन करतांना आणि वाचून ते आचरणांत आणतांना विकाराचा प्रवेश तेथें होऊं शकणार नाहीं, आणि झालाच तर फार वेळ राहणार नाहीं. अशा रीतीनें मासिकांतलें लिखाण हें समाजाच्या उन्नतीसाठीं आणि नीतिधर्माला अनुसरून असावें. याप्रमाणें लिखाण मासिकांत चालू असेल तोंपर्यंत मी आपल्याजवळ आहें म्हणून समजावें. ज्या दिवशीं हें तत्त्व सुटेल त्या वेळीं मी आपल्यापासून गेलों म्हणून समजावें. यापेक्षा मी आणखी काय अधिक सांगूं !

---

१७६. विद्वानाच्याबद्दल मला आदर आहे, पण प्रेम नाहीं. त्याच्यामध्यें असणाऱ्या सरस्वतीबद्दल मला आदर आहे.

# सदाचरण हा परमार्थाचा पाया आहे

२५ जून

राम सहज हातीं लागेल म्हणून जीं काहीं साधनें समर्थांनीं सांगितलीं आहेत त्यामध्यें चांगल्या ग्रंथाचें वाचन हेंहि एक आहे. परंतु कोणत्याहि ग्रंथाचें अगर पोथीचें वाचन करतांना, केवळ काहींतरी वाचायचें म्हणून वाचन करूं नये. अर्थ कळल्याशिवाय पोथी खरी वाचल्यासारखें नाहीं होणार; तसेंच जितका त्याचा अर्थ कळला तितकें तरी कृतींत आणण्याचा प्रयत्न करावा. मी जें करीत नाहीं तें प्रथम करायला सुरुवात करावी. भाराभर वाचलें आणि कृति केली नाहीं तर काय उपयोग ! चार मैलांचा रस्ता असला तर सबंध रस्ता एकदम दिसावा असें म्हटल्यानें कसें होईल ? एक मैल रस्ता चालावा म्हणजे पुढचें दिसेल. जसजशी मजल मारावी तसतसें पुढचें दिसूं लागेल. परमार्थाचेंहि असेंच आहे. लहान मुलानें बापासारख्या मिशा मला याव्या म्हणून हट्ट धरला तर कसें होईल ? त्याचप्रमाणें, आजच मला देवदर्शन व्हावें म्हटलें तर कसें होईल ? साधन करूं लागावें, सद्गुरूची आज्ञा पाळावी, म्हणजे सर्व काहीं होतें. जेवायला बसलें म्हणजे पोट भरायचें राहतें का ?

नुसता ' सावधान ' हा शब्द ऐकून समर्थ किती ' खरे सावध ' झाले ! आपलें चुकतें कोठे तें पाहावें. खरोखर परमार्थाचीच वाट अगदीं सरळ आहे। प्रपंचाचा रस्ता मात्र डोंगराळ असून काटेकुटे यांनीं भरलेला आहे. आपला प्रपंच हा परमार्थाच्या सोयीसाठीं असायला पाहिजे. पण याच्या उलट, आपला परमार्थच मुळीं आपल्या प्रपंचाच्या सोयीसाठीं आपण केला आहे ! कुंपणानें शेत खावें तसें आपलें झालें आहे. शेताला कुंपणाची जरूरी आहे; नाहींतर ढोरें आंत येऊन शेत फस्त करतील. पण कुंपणच जर बेसुमार वाढलें तर त्यामुळें शेताचें नुकसान होतें हें जाणलें पाहिजे.

ज्यानें व्यवहार तपासून केला त्याला परमार्थ साधलाच. परमार्थ हा साखरेसारखा आहे. आपण साखरेचें कारलें जरी केलें तरी तें खायला गोडच लागतें. तसें प्रपंचांतसुद्धां परमार्थ केला तर तो गोडच असतो. परमार्थ हा आपल्यासाठींच असल्यानें तो आपल्याला शक्य आहे किंवा नाहीं हें विचार करून पाहावें; आणि तो आपल्याला शक्य आहे असें जर पटलें तर मात्र केल्याशिवाय राहूं नये. पोटांत अन्न घालण्यासाठीं जसें तोंड, त्याप्रमाणें परमार्थाला सदाचरण आवश्यक आहे. सदाचरण हा परमार्थाचा पाया आहे. पाया म्हणजे काहीं घर नव्हे, परंतु पायाशिवाय मात्र घर नव्हे हें देखील तितकेंच खरें. आपण स्वतःच्या मुलाला जसें प्रेमानें घेतों तसा परमार्थ करावा; आणि आपण दुसऱ्याच्या मुलाला जसें घेतों तसा प्रपंच करावा. भगवंताच्या स्मरणात प्रपंच सुखाचा करणें हाच खरा परमार्थ, आणि ज्याची वृत्ति सुधारून भगवंताकडे लागली त्यालाच खरा परमार्थ कळला.

---

१७७. भगवंतावर अकारण प्रेम करणें याचें नाव परमार्थ.

# परमार्थांत नियम थोडा करावा, पण तो शाश्वताचा असावा

**२६ जून**

[ " देवा आतां ऐसा करीं उपकार देहाचा विसर पाडी मज ॥ " या तुकाराममहाराजांच्या अभंगावर केलेलें निरूपण :— ] खरोखर व्यवहारात आपण पाहूं गेलों, तर ज्या झाडाची वाढ व्हावी असें आपल्याला वाटतें त्या झाडाला आपण पाणी घालतों, त्याची मशागत करतों, त्या झाडाकडे जास्त लक्ष पुरवितों, परंतु जें झाड वाढूं नये असें वाटतें, किंवा ज्या झाडाचें विशेष महत्त्व आपल्याला वाटत नाहीं; त्या झाडाकडे आपण दुर्लक्ष करतों. तसें, जेणेंकरून परमेश्वराच्या ठिकाणीं बुद्धि स्थिर होईल त्याची जोपासना करावी. देहाकडे, विचाराकडें, विषयाकडे दुर्लक्ष करावें म्हणजे आपोआपच त्याचा विसर पडेल.

ज्याप्रमाणें एखाद्या झाडाची जोपासना करतांना, त्याला गुराढोरांनीं खाऊं नये म्हणून त्याच्या भोंवतीं कुंपण घालावें लागतें, त्याप्रमाणें **परमार्थ हा खरा कुंपणांतच ठेवावा; तो जितका गुप्त राहील तितका चांगला.** त्याचें प्रदर्शन झाल्यास त्याला दृष्ट लागतें. म्हणून परमार्थ हा कोणाच्या न कळत परंतु अत्यंत आवडीनें करावा. झाड लावल्यावर तें किती वाढलें आहे हें काहीं कुणी रोज उकरून पाहात नाहीं, त्याप्रमाणें अनुभवाच्या प्रचीतीच्या मागे लागूं नका; त्यामुळे प्रगति खुंटेल. हट्टी आणि व्यसनी माणसें एका दृष्टीनें मला आवडतात; कारण त्यांचा हट्ट भगवंताच्या मार्गाला लावला कीं झालें. परमार्थांत नियम थोडाच करावा, पण तो शाश्वताचा असावा; म्हणजें जेणेंकरून भगवंताचें प्रेम लागेल याबद्दलचा असावा, आणि तो प्राणाबरोबर सांभाळावा. जें अत्यंत थोर भाग्याचें असतात, त्यांनाच ध्यानमार्ग साधतो. हा मार्ग फार थोरांचा आहे. ध्यानामध्यें जगाचाच विसर पडतो. त्या अवस्थेमध्यें दिवस काय पण वर्षेंसुद्धां जातील, पण त्याच्या देहाला काहीं होणार नाहीं. **साधनांत साधन म्हणजें भगवंताचें नाम; दानांत दान म्हणजें अन्नदान; आणि उपासनेंत उपासना म्हणजें सगुणाची उपासना होय;** या तिन्हींमुळें देहाचा विसर पडतो. म्हणून शक्य तों या तीन गोष्टींची कास धरा. मनुष्याची साहजिक प्रवृत्ति व्याप वाढविण्याकडे असतें. द्वैत वाढवून त्यांत अद्वैत पाहण्यांत आनंद असतो हेंहि खरें. साधें मधमाशीचें उदाहरण घ्या. त्या अनेक झाडांवरून मध गोळा करतात आणि नंतर तो पोवळ्यांत एकत्र करतात. असा एकत्र केलेल्या मधाचा केवढा गोड सांठा होऊं शकतो बरें! अशा रीतीनें सर्व द्वैतामध्यें एक अद्वैत, म्हणजे एक राम, पाहायला शिकावें, आणि ज्याला सर्वत्र राम पाहणें असेल त्यानें स्वतःच राम पाहून, प्रत्येक कृति ही रामाची समजावी. स्वतःमध्यें राम पाहिल्याशिवाय तो सर्वत्र पाहतां येणार नाहीं. तेव्हा स्वतःचा म्हणजेच देहाचा विसर पडल्याशिवाय सुख लाभणार नाहीं, आणि हा देहाचा विसर राममय सृष्टि झाल्यानेंच होईल. म्हणून अखंड भगवंताच्या अनुसंधानांत राहा, आणि त्याला अनन्यभावें शरण जाऊन त्याच्या कृपेची याचना करा.

---

**१७८. परमार्थाला अगदीं स्वतःपासून सुरुवात करायची असते.**

# परमार्थ सोपा आहे; पण विद्वान तो अवघड करून सांगतात

२७ जून

असें पाहा, एखादा प्रवचन करणारा घ्या, किंवा मोठा वैदिक कर्में करणारा घ्या; त्याला त्यापासून समाधान मिळतें असें नाहीं, तो असमाधानातच असतो. एक वैश्वदेव केला असता समाधान पावलों असें काहीं त्या शास्त्रीबुवाला वाटत नाहीं. कळूं लागल्यापासून आपण सदाचारानें वागत असून आणि देवधर्म करीत असूनहि आपल्याला समाधान लाभत नाहीं, याचें कारण काय? तर आपलें ध्येय निश्चित झालेलें नसतें. आपण नीतीनें वागतों तें लोकांच्या भीतीनें; कारण आपण वाईट वागलों तर लोक आपल्याला नांवें ठेवतील. लौकिकासाठीं केलेलें कर्म कधींहि समाधान देऊं शकत नाहीं. पापकर्म करणाऱ्यालाहि समाधान लाभत नाहीं, कारण त्यालासुद्धां आपण करतों हें वाईट आहे असें वाटतच असतें. एकदा एक गृहस्थ माझ्याकडे आला आणि म्हणाला, " देवापाशीं काहीं न्याय नाहीं; तो अगदीं अन्यायी आहे. " मीं त्याला विचारलें, " असें झालें आहे तरी काय? " त्यावर तो म्हणाला, " मीं कधीं कोणाचा पैसा खाल्ला नाहीं. सदाचरणानें वागलों, पण मी फक्त एकमजली घर बांधूं शकलों, आणि माझ्या हाताखालीं काम करणाऱ्या एका भिकारड्या कारकुनानें पैसा खाऊन माझ्या घरासमोर दुमजली घर बांधलें! " मीं मग त्याला विचारलें, " मग तुम्हीं कां नाहीं पैसा खाल्ला? " त्यावर तो म्हणाला, " मला तसें आवडत नाहीं; लोक नांवें ठेवतील. " तेव्हां जें कर्म लौकिकासाठीं केलें त्यानें कधींहि समाधान मिळूं शकणार नाहीं. एखाद्या गावाला जाण्याचें ठरवून त्या गावाच्या गाडींत आपण बसलों. एक एक स्टेशन मागें पडूं लागलें कीं आपल्याला समाधान वाटतें, कारण गांव जवळ आलें; हें का खरें समाधान म्हणायचें? संसारिक सुखोपभोग घेतांना असलें समाधान आपल्याला मिळतें, कारण आपलें ध्येय लौकिक मिळविण्यापुरतेंच मर्यादित असतें. प्रपंचांत सुख लाभावें म्हणून आपण देवाचें करतों; आणि लौकिकासाठीं नीतिधर्मानें वागतों; मग त्यांतून शाश्वतचें सुख कसें लाभेल? अंगावर चांगलें दागिने घातले, उत्तम लुगडें नेसलें, परंतु कुंकू जर कपाळाला नसेल तर या सर्वांची काय किंमत? तसेंच, जर देवाचें प्रेम नसेल तर त्या सत्कर्मापासून तितकासा उपयोग होणार नाहीं. याउलट, देवाच्या ठिकाणीं अत्यंत प्रेम असूनसुद्धां जर नीतिधर्माचें आचरण नसेल तर ती परमार्थाची इमारत टिकूं शकणार नाहीं. खरोखर परमार्थ हा अत्यंत सोपा आहे. विद्वान् लोक तो उगीचच अवघड करून सांगतात. चांगलें काय आणि वाईट काय हें कळायला लागल्यापासून जो त्याप्रमाणें वागेल त्याला खात्रीनें परमार्थ साधेल. परमार्थ तीनपैकीं कोणत्याहि एका गोष्टीनें साधूं शकेल. एक, देहानें साधूची संगत, दुसरी, संतांच्या वाङ्मयाची संगत आणि त्याप्रमाणें पुढें आचरण, आणि तिसरी, भगवंताचें नाम घेतल्यानें त्याची संगत आपल्याला अखंड लाभूं शकेल. संतांनीं सांगितलें तें संशय न घेता विश्वासानें करणें ही पहिली पायरी आणि तें पुढें निश्चयानें, श्रद्धेनें आणि प्रेमानें चालूं ठेवणें ही शेवटची पायरी; हाच शाश्वत समाधानाचा मार्ग आहे.

---

१७९. अत्यंत कठीण प्रमेये असलेले जगांतले ग्रंथ वाचावेत, पण शेवटीं अत्यंत सोप्यांतलें सोपें असें नामच घ्यावें.

# आपली व भगवंताची इच्छा एकच होणें हें परमार्थाचें सूत्र आहे

२८ जून

एकदा जनक राजाच्या घरीं एक विद्वान् आला आणि आपण आल्याची वर्दी त्यानें राजाला पाठविली. "आतां राजा आपली पूजा करील" असें त्याच्या मनांत आलें. हा त्याचा भाव समजून जनक राजानें निरोप पाठविला कीं, आपण एकटेंच यावें. तसें आपण अभिमानाचें गाठोडें बाहेर ठेवून मगच रामाकडे जावें, तसेंच सद्गुरूच्या घरींहि आपलें भांडवल बाजूला ठेवूनच जावें. मी कोण याची जाणीव जोपर्यंत राहतें तोपर्यंत दुजेपण आलेंच. अभिमान वाढवण्याकरितां देवाकडे नाहीं जाऊं. दुसऱ्याचें वाईट व्हावें असें आपल्याला वाटलें की आपला अभिमान वाढीला लागला आहे असें जाणावें. समर्थांचें सांगणें जोपर्यंत सत्य वाटत नाहीं तोपर्यंत माझें कुठें तरी चुकतें आहे यांत शंका नाहीं. आपल्याला प्रिय तेवढीच आज्ञा आपण पाळतों हें बरें नव्हें. सर्वच राम कर्ता म्हटल्यावर सुखदुःख कुठें आलें ? पोरांबाळांवर जितकें प्रेम करता तितकें प्रेम भगवंतावर करावें. आपली आणि भगवंताची इच्छा एकच होणें हें परमार्थाचें सूत्र आहे. भगवंताची जी इच्छा तीच आपली करावी आणि आनंदांत राहावें. बायका आणि पैका भगवंताला भेटण्याच्या आड येतात, तेव्हां विवेकानें त्यांना हळूंच दूर सारावें आणि आपला मार्ग मोकळा ठेवावा. अगदीं निःस्वार्थबुद्धीनें केलेलें कर्तव्य कधीं वायां जात नाहीं. एखाद्या सावकाराकडे कोणाचें दागिने गहाण असलें, तर त्यानें आपल्या घराच्या लग्नामध्यें ते वापरणें हा अन्याय आहे. त्याचप्रमाणें आपलीं मुलेंबाळें हीं देवानें आपल्याजवळ दिलीं आहेत, त्यांचें रक्षण करावें, तें कर्तव्य होईल. पण त्यांच्या ठिकाणीं आपलेपणा ठेवून सुखदुःख भोगणें मात्र पाप आहे. संन्याशानें भगवें वस्त्र धारण केल्यावर थोडा तरी त्याचा परिणाम बुद्धिवर होतो. त्याचप्रमाणें आपण भजनपूजन करूं लागल्यावर त्याचा परिणाम आपल्यावर दिसला पाहिजे. जो शहाणा असेल त्यानें समजून आणि जो अडाणी असेल त्यानें श्रद्धेनें बंधनें पाळावींत. स्वतःच्या मताबद्दल आपल्याला पूर्ण खात्री असावी, त्यांत घोटाळा असूं नये. मनानें आपण खंबीर झालें पाहिजे. जें ज्ञान व्यवहाराला लागूं पडत नाहीं तें ज्ञान खरें असलें तरी आपल्याला उपयोगाचें नाहीं. ज्याप्रमाणें पांढरा कपडा मळण्याचा जास्त संभव असतो त्याप्रमाणें सत्कर्माला विघ्नें फार येतात, त्यांना न जुमानतां आपण सत्कर्म करावें. आचार आणि विचार हीं दोन्ही जुळलीं म्हणजे उच्चारहि तसाच येतो. नारळांत पाणी जितकें गोड तेवढी खोबऱ्याला चव कमी, तसें जेवढी विद्वत्ता जास्त तेवढी निष्ठा कमी. अधिक वाचूं नका; जें काहीं थोडें वाचाल त्याचें मनन करा, आणि तें कृतींत आणा. जसें वडिलांचें पत्र वाचल्यावर आपण त्यांतल्या मजकुराप्रमाणें कृति करतों तशी ग्रंथवाचनाच्या समाप्तीनंतर कृतीला सुरुवात करावी. **परमार्थ हें सर्वस्वीं कृतीचेंच शास्त्र आहे. समाधान आणि आनंद हें त्या शास्त्राचें साध्य आहे.** भगवंताच्या स्मरणांत कर्तव्य केलें कीं जीवनांत आनंद उत्पन्न होतो.

---

१८०. भगवंताच्या नामाचा नाद लागला तर दुःखाची जाणीव कमी होईल. दुःखाची जाणीव नसल्यावर मग दुःख असलें म्हणून बिघडलें कुठें !

# परमार्थाचा अनुभव वाढीस लागण्याकरितांच पुण्यतिथी साजरी करावी

**२९ जून**

पुण्यतिथि कशी साजरी कराल ? या दिवशीं जो नेम कराल तो सतत टिकण्यासारखा असतो. म्हणून आजपासून नामाशिवाय बोलायचें नाहीं असें आधींच ठरवा. नामात राहण्याचा प्रयत्न करा, म्हणजे इथें आल्यासारखें कांहीं केल्याचें श्रेय तरी मिळेल. इथें जो जो म्हणून आला त्याच्याजवळ आपण राहावें असें मला वाटतें, पण तुम्हींच दार लावून ठेवलें तर मीं काय करणार ? पाहुणा घरीं आला आणि त्याला दार उघडलेंच नाहीं तर तो काय करणार ? तसें विषयांत राहून दारें बंद करून ठेवूं नका. नामाचा उच्चार कंठीं ठेवा, म्हणजे विषयाचा घाला होणार नाहीं. आता कलि मातत चालला आहे, त्याचा घाला चुकविणें असेल तर नामावर विश्वास ठेवा. कोणी कांहींहि सांगितलें तरी नाम सोडूं नका. जसें पाण्याचा मोठा लोंढा चालू झाला कीं एखाद्या स्थिर झाडाला दोरानें बांधून ठेवलें म्हणजे वस्तु वाहून जात नाहीं, तसें तुम्हीं नामाची कांस घट्ट धरलीत म्हणजे काळ कांहीं करूं शकणार नाहीं. समर्थांनीं नामाच्या समासांत सांगितलें आहे तसें नाम हेंच रूप असें समजून नाम घेत चला म्हणजे रूप दिसेल. माझ्यावर जर खरोखरीच प्रेम करीत असाल तर तुम्ही अगदीं शांत राहा आणि मग त्याचा अनुभव पाहा. भगवंत हा आपल्या अंतर्मध्यें प्रकट व्हायचा असल्यामुळें नामस्मरणाच्या योगानें तो हळूहळू प्रकट होत जाणें हेंच खरें हिताचें आणि कायमचें असतें. डोक्यावर हात ठेवून चमत्कार होणें, कांहींतरी तेज दिसणें, दृष्टांत होणें इत्यादी गोष्टी तात्पुरत्या असतात, एखादा अशक्त, हाडकुळा मनुष्य लठ्ठ होण्यासाठीं "अंगाला सूज येऊं दे" असें म्हणाला तर तें वेड्यासारखें होईल, याच्या उलट, त्यानें नीट औषध घेतलें तर तो लठ्ठ होणार नाहीं, पण त्याचें शरीर घट्ट होईल. तसेंच परमार्थाच्या अनुभवाचें आहे, आणि हा अनुभव वाढीला लागावा याकरितांच पुण्यतिथि साजरी करावी. शेताची मशागत जशी पावसासाठीं ( म्हणजे पाऊस येण्याचे अगोदर ) करतात, तशी नामासाठींच इतर साधनें करावींत. नामाचें प्रेम एकदम येणार नाहीं; पण पाऊस पडला कीं शेताच्या मशागतीचें सार्थक होतें, तसें नामस्मरण सतत केल्यानें आज ना उद्यां भगवंताचे प्रेम येईलच येईल. प्रपंचाच्या गर्दीमध्यें भगवंताचें स्मरण ठेवण्यासाठीं उत्सव, सण, पुण्यतिथ्या वगैरे असतात. खरोखर प्रापंचिकाला कितीतरी पाश आहेत ! पैसा, लौकिक, मुलें, मित्र, आप्त वगैरे सर्व पाशच आहेत. अशा अनेक पाशांमध्येंहि नाम आवडीनें घेणें किती कठीण आहे ! त्यामध्यें टिकणारा मनुष्य चांगला भक्कम असला पाहिजे. विषयाची उर्मी हें मायेचें स्मरण होय, आणि नामाचें स्मरण हें भगवंताचे स्मरण होय. नामाच्या मागें भगवंताचें अस्तित्व आहे म्हणून नामांत सत्संगतीहि आहे. मोबदल्याची अपेक्षा न करता मनापासून नाम घ्यायचे आजच्या दिवसापासून ठरवा.

---

१८१. मायेनें आपल्यावर विषयास्त्र सोडिलें कीं आपण त्यावर भगवंताच्या नामाचें अस्त्र सोडावे, म्हणजे विषय आपोआपच नाहींसा होईल.

# अनुसंधानी चित्त। सर्वांभूतीं भगवंत। हाच माझा परमार्थ

३० जून

ज्यास पाहिजे असेल हित। त्यानें ऐकावी माझी मात ॥ जो झाला रामभक्त। तेथेंच माझा जीव गुंतत ॥ मला रामभक्ताविण कांहीं। सत्य सत्य जगीं कोणी नाहीं ॥ जीवाचें व्हावें हित। हाच मनाचा संकल्प देख ॥ तुम्हांस सांगावें कांहीं ॥ ऐसें सत्य माझेजवळ नाहीं। पण एक सांगावें वाटतें चित्तीं। रघुपतीवीण शोभा नाहीं जगतीं ॥ मुलगी सासरीं गेली। तिची काळजी सासरच्याला लागली। तैसें तुम्ही माझे झाला। आतां काळजी सोंपवावी मला ॥ सदा राखा समाधान। हाच माझा आशीर्वाद पूर्ण। मीं तुमची वेळ साधली। हा ठेवा मनीं विश्वास। आनंदानें राहावें जगांत ॥ अंतकाळची काळजी। तुम्ही कशाला करावी ? ॥ व्यवहार मी सांभाळला। तरी पण रामाला नाहीं दूर केला ॥ राम सखा झाला। नामीं धन्य मला केला। मीं तुम्हांस म्हटलें आपलें। याचें सार्थक करून घेणें आहे भलें ॥ नामापरतें न माना सुख। हाच माझा आशीर्वाद ॥ माना माझे बोल सत्य। कृपा करील खास भगवंत ॥ मी असो कोठें तरी। मी तुम्हांपासून नाहीं दूर। याला साक्ष रघुवीर ॥ तुमचे आनंदांत माझें अस्तित्व जाण। दुःखी होऊन न करावें अप्रमाण ॥ तुम्हीं माझे म्हणवितां। मग दुःखीकष्टी कां होतां ? ॥ उपाधिवेगळे झाला। ऐसें ऐकूं द्यावें मला ॥ माझें ज्यानें व्हावें। त्यानें राम जोडून घ्यावें ॥ दृश्यवस्तूचा होतो नाश। याला मींहि अपवाद नाहीं खास ॥ शेवटीं मागणें तुम्हां एकच पाहीं। नामावांचून दूर कधीं न राहीं ॥ अनुसंधानीं चित्त। सर्वांभूतीं भगवंत। नामीं प्रेम फार। त्याला राम नाहीं दूर ॥ हाच माझा परमार्थ। त्यानेंच आनंदसागर झाले समर्थ ॥ ब्रह्मानंदबुवा देहानें गेला। तरी त्यानें सर्वव्यापी होऊन राहिला ॥ मीं सांगितल्याप्रमाणें वागावें। राम कृपा करील हें निश्चित समजावें ॥ आतां आनंदानें द्यावा निरोप। हेंच तुम्हां सर्वांस माझें सांगणें देख ॥ सदा राहावें समाधानीं। नको सुखदुःख काळजीचा लेश ॥ माझा झाला जगदीश। हा भाव ठेवा निरंतर। राम साक्षी, मीं तुम्हांपासून नाहीं दूर ॥ सर्वांचें करावें समाधान। जें माझे प्राणाहून प्राण जाण। काळ फार कठीण आला। बुद्धिभेद त्वरित झाला ॥ आतां सांभाळावें सर्वांनीं आपण। रामाविण न जाऊं द्यावा क्षण ॥ सर्वांनीं व्हावें रामाचें। हाच माझा आशीर्वाद घेई साचें ॥ राम कृपा करील लवलाहीं ॥ जगाचें ओळखावें अंतःकरण। तैसें आपण वागावें जाण ॥ नामापरतें दुजें न मानावें। एका प्रभूस शरण जावें ॥ हा करावा उपाय। तोंच समाधानाला नेईल खास ॥ सुज्ञांप्रति काय लिहावें। परी सूचनार्थ बोलिलें स्वभावें ॥ याहुन दुजें लिहिणें कांही। सत्य आतां उरलें नाहीं ॥ विवेक-वैराग्य-संपन्न। सदा असो अंतःकरण ॥ अखंड घडो भगवद्भक्ति। आत्मज्ञानप्रतीति ब्रह्मस्वरूपास्थिति। नामीं निरंतर जडो वृत्ति ॥ ऐसा जो माझे प्राणाचा प्राण। केवळ मम आत्माचि जाण। मीं आहे ॥ तुमच्यापाशीं। हा ठेवावा निर्धार। न सोडावा आतां धीर ॥ सुखानें करा नामस्मरण। कृपा करील रघुनंदन

१८२. मागणें तुम्हां एकच पाहीं। नामावांचून दूर कधीं न राहीं ॥

# सद्गुरुची आवश्यकता कां आहे?

१ जुलै

शिकावें असे ज्याच्या मनात येतें तो शिष्य, आणि जो शिकवितो तो गुरू. मला कांहीं कळत नाहीं असें ज्याला वाटतें तोच गुरु करील. व्यवहारांतसुद्धां आपल्याला गुरु करावा लागतो., तर त्यापेक्षां अधिक अवघड ज्ञान होण्यासाठीं गुरु नको म्हणून कसे चालेल! प्रपंचात दुःख झालें, समाधान मिळालें नाहीं, तर मग खरें सुख कुठें आहे आणि ते मला कोण दाखवील अशी ज्याला तळमळ लागेल, तोंच गुरु करण्याच्या भानगडींत पडेल. प्रपंच आम्हांला कडू वाटेल तरच शिष्य होण्याचा प्रश्न. संताच्या कृपेनें दुखणें बरें झालें म्हणून त्याला मानणें हें खरें नव्हे. जो कांहीं चमत्कार करून दाखवील त्याला आम्ही बुवा म्हणतो; संताची परीक्षा आपण बाह्यांगावरून करतो. म्हणूनच गुरु जवळ असूनहि त्याची ओळख पटत नाहीं. कारण गुरु जिथें वस्ती करतो तिथें, म्हणजें विषयातीत स्थितीत आपण जातच नाहीं. जो शिष्याला विषयांत ओढेल त्याला गुरु कसें म्हणावें? मी "राम राम" म्हणतो, वाईट मार्गानें जात नाहीं, मग गुरूचें लोढणें कशाला, असें कांहींजण म्हणतात. खाणावळीत जाऊन पोट भरतें मग घराची काय गरज, म्हणण्यासारखें हें आहे. **'मी केलें' ही जाणीव आड येते म्हणून सद्गुरूची आवश्यकता आहे.** सर्वांभूतीं भगवंत ज्याला पाहतां येईल त्याला संताची खरी ओळख होईल. जसें वासावरून आपण कस्तुरीची परीक्षा करतो, त्याप्रमाणें आपल्या मनावरून आपण संतांची परीक्षा करावी. माझें चित्त जिथें निर्विषय होईल तिथेंच संताची खरी जागा म्हणतां येईल. ज्याला भगवंतप्राप्तीची तळमळ लागली आहे त्याला शिष्य म्हणावें; तसेंच जो गुरुआज्ञेबाहेर जात नाहीं, आणि गुरु हेंच एक भगवंतप्राप्तीचें साधन मानतो तो सच्छिष्य होय. गुरुपरता देवधर्मच नाहीं मानूं. सत्कर्माचा अभिमान जर आपल्याकडे घेतला तर रामाचा विसर नाहीं का पडला? आरशावर मातीचा थर लावा नाहींतर केशराचा लावा, तोंड नाहीं दिसणार; त्याप्रमाणें अभिमान गेल्याशिवाय राम नाहीं भेटणार. देवाजवळ गेला तरी नामदेवाचा अभिमान नाहीं गेला, म्हणून भगवंतांनीं नामदेवाला 'गुरु कर' म्हणून सांगितलें. 'माझे दुर्गुण फार आहेत; पण रामा, आतां मला तुझा व्हावें असें वाटतें' असें मनापासून म्हटलें म्हणजे राम नाहीं दुर्गुणाकडे पाहात. आपण कांहीं राखून नाहीं ठेवूं. सर्वस्व गुरूचें म्हटल्यावर चांगलेंवाईट सर्व त्याचेंच होतें. नवरा काळा असला म्हणून पतिव्रता ही पतिव्रता होत नाहीं असें नाहीं, त्याप्रमाणें गुरु जरी वाईट असला तरी सच्छिष्य जर असेल तर भगवंताला त्याचें काम करावेंच लागतें.

१८२. "भगवंताच्या नामाशिवाय मला कांहीं कळत नाहीं." असें ज्याला कळलें त्याला सर्व कळलें.

# गुरुसेवा करणें म्हणजे काय ?

२ जुलै

साधनाची आटाआटी कुठपर्यंत करायची ? जप, तप, नेम, याग, वगैरे आपण कशाकरितां करतो ? तर देवाची प्राप्ति व्हावी म्हणून. तोच देव जर आपल्या घरीं आला तर साधनाचीं आटाआटी कशाला करायची ! गुरुभक्ति करायची म्हणजे काय ? त्याच्या देहाची सेवा करणें हीच गुरूची सेवा असें तुम्हाला वाटतें का ? वास्तविक देहाची सेवा करणे ही गुरूची खरी सेवाच होत नसते. **गुरु सांगेल तसें वागणें हीच त्याची खरी सेवा होय**. माझ्याजवळ जे जे येतात, ते कोणी मुलगा मागतो, कोणीं संपत्ति मागतो, कोणी रोग बरा करा म्हणून मागतो; तेव्हां, माझी सेवा करायला तुम्ही येतां, का मींच तुमची सेवा करावी म्हणून येतां ? समजा, तुम्ही एखाद्याच्या घरी गेलांत आणि त्याच्या घरीं कोणीं मनुष्य मेला आहे आणि तो सुतकांत आहे; अशाजवळ जर तुम्हीं पंचपक्वान्नाचें जेवण मागितलेंत तर त्याला काय बरें वाटेल ? अशासारखेंच माझ्याजवळ येऊन संसारांतलें सुख मागणें होय. माझ्याजवळ येऊन मनुष्य-देहाचें खरें सार्थक होईल असें करा. तुम्हीं मागाल त्याप्रमाणें मी थोडेंसें देणार नाहीं असें नाहीं, पण तें काढा घेण्याकरितां गुळाचा खडा देण्यासारखें आहे. गुरूला अनन्य शरण जाणें म्हणजे इतकें की त्याचें मन आणि आपलें मन एक झालें पाहिजें. त्याचे जें जें व्यापार होतील तो मीच आहें, त्या व्यतिरिक्त मी नाहीं. अशी पक्की भावना झाली पाहिजे; म्हणजे दैववशात् जरी आपण गुरूपासून दूर असलों तरी मनानें त्याच्याशीं संलग्न असल्यावर त्याच्यापाशींच असतो; पक्षीण रानांत चाऱ्यासाठीं जरी गेली असली तरी तिचें सर्व लक्ष आपल्या घरट्यांतल्या पिलांकडे असतें, त्याप्रमाणेंच साधनाची म्हणून आटाआटी करण्याचें कारण नाहीं; नाहीं तर त्याचाच अभिमान होतो आणि मिळवायचें तें बाजूलाच राहून उलट तोटा होतो. जें जें घडत असतें तें माझ्याच इच्छेनें झालें असें समजत जा आणि त्यांत आनंद माना. तुम्हीं जी जी गोष्ट कराल त्यांत मला आठवा. म्हणजें यापेक्षां दुसरें साधन नाहीं. आपण आपल्या आईशीं जसें बोलतो तसें माझ्यापाशीं बोलावें, आपलें सर्व दुःख मला सांगत जावें माझ्याजवळ जें आहे ते व्यावहारिक जगांत कोठेंहि तुम्हाला मिळायचें नाहीं. तें म्हणजें भगवंताच्या नामाचें प्रेम होय.

नाम घ्यावें असें वाटतें म्हणजें आपल्यावर भगवंताची कृपा आहेच; आपली रेषा उत्तम पडली आहे. मुंगी डोंगरावर चढण्याचा प्रयत्न करते, आणि कालांतरानें का होईना पण वर पोंचल्या-शिवाय राहत नाहीं हें ध्यानांत धरून आपण प्रयत्नाला लागूं या. राम खात्रीनें कृपा करील हा विश्वास बाळगा.

---

१८४. भगवंताचें नाम हें औषध समजावें, भगवंताची प्राप्ति हें त्याचें फल. औषध मात्र थेंब थेंब आणि सतत पोटांत गेलें पाहिजे.

# सद्‌गुरूची कामगिरी कोणती ?

३ जुलै

सद्‌गुरूची कामगिरी कोणती ? आरशावर धूळ पडलेली असते, ती बाजूला सारायला सद्‌गुरु सांगतात. आपलें चुकतें कोठें तें सद्‌गुरु सांगतात. सद्‌गुरु आपल्याला मार्गाला लावतात. माझें साधन माझ्या-जवळच आहे, तें दुसऱ्याकडून मिळणार नाहीं, याची ते जाणीव करून देतात. स्वप्नामध्यें तलावांत पडला म्हणून ओरडूं लागला, तोंच जागृत झाल्यावर ओरडण्याचें थांबला ! **सद्‌गुरु जागें करण्याचें काम करतात.** मला करायचेंच कांहीं उरलें नाहीं असें ज्यानें म्हटले त्यानें सद्‌गुरु खरोखर केला असें म्हणावें. एखादा सुखवस्तु गृहस्थ 'मी स्वस्थ आहें' असें म्हणतो तें कांहीं खरें नाहीं. मन जोंवर गिरक्या मारतें तोंपर्यंत तो स्वस्थ आहे असें नाहीं म्हणतां येणार. शिष्याच्या भावनाच गुरूला गुरुपद देतात जो शरण जातो त्याचा कार्यभाग सद्‌गुरु उचलतो. **ज्याची दृष्टि रामरूप झाली तो खरा गुरु**, जें चिरकाल टिकतें तें गुरुपद समजावें. खरोखर सद्‌गुरु म्हणजे मूर्तिमंत नामच होय. गुरूनें सांगितलेलें अक्षरशः पाळणें हेंच खरें साधन. फडक्यांत रुपया बांधला तर त्या फडक्याला महत्त्व नसून त्यांतल्या रुपयाला असतें, त्याचप्रमाणें संतांना भगवंताचा जो ध्यास असतो त्याला महत्त्व आहे, त्यांच्या बाह्यांगाला महत्त्व नाहीं. संत कुणालाहि देहानें कायमचे लाभले नाहींत. पुष्कळांना संतांची गांठ पडते, परंतु सत्संगतीचें महत्त्व न कळल्यामुळें बहुतेकांना त्यापासून जो व्हायला पाहिजे तो फायदा होत नाहीं. आपलीं जीं कर्तव्यें ठरलीं आहेत तीं आपण बरोबर करावींत. व्यापार थोडक्या प्रमाणांत केला तर पुढें वाढतो, त्याप्रमाणें कर्तव्य करीत गेल्यानें फलाचीं आशा आपोआप सुटेल. आपलें कर्तव्य कोणते तें सद्‌गुरु आपल्याला दाखवून देतात. आपल्या नशिबांत जेवढें मिळायचें असेल तेवढेंच आपल्याला मिळणार, अशी वृत्ति बनून आपलें 'हवें' पण कमी होईल. मनाची ही वृत्ति झाली कीं, जे घडेल तें भगवंताच्या इच्छेनेंच घडेल असें आपल्याला वाटूं लागतें. असें वाटूं लागलें कीं समाधान चालत घरीं येतें. पण हें सगळें होण्यासाठीं आपल्या अंतः-करणाची शुद्धता हा पाया आहे. रथ आहे खरा, पण जर त्याला सारथी म्हणजे चालवणारा नसेल तर रथ कुठेंतरीच जाईल, केवळ गाडी माझी आहे म्हणून ती मालकाला चालवितां येणार नाहीं. साधी बैलगाडीसुद्धां चालवितां येणार नाहीं. गाडीवान म्हणूनच गाडी चालवितां येईल, मालक म्हणून ती चालवितां येणार नाहीं, त्याप्रमाणें आपला देह मनुष्य आपल्या मनानें चालवितो, आणि खड्ड्यामध्यें पडतो. सद्‌गुरु हे गाडीवानाचें काम करतात आणि आपल्या देहरूपी गाडीला योग्य रस्त्यावरून नेतात. आपण नेहमीं भगवंताच्या अनुसंधानांत मग्न असावें आणि गाडीवानावर विश्वास ठेवून निर्धास्त असावें, मग कसलाच धोका उरणार नाहीं. सद्‌गुरूचे आपल्यावर केवढें उपकार आहेत !

---

**१८५. संत हे चालते-बोलते देवच आहेत.**

# देह हा देवाच्या प्राप्तीकरितां आहे, ही जाणीव सद्गुरु देतात

**४ जुलै**

एकदा असें झालें कीं, एका साधूकडे चोरांनीं चोरी केली. आणि ते पळून जात असताना शिष्यांनी पाहिले. तेव्हां चोरांना धरून त्या शिष्यांनीं खूप चोप दिला. हें त्यांचें करणें गुरूला समजलें तेव्हां त्या चोरांना आणून गुरूनें त्यांच्या अंगाला तेल वगैरे लावून स्नान घातले आणि त्यांना पंचपक्वान्नांचें भोजन दिलें. "हें असें काय करतां?" म्हणून शिष्यांनीं गुरूला विचारलें, तेव्हां त्यांनीं शिष्यांना सांगितलें कीं, "तुम्ही तरी काय करतां? सर्वचजण देवाच्या घरीं चोरी करीत आहेत; कारण आपल्याला त्यानें हा जो देह दिला तो देवाची प्राप्ती करून घेण्यासाठीं म्हणून दिला, परंतु आपण तें न करतां त्याच्यापासून विषय चोरतो आहेच की नाहीं!" म्हणून विषयांत आसक्ति न ठेवतां आपण देवाची मनापासून भक्ति करावी. आपण सर्वांनीं "मी भगवंताकरितां आहे" असें मनानें समजावें. सर्व ठिकाणीं भगवंतच भरलेला आहे अशी मनाची नक्की खात्री झाल्यावर मग द्वैत आपोआप नाहींसें होऊन जी एकाग्रता साधतें तीच खरी समाधि होय. संत लोक तरी काय करतात? ते सदासर्वदा समाधि सुख भोगीत असतात व नेहमी भगवंताविषयीच सांगत असतात. भगवंताच्या लीला पाहाणाऱ्यांनाच खरा आनंद मिळतो. आपण एक दाणा शेतांत पेरावा आणि त्याबद्दल हजार दाणे घ्यावे ही भगवंताची लीला आहे. भगवंताच्या ठिकाणीं जें जें आहे तें तें सर्व आपल्या ठिकाणी आहे. जसा मारुतीमध्यें देव-अंश होता तसा तो आपल्यामध्येंही आहे, त्यानें तो फुलविला पण आपण झाकून तो विझवून टाकला. मारुतीचें ध्येय डोळ्यासमोर ठेवावें त्याचें ब्रह्मचर्य, भक्ति, दास्य आणि परोपकार करण्याची तऱ्हा, या गोष्टी आपण शिकाव्यात. मारुति हा चिरंजीव आहे. ज्याची तशी भावना असेल त्याला अजूनहि त्याचें दर्शन होईल. मारुतीला सर्व सृष्टि रामरूप दिसली, हेंच खरें भक्तीचें फळ आहे. उपासक देहाला विसरला कीं उपास्यमूर्तीमध्यें त्याला जिवंतपणा अनुभवाला येऊं लागेल. "माझ्या देवाला हें आवडेल का?" अशा भावनेनें जगांत वागावें, हाच सगुणोपासनेचा मुख्य हेतु आहे. भगवंत दाता आहे, तो माझ्यामागें आहे, तो माझें कल्याण करणार आहे, ही जाणीव झाली कीं जें मिळालें तें भगवंताच्या इच्छेनें मिळालें ही भावना होऊन, आहे त्या परिस्थितीमध्यें समाधान टिकेल. चुकीची वाट चालत असतांना, 'अरे, तूं वाट चुकलास," अशी जागृति संत आपल्याला देतात व खरा मार्ग दाखवितात. यामध्यें संतांचा हेतु एकच असतो आणि तो हा की, "जें मला कळलें आहे तें लोकांना कळून लोक सुखी होऊं द्या." हजारो लोक भगवंताच्या नामाला लावणें हेंच खरें संतांचें काम होय.

---

**१८९. भगवंताचे नाम सिद्ध करून देणें हाच संतांचा जगावर सर्वांत मोठा उपकार होय.**

# सद्गुरूंच्या शब्दावर विश्वास ठेवून श्रद्धेनें व प्रेमानें नाम घ्या

५ जुलै

तुम्ही सर्व देवाची छान सेवा करता आहात ह्याबद्दल शंका नाहीं. अशीच सेवा अखंड चालू ठेवा. त्यांतच कल्याण आहे. त्यानेंच आपण तरून जाऊं. जरी कुणीं कांहींहि सांगितलें, 'ह्यांत काय आहे, ह्यांत काय आहे, ह्यानें काय होणार आहे,' तरी तुम्हीं तिकडे लक्ष देऊं नका. परमेश्वराची सेवा वाढवावी तेवढी थोडीच आहे. तो फार मोठा आहे, अमर्याद आहे. त्याला पाहायला तशीच सेवाहि फार मोठी करायला पाहिजे, तशी मोठी शक्तीहि त्याला पाहण्यासाठीं आपल्याला लागेल. अर्जुनाला श्रीकृष्ण परमात्म्यानें दिव्य दृष्टि देऊन दर्शन घडविलें. ती दिव्य दृष्टि आपल्याजवळ नाहीं, पण ती मिळविण्याची शक्ति आपल्याजवळ आहे. भक्तीची प्रगति ही खरी शक्ति; आणि त्याकरितां अखंड नामस्मरण हेंच खरें साधन. श्रीरामप्रभू आपल्या घरांतला कुणीतरी आहे, याबद्दल खात्री बाळगा. त्याला तुम्ही आपलीं सुखदुःखें सांगा. दिवसाकांठीं एकदां तरी रामापुढें उभें राहून त्याला अनन्यभावानें शरण जा, दिवस आनंदात जाईल आणि तुमचें दुःख दूर होईल. आपलें ज्ञान, शक्ति, वैभव, सत्ता, त्याच्यापुढें कांहींच नाहींत. तेव्हां या सर्वांचा विसर पाडून त्याला शरण जा, आणि त्याच्याजवळ प्रेम मागा. "देवा ! आम्ही जे तुझें दर्शन घेतों तें सर्व बाह्य स्वरूपाचें, तुझें आम्हांला खरें दर्शन घडव. आम्ही अवगुणसंपन्न असूं, आमच्याजवळ तुझें दर्शन व्हावें एवढी सेवा नाहीं, परंतु तूं आतां आम्हांला क्षमा कर. यापुढें, देवा, कितीहि संकटें येवोत, आमच्या प्रारब्धाचे भोग आम्ही तुझ्या नामांत आनंदानें भोगूं. जें कांहीं व्हायचें असेल तें होऊं दे. आमचें समाधान टिकून तुझ्या नामांत आमचें प्रेम राहील एवढी तुझी कृपा असूं दे." खरोखर परमेश्वर भक्तांचें मन पाहतों; त्याचा भाव पाहतो; एरव्हीं तो त्याच्याजवळच असतो. जो श्रद्धेनें परमेश्वराचें चिंतन करतो त्याला परमेश्वर जवळ असून, आपल्याला तो मदत करायला सिद्ध आहे याची खात्रीच असते. आपल्याला दोन मार्ग आहेत; एक श्रद्धेचा आणि दुसरा अनुभवाचा. आम्ही एका गांवीं गेलो होतो. त्या गांवाची अशी गंमत कीं, पायवाटेनें गेलें तर फक्त २।३ मैलांचें अंतर, आणि मोटारच्या रस्त्यानें गेलें तर दहाबारा मैलांचें अंतर. तशी श्रद्धा ही पायवाटेसारखी आहे. तिनें चाललें असतां अंतर कमी पडेल. मोटारीचा मार्ग म्हणजे अनुभवाचा मार्ग. मोटार कुठें रस्त्यांत बिघडली किंवा घाटेंत कुठें अडथळा आला कीं प्रगति थांबते; त्याप्रमाणें अनुभवांत कांहीं चुकलें कीं प्रगति खुंटते. तेव्हां शक्य तो आपण श्रद्धेचा मार्ग पत्करावा. कित्येकांची या मार्गानें चालल्यानें आपल्या कल्पनेपेक्षांहि फार प्रगति झालेली आहे; ते तरूनहि गेले आहेत. तेव्हां सद्गुरूंच्या शब्दावर विश्वास ठेवून श्रद्धेनें आणि प्रेमानें नाम घ्या. मनात कांहींहि शंका येऊं देऊं नका. तपश्चर्येचें सर्वांत शेवटचें फळ जर कांहीं असेल तर परमेश्वराच्या ठिकाणीं अनन्यभावें शरण जाण्याची बुद्धि होय. ती बुद्धि आपल्याला झाली पाहिजे. एकदां शरण गेल्यावर आपण उरूच शकत नाहीं, त्यालाच शरणागति असें म्हणतात; आणि हीच परमार्थांतील अत्यंत श्रेष्ठ गति आहे.

---

१८७. मनुष्य कसाहि असला तरी भगवंताच्या स्मरणांत त्याला समाधान खात्रीनें मिळेल.

# सद्गुरु सदैव आपल्याजवळच आहेत अशी खात्री पाहिजे

६ जुलै

अंतःकरणात सुप्त असलेलें भगवंताचें प्रेम जागृत होण्यासाठीं कांहीं निमित्त लागतें. तीर्थयात्रा आणि साधुसंतांची भेट हेंच तें निमित्त होय. श्रीरामचंद्रहि तीर्थयात्रेला जाऊन अनेक संतांची दर्शनें घेऊन आले। संतांच्यापाशीं अहंकाराला जिवंत राहतांच येणार नाहीं, कारण 'परोपकार' करायला लागणारा 'पर' च ठिकाणावर नाहीं तर मग दुसऱ्याकरितां मीं कांहीं केलें ही भावना होण्याला आधारच कुठें राहिला ! विषयाच्या लालसेनें सत्समागम करणें हा खरा सत्समागम नव्हे. संत कधींकधीं आपल्याला विषय देतात हें खरें, पण एकंदरींत आपल्याला विषयाचा वीट आणण्याचाच त्यांचा प्रयत्न असतो. संतांच्या घरीं नुसतें पडून राहिल्यानेंहि शुद्ध भाव येईल. आपण आपल्या सद्गुरूचें आहोंत असें छातीठोकपणें सांगत चला. कांहीं नाहीं केलेंत तरी चालेल, आपले सद्गुरु आपल्या मागेंपुढें आहेत अशी दृढ भावना असावी. मला सुखदुःख दोन्हीं नाहींत, पण तुम्ही दुःखी झालांत तर मला दुःख होतें. तेव्हां तुम्हीं मनाला दुःखच होऊं नये असें वागा. मी देह ठेवल्यानंतर, मी गेलों नाहीं असें एकाला तरी वाटत होतें का ? **तुमची अशी दीन अवस्था पाहून तुम्हांला धीर देण्याकरितां, लोकांचा अपवाद सोसूनहि अशा तऱ्हेनें मला यावें लागलें.** आईच्या आपल्या मुलाबद्दलच्या प्रेमाची कल्पना वांझेला कशी येणार ? तुम्हांला जर मला यांतून सोडावयाचें असेल तर तुम्हां प्रत्येकाला, आपला आधार गेला नाहीं, मी आपल्याजवळच आहे, अशी खात्री पाहिजे. "मी कोण आहे" असे लोक विचारतात. त्यांना काय सांगावें ? देहांत असतांना स्पष्ट सांगतां येत होतें. व्यवहाराप्रमाणें मला वागावें लागलें, पण त्या वेळीं जो मी होतों तोच मी आतांहि आहें. प्रपंची माणसाच्या दुःखाची मला पूर्ण जाणीव आहे. ती जाणीव ठेवूनच भगवंताचें नाम घ्या असें मी सांगतों. नाम घ्यायची इच्छा पूर्ण झाली नाहीं म्हणून मी जन्माला आलों. देवापेक्षां आरास मोठी नसावी, म्हणून मी कमी बोलण्याचा अभ्यास करणार आहें. जे मीं सुरुवातीला सांगितलें तेंच मीं आतां शेवटीं सांगतों. तुम्ही कसेहि असा, पण भगवंताच्या नामाला सोडूं नका. वेळप्रसंग येईल तसें वागणें उचित आहे, आणि त्याबद्दल मनावर परिणाम होऊं देऊं नये. परमात्म्याच्या चिंतनांत मन गुंतलें असतांना अवांतर गोष्टींचा परिणाम त्यावर होत नाहीं. अभ्यास करावा, पण काळजी न करतां. सर्वस्वीं भार भगवंतावर ठेवून निवांत असावें. आपल्या मनाचें स्वास्थ्य बिघडूं न देतां आनंदात राहावें. वृत्ति आवरून आवरत नाहीं। ती परमात्म्याकडे लावली म्हणजे आवरते, जेवढें झेपेल तेवढेंच करावें. रामइच्छेनें सर्व चालतें असें लक्षात ठेवावें.

१८८. भगवंताच्या नामांतच संतसंगति आहे. कारण नामाच्या मागें भगवंताचें अस्तित्व आहे. विषयाची ऊर्मि हें मायेचें स्मरण होय, आणि नामाचें स्मरण हें भगवंताचें स्मरण होय.

# "देव माझा आहे" असें म्हणण्याऐवजीं "मी देवाचा आहें" असें म्हणावें, हेंच सद्‌गुरु सांगतात

७ जुलै

अधिष्ठानाशिवाय कर्म साधत नाहीं. मालक पाठीशीं असला कीं कर्म करणाऱ्याला जोर येतो. या जगांत कर्माशिवाय कोण राहतो ? पण कर्म यथासांग होत नाहीं याचें कारण, आपण कर्म कशाकरितां करतों याची जाणीवच होत नाहीं आपल्याला. कांहीं चांगलीं कर्ममार्गी माणसें भक्तिमार्गी लोकांना नांवें ठेवतात. भक्तिभावानें जो राहतो तो दुसऱ्याला नांवें ठेवीत नाहीं. 'मी कोण' हे जाणायला ज्ञान आणि भक्ति लागतेच; तसेंच "ब्रह्म सत्यं, जगन्मिथ्या" म्हटलें तरी त्याचा अनुभव येण्यासाठीं कर्म करावेंच लागतें. उपासना भगवंताला ओळखून करावी. लहान मूल आईकडे डोळे करून मुकाट्यानें दूध पितें. त्याप्रमाणें समर्थांसारख्यांनीं जें सांगितलें तें आम्हीं निमूटपणें करावें. डोळे मिटून जितकें काम होईल, अंधश्रद्धेनें जें होईल, तें अभिमानानें, ज्ञानाचे डोळे उघडे ठेवूनहि नाहीं होणार. मूल होऊन भगवंताला ओळखावें. याला अडचण एकच असते; माझें "शहाणपण" आड येतें. भक्त मुलांसारखे वागतात, म्हणून त्यांचे लाड देव पुरवितो. कुणी असें म्हणतील कीं, "भगवंताची नि आमची ओळख नाहीं, तर त्याची आम्हीं कशी पूजा करावी ? पांडुरंगाकडे जाण्यासाठीं कांहीं मार्ग आधीं आक्रमणें जरूर आहे. त्याला ओळखल्याशिवाय मी भजन करणार नाहीं" हें म्हणणें वेडेपणाचेंच आहे. आपल्यावरून जग ओळखतो तो खरा शहाणा. भगवंताला पुष्कळ मार्गांनीं ओळखतां येईल. ज्ञान्यांचा मार्ग असा आहे कीं, चोर चोरी करून गेल्यावर जागें होण्याप्रमाणें आहे. संतांनीं अखंड जागृत राहण्याचा मार्ग सांगितला; तो असा कीं, देहानें प्रपंच करा, पण मन भगवंताच्या ठिकाणीं अर्पण करा. मन भगवंताच्या ठिकाणीं स्थिर झाल्याशिवाय इतर कांहींहि करून उपयोग नाहीं; ध्येय सत्य असल्याखेरीज चित्ताची स्थिरता होत नाहीं; पण सत्य अशा ध्येयावर अगोदर पूर्ण श्रद्धा पाहिजे. प्रपंचांत जशी प्रेमाची गरज आहे तशी परमार्थांत श्रद्धा पाहिजे. "देव माझा आहे" असें म्हणण्याऐवजीं "मी देवाचा आहें" असें म्हणावें, म्हणजे श्रद्धा उत्पन्न होते. समुद्राचा तरंग असतो, तरंगाचा समुद्र असतो असें नव्हे. साधनांत निश्चितपणा असेल तर त्यांत समाधान आहे; म्हणून साधन श्रद्धेनें करीत जावें. जशी श्रद्धा तशीं फळें. आपण भगवंताच्या स्मरणांत निर्धास्त असावें. प्रपंचांत मात्र कधींच धीर सोडूं नये. ज्याप्रमाणें मुंग्यांची राणी जागेवरून हलवली कीं, तिच्याबरोबर तिच्यामागें असणाऱ्या हजारों मुंग्या नाहींशा होतात, त्याप्रमाणें एक देहबुद्धि काढून टाकली कीं, आपल्या मनांत उठणारे हजारों संकल्प नाहींसे होतात. या देहबुद्धीच्या पलीकडे गेल्यावर जें ज्ञान होतें त्यालाच आत्मज्ञान म्हणतात. असें आत्मज्ञान झाल्यावर जें पूर्ण समाधान मिळतें तेंच खरें भगवंताचें दर्शन होय.

---

१८९. सूर्य हा प्रकाश देतो, पण त्यामुळें अंधार आपोआप नाहींसा होतो; तसें नाम भगवंताचें प्रेम वाढवतें, आणि मग आपले दोष आपोआपच नाहींसे होतात.

# सद्गुरु नामाच्या योगानें देहधारी जीवांना व वासनेंत गुरफटलेल्या पिशाच्चांना चांगल्या अवस्थेला नेतो

८ जुलै

[एका गृहस्थाच्या पत्नीस पिशाच्चाची बाधा होती. तिच्या ठिकाणीं एकच पिशाच्च येत नसून आळीपाळीनें आठदहाजण संचार करीत असत. एकाच बाईच्या अंगांत इतकीं पिशाच्चें कशीं येऊं शकतात असा प्रश्न विचारला असतां श्रीमहाराज म्हणाले :– ] ज्या माणसाच्या अंगामध्यें पिशाच्च येऊं शकतें तें माणूस उघडलेल्या दरवाज्याप्रमाणें समजावें. दरवाजा बंद आहे तोंपर्यंत कुणालाच पलीकडे जातां येत नाहीं; परंतु दरवाजा एकदां उघडला म्हणजे त्यांतून जाण्यासारखे जे जीव असतील ते तिथें येऊन बसतात. प्रत्येक जीव आपआपली वासना तिथें तृप्त करून घेण्याची खटपट करीत असतो. तरी त्याला देखील मर्यादा असतेंच. अंगांत येणारे जीव पूर्वीं देहधारी असतांना आपल्याप्रमाणेंच जीवन जगलेले असतात. म्हणून खरा सत्पुरुष तोच कीं जो भगवंताच्या नामानें देहधारी जीवांना आणि वासनेमध्यें गुरफटून गेलेल्या पिशाच्चांना चांगल्या अवस्थेला घेऊन जातो. त्याला सर्व जीव सारखेच. दोघांचेंहि कल्याण त्याला करायचें असतें, अंगांत येणाऱ्याचें आणि ज्याच्या अंगांत येतें त्याचें.

मनुष्यानें चिकित्सा करावी, पण चिकित्सेचा हेतु शुद्ध असावा. सत्य काय आहे हें शोधण्यासाठीं जर चिकित्सा केली तर त्याचे मार्ग निराळे असतात. दुसऱ्याला ताप देणें ही चिकित्सा नव्हे आणि सत्यशोधन पण नव्हे. पिशाच्चांचें अस्तित्व सूक्ष्म सृष्टीमध्यें असतें; म्हणून त्यांचें ज्ञान व्हायला आपली दृष्टि सूक्ष्म बनली पाहिजे ती नामानें बनते. यासाठीं तुम्हीं नाम घेत जावें, म्हणजे, सर्व गोष्टी आपोआप कळतील. एका बाईच्यामागें एक ब्रह्मचारी पिशाच्च लागलें होतें. तें पिशाच्च वेदमंत्र स्वच्छ आणि बिनचूक म्हणत असे. वेदसूक्तें स्वरासहित मोठ्या ठसक्यांत म्हणणाऱ्या त्या पिशाच्चाला गायत्रीमंत्र म्हणायला सांगितला तर तो मात्र अर्धाच म्हणून तें गप्प बसे. असें करण्याचें कारण विचारलें म्हणजे तें म्हणे, " सबंध गायत्रीमंत्र जर मीं म्हटला तर मी भस्म होऊन जाईन ना ! म्हणून मी तो अर्धाच म्हणतों." बघा, गायत्रीच्या मंत्राचें केवढें सामर्थ्य आहे ! द्विजानें गायत्रीची उपासना केली तर त्याला इतर काहीं करण्याची आवश्यकताच नाहीं. परंतु सध्याची परिस्थिति त्याला अनुकूल नाहीं. त्यासाठीं लागणारें पावित्र्य आणि आचरण सध्या कोणाला टिकवता येत नाहीं. म्हणून संतांनीं दयाळू होऊन भगवंताचें नाम सिद्ध करून दिलें. गायत्रीनें जें साधतें तें नामानें साधतें यांत बिलकुल शंका नाहीं. **शिवाय नामाला देहाच्या स्थितीचें बंधन नाहीं हा त्याचा विशेष होय.** म्हणून सध्यांच्या काळांत प्रत्येकानें नाम घ्यावें. जगांत असें कोणतेंहि पाप नाहीं कीं जें नामासमोर टिकूं शकेल. नामांत शेवटचा श्वास जाण्याकरितां आतांपासून सतत नामांत राहण्याचा प्रयत्न करा.

---

१९०. " परिस्थिति चांगली आली तर नाम घेईन " असें म्हणणारा मनुष्य नाम कधींच घेत नाहीं.

# सद्‌गुरूंजवळ "मी शरण आलो आहें" असें म्हटलें तर पुढचें काम तें करतातच

९ जुलै

जें दृश्य असतें तें आज ना उद्यां नाश पावतें. दृश्य हें दृश्यपणांत असतांना स्वतंत्र नसतें, भगवंताच्या आधीन असतें. म्हणून जगांत जी जी गोष्ट घडते ती ती भगवंताच्या इच्छेनेंच घडते हें आपण ओळखावें. आपला देह दृश्यच आहे; अर्थात् त्याला चालविणारा भगवंत देहांत आहे. त्याच्या अनुसंधानांत राहाण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे. हें अनुसंधानांत राहणें भगवंताच्या नामानें साधतें. म्हणून तुम्हीं सर्वांनीं नाम घेण्याचा निश्चय करावा. आपलें चित्त नामामध्यें गुंतलें म्हणजे देहाला प्रारब्धाच्या स्वाधीन करतां येतें. ही युक्ति ज्याला साधली त्याला सुखदुःखाची बाधा उरली नाहीं. व्यवहाराच्या मार्गानें जात असतां भगवंताचें नाम कधीं विसरूं नयें. आपल्या प्रयत्नाला जे फळ येईल ती भगवंताची इच्छा समजून, जें पदरात पडेल त्यांत समाधान मानावें. आपण प्रपंची लोक आहोंत, म्हणून प्रपंचाला उचित असणारा प्रयत्न केल्यावांचून कधीं राहूं नये; पण प्रपंच हेंच आपलें सर्वस्व आहे असें न समजतां त्यामध्यें भगवंताला विसरूं नये. परमार्थाला सदाचरणाची फार जरूरी आहे. उगीच भलत्याच्या सांगण्याला भुलूं नये. आणि अनीति-अधर्माच्या मार्गाला जाऊं नये. संत जें सांगतात त्याच्यावर विश्वास ठेवून, मुखांत नाम ठेवावें आणि सदाचरणानें वागून प्रपंच करावा. असें जो वागेल त्याचें कल्याण राम खात्रीनें करील हें मी सर्वांना वचन देतो. प्रत्येकाला प्रपंचासाठीं देव पाहिजे असतो. खरोखर हे सर्व हिंगजिऱ्याचेंच गिऱ्हाईक आहेत; देवासाठीं देव पाहिजे असें म्हणणारा खरा कस्तुरीचा चाहताच कोणी भेटत नाही. असा मनुष्य भेटणें कठीण जातें, म्हणून सामान्य माणसांना आपण तयार करीत राहिलें पाहिजे असें वाटतें. मला या कार्यामध्यें रामानें पुष्कळ यश दिलें आहे. देह हा कष्टासाठींच असल्यामुळें त्याचें सुखदुःख सारखेंच मानावें.

जो बरा होणार नाहीं अशा रोग्याला बरा करतो तो डॉक्टर खरा. अगदी विषयांतल्या माणसांनासुद्धां जो बाहेर काढतो तो संत खरा. त्याच्याजवळ जाऊन नुसतें "मी शरण आलों आहें" असें म्हटलें तरी पुरें होतें. हल्लींच्या आणि पूर्वींच्या प्रपंचांत तसा फरक नाहीं; पण पूर्वी लोक देवाला विसरत नसत. अलीकडे ते जास्त संकुचित झाले आहेत. पूर्वी खेडेगावांमध्यें स्वाभाविकपणें एकमेकांच्या उपयोगी पडावें अशी बुद्धी असायची, पण आतां काळ पालटला आहे. नीतिशास्त्राच्या दृष्टीनें लोकांना मदत करणें निराळें, आणि भगवंताकरतां तें करणें निराळें. तुम्हां इतक्या लोकांना नामकरण करतांना पाहून मला एक समाधान वाटतें कीं, मला जी गोष्ट आवडते ती इतक्या लोकांना आवडूं लागली आहे. मी सांगितलेलें तेवढें करीन असा निश्चय करा. कशाचीहि काळजी करूं नका, मीं तुमचा भार घेतला आहे. ही जाणीव ठेवून आनंदानें प्रपंच करा.

---

१९१. मारुतीनें दिलेली मुद्रिका पाहिल्यावर सीतेला रामाच्या स्वरूपाची आठवण झाली; त्याप्रमाणें नाम घेतांना आपल्याला त्याची आठवण झाली पाहिजे.

# सद्‌गुरूस जावें शरण। संशयविरहित वृत्तीनें ध्यावें नाम

१० जुलै

राम ठेवील जी स्थिति। त्यांत समाधान राखे ज्याची वृत्ति। त्या नांव खरी विरक्ति। रामा आड जें जें कांहीं। तेथून दूर ठेवी वृत्ति। या नांव विवेकाची प्राप्ति॥ वृत्ति न होऊं द्यावी विषयीं फार। चित्तीं चिंतावा रघुवीर। जेव्हां वृत्ति होते विषयाकार। तेथें न राहे सारासार विचार॥ त्राता राम जाणून चित्तीं। निर्भय करावी आपली वृत्ती॥ वृत्ति राही अभिमानाला धरून। तेथें न राहो कधीं अनुसंधान॥ जोंवर देहाची संगति। तोंवर मी-माझें ही वृत्ति॥ जें जें पाहावें तें तें रामच होईजे। ऐसी ठेवावी वृत्ती। रघुनंदन आणावा चित्तीं॥ काळोख अत्यंत मातला। घालवयास उपाय दुजा न सुचला। होता सूर्याचें आगमन। काळोख जाईल स्वतः आपण॥ तैसें 'राम कर्ता' हा भाव ठेवतां चित्तीं। उपधीरहित बनते वृत्ति॥ वृत्ति असावी शुद्ध, संतसज्जनांना प्रमाण। त्यानें संतुष्ट होईल नारायण॥ जग स्वार्थमूलक खरें। हें आपलें वृत्तीवरूनच ओळखणें बरें॥ वृत्ति अलग करावी सर्वांहून। आलेली ऊर्मि करावी सहन। सर्व कर्ता जाणून रघुनंदन॥ एक भगवंत असावा। असें ज्याला वाटेल चित्तीं। फरक न पडे त्याची वृत्ति॥ निःसंशय करावी वृत्ति आपण। सद्‌गुरूस जावें शरण। संशयविरहित वृत्तिनें ध्यावें नाम। जें सुखाचें आहे धाम॥ शुद्ध ज्याचें अंतःकरण। शुद्ध ज्याचें आचरण। परमात्म्याबद्दल शुद्ध ज्याची वृत्ति। त्याचेहून दूर न राहे रघुपति॥ शांत राखावी वृत्ति। कृपा करील रघुपति॥ सर्वकांहीं करावें आपण। पण वृत्तीनें त्यांत न गुंतावें आपण॥

**वासना नदी ओलांडण्यांत। भगवंताच्या नामाचा सेतु पाहिजे**॥ नामानें वासनेच्या डोक्यावर नाचतां येतें॥ नामाचा ठेवावा संग। तेथेंच मिळेल सत्संग॥ नामांत ठेवावें प्रेम। तेथें प्रकटेल पुरुषोत्तम॥ नाम मानावें सत्य। दुजें न म्हणतां होईल असत्य॥ देहाचें चलन ज्याचे सत्तेनें। त्या रघुपतीचें स्मरण असावे आनंदानें। आतां काळ कठीण आला। नामाचा आधार पाहिजे धरला॥ प्रपंचांत धरितां नामाची संगति। काळजी विरहित आनंद देई॥ वासना नामापायीं जडली। धन्य धन्य सज्जनीं मानिली॥ पाणी माती एक झाले। वेगळे नाहीं करतां आलें॥ निवळी घालावी पाण्यांत। पाणी स्वच्छ होतें जाण॥ तैसा विषयांत राहून जगती। नामाची ठेवावी संगती॥ विषयाचें विष शोषून घेई। ऐसी आहे नामाची प्रचीति॥ जोंवर न कळले सत्य। तोंवर भ्रमानें न मानावें असत्य। शक्य तितकें राहावें नामांत। याहून दुसरें न आणावें मनांत॥ एका नामीं ठेवावें मन। दुसरा विचार न उठूं द्यावा जाण॥ परा पश्यंति वैखरी वाणी। याच्याहि पलिकडे नाम ठेवा स्मरणीं॥ नामापरती उठेल वृत्ति। तेथें सावध असावें तुम्हीं॥ जो नामांत राहिला दंग। त्यानें लुटला रामरंग॥ रामनाम बोलावें वाचा। काळ न येऊं द्यावा काळजीचा॥ नामावीण राम। जैसें पाकळ्यांवीण फूल जाण॥ नाम ज्यानें घेतलें सर्वकाळ। जिंकला त्यानें एक अंतकाळ॥ भगवंत ठेवील त्यांत हित मानावें। अखंड नामस्मरण ध्यावें॥ नामांत स्वतःचा विसर। हेंच देईल रघुवीर॥ भगवंताची प्राप्ति संतांची संगति। नामाचें प्रेम हें भगवत्कृपेवांचून नाहीं साधत जाण॥ सतत करावें नामस्मरण। सर्व इच्छा राम करील पूर्ण॥

---

**१९२. त्राता राम जाणून चित्तीं। निर्भय करावी आपली वृत्ती॥**

# सत्पुरुष व त्यांचा अनुग्रह

११ जुलै

एखाद्या सत्पुरुषाचा अनुग्रह झाला म्हणजे त्या व्यक्तीच्या प्रापंचिक आणि पारमार्थिक बाबतींत त्या सत्पुरुषाचीच सत्ता असते का? होय. सरकारच्या हातांत सर्व सत्ता असते, आणि राज्ययंत्र सुरळीत चालण्याकरितां एकेक खात्याकडे एकेक कामगिरी सोंपविलेली असते. कायद्याला धरून जोपर्यंत तें खातें आपलें काम करीत असतें तोपर्यंत सरकार त्यांत ढवळाढवळ करीत नाहीं; फक्त क्वचित् प्रसंगीं आणि विशेष कारणांमुळेंच, हस्तक्षेप करून सरकार आपल्या सत्तेचा उपयोग करतें आणि इच्छेप्रमाणें गोष्टी घडवून आणतें. तोच नियम इथेंहि लागू आहे. प्रापंचिक बाबतींत "प्रारब्ध" हें एक खातें आहे. त्याचा संबंध देहापुरताच असतो. प्रत्येकाच्या प्रारब्धानुसार त्याला बऱ्यावाईट गोष्टी भोगाव्या लागतात. त्यांत सत्पुरुष होतां होईल तों ढवळाढवळ करीत नाहीं. फक्त व्यक्तींच्या कल्याणाकरितांच जर जरूर असेल तर सत्पुरुष त्यांत ढवळाढवळ करील; नाहींतर प्रारब्धाप्रमाणें गोष्टी घडूं देईल. पण परमार्थाच्या बाबतींत मात्र त्याची सर्व सत्ता असते. आपण मात्र त्यानें सांगितलेल्या साधनांत राहून त्याला त्याची कामगिरी करण्यांत अडथळा न येईल असें वागणें जरूर असतें. हा अडथळा अनेक प्रकारचा असतो. एक म्हणजे, त्यानें सांगितलेल्या साधनाबद्दल शंका घेणें; दुसरें, दुसऱ्याला अमुक एक दिवसांत साधलें, मला अजून कां साधत नाहीं, असा विचार मनांत येणें; आणि तिसरें, सांगितलेल्या साधनापेक्षां कांहीं अधिक किंवा कमी करण्याचा प्रयत्न करणें, इत्यादि. थोडक्यांत म्हणजे, एकदां संताच्या पायावर डोकें ठेवल्यावर आपला प्रपंच आणि परमार्थ हीं दोन्हीं कामें त्याच्याकडे सोंपवून, प्रपंचांत घडणाऱ्या गोष्टी त्याच्याच इच्छेनें घडताहेत अशी भावना टेवून, आपलें कर्तव्य करीत त्यानें सांगितलेल्या साधनांत एकनिष्ठेनें राहणें हाच खरा मार्ग आहे. **संताच्या देहाकडे पाहण्याचें कारण नाहीं, त्याचा देह आमचें काम करीतच नाहीं; तो परमात्मस्वरूप आहे ही जी आपली भावना, ती आपलें काम करते.** संत अत्यंत दयाळू असतात. अशा सत्पुरुषाच्या देहामध्यें सूक्ष्म तत्त्वें जास्त प्रमाणांत असतात; म्हणून आपले अवगुण घालविण्याचा उपाय म्हणजे सत्संगति होय. भगवंत हा दृश्य जगाच्या बाहेर राहतो. सत्पुरुषाला भगवंत भेटलेला असतो. म्हणून, सत्पुरुष हा देहानें या जगांत राहतो असें दिसलें, तरी अंतर्यामीं तो भगवंतापाशींच बसतो. म्हणून, आपण सत्पुरुषाकडे जात असतांना या जगातल्या वस्तूविषयीं वासना धरून गेलों तर तें योग्य नव्हे. सत्पुरुषाला त्याच्या लक्षणांवरून ओळखतां येणार नाहीं. पुस्तकामध्यें दिलेलीं जीं लक्षणें असतात त्याच्या पलीकडे संत असतो. त्याला ओळखायला आपल्या अंगीं थोडें तरी भगवंताचें प्रेम आवश्यक आहे. भगवंताचें प्रेम हें एक मोठें वेड आहे. तें ज्याला लागेल तो भाग्याचा खरा!

---

**१९३. भगवंताच्या दास्यांत जें प्रेम आहे तें जगाच्या मालकींत नाहीं.**

# आपलें जीवन एकदां सद्गुरूच्या ताब्यांत दिल्यावर तो सांगेल त्याप्रमाणें वागावें

१२ जुलै

**ज्या दानाची आठवण राहात नाहीं तें दान खरें होय.** जेव्हा आपण बक्षीस देतों, त्या वेळीं कोणतीहि अट न ठेवता तें दिलें तरच त्याला बक्षीस म्हणतां येईल. शुद्ध भावना म्हणजे मोबदला न घेण्याची किंवा फलाशा सोडण्याची इच्छा. भक्ति ही अशी निरपेक्ष असावी. देवालयें बांधलीं, देवाचें पूजन-अर्चन केलें, म्हणजे भक्ति निरपेक्ष केली असें नव्हे. देवाचें करीत असतांना, जप करीत असतांना, त्यापासून कांहीं हवें आहे असें न वाटलें पाहिजे. तुम्ही सर्व लोक भजन, पूजन करता, परंतु हेंच सर्व कसें होऊन बसलें आहे, जसें शास्त्रांत भांडें कोठें ठेवावें, पळीताम्हन कोठें ठेवावें, वगैरें जें लिहिलेलें असतें तें सर्व माणूस तोंडानें म्हणत असतो आणि करीत असतो. कारण त्यामुळें त्याला कृति करणें सोपें जातें, तसें, आपण देवाचें करतों, परंतु तें केवळ केलें पाहिजे म्हणून, ती आपल्या घरातली एक प्रथा आहे म्हणून; आपल्याला देव आवडतो म्हणून नव्हे. एक मुलगा होता, त्याला त्याच्या वडिलांची पत्रें येत असत. तो पत्र वाची आणि देव्हाऱ्यांत ठेवून देई. दुसरें पत्र आलें कीं तें वाची. आणि मागलें पत्र काढून टाकी. एकदा वडिलांनीं पंचवीस रुपये मागितले. मुलानें तें पत्र वाचलें आणि नेहमींप्रमाणें पूजेंत नेऊन ठेवलें. नंतर कांहीं दिवसांनीं वडिलांकडून एक गृहस्थ आला आणि त्याला म्हणाला, "तुला तुझ्या वडिलांचें पत्र मिळालें का?" त्यावर तो म्हणाला "हो." "अरे, मग पैसे कां नाहीं पाठविलेंस वडिलांना!" त्या गृहस्थानें विचारलें. त्यावर तो म्हणाला, "तेवढेंच राहिले बघा." तसें आपलें होतें. आपण कृति करतों, पूज्य भाव वगैरे ठेवतों, परंतु सद्गुरूनें सांगितलेलें तेवढें करीत नाहीं. त्यामुळेंच आपलीं सत्कर्में हीं आपला अहंकार कमी व्हायला कारणीभूत न होतां, उलट अहंपणा वाढवायलाच मदत करतात म्हणून, सद्गुरूनें सांगितलेलें साधनच आपण प्रामाणिकपणें संशयरहित होऊन करावें. त्याकरितां व्यवहार सोडण्याची जरूर नाहीं. युद्धांत सारथ्याच्या हातीं सर्व कांहीं असतें. तो लगाम हातीं घेऊन जागृतपणें उभा असतो, आणि योग्य वाटेल तेथें रथ नेऊन उभा करतो, युद्धकर्त्याचें काम फक्त बाण अचूक दिशेला किंवा व्यक्तीवर सोडणें. त्याप्रमाणें, आपलें सर्व जीवन एकदां सद्गुरूच्या ताब्यांत दिल्यावर, तो सांगेल त्याप्रमाणें वागणें हेंच आपलें कर्तव्य ठरतें. आपण व्यवहारांत गुंतू नये, पण व्यवहाराला सोडूंहि नये. **ज्यानें जगाची आस टाकली त्याचें तेज पडणारच हें लक्षांत ठेवावें.** "मला" भगवंताची गरज आहे आणि प्रपंचाला "माझी" गरज आहे. एखादा रुपया आपण उचलला तर त्याच्या दोन्ही बाजू जशा एकदमच हातीं येतात, त्याप्रमाणें आपण प्रपंचांत पडलों; कीं आपल्याला परमार्थ हा पाहिजेच. परमार्थांत भगवंताची गरज असते. ही भगवंताची गरज सद्गुरु त्याचें 'नाम' देऊन भागवितात. आपण हें नाम निरंतर आणि श्रद्धेनें घेणें आवश्यक आहे. अशा रीतीनें नामांत अखंड राहिलें तर परमार्थ साधतो, भगवंताची गरज भागते, प्रपंचांत समाधान मिळतें, आणि जन्माला आल्याचें सार्थक होतें.

**१९४. नामानें भगवंताची प्राप्ति होणारच ही खात्री असावी; अशा नामालाच 'निष्ठेचें नाम' असें म्हणतात.**

# सद्गुरूकडून मिळालेलें ईश्वराचें नाम प्रेमानें, भक्तीनें व एकाग्रतेनें घ्यावें

**१३ जुलै**

आपल्या अनुभवाला येईल तेंच खरें जरी असलें, तरी आपण त्याप्रमाणें वागतों का ? पुष्कळ गोष्टी वाईट आहेत असें आपल्या अनुभवाला येतें, परंतु त्या करण्याचें आपण टाळतों का ? हाच तर आपल्यातला दोष आहे. थोर पुरुषाचें मात्र तसें नसतें. त्यांना जें अनुभवाला आलें तें त्यांनीं आचरणात आणून दाखविलें. आणि म्हणूनच ते संतपदवीला गेले. खरोखर संतांचें आपल्यावर केवढे उपकार आहेत ! जगांतलें सुख हें खरें सुख नव्हे; दुःखानेंच सुखाचा घेतलेला केवळ वेष आहे तो. आणि असें जेव्हां त्यांच्या अनुभवास आलें तेव्हां त्यांनीं त्या सुखाकडे पाठ फिरविली, आणि खऱ्या सुखाच्या शोधाला ते लागले. परमेश्वरप्राप्तींतच खरें सुख आहे असें त्यांना आढळून आलें, आणि त्या प्राप्तीचा अगदीं सोपा मार्ग म्हणजे ईश्वराचें नाम; आणि हेंच वेदकाळापासून तों आत्तापर्यंत सर्व साधुसंतांनीं अनुभव घेऊन सांगितलें आहे. सद्गुरूकडून मिळालेलें ईश्वराचें नाम प्रेमानें, भक्तीनें, आणि एकाग्रतेनें घेतलें तर परमेश्वर आपल्याजवळ येऊन उभा राहतो, असा सर्व संतांनीं आपला अनुभव कंठरवानें सांगितला आहे. आपण तसें नाम घेतों का ? नामाकरितां नाम आपण घेतों का ? का मनांत कांहीं इच्छा, वासना ठेवून घेतो ? कोणतीहि वृत्ति मनांत उठूं न देतां जर नामस्मरण केलें तर देव कांहीं लांब नाहीं. **देव आणि नाम हीं दोन्ही भिन्न नाहींतच. नाम म्हणजेच देव, आणि देव म्हणजेच नाम.** नाम एकदा मुखांत आलें म्हणजे देव हातांत आलाच. मुलें पतंग उडवितात; एखादा पतंग आकाशांत इतका उंच जातो कीं तो दिसेनासा होतो. तरी तो पतंग उडविणारा म्हणतो; माझ्या हातांत आहे पतंग; कारण पतंगाचा दोरा त्याच्या हातांत असतो. जोंपर्यंत अखंड नामस्मरणाची दोरी आपल्या हातांत आहे तोंपर्यंत परमेश्वर आपल्या हातांत आहे. ती दोरी सुटली कीं परमेश्वर सुटला. आपल्या नामस्मरणाला एका गोष्टीची अत्यंत जरूरी आहे; आपल्या जीवनांत परमेश्वरावाचून नडतें असें जोंपर्यंत आपल्याला वाटत नाहीं, तोंपर्यंत आपलें नामस्मरण खरें नव्हे. **परमेश्वरच आपल्या जीवनाचा आधार, त्याशिवाय आपण जगूंच शकत नाहीं, अशी वृत्ति बाणल्यावर होणारें नामस्मरण तेंच खरें नामस्मरण.** आपली स्थिति तर याच्या अगदीं उलट ! आपलें परमेश्वरावांचून कुठेंच अडत नाहीं अशा वृत्तीनें आपण नामस्मरण करतों, मग परमेश्वर तरी कसा येईल ! परमेश्वराचें नाम हेंच आपल्या जीवनाचें सर्वस्व समजून नाम घेतलें तर जीवनाचें सार्थक झाल्यावांचून राहणार नाहीं.

---

१९५. रामबाण म्हणजे बरोबर काम करणारा बाण। आपल्या लक्ष्यावर अचूक जाऊन तो बाण पुनः परत येऊन भात्यांत बसे. नाम अगदीं रामबाण आहे. रामाच्या जवळ राहणारें आणि अचूक रामाकडे नेणारें तें साधन आहे.

# गुरु जें साधन सांगेल त्यांतच त्यास पाहा

१४ जुलै

परमार्थ म्हणजे काय हें मी तुम्हाला अगदीं थोडक्यांत सांगतों. परमार्थाचें जर कांहीं वर्म असेल तर, आसक्ति सोडून प्रपंच करणें हें होय. ज्यानें आपल्याला प्रपंच दिला त्याचाच तो आहे असें समजून वागणें म्हणजे आपल्याला त्याबाबत सुखदुःख बाधत नाहीं. हें साधण्यासाठीं गुरुमुखानें दिलेलें परमात्म्याचें नाव आपण घेत असावें. गुरु कुणाला करावें? जिथें आपलें समाधान होतें तेंच गुरुपद म्हणावे. गुरुपद कुठेंहि एकच असतें. गुरूला कुठें आडनाव असतें का! गोंदवलेकर गोंदवल्यास राहात असतील, दुसरा कुणी आणखी कोणत्या गावीं राहात असेल. म्हणून लौकिक आडनाव जरी निराळें झालें तरी गुरुपद हें सर्वकाळीं अबाधित असेंच असतें. तुमचें जिथें समाधान झालें त्याला गुरु समजा, आणि तो जें साधन सांगेल त्यांतच त्याला पाहा; त्याच्या देहाकडे पाहूं नका. तो लुळा-पांगळा आहे कीं काय हें पाहूं नका. तो देहानें कसाहि असला तरी त्यानें सांगितलेल्या साधनांत राहा, त्याची लाज, जिथून गुरुपद निर्माण झालें त्याला असते. गुरुआज्ञा हाच परमार्थ; तो सांगेल तेंच साधन. तुम्ही आपल्या मनानें कांहीं ठरवून करूं लागलांत तर त्यांत तुम्हाला यश येणार नाहीं; अभिमान धरून कांहीं करूं लागलांत तर तें साधणार नाहीं. म्हणून अभिमान सोडून गुरूकडे जा. गुरु सांगेल तेंच साधन हें पक्कें लक्षांत ठेवा. खरा परमार्थ हा लोकांना उपदेश करण्यासाठीं नाहीं, तो निव्वळ स्वतःकरतां आहे. आपला परमार्थ जगाला जितका कमी दिसेल तितका आपल्याला फायदेशीर आहे. जगातल्या मोठेंपणांत मुळींच सार्थकता नाहीं. खरा मोठेपणा नसतांना उगीच मोठेपणा वाटणें हा तर फार मोठा घात आहे. एकानें कोळशाचें दुकान घातलें आणि दुसऱ्यानें पेढ्याचें दुकान घातलें, दुकान कशाचेंहि असलें, तरी शेवटीं फायदा किती होतो याला महत्त्व आहे; तसें प्रपंचांत कमी जास्त काय आहे याला परमार्थांत महत्त्व नसून, मनुष्याची वृत्ति भगवंताकडे किती लागली याला महत्त्व आहे. परमार्थाला कोणतीहि परिस्थिति चालतें. आपली वृत्ति मात्र स्थिर असली पाहिजे. एकीकडून मनाचें संयमन आणि दुसरीकडून भक्तीचा जोर असला म्हणजे परमार्थ लवकर साधतो. खरोखर परमार्थ इतका सोपा आहे कीं तो सहज रीतीनें करतां येतो. पण गंमत अशी कीं, तो "सोपा" आहे म्हणून कुणीच करीत नाहीं. प्रपंच हा परमार्थाच्या आडकाठीसाठीं नाहीं, तो परमार्थासाठींच आहे, हें पक्कें लक्षांत ठेवावें. हृदयीं ठेवावा राम। मुखीं सदा त्याचें नाम। हातांत असावें प्रपंचाचें काम। हेंच खरें परमार्थाचें वर्म॥ ज्याची वाटते महती। त्याचेंच चिंतन होय चित्तीं। रामावांचून आतां न ठेवा दुजा भाव। चित्तास येईल तेथेंच ठाव॥ देहासकट माझा प्रपंच जाण। हा रामा तुला अर्पण। ऐसें वाटत जावें चित्तीं। कृपा करील रघुपति॥ सर्व ठिकाणीं पाहावें रामाचें अधिष्ठान। तेणें मिळेल मनास समाधान॥

---

१९६. सत्समागम आणि भगवंताचें नाम। हींच करतात परमार्थाचें काम॥

# भ्रमनिरास होऊन परमेश्वराची तळमळ लागल्यावर गुरुभेट निश्चित

१५ जुलै

काय करावें हें मनुष्याला कळतें, पण त्याचें मन त्याला आवरत नाहीं. विषयाचा उपभोग घेताना आपलें मन त्यामध्यें जास्तच रंगून जातें, आणि त्याचें सुखदुःख निस्तरताना मात्र आपली भ्रमिष्टासारखी चित्तवृत्ति होते. आपल्याला झालेला भ्रम नाहींसा करण्याचे तीन उपाय आहेत. एक सद्विचार, दुसरा नामस्मरण, आणि तिसरा सत्संगति. संत ओळखणें फार कठीण आहे. आपण त्याच्यासारखें व्हावें तेव्हाच तो कळायचा. त्यापेक्षां सद्विचार बाळगणें सोपें. भगवंताचा विचार तोच सुविचार होय. भगवंताच्या कथा ऐकाव्यात, त्याच्या लीला वर्णन कराव्यात, त्याच्या वर्णनाचे ग्रंथ वाचावें, पण याहिपेक्षां आपल्याजवळ नेहमीं राहाणारें असें त्याचें नाम घ्यावें. तुम्ही नेहमीं नाम घेत गेलांत तर तुम्हाला संत धुंडीत जाण्याची जरूर न पडता, संतच–अगदीं हिमालयातले संत–तुम्हाला धुंडीत येऊन तुमचें काम करतील. अहो, खडीसाखर ठेवली कीं मुंगळ्यांना आमंत्रण करायला नको! तुम्ही म्हणाल, 'आम्हाला तें करता येत नाहीं;' पण आपण आपल्या मुलाला शाळेंत घालतों, आणि तो न शिकला किंवा त्याला अभ्यास येत नसला तर पुनः त्याच वर्गांत त्याला बळजबरीनें ठेवतोंच कीं नाहीं! त्याला एक विद्या आली नाहीं तर दुसरी कोणती येईल ती शिकवतोंच कीं नाहीं? आणि त्यानें आपल्या पोटा-पाण्याची व्यवस्था करायला तयार व्हावें म्हणून आपल्याला तळमळ लागतेच कीं नाहीं! तशी परमेश्वर मिळावा म्हणून आपल्याला तळमळ लागली आहे का? नाहीं! तर तशी तळमळ लागली म्हणजे तुमचा गुरु प्रत्यक्ष जमिनींतून वर येईल. तो गेला असें समजूं नका; तो सारखा तुमच्याकरितां वाट पाहात असतो. आई मुलाची फार तर एक जन्मापर्यंतच म्हणजे देह आहे तोपर्यंतच काळजी करील, पण गुरु हा जन्मोजन्मीं तुमची काळजी घ्यायला तयार आहे. त्याला देह नाहीं म्हणून तो नाहीं असें समजूं नका. तुम्ही दुश्चित्त झाला म्हणजे तो दुश्चित्त होतो। तुम्हाला काटा लागला म्हणजे त्याला त्याचें दुःख होतें. म्हणून तुम्ही केव्हाहि दुश्चित्त होऊं नका. देहाचे भोग येतील-जातील, पण तुम्ही सदा आनंदात राहा. तुम्हाला आता कांहीं करणें उरलें आहे असें मानूं नका. गुरुभेट झाली म्हणजे तुम्ही तुम्हीपणानें उरतच नाहीं। मात्र गुरूला अनन्य शरण जा. एक शिष्य भेटला, तेव्हा तो आनंदानें नाचूं लागला, तेव्हा मीं त्याला विचारलें, "तुला एवढा आनंद कसला झाला आहे?" त्यावर तो म्हणाला, "मला आता आनंदाशिवाय कांहीं उरलेंच नाहीं, कारण मला आज गुरु भेटले!" जो असा झाला त्यालाच खरी गुरूची भेट झाली। तरी तुम्ही गुरूला अनन्य शरण जा म्हणजे तुम्ही आणखी कांहीं करण्याची जरूरी नाहीं.

१९७. अत्यंत चिकाटीनें संतांचा समागम करावा आणि त्यांच्या कृपेस पात्र व्हावें.

# ज्या दिवशीं सद्गुरूंनीं आपल्याला अनुग्रह दिला त्याच दिवशीं आपण धन्य झालों

१६ जुलै

परमात्म्याकडे जाण्याचे अनेक मार्ग आहेत. आपल्या गुरूंनीं जो राजमार्ग दाखविला त्यानेंच जावें. मध्येंच दुसरा मार्ग घेतला तर पल्ला कधींच गांठायचा नाही. एका वैद्याचें औषध सोडून दुसऱ्याचें घेतलें तर पहिल्या वैद्याची जबाबदारी संपली. आतां, तरीहि मी माझ्या माणसाला सोडीत नाहीं ही गोष्ट निराळी. ज्या दिवशीं मी तुम्हाला अनुग्रह देऊन आपला म्हटलें, त्या दिवशींच वास्तविक तुम्ही धन्य झाला. सर्व प्रापंचिक आणि पारमार्थिक जबाबदारी गुरूवर सोंपवून तुम्ही मोकळे झाला. गुरुआज्ञेशिवाय तुम्हाला दुसरें कर्तव्यच उरलें नाहीं; पण तुम्हाला असें वाटतें कुठें ! विष हें आमटींत घातलें काय किंवा भाजींत घातलें काय, दोन्ही त्याज्यच; त्याप्रमाणें अभिमान व्यवहारांत असला काय किंवा पारमार्थिक साधनांत असला काय, दोन्ही त्याज्यच. मी कोण हें आधीं जाणलें पाहिजे; परमात्मा कोण तें मग आपोआपच कळतें. दोघांचेंहि स्वरूप एकच आहे, म्हणजे दोघेहि एकच आहेत. परमात्मा निर्गुण आहे, आणि तो जाणण्यासाठीं आपणहि निर्गुण असायला पाहिजे; म्हणून देहबुद्धि आपण सोडली पाहिजे. कोणतीहि गोष्ट आपण जाणतों म्हणजे आपल्याला त्या वस्तुकार व्हावें लागतें, त्याखेरीज जाणणेंच होत नाहीं. म्हणून परमात्म्याला जाणण्यासाठीं आपणहि नको का परमात्मस्वरूप व्हायला ? यालाच " साधु होऊन साधूस ओळखणें, " किंवा " शिवाय भूत्वा शिवं यजेत " असें म्हणतात. आतां, कोणत्याहि वस्तूचा आकार आपल्याला प्राप्त होण्यासाठीं आपल्याजवळ तत्सदृश असे संस्कार पाहिजेत; ते संस्कार त्या वस्तूच्या आघातानें प्रत्याघातरूपानें उद्भूत होतात, नंतर त्या वस्तूचें ज्ञान होतें. म्हणून परमात्मरूपाला पोषक अशा संस्कारांनीं सर्व विरोधी संस्कार घालवून, आपण आपलें अंतःकरण पोषक संस्कारांनीं युक्त केलें पाहिजे. जर आपण कांहीं साधनानें निष्पाप होऊं शकलों, तर आपल्याला जगांत पाप दिसणेंच शक्य नाहीं. देवाच्या गुणानें आणि रूपानें त्याचे गुण आणि रूप मिळेल, पण त्याच्या नामानें तो जसा असेल तसा सर्वच्या सर्व मिळतो. म्हणून नाम हें साधन श्रेष्ठ आहे. **अंतःकाळीं अगदीं शेवटीं सुटणारी वस्तु म्हणजे भगवंताचें नाम पाहिजे. नामांत शेवटचा श्वास गेला पाहिजे. याहून दुसरें काय मिळवायचें ?**

---

१९८. आपण भगवंताच्या नामांत राहिलें पाहिजे; त्यांतच जीवनांतलें सर्व सुख सामावलें आहे.

# गुरूनें सांगितलेलें साधन करणाऱ्यालाच परमात्म्याची ओळख होऊं शकते

१७ जुलै

एकदा असें झालें कीं एक बाई बाळंतीण झाली आणि ताबडतोब तिच्या मुलाला दुसरीकडे नेलें. पुढें कांहीं वर्षांनीं त्या दोघांची भेट झाली, तेव्हां मुलाला ही माझी आई आणि त्या बाईला हा माझा मुलगा हें ओळखता आलें नाहीं; तशासारखें आपलें झालें आहे. आपण इथें कशाकरितां आलों हेंच विसरलों आहोंत. खरें म्हणजे आपण कांहीं एका निश्चित कार्याकरितां जन्मलों आहोंत; तें म्हणजे मनुष्य-देहांत परमात्म्याची ओळख करून घेणें हें होय. परंतु आपण विषयांत पडल्यामुळें परमार्थाची ओळख विसरलों, विषयांतच आनंद मानूं लागलों, आणि त्यातच सुख मिळावें अशी आशा करीत राहिलों. पण विषयच जर खोटे तर त्यापासून सुख तरी कसें मिळणार ? आणि जें सुख मिळतें तेंहि अंतीं खोटेंच ठरतें ! म्हणून विषयापासून आपण विरक्त व्हावें तेव्हांच भक्ति करतां येते. जिथें विषयविरक्ति झाली तिथेंच भक्तीला सुरवात होते गुरु तरी काय करतो, तर विषय हे खोटे आहेत, त्यांत आपल्याला सुख मिळणार नाहीं, हेंच दाखवितो म्हणून तो जें सांगेल तसें वागणें यांतच आपलें हित असतें म्हणून गुरूनें सांगितल्याशिवाय जें जें साधन कराल तें तें फक्त कष्टालाच कारण होईल. कितीहि साधनाची आटाआटी केली आणि शरीराला कष्ट दिले तरी ते व्यर्थ जातात, कारण गुरूव्यतिरिक्त जी खटपट ती फारशी उपयोगाची नसते. गुरूनें सांगितलेलें साधन हलकें मानून आपल्या मनानें केलेलें साधन आपल्याला बरें वाटतें, म्हणजे गुरूला गौणपणा दिल्यासारखें झालें ! वास्तविक पाहतां गुरु हा सर्वज्ञ आहे आणि तोच प्रत्यक्ष परमात्मा, ही भावना दृढ झाली पाहिजे; ती तशी झाली म्हणजे त्याच्या वचनावर विश्वास बसतो. आणि गुरु सांगेल तेंच साधन खरें असें वाटूं लागतें. गुरु तरी नाम हेंच सत्य सांगतो. आणि नामस्मरणाला आणखी दुसऱ्या कांहीं साधनांची गरज लागत नसते हें पटवून देतो. **नाम हेंच साधन आणि तेंच साध्य होय** हें अक्षरशः खरें आहे. गुरूनें सांगितलेलें साधन पतिव्रतेसारखें निष्ठेनें पाळलें पाहिजे. ती जशी आपल्या पतीशिवाय जगात दुसरा पुरुषच नाहीं असें मानते, त्याप्रमाणें आपण आपलें साधन सांभाळलें पाहिजे, जो असा अनन्यतेनें वागतो त्यानेंच गुरुआज्ञा प्रमाण मानली असें होतें, आणि त्यामुळेंच त्याला खरें सुख होतें. कुठेंतरी आपलें प्रेम असावें, कुणावर तरी आपला विश्वास असावा, कुठेंतरी आपलेपणा असावा. आपण त्याचें होऊन राहावें अशी नेहमीं इच्छा धरावी. जितक्या अपेक्षेनें आपण प्रपंचांत सुख मिळवण्यासाठीं धडपड करतों तितकी सर्व जर भगवंताकडे लावली तर आपल्याला सुख खात्रीनें मिळेल यांत शंका नाहीं.

**१९९. नुसत्या विचारानें तत्त्वज्ञान निश्चित होणार नाहीं. त्यासाठीं साधन करायला पाहिजे.**

# सद्गुरू आपल्यावरचीं संकटें नाहींशीं करीत नाहींत, तर संकटांची भीति नाहींशीं करतात

१८ जुलै

खरोखर, भगवंताची सेवा एकपरी सोपी आहे, पण गुरूची सेवा करणें फार कठीण गोष्ट आहे. नाथांनीं खरी गुरुसेवा केली, कल्याणांनीं खरी गुरुसेवा केली. देहबुद्धि नाहींशी झाल्याशिवाय पूर्ण गुरुसेवा घडतच नाहीं, आणि गुरुसेवेमध्यें देह झिजवल्यावांचून देहबुद्धि पूर्ण नष्ट होत नाहीं. देहबुद्धि आहे तोंवर, म्हणजे "मी देही आहें" ही भावना आहे तोंपर्यंत, काळजी राहणारच. काळजी ही मनांतून असते; जोंवर संशय फिटत नाहीं, परमेश्वराचा आधार वाटत नाहीं, तोंवर काळजीहि मनाला सोडीत नाहीं. ग्रहांच्या अधिकाराची मर्यादा देहापर्यंतच आहे. पैसा किती मिळेल हें त्यावरून सांगतां येईल, भगवंताकडे किती कल आहे, हें सांगतां येईल, पण भगवंताची प्राप्ति होईल कीं नाहीं हें सांगतां येणार नाहीं. मनुष्यजन्म येऊनहि भगवंताची प्राप्ति नाहीं झाली तर जिवाचें फार नुकसान आहे.

भगवंताच्या प्राप्तीची मनापासून तळमळ लागायला पाहिजे. एकदां का अशी तळमळ लागली कीं मनुष्य वेडा बनतो आणि कोणी संत भेटला कीं निवांत होतो. **संत आपल्यावर येणारीं संकटें नाहींशीं करीत नाहींत** तर त्या संकटांची भीति नाहींशीं करतात. संकटापेक्षां संकटाची भीतीच आपल्याला फार घाबरवून सोडते. 'जें मला कळलें तें लोकांना कळून लोक सुखी होऊं द्या' हा संतांचा एकच हेतु असतो. संत विषयावर मालकी गाजवितात. संत स्वतःला जिंकून जगांत वावरत असतात. **जगाला जिंकणें एकवेळ सोपें, पण स्वतःला जिंकणें कठीण आहे.** संत साक्षित्वानें जगांत राहतात, आणि साक्षित्वानें राहणाऱ्याला दुःखाची बाधा होत नाहीं. संतांच्या संगतींत राहून, त्यांच्या आज्ञेंत राहून, आपण आपल्या मनांतले सर्व संशय नाहींसे करावेत. वास्तविक संतांच्या आज्ञेचें एकनिष्ठपणानें जो पालन करतो त्याचे संशय आपोआप दूर होतात. जोंवर संशय आहे तोंवर असमाधान आहे. समाधान हें आपलें आपल्यालाच ध्यायचें असतें. म्हणून ज्याला स्वतंत्र राहायचें आहे त्यानें फार धडपड करूं नये; जशी स्थिति येईल त्या स्थितींत समाधानांत राहावें. कचेरीचे विचार आपल्याबरोबर घरीं आणू नयेत; ते तिथेंच ठेवावेत. घरांतलें वातावरण शुद्ध आणि निःसंशयाचें असावें. भोळेपण एकप्रकारें चांगलें; ती एक भाग्याची गोष्ट आहे. जो योगभ्रष्ट असतो त्याच्या अंगीं भोळेपण असतें, जसें कल्याणस्वामींच्या अंगीं होतें. झालेल्या गोष्टी विसरून जाण्यातच खरा आनंद आहे; पण तें विसरणें कृत्रिमपणें न आणतां, भगवंताच्या स्मरणांत राहून आलें पाहिजे. म्हातारपणीं मन आणि शरीर फार नाजूक बनतें. त्या वेळीं शरीरसुद्धां बरें राहायला आनंद हें फार मोठें औषध आहे. हंसावें, खेळावें, लहान मुलांत मिसळावें, थट्टा-विनोद करावा; काहींहि करावें पण आनंदांत राहावें. ज्याचा आनंद कायम टिकला, त्याच्याच जन्माचें सार्थक झालें.

---

**२००. समाधान ही परमेश्वराची खरी देणगी आहे, ती मिळविण्याचा उपाय म्हणजे भगवंताचें स्मरण होय.**

# सद्गुरूनें सांगितलेल्या साधनांत राहिल्यानेंच गुरुभेटीचें सार्थक होतें

१९ जुलै

मी जेव्हां भजन करीत असें त्या वेळेस मी आणि देव याच्याशिवाय मला कुणीच दिसत नसे. तसेंच तुम्हाला व्हावें अशी माझी इच्छा आहे, आणि तसें तुम्हाला होऊं शकेल म्हणूनच हें मी सांगतों आहें. बाह्यागानें बुवा होणें मला मुळींच आवडत नाहीं, परंतु मनानें बुवासारखें व्हावें हें आवडतें.

रोज थोडेंसें वाचून सांगत जावें. लोकांना बरें वाटेल किंवा नाहीं याकरितां आपण सांगूं नये, तर देवाला शरण जाऊन त्याचें येईल तसें गुणवर्णन आपण करीत राहावें. रोज पोथीला नमस्कार करून सांगायला सुरुवात करावी. आपण सांगतांना दुसऱ्याचे दोष सांगू नयेत आणि परनिंदा करूं नये. याकरितांच मी तुम्हांला सांगतों कीं, रोज निजण्याच्या वेळेस आपण दिवसभरांत देवप्राप्तीसाठीं काय केलें आणि दुसऱ्याच्या निंदेंत किती काळ घालविला याचा धडा वाचावा. म्हणजे चित्तशुद्धि होत जाईल. रोज असें तुम्ही करीत जा म्हणजे तीन महिन्यांत तुमचें चित्त शुद्ध होईल. चित्त शुद्ध होण्यासाठीं दुसरा उपाय म्हणजे सत्संग. सत्संग करावा म्हणजे दुश्चित होत नाहीं. सत्संग करण्यासाठीं संत कुठें पाहावेत ? आपण पाहूं गेलों तर आपल्याला संत ओळखतां येतील का ? संत आपल्यासारखेच देहधारी असतात का ? हल्लींच्या काळांत संत पाहूं गेल्यास सांपडणें कठीण आहे, अशा वेळीं दासबोध हाच सत्संग होईल. समर्थांनीं सांगून ठेवलें आहे कीं, जो विश्वासानें हा ग्रंथ वाचील, त्याला माझा संग घडेल. आपण संत देहांत पाहूं नये, तर ते जें साधन सांगतात तेंच ते होत असें समजावें. संत भेटल्यावर कांहीं करण्याचें उरलें आहे असें आपल्याला वाटतांच कामा नये; ज्यांना तें वाटतें त्यांना गुरु भेटूनहि भेट न झाल्यासारखेंच आहे. आज एक यात्रा केली, उद्यां दुसरी करायची राहिली, अशी इच्छा कां असावी ! गुरु एकदां भेटला कीं, त्याच्याखेरीज आतां कांहीं कर्तव्यच उरलें नाहीं असें ज्याला वाटतें, त्यानेंच गुरु भेटून सार्थक केलें असें होतें. गुरुआज्ञेपरतें दुसरें त्याला साधनच नसतें तोच परमार्थ, आणि तीच त्याची तीर्थयात्रा होते. आणखी कांहीं करायचें आहे असें त्याच्या ध्यानींमनींहि येत नाहीं. गुरु हा विषयापलीकडे असतो, परंतु तुम्हीं त्याला विषयांत ओढूं पाहतां. जसें नदीच्या ओघांत आपण सांपडलों म्हणजे बाहेर पडायला आपल्याला जोरानें हात मारावे लागतात, तसें विषयांतून बाहेर पडण्यासाठीं आपल्याला श्रम करायला नकोत का ! काय काय करायला पाहिजे हें वाचनानें कळेल, पण साधकानें तें स्वतः केल्याशिवाय भागणार नाहीं.

---

२०१. नाम उपाधिरहित असल्यानें आपणहि उपाधिरहित झाल्याशिवाय नामाचें प्रेम आपल्याला येणार नाहीं.

# नामांतच राहे समाधान । ही सद्‌गुरूची आहे खूण

२० जुलै

(एक पत्र)–आशीर्वाद, तुमचीं पत्रें मिळालीं. तुम्ही नाहीं आला हें बरें केलें. वाटेंत फार त्रास झाला असता. मला जें तुम्हांस समाधान द्यावयाचें तें याच्यामध्यें नाहीं हें लक्षांत ठेवून वागावें. रामापायीं ठेवावें मन । त्यासी कर्तव्य नाहीं उरलें जाण ।। देहभोग आजवरी नाहीं सुटला कोणाला । त्याचा त्रास मात्र नाहीं रामभक्ताला ।। तुम्हांला आतां करण्याचेच नाहीं कांहीं । भाव ठेवा रामापायीं ।। नामांतच राहे समाधान । ही सद्‌गुरूची आहे खूण ।। रामास जावें अनन्य शरण । कृपा करील तो दयाघन ।। देह सोडावा प्रारब्धावर । ज्या ज्या वेळीं जें जें होईल तो मानावा आनंद ।। दृश्यातें नाहीं मानूं सत्य । रामरूपीं ठेवावें चित्त ।। विषयासी नाहीं देऊं थारा । दया येईल रघुवीरा ॥ नाहीं देवाजवळ मागूं दुजें जाण । तुमचे नामीं लागो मन ।। ऐसें प्रार्थिता जो झाला । राम कृपा करील त्याला ।। तात्यानें दुसरें नाहीं केलें कांहीं । सेवेला देह अर्पण केला पायीं ।। याहून दुसरे करण्याचें काय आतां । भगवंत जोडेल तत्त्वता ।। नाहीं भंगूं द्यावें समाधान । रामापायीं ठेवावें मन ।। लोभ्याच्या मनांत जसें वित्त । तसें साधकाचे नामांत चित्त ।। एवढें ज्यानें केलें काम । त्याला नाहीं रामाचा वियोग ॥ पाण्यावांचून जसा मासा तळमळतो । तसे नामाशिवाय व्हावें मन ॥ एक मानावी आज्ञा प्रमाण । नाहीं याहून दुसरें साधन जाण ।। साधनाच्या आटाआटी । नाहीं देह करूं कष्टी ॥ रामापायीं ठेवा मन । नाम घ्यावें रात्रंदिन ।। रामावांचून नाहीं कोणी सखा । त्याला नाहीं कोठें धोका ।। नामाचें चिंतन, भगवंताचें ध्यान, गुरुआज्ञा प्रमाण । तीच गुरुपुत्राची आहे खूण ।। नाहीं यावांचून दुसरें स्थान । जिथें राहे समाधान ।। रामापायीं व्हावें लीन । याहून नाहीं दुसरें लिहिणें जाण ।। आतां याहून दुजें नाहीं करणें कांहीं । असा भाव ज्यानें ठेविला हृदयीं । त्याला राम नाहीं राहिला दूर ॥ नामाविण न मानावें हित । त्यानेंच जोडेल भगवंत ।। नामाविण मला नाहीं पाहूं कोठें । नामांतच मी भेटे असें जाणावें ॥ नाहीं करूं देहाचा कंटाळा । राम ठेवील त्यांत रहावें सदा । जें जें होतील देहाचे हाल । तें तें परमात्म्यापासून आले असे जाणावे ।। नाहीं करूं काळजीला । मी नाहीं सोडलें तुम्हाला ।।

---

२०२. रामापायीं ठेवा मन । नाम घ्यावें रात्रंदिन ।।

# वेदांना जें परमात्मस्वरूप अगोचर आहे तें स्वरूप तद्रूपत्वानें संत जाणतात

२१ जुलै

शास्त्रामध्यें असें सांगून ठेवलें आहे कीं, कृतयुगामध्यें ध्यानानें, त्रेतायुगामध्यें हवनानें, आणि द्वापारयुगामध्यें देवतार्चनानें भगवंताची प्राप्ती होते. परंतु कलियुगामध्यें त्यांपैकीं काहींच साध्य होणें शक्य नसल्यानें, भगवंताचें केवळ नाम घेतलें असतां मनुष्याला त्याचें दर्शन घडतें. शास्त्राच्या या सिद्धांताचा संतांनीं स्वतः अनुभव घेतला आणि लोकांना सांगितलें कीं, साडेतीन कोटी जप केला असतां चित्तशुद्धि होते। आणि तेरा कोटी जप केला असतां भगवंताचें दर्शन होतें. एकवेळ मला आपण महत्त्व देऊं नका, पण ज्या थोर संतांच्या नांवावर मी नामाविषयीं सांगतों, ते ज्ञानेश्वरमहाराज, एकनाथमहाराज, तुकाराममहाराज आणि समर्थ रामदासस्वामी यांच्यासारखे संत कधीं वेदबाह्य बोलतील हें शक्यच नाहीं. वेदांना जें परमात्मस्वरूप अगोचर आहे तें स्वरूप तद्रूपत्वानें संत जाणतात. नामाविषयीं श्रुतिप्रमाण पाहिजे असेल तर अथर्वणवेदान्तर्गत कलिसंतरणोपनिषद् पाहावें. ( त्यांत पुढील मंत्र आहेत :- सर्वश्रुतिरहस्यगोप्यं तत् श्रृणु । येन कलिसंसारं तरिष्यसि । भगवदादि पुरुषस्य नारायणस्य नामोच्चारणमात्रेण निर्धूतकलिर्भवति । नातःपरतरोपायः सर्ववेदेषु दृश्यते । नास्य विधिः । सर्वदा शुचिः अशुचिः वा पठन् को ऽपि सायुज्यतामेति । यदा सार्ध - त्रिकोटीर्जपति तदा पूतो भवति । सद्यो मुच्युते ।। ) वेद भगवंताचें वर्णन करतात. नामदेखील भगवंताचेंच वर्णन - अस्तित्व - प्रकट करतें. **प्रत्येक वेदमंत्राच्या आरंभीं " हरिः " ॐ असतें. तें नामच आहे. जसा वेद हा अनादि तसें नाम हेंहि अनादि. जसा वेद हा अपौरुषेय तसें नाम हेंहि अपौरुषेय. जसा वेद हा अनंत तसें नाम हेंहि अनंत आहे.** प्रत्यक्ष शिवानें नाम घेतलें म्हणून तें अनादि साधन आहे. इतर साधनांना आणि वैदिक कर्मांना आहारविहाराचीं बंधनें आहेत. भगवंताच्या नामाला तीं नाहींत. नाम हें आगंतुक नाहीं. आदिनारायणानें वेद सांगण्याच्या वेळीं जो ॐ चा ध्वनि केला तेंच नाम होय. म्हणून सर्वांना माझी विनंती आहे कीं, आपण नाम घेत जावें. **किंबहुना आपण नाम घेतलें तरच वेदांचा खरा अर्थ आपल्याला कळेल अशी माझी खात्री आहे.**

आपण नाम घेणाऱ्या लोकांनीं शास्त्राच्या विरुद्ध वर्तन करूं नये. आपलें लक्ष भगवंताकडे ठेवलें तर क्षुल्लक वाद करायला वेळ सांपडणार नाहीं. वेद म्हणजे भगवंताची स्तुति होय. ती करीत असतांना आपलें लक्ष शब्दांकडे नसावें, त्यांच्या अर्थाकडे असावें; अर्थ न समजला तरी भगवंताकडे असावें. आपण तेवढेंच बरोबर विसरतों म्हणून तंटे उत्पन्न होतात. शहाण्या माणसानें असें न करावें. भगवंताला लबाडी खपत नाहीं. आपलें मन स्वच्छ नसेल तर भगवंत हात आखडता घेतो, पण खरी अनन्यता असेल तर पोटभर पुरवितो. इतक्या तन्मयतेनें नाम घ्या कीं, " मी नाम घेतों आहें " हें सुद्धां विसरून जा.

---

२०३. इतर साधनांनीं लवकर साधल्यासारखें वाटेल, पण तें तात्पुरतें असतें. नामानें थोडा उशीर लागेल, पण जें साधेल तें कायमचें साधेल, कारण नामानें मुळापासून सुधारणा होते.

# गुरु आपल्याला अंतिम सुख दाखवितात

२२ जुलै

एक पाचसहा वर्षांचा मुलगा एका विहिरीजवळ उभा होता. त्याची एक वस्तु आत पडली होती. ती काढण्याकरितां 'मी आत उडी मारतों' असें तो म्हणूं लागला. त्यावर एक मनुष्य तिथें होता तो म्हणाला, 'तूं असें करूं नकोस, आंत पडून बुडून जाशील.' तरी पण तो ऐकेना. एवढ्यांत त्याचा बाप तिथें आला. त्यानेंहि मुलाला पुष्कळ सांगून पाहिलें, पण तो ऐकेना. मग त्या मुलाला बापानें धाक दाखवून आणि मार देऊन घरांत नेलें. आतां मुलाला मारलें म्हणून तुम्ही बापाला दोष द्याल का ? एकुलता एक मुलगा, नवस करून झालेला, 'त्याला जाऊं दिलें असतें; तर काय झालें असतें ?' असें म्हणाल का ! नाहीं ना ! तर मग गुरु तरी काय करीत असतात ? आपण विषय मागत असतो आणि ते दिले तर आपण त्यांत बुडून मरूं हें त्याला माहीत असतें, म्हणूनच तो आपल्याला त्यांतून वाचविण्यासाठी चार गोष्टी सांगून पाहतो. आपण तेंहि न ऐकलें तर तो आपत्ति वगैरे आणून धाक दाखवितो, आपण त्याबद्दल रडत असलों तरी तो आपल्याला त्यांतून वर ओढीतच असतो. आपण तर चांगले शिकले सवरलेले असतो, त्या मुलाप्रमाणें अज्ञान नसून चांगले वयस्क असतो; तरीसुद्धां आपल्याला विषयांत उडी घ्यावीशी वाटते. गुरूनें सांगितलें लग्न करूं नकोस, तर आपण लग्न कधीं होईल म्हणून त्याच्या पाठीस लागत असतो; आणि शेवटीं तर गुरूला समजतच नाहीं असें म्हणण्यापर्यंत आपली मजल जाते ! आपण सध्यां दिसतें तेंच सुख खरें असें मानीत असतो. पण अंतिम सुख काय हें गुरूला कळत असतें. म्हणून तो सध्यां दिसणाऱ्या सुखापासून आपल्याला परावृत्त करीत असतो. तेव्हां आपण गुरुवचनावर विश्वास ठेवू , त्याच्या आज्ञेप्रमाणें वागणें हेंच श्रेयस्कर आहे; आणि तो जें साधन सांगेल तेंच करीत राहावें म्हणजे आपल्याला अंतिम सुखाचा लाभ होईल. संत आज्ञा करतो म्हणजे काय करतो ? तर आपलें मन जिथें गुंतलें असेल तिथून त्याला काढण्याचा तो प्रयत्न करतो. जसें आपलें मन पैशांत अडकलें असेल तर तो आपल्याला मातीशीं खेळायला सांगेल माती आणि पैसा सारखा वाटेपर्यंत तो आपल्याला तेंच सांगेल. भगवंत भक्ताचीं संकटें नाहींशीं करतो म्हणजे त्याची प्रापंचिक संकटें दूर करतो असें नाहीं. तीं काय सहज दूर करतां येतात; पण भक्ताला समाधानांत ठेवून संकटें सहन करण्याची शक्ति भगवंत देतो. भक्ताला तो नेहमीं स्मरणांत ठेवतो. असे भक्तच संतपदाला पोंचतात. एखाद्या विद्वान् माणसाची विद्वत्ता ओळखायला आपण थोडें तरी विद्वान् झालें पाहिजे, त्याचप्रमाणें संत ओळखायला संतांच्या ठिकाणीं असणारा गुण थोडा तरी आपल्या ठिकाणीं असला पाहिजे. संतांचा मुख्य गुण म्हणजे ते भक्तीला चिकटलेले असतात. सत्पुरुषाचे बाहेरून वागण्याचे प्रकार त्या त्या देशकालमानानें निरनिराळे असतात, पण आंतलें भगवंताचें प्रेम मात्र सर्वांचें एकच असलें पाहिजे. हजारों लोक भगवंताच्या नामाला लावणें हेंच खरें संतांचें काम होय.

२०४. आयुर्वेदानें रोग मुळापासून जातो, पण त्याला वेळ लागतो. तसें नामानें वेळ लागेल, पण सर्व भवरोग मुळापासून जाईल.

# गुरुआज्ञेवर अत्यंत श्रद्धा ही मोठी भाग्याची गोष्ट आहे

२३ जुलै

गुरुआज्ञेप्रमाणें वागणाऱ्याला कधींहि नड येत नाहीं. राजाच्या राणीला दुपारीं जेवायला कसें मिळेल याची काळजी नसते, तसें गुरूचा आधार आपल्याला आहे असें ठाम समजणाऱ्याला कसली नड असणार ? लांब उडी घेण्यापूर्वी चार पावलें मागें जावें लागतें, परिसापाशीं सोनें व्हायला त्याचें लोखंड व्हावें लागतें. **तसें गुरूचा पाठीराखेपणा असून जी आपल्याला अधोगतीशी वाटते, ती पुढच्या महत्कार्याची पूर्वतयारीच होय.** बाप मुलाला हातावर घेऊन पोहायला शिकवीत असतांना मधून मधून जसें हात काढून घेतो, पण मुलाची खात्री असते कीं हा आपल्याला बुडूं देणार नाहीं, तसें आपल्याला सद्‌गुरूचा आधार आहे अशी आपण पक्की खात्री बाळगावी. आपण आजारी पडलों तर आपणच पैसे देऊन डॉक्टरवर विश्वास, श्रद्धा ठेवतों; औषधाची कांहीं माहिती नसतांना तें आपण घेतों. व्यवहारात जर असें आहे, तर मग ' श्रद्धा उत्पन्न झाल्याशिवाय आपण नाम घेणार नाहीं ' असें म्हणणें बरोबर नाहीं. डॉक्टरवर आपण विश्वास ठेवतों याचें कारण असें कीं, आपल्याला जगायची इच्छा आहे; तसें भगवंताच्या प्राप्तीची तळमळ असेल तर मनुष्य त्याचें नाम घेतल्याशिवाय राहाणार नाहीं. **आधीं श्रद्धा, मग कृति, आणि नंतर कृतीच्या फलाचा अनुभव, असा व्यवहाराचा नियम आहे.** परमार्थामध्यें आपण त्याच मार्गानें जावें. आगगाडींत ड्रायव्हरवर विश्वास ठेवून आपण स्वस्थ झोंप घेतों, त्याचप्रमाणें भगवंतावर श्रद्धा ठेवून काळजी न करतां आपण स्वस्थ राहावें. ड्रायव्हरपेक्षां भगवंत नक्कीच श्रेष्ठ आहे. **परमार्थांत अंधश्रद्धेची मुळींच गरज नाहीं, पण तिथें श्रद्धेशिवाय मात्र मुळींच चालायचें नाहीं.** सांगणारा कसाहि असला तरी ऐकणाऱ्याची जर खरी श्रद्धा असेल तर त्या श्रद्धेनेंच त्याच्या अंगीं पात्रता येईल संताच्या सांगण्यावर पूर्ण श्रद्धा ठेवावी. खरें म्हणजे अशी अंधश्रद्धा ज्याला लाभली तो लवकर सुखी झाला, अशी श्रद्धा असणें ही फार भाग्याची गोष्ट आहे. आज आपल्यापाशीं ती नाहीं तर निदान आपण स्वतःशीं प्रामाणिक बनूं या. आधीं पुष्कळ चिकित्सा करून आपलें ध्येय ठरवावें पण एकदा तें ठरलें कीं मग निश्चयानें आणि श्रद्धेनें त्याच्या साधनांत राहावें. व्यवहारांत तुम्ही एकमेकांवर जेवढी निष्ठा ठेवतां तेवढी जरी भगवंतावर ठेवलीत तरी भगवंत तुम्हाला खात्रीनें समाधान देईल.

तपश्चर्येचें सर्वांत शेवटचें फळ कांहीं असेल तर परमेश्वराच्या ठिकाणीं अनन्यभावें शरण जाण्याची बुद्धि होय. ती बुद्धि आपल्याला झाली पाहिजे. एकदा शरण गेल्यावर आपण उरूंच शकत नाहीं; त्यालाच शरणागति म्हणतात, आणि हीच परमार्थांतली अत्यंत श्रेष्ठ गति आहे.

---

२०५. " मी ब्रह्म आहे " या अनुभवांतसुद्धां मी पण आहे. नाम त्याच्याहि पलीकडे आहे.

# गुरुपद हें देवाच्या अधिष्ठानाशिवाय येतच नाहीं

२४ जुलै

प्रत्येकजण पोटाला खायला मिळावें म्हणून खटपट करीत असतो. परंतु आपल्या इच्छेप्रमाणें आपल्याला मिळतें का ? नाहीं. म्हणून सांगायचें कारण असें कीं, जर आपण विषयांकरितां इतके झटतों, तर देवाच्या प्राप्तीकरतां श्रम करायला नकोत का ? संत सांगतात तो मार्ग चोखाळून पाहावा. एकदां ठाम विचार करून आपण ज्याला गुरु कल्पिला तो सांगेल तेंच साधन मानावें. गुरु देहांतच असावा हें मानणें चूक आहे. गुरु हे देहांत कधींच नसतात. गुरु कसाहि असला तरी तो प्रत्यक्ष देवच आहे अशी भावना ठेवून वागलें पाहिजे. अशी भावना ठेवून वागलें म्हणजे गुरु कसाहि असला तरी तिथें प्रत्यक्ष देवाला येणें भाग पडतें. म्हणूनच गुरुपद हें देवाच्या अधिष्ठानाशिवाय येतच नाहीं. गुरु सांगेल तसें आपण नेहमीं साधन करीत राहावें, तसें साधन करीत राहिलें म्हणजे आपल्याला तिथेंच देवाची प्राप्ती होते. गुरु नामाशिवाय दुसरें काय सांगणार ? त्यांतच आपण सदा राहावें. जो खरा साधनांत राहतो त्याला ह्या सर्व गोष्टी आपोआपच साधत असतात. म्हणून आपण गुरूला अनन्य शरण जाऊन, तोच सर्व करतों आहे हें मानून, जें होईल त्यांत आनंद मानीत जावा. भगवंताबद्दल जिज्ञासा उत्पन्न होणें ही खरी भाग्याची गोष्ट आहे. असा जिज्ञासू शिष्य भेटला तर संतालादेखील आपलें स्वतःचें सार्थक झालें असें वाटतें. श्रीरामचंद्राची जिज्ञासू अवस्था पाहून वसिष्ठांना फार आनंद वाटला, आणि तें साहजिकच आहे. संतांनीं एकच देव, एकच साधन, आणि एकच गुरु मानला; त्याचप्रमाणें आपण एका नामांत राहण्याचा प्रयत्न करावा. मुलगा हंसतखेळत असतां बाप त्याला घेतो, पण रडूं लागला कीं खालीं ठेवतो; याच्या उलट मुलगा रडत असला तर आई त्याला घेते; हाच देवामध्यें आणि संतामध्यें फरक आहे.

बर्फामधलें पाणी काढलें तर कांहींच उरत नाहीं; त्याप्रमाणें संतांमधलें भगवंताचें प्रेम जर काढून टाकलें तर त्यांच्यामध्यें मग कांहीं उरतच नाहीं. साधन करण्याचे कष्ट न होतां वस्तु साध्य करून घेण्याचा मार्ग म्हणजे सत्संगति हा होय. आपल्या मनावर संगतीचा फार परिणाम होतो. नुसता हेतु काम करीत नसून संगत काम करीत असते. संगत दोन प्रकारची आहे; घातक आणि उत्तम. विषयी माणसाची संगत ही घातक होय, आणि सत्संगत ही उत्तम होय. सत्संगतीमध्यें असतांना आपल्या ठिकाणीं दोष आहे असें ज्याला कळेल तो लवकर सुधारेल. आपण ज्या सत्पुरुषाकडे जातों त्यानें सांगितलेलें मनापासून आचरणामध्यें आणण्याचा प्रयत्न केला तरच त्याच्याशीं खरी संगत केली असें म्हणावें. संताची प्रचीति पाहणें म्हणजे आपलें प्रपंचांतलें काम मनासारखें होणें हें नव्हे. ज्या घटकेला आपलें चित्त शुद्ध होतें त्या घटकेला संताची खरी प्रचीति आली असें समजावें.

२०६. संतांना ओळखण्यासाठीं अनुसंधानाशिवाय दुसरें साधन नाहीं.

# "वाटेल तें झालें तरी भगवंताचें नाम सोडूं नका" हेंच मी रात्रंदिवस सांगतों

२५ जुलै

संकल्प ही फार मोठी शक्ति आहे. इच्छा जर खरोखर अतिप्रबल झाली तर ती वस्तूला आपल्याकडे खेंचून घेतल्याशिवाय राहणार नाहीं. परंतु प्रापंचिक वस्तु आपण कितीहि मिळविल्या तरी त्या स्वभावतःच अपूर्ण असल्यामुळें त्यांच्या प्राप्तीपासून पूर्ण समाधान होत नाहीं. याच्या उलट, भगवंताच्या प्राप्तीसाठीं प्रबल इच्छा धारण केली तर भगवंत भेटतो, आणि तो स्वतः पूर्ण असल्यामुळें आपल्या वासनांची पूर्ण तृप्ति होऊन त्या क्षीण बनतात, आणि नंतर आपोआप नाहींशा होतात; म्हणून नेहमीं "भगवंत मला हवा" अशी इच्छा करीत जावें. त्याचें नाम घेणें म्हणजे "तूं मला हवा आहेस," असें म्हणणेंच होय **खऱ्या प्रेमानें जर आपण आपला भार रामावर टाकला तर तो नेहमीं आपल्या कल्पनेच्या बाहेर गोष्टी घडवून आणतो असा माझा अनुभव आहे.** आपला देह आणि प्रपंच भगवंताच्या सत्तेनें चालतो ही जाणीव सतत ठेवून जगांत वागावें म्हणजे आपल्याला कधीं कमी पडणार नाहीं. सरकार जेव्हां राज्य करतें तेव्हां सरकारांचा सरकार जो भगवंत त्याला विसरतें, म्हणून सरकारचें चित्त अस्वस्थ असतें. सरकारनें वैराग्याच्या विरक्त वृत्तीनें वागलें पाहिजे. दारूच्या धुंदींत असलेला भिकारी स्वतःलाच राजा समजतो, पण प्रत्यक्ष गटारांत लोळत असतो. असें आपलें होतां कामा नये. पाप ही एक प्रकारची आगच आहे, आणि त्यांतहि राजे लोकांचें पाप म्हणजे मोठीच आग असते; कारण ज्याच्या हातीं सत्ता अधिक त्याचें पापदेखील मोठया प्रमाणावरच घडतें. या पापांचा तुम्हांला खराखरा कंटाळा आला असेल तर, वाटेल तो प्रसंग आला तरी तें पाप पुनः आम्हीं करणार नाहीं असें मला वचन द्या. मी तुमचें मागलें सर्व पाप घेतो. रात्रंदिवस माझ्या माणसांना मी हेंच सांगत असतो कीं, वाटेल तें झालें तरी भगवंताचें नाम सोडूं नका. नामानें चित्त आराम पावतें यांत कांहीं शंकाच नाहीं. काय पाहतां श्रेष्ठ जन । काळ आला हो कठीण ।। नका भुलूं भलत्या भ्रमीं । नाम जपा अंतर्यामीं । भूल पडली कलिमाजीं । असत्याला जन राजी ॥ करा असत्याचा कंटाळा । नाम जपा वेळोवेळीं ॥ जेथें तेथें बुद्धिभेद । मिथ्या म्हणती शास्त्र वेद ॥ नाम सांगतां जनांसी । विष देऊं येती त्यांसी ।। दास म्हणे काळगती । पाहा युगाची प्रचीति ।।

भगवंत खरोखरच मनापासून ज्याला हवा आहे त्याचें काम झालेंच पाहिजे. आपल्याला जगांतला मान, लौकिक, पैसा, विषय इत्यादि कांहीं नको असें वाटतें का ! तसें नसेल तर 'भगवंत मला हवा आहे' असें नुसतें तोंडानें म्हणणें बरोबर नाहीं. ज्याला भगवंताचें प्रेम जोडायचें असेल त्यानें जगाचा नाद सोडायला पाहिजे. जगाच्या मागें लागाल तर आपलें साधन ठार बुडवून बसाल. खरोखर तुम्हीं सतत भगवंताचें नाम घ्यावें आणि मनापासून भगवंताला आळवावें. तुम्हीं कितीहि पतित असला तरी पावन होऊन जाल हा माझा तुम्हांला आशीर्वाद आहे.

२०७. नामाच्या आनंदाचा झटका आला कीं मनुष्य स्वतःला विसरेल आणि जगालासुद्धा विसरेल.

# " नाम घेणाऱ्याचें राम कल्याण करतो " हें माझें सांगणें शेवटपर्यंत विसरूं नका

२१ जुलै

कोणतीहि इमारत बांधीत असतांना अगोदर तिचा पाया जसा घालावा लागतो, त्याप्रमाणें परमार्थ साधण्यासाठीं अगोदर साधनांचा पाया घालावा लागतो. शास्त्रानें चार प्रकारचें साधन सांगितलें आहे. प्रथम नित्यनित्यवस्तुविवेक करावा. अनित्य जो विषय त्याच्या बाबतींत आपण उदास व्हावें आणि नित्य जो भगवंत त्याच्याकडे लक्ष द्यावें नंतर या जगातल्या किंवा स्वर्गांतील भोगांची वासना नाहींशी करावी. हें दुसरें साधन होय. आपलें मन बाह्य विषयांकडे धाव घेतें, तिथून त्याला खेचून आणावें आणि भगवंताकडे लावावें. आपण चूक केली नसतांहि कोणी जाच केला तरी शांतपणें सहन करावें. गुरूच्या सांगण्यावर विश्वास ठेवावा. हर्षविषाद न मानतां संतोषानें राहावें. हें तिसरें साधन होय. शेवटीं, भगवंताच्या भेटीची किंवा सद्‌गुरूंच्या भेटीची खरी तळमळ लागावी. ही सर्व साधनसामग्री असेल तरच साधकाला ब्रह्मदर्शन घडेल. ब्रह्मदर्शन होण्यासाठीं कडकडीत वैराग्य असावें लागतें. पैशाचा लोभ पूर्णपणें गेला पाहिजे. मनामधलीं कामवासना पूर्णपणें गेली पाहिजे. मोहाला बळी पडतां कामा नये. नुसता प्रपंच चांगला करणें हें काहीं मनुष्यजन्माचें ध्येय नव्हे. जनावरेंदेखील आपपला प्रपंच करतात. मनुष्यानें भगवंताची उपासना करून त्याची प्राप्ति करून घेतली पाहिजे; तरच प्रपंचातल्या कष्टाचें सार्थक होतें. सध्याच्या परिस्थितीमध्यें उपासना करायला नामासारखा सोपा उपाय नाहीं, म्हणून हा इतका खटाटोप मी करून दाखवितों. प्रत्येकानें नाम घ्यावें ही माझी इच्छा आहे. रामरायानें माझी इच्छा पूर्ण केली. खरोखर भगवंताच्या नामामध्यें फार मोठें सामर्थ्य साठविलेलें आहे. त्याचें नाव घेऊन जो जगांत वावरेल त्याला व्यवहारामध्यें नेहमींच यश येईल असें नाहीं, परंतु भगवंत त्याची लाज राखील यांत शंका नाहीं. प्रपंचांतलें यश आणि अपयश या तात्पुरत्या गोष्टी आहेत. भगवंताच्या अनुसंधानाला खरें महत्त्व आहे. रामाच्या इच्छेनेंच आपल्याला सुखदुःख भोगावें लागतें, पण हें आपल्याला सर्वांच्या शेवटीं आठवतें म्हणून सुखदुःख बाधतें; म्हणून आपण सुरुवातीपासूनच रामाची इच्छा लक्षांत ठेवून वागूं, यासाठीं त्याच्या नामाची गरज आहे. प्रपंचाची तऱ्हा अशी असते कीं, आज सुख झालें म्हणून जरा बरें वाटलें कीं लगेच उद्यां दुःखाचें ताट पुढें वाढून ठेवलेलें असतें, म्हणून एका डोळ्यांत सुखाचे अश्रु तर दुसऱ्या डोळ्यांत दुःखाचे अश्रु ठेवून माणसानें प्रपंचांत वागावें प्रत्येक गोष्ट भगवंताच्या इच्छेनेंच जर घडते तर एकीचें सुख आणि दुसरीचें दुःख कां मानावें ! शहाण्या माणसानें आपलें चित्त भगवंताच्या नामांत गुंतवून ठेवावें, आणि बरावाईट जसा प्रसंग येईल त्यांत सामील होऊन जावें. जो नाम घेईल त्याच्या मागें राम उभा आहे. नाम घेणाऱ्याचें राम कल्याण करतो, एवढें माझें सांगणें शेवटपर्यंत विसरूं नका.

---

२०८. " भगवंताच्या नामाशिवाय मला कांहीं कळत नाहीं " असें ज्याला कळलें त्याला सर्व कळलें.

# भगवंताच्या नामामध्यें जीवाचें कल्याण आहे असा माझा अनुभव आहे

२७ जुलै

आपल्या जीवनामधली प्रत्येक क्रिया ही रामाच्याकरितां व्हावी, आपलें जगणेंदेखील त्याच्या सेवेसाठीं असावें; किंबहुना लहान मुलाला जशी आई, मोठया मुलाला जसा बाप, बाईला जसा प्रेमळ नवरा, मुनीमाला जसा सज्जन मालक, नोकराला जसा त्याचा स्वामी, एखाद्याला जसा विश्वासू मित्र, तसा रामराया प्रत्येकाला वाटला पाहिजे. म्हणून प्रत्येकानें गोंदवल्यास यावें. भगवंताच्या अस्तित्वाची खरी जाणीव होऊन त्याच्या अनुसंधानामध्यें जीवनाचा प्रत्येक क्षण कसा घालवावा हें सगुणोपासनेशिवाय सामान्य स्त्री-पुरुषाला समजणें अशक्य आहे. जगांत घडून येणाऱ्या प्रत्येक गोष्टीमध्यें रामरायाची इच्छा काम करीत असल्याचें आपण जाणलें पाहिजे; इतकेंच नव्हे, तर व्यवहारदृष्टया आपण योग्य प्रयत्न केल्या-नंतर जें चांगलें-वाईट फळ मिळेल तें रामाच्या इच्छेनेंच मिळत असतें अशी श्रद्धा ठेवावी. अशी श्रद्धा ज्याच्यापाशीं असते त्याला सुखदुःखाची बाधा होत नाहीं. सर्व कांहीं राम करतो, खरें कर्तेपण रामाचें, हें नीट लक्षांत आणून भगवंताकडे कर्तृत्व द्यावें आणि आपण मीपणानें नाहींसें व्हावें. खरोखर आपल्या रामाला काय कमी आहे ? आपण मागावें फक्त एका रामाजवळ ! तो देईल अथवा न देईल. जें देईल त्यांत समाधान मानावें. दुसऱ्या कोणाच्याहि जवळ आपण कधीं मागूं नये; त्यामध्यें आपल्या उपासनेला कमीपणा आहे. मात्र देणाऱ्यानें स्वखुशीनें दिलें तर तें टाकूं नये. जें मी सहसा कोणाला सांगत नाहीं तें तुम्हांला सांगतों.

माझ्या आयुष्यांत मी नामाशिवाय दुसरें साधन केलें नाहीं. माझ्या गुरूंनीं मला नामच दिलें, तेंच नाम मी सर्वांना देत आहें. तुम्हीं तें नाम घ्या; तुम्हांला राम खात्रीनें भेटेल. तोंडानें नेहमीं "राम राम" म्हणत जा. भगवंताच्या नामामध्यें जीवाचें कल्याण आहे असा माझा अनुभव आहे. म्हणून तें जास्तींत जास्त स्त्री-पुरुषांनी घ्यावें. कोणत्याहि कार्याच्या पाठीमागें भगवंताच्या उपासनेचें बळ ठेवा. गाईचें रक्षण आणि त्यांची सेवा इतर कशासाठीं नसावी, फक्त भगवंतासाठी असावी. आपण जें कांहीं करीत आहोंत तें सर्व भगवंतासाठीं करीत आहों ही जाणीव राहण्यासाठी त्यांचें नाम सतत घेत असावें. ज्या वेळी समाजांतली पुष्कळ माणसें अमर्याद विषयासक्त बनतात त्या वेळीं कलियुग सुरू झालें असें समजावें. सज्जनांची बुद्धि भ्रष्ट होऊन ते देखील विषयाधीन बनतात. विषयाची प्राप्ति करून घेण्यासाठीं वाटेल तें कृत्य करण्याची त्यांची तयारी असते. अशा वेळीं भगवंताच्या नामाचें माहात्म्य जो सांगतो त्याच्यावर कठीण प्रसंग यायचेच. पण परमात्मा सांभाळतो अशा निष्ठेनें जो राहील तो प्रत्येक संकटांतून सहीसलामत पार पडेल यांत शंका नाहीं; म्हणून प्रत्येकानें नामाला चिकटून असावें. जगाचा नाद सोडा आणि भगवंताचें प्रेम जोडा. आतां रामावांचून न आणावा विचार । कृपा करील रघुवीर ।।

---

**२०९. आपण नाम सोडणार नाही हें नक्की ठरवलें कीं, आपली वृत्ति निःशंक होतेच होते.**

# "नामामध्यें जे स्वतःला विसरले त्यांनाच खरा मी कळलों"

२८ जुलै

गूढ शोधून काढण्याकडे मनुष्याची नेहमीं प्रवृत्ति असते. कोंकणामध्यें पाण्याचे झरे आढळतात. ते कोठून येतात हें कळत नाहीं, म्हणजे, केवळ दृश्यामध्यें असणाऱ्या गोष्टींचेंदेखील मूळ आपल्याला उकलत नाहीं. मग जें अदृश्यच आहे त्याचें मूळ आपल्याला कसें कळणार ? मी बोलतों कसा, माझें मन कुठून येतें, हें देहबुद्धींत राहणाऱ्यांना कळणें कठीण आहे. तुम्हांला न रुचणाऱ्या गोष्टी मला सांगाव्या लागतात, म्हणून त्या मी अगदीं सोप्या शब्दांत सांगतो. पण जें खरें आहे तें अशा रीतीनें सांगणारा तुम्हांला क्वचितच भेटेल. स्वतःच्या प्रपंचाचें कल्याण करून घेण्यासाठीं तुम्ही माझ्याकडे येतां, पण कोळसा जितका जास्त उगाळावा तितका तो काळाच होत जातो, त्याप्रमाणें प्रपंचामध्यें कसेंहि केलें तरी दुःखच पदरांत पडतें. माझ्या मनांत जें आहे तें स्पष्ट बोलल्यावांचून मी कधीं राहिलों नाहीं. बाप आपल्या मुलांवर जितकें प्रेम करतो तितकें प्रेम मीं अनेक लोकांवर केलें. फार थोड्या लोकांनीं मला ओळखलें. नामामध्यें जे स्वतःला विसरले त्यांनाच खरा मी कळलो. मी तुमच्याकडे येतो. पण मला येण्यासाठीं तुम्हीं वाट मोकळी ठेवीत नाहीं. मी येण्यासाठीं तुम्ही वाट मोकळीं करा; म्हणजे, तुम्ही सतत नामस्मरणांत राहा. मी कधींच कोणाबद्दल निराश होत नाहीं. जो मनुष्य म्हणून जन्माला आला त्याचा उद्धार होणारच. मला रामावांचून दुसरें जिवलग कोणी नाहीं. देहाच्या भोगांना मी कधीं कंटाळलों नाहीं. तुम्ही भगवंताचें नाम घ्यावें यापलीकडे, सत्य सांगतों, मला दुसरी कसलीहि अपेक्षा नाहीं. जीवनामध्यें तुम्ही घाबरूं नका, धीर सोडूं नका, आणि घ्यायचें झालें तर नामच घ्या. जर तुम्हांला कोणीं विचारलें, "का हो, तुम्ही कांहींच साधन करीत नाहीं ?" तर त्यांना म्हणावें, " मला माहीत नाहीं, तुम्ही माझ्या गुरूंना विचारा. " माझा नियम असा आहे कीं, परमार्थाची एकाहे गोष्ट अशी असतां कामा नये कीं जी व्यवहाराच्या आड येईल. माझ्या गांवीं पैसा पिकत नाहीं, पण भक्ति मात्र खास पिकते. उद्धवानें श्रीकृष्णाचा निरोप जसा गोपींना सांगितला तसा मी संतांचा निरोप तुम्हांला सांगतों. तो निरोप मात्र मी बरोबर सांगतो. **ज्याच्याजवळ भगवंताचें नाम आहे. त्याच्या मागें-पुढें मी उभा आहे. मी तुमच्याजवळ आहेच. तो कसा आहे याचा विचार तुम्ही करूं नका. तुम्ही नुसतें नाम घ्या, बाकीचें सर्व मी करतों.** शुद्धीमध्यें नाम घेण्याची जबाबदारी तुमची आहे, मग झोंपेंत आणि बेशुद्धींत नाम घेण्याची जबाबदारी माझी आहे। ती मी सांभाळीन.

**२१०. दृश्यामध्यें असणारी भगवंताची खूण म्हणजेच नाम होय, "हेंच माझें सर्वस्व आहे" असें नामांत प्रेम असावें.**

# " माझ्याकडे येणाऱ्या माणसांना माहेरीं आल्यासारखे वाटलें पाहिजे "

२९ जुलै

पुष्कळ मंडळीं यावींत, आलेल्याला खायला घालावें, आणि भगवंताचे नाम घ्यावें, या तीन गोष्टी मला फार आवडतात. त्या जो करील त्याच्या हयातींत त्याला कधींहि कमी पडणार नाहीं. माझ्या माणसानें प्रपंचांत हेळसांड केलेली मला आवडायची नाहीं. उलट, इतरांच्यापेक्षा त्याने जास्त दक्षता दाखवली पाहिजे. कमी आहे त्याची काळजी न करता, जास्त असेल तर त्याविषयीं ममत्व न ठेवता, जो येईल तसा खर्च करतो, तो मनुष्य तें सर्व मला देतो. मला विकत श्राद्ध घ्यायची संवय आहे. मला स्वतःचा प्रपंच करता आला नाहीं; पण दुसऱ्याचा मात्र चांगला करतां येतो. माझ्याजवळ एकहि पैसा नव्हता आणि खाणारीं माणसे पुष्कळ होतीं; पण मी कधींहि काळजी केली नाहीं. मीं आजपर्यंत पैशासाठीं कोणापुढें जीभ विटाळली नाहीं. उद्यां जर कोणी एक लाख रुपये माझ्या नकळत माझ्या उशाशीं आणून ठेवले, तर मी ते विष्ठेसारखे बाजूला सारीन आणि स्वतःच्या श्रमानें चार आणे मिळवून पोट भरीन. मला आवडतें कीं एक लंगोटी घालावी, मारुतीच्या देवळांत राहावें, भिक्षा मागावी, आणि अखंड नाम घ्यावें. हें करायला कोण तयार आहे ! मीं आपला नामाचा हट्ट कधीं सोडला नाहीं. मी जरी जास्त गरिबांचाच आहें तरी मला प्रपंचांत कधीं दैन्यपणा आवडत नाहीं. दुसऱ्याकरतां निःस्वार्थीपणानें भीक मागण्याची मला कधींच लाज वाटली नाहीं. व्यवहारदृष्ट्या माझ्यामध्यें एकच दोष आहे कीं, मला कुणाचें दुःख पाहवत नाहीं. माझ्यामध्यें प्रेमाशिवाय दुसरें कांहीं सांपडायचे नाहीं. माझ्यातले प्रेम काढलें तर मग "मी" नाहींच. मला फक्त आईच्याच प्रेमाची कल्पना आहे. माझ्याकडे येणाऱ्या माणसाला माहेरीं आल्याप्रमाणें वाटलें पाहिजे, तो परत जातांना त्याच्या डोळ्यांत पाणी आलें पाहिजे, दुसऱ्याला आपला आधार वाटला पाहिजे. मी असून कांहींच होत नाहीं, ज्या गोष्टी घडायच्या त्या घडतच असतात, पण आपण असण्यांत एक आधार आहे असें इतरांना वाटावें. मी आलों खरा एकाकरितां, पण इतरांच्याकरितांसुद्धां पुष्कळ काम झालें. माझे आतां किती दिवस आहेत कोणास ठाऊक ! मी पुढें असो वा नसो, जे मीं सुरुवातीला सांगितलें तेंच मीं शेवटींहि सांगतों: तुम्हीं कसेहि असा पण भगवंताच्या नामाला सोडूं नका. रामरायानें तुम्हां सर्वांवर कृपा करावी ही माझी त्याला प्रार्थना आहे. तुम्हीं माझ्यासाठीं इतक्या आपलेपणानें कष्ट करतां याची जाणीव मला आहे. या कष्टांचा मोबदला रामरायाच तुम्हांला देईल. तुम्ही सर्वजण आनंदात राहा हा माझा तुम्हां सर्वांना आशीर्वाद आहे.

---

२११. वृत्ति शांत होणें हाच नामाचा अनुभव आहे. नामाची सतत धार धरावी म्हणजे तें वृत्तिपर्यंत पोचतें.

# राम कर्ता हें जाणून चित्तीं। जगांत संत ऐसें वर्तती ॥

३० जुलै

[ साधकानें भक्ति करण्यामध्यें बाह्यांगावर भर न देतां किती सांभाळून वागावें याबद्दलचें पुढील पत्र– ] जेथें मीपणाचें ठाणें । तेथें दुःखाचें साम्राज्य असणें ॥ हा आहे नियम । म्हणून मी सांगतों राखावा नेम ॥ सर्वस्वीं व्हावें भगवंताचें । 'मी माझें' सोडून साचें ॥ बाह्य मीपणानें जरी सोडलें । पण अभिमानानें वृत्ति बळावली । तेथें घाताला सुरुवात झाली ॥ बुद्धि करावी स्थिर । नामीं असावें प्रेम अनावर ॥ राम कर्ता हें जाणून चित्तीं । जगांत संत ऐसें वर्तती ॥ साधनीं सावधान जाण । हेंच साधकाचें मुख्य लक्षण ॥ कली अत्यंत मातला । गलबला चोहोंकडून जरी झाला । चित्त ठेवतां रामावर स्थिर । कार्य घडतें बरोबर ॥ आपण होऊन न करावें कांहीं । राम कर्ता सर्वस्व पाहीं ।। चित्तीं ठेवावा रघुनाथ मुखानें भगवंताचें नाम । 'मी कर्ता नव्हे' जाणून कर्म । त्याला बाधेना कलीचा मार्ग ॥ तेव्हां तुम्हांस सांगणें माझें एक । राखावें सदा भगवंताचें अनुसंधान ।। बाह्य वेषानें कसाहि नटला । जगाला भुलविता झाला । तरी जोंवरी नाहीं चित्त स्थिर । कसा पावेल रघुवीर ! ॥ आजवर केल्या गोष्टी फार । भल्या बुऱ्या असतील जाण । त्याचा न करावा विचार । पुढें असावें खबरदार ॥ मानावी परस्त्री मातेसमान । दुसऱ्याचें न पाहावें उणेंपण । परनिंदा टाळावी । स्वतःकडे दृष्टि वळवावी। गुणांचें करावें संवर्धन । दोषांचें करावें उच्चाटन ॥ याला एकच उपाय जाण । अखंड असावें अनुसंधान ॥ प्रपंच न मानावा सुखाचा । तो असावा कर्तव्याचा ।। वृत्ति असावी स्थिर । चित्तीं भजावा रघुवीर ।। असा करा कांहीं नेम । जेणें जवळ येईल राम । जेथें नाम तेथें राम । हा ठेवावा विश्वास कृपा करील रघुनाथ खास । प्रपंचाची धरितां कांस । दुःखचि पावे खास ।। प्रपंच हाच आधार । प्रपंचाविण निराधार । ऐसें होई ज्याची वृत्ति । समाधान न ये त्याचे हातीं ।। तुम्ही सुज्ञ भाविक जाण । एवढें ऐकावें माझें वचन।। दुष्ट मतीची उत्पत्ति । ही दुर्जनाची संगति । भावें धरितां रघुपती । सर्व संकटें दूर जाती । वृत्ति असावी खंबीर । ज्याचा आधार रघुवीर ।। प्रपंचीं सुखाची अपेक्षा। वेश्येचें जैसें जाण पातिव्रत्य ।। दुर्जनाचें जैसें मन । पाषाणास न फुटे द्रव जाण । तैसें प्रपंचीं इच्छी जो सुख । जें आजवर कोणास न मिळालें देख ।। प्रपंचाचें दुःख जाण । तें मीपण असल्याची खूण जाण ॥ जगांत वर्तावें । घरांत असावें । व्यवहारांत व प्रपंचांत वागावें । परी न कोठें गुंतावें ॥ फार दिवसांचा वृक्ष झाला । घरांतील धडामोडी दिसती त्याला । जैसें तो न सोडी आपलें स्थान। तैसें वागावें आतां आपण ।। **ज्याचें घरीं रामाचा वास । तेणें न राहावें कधीं उदास ।। सदा राखावें समाधान । मुखीं भगवंताचें नाम ।** काळ फारच थोडा झाला । पण प्रेमा फार वाढला। आतां तें प्रेम ठेवा नामीं । कृपा करील चक्रपाणी ।। आतां करा चित्त स्थिर । हृदयीं धरा रघुवीर ।। सुज्ञाप्रति काय लिहावें । परी सूचनार्थ बोलिलें स्वभावें । रामावाचून न आणवा विचार । हाच माझा। आशीर्वाद ।।

---

२१२. जेथें नाम तेथें राम । हा ठेवावा विश्वास । कृपा करील रघुनाथ खास ।।

# संतांनादेखील त्यांचें प्रारब्ध भोगावें लागतेंच

३१ जुलै

[एक बुद्धिमान् पण अश्रद्ध प्रोफेसर श्रीमहाराजांकडे येऊन विचारूं लागले, " महाराज, आपण न मागता इतकी मेवामिठाई, फळफळावळ, लोक आपल्याला कां देतात?" त्यावर श्रीमहाराज हंसून म्हणाले :]

अहो, हा प्रारब्धाचा गुण आहे. आपलें अन्न, वस्त्र, पैसा, मान, अपमान आणि शरीरदुःख, या सर्व गोष्टी प्रारब्धाधीन आहेत. प्रारब्धच असा खेळ करीत असतें. प्रारब्धाचे भोग हे फार बलवत्तर असतात. तिथें आपला इलाज चालत नाहीं. अहो, तुम्ही नोकरी चाकरी करणार, घरदार सांभाळून प्रपंचात राहणार, आणि आमच्यासारख्या गोसाव्यापुढें मिठाई येऊन पडते याचें वैषम्य वाटून घेणार : जरासें धाडस करा, मग पाहा काय घडतें तें ! माझा परमार्थ असा मिंधा नाहीं. मला देणारा राम समर्थ आहे. ज्या गोष्टी आतापर्यंत घडल्या त्या प्रारब्धानें घडणारच होत्या. आपल्या भाग्यानें कधीं त्या आधीं कळतात इतकेंच. माणसाचे जन्ममृत्यु भगवंताच्या हातामध्ये असतात; यामध्यें कोणाला दोष देऊं नये. झालें तें होऊन गेलें, त्याची आठवण न करावी. जगातल्या घडामोडी जशा चालतात, तशाच आपल्या सर्व गोष्टी प्रारब्धानें चालतात. आपण जें मिळवलें आहे तें आपल्या प्रयत्नानें मिळालें ही कल्पना गेल्याशिवाय देह प्रारब्धावर टाकतां येणार नाहीं. प्रारब्ध टाळणें म्हणजे लोकांचें कर्ज बुडविणेंच होय. जो संताची किंवा सद्गुरूची आज्ञा पाळतो त्याला त्याचें प्रारब्ध हें प्रारब्धरूपानें राहात नाहीं. संतांनादेखील त्यांचें प्रारब्ध भोगावें लागतेंच, पण त्यांना देहबुद्धि नसल्यानें भोगाचें सुखदुःख त्यांना नाहीं. कांहीं गोष्टी अशा असतात कीं ज्यांचें कारण आपल्याला दाखवितां येत नाहीं, अशा वेळी त्या प्रारब्धानें घडल्या असें आपण म्हणतो. मीं एकच साधन केलें, मी कोणाचें मन आजपर्यंत दुखवलें नाहीं. एका पैशानेंहि मी कोणाचा मिंधा होऊन राहिलों नाहीं. कोणाची माय व्याली असेल त्यानें सांगावें माझ्या सांगण्याप्रमाणें वागण्यानें आजपर्यंत व्यवहारांत आणि प्रपंचात कोणाचें नुकसान झालें असेल त्यानें येऊन सांगावें. कांहीं लोक आपल्या कर्तबगारीनें मिळवितात, पण माझ्यावर रामाचा अनुग्रह होऊन माझ्या कल्पनेच्या बाहेर सर्व झालें. त्यामुळें कर्तेपणाचा अभिमान मला कधीं झाला नाहीं. माझें बोलणें प्रत्येकाला कळतें : ज्याची जेवढी तयारी असेल तेवढें त्याला कळतें. मी सांगतों तसें वागा आणि नामांत राहा. राम तुम्हांला सुखी करील.

---

२१३. नाम हें घराच्या छपरासारखें आहे. इतर साधनें खोल्यांप्रमाणें आहेत. भिंतीवर चढून आंत उडी मारणें अशासारखीं हीं इतर साधनें आहेत. पण किल्लीनें कुलूप काढून खोलींत सरळ जावें तसें हें नामाचें साधन आहे.

# आनंद कशामुळें मिळतो ?

१ ऑगस्ट

सृष्टि शून्यापासून निर्माण झाली. आपलीहि मूळ स्थिति तीच आहे, म्हणून आपण शून्याकडे जाण्याचा प्रयत्न करावा; म्हणजेच स्वानंदात स्वस्थ राहावें. पण तें आपल्या हातून होत नाहीं, कर्म करीतच राहावें असें वाटतें. प्रपंचाची दगदग झाली म्हणजे आपण दूर जाऊन बसतो; पण मनाची तळमळ त्यामुळें नाहींशी झाली नाहीं तर काय उपयोग ? याकरितां मनाची स्वस्थता कशानें येईल तें पाहावें. आनंद कुणाला नको आहे ? आपल्याला आनंद हवा आहे खरा, परंतु तो मिळविण्याकरितां जें करायला पाहिजे तें आपण करीत नाहीं. नोकरी नको आणि खायला हवें हें कसें शक्य आहे ? खरोखर प्रपंचाच्या या अगणित उपाधीतून सुटून जो स्वास्थ्याकडे जातो तो धन्यच होय. मनाच्या विरुद्ध गोष्टी झाल्या कीं लगेच आपल्या आनंदांत बिघाड येतो; याकरितां, आपल्या इच्छेविरुद्ध घडलें तरी माझें स्वास्थ्य बिघडणार नाहीं, इकडे पाहावें. याला एकच उपाय आहे, आणि तो म्हणजे माझी इच्छाच मीं नाहींशी करणें; कोणतीहि वस्तु मिळावी किंवा अमुक एक गोष्ट घडावी, ही बुद्धीच ठेवूं नये, जोपर्यंत हाव आहे तोपर्यंत स्वास्थ्यापासून आपण दूर आहों असें समजावें. महत्त्वाकांक्षा खुशाल धरावी, पण त्यामुळें मनाला त्रास होऊं देऊं नये. भगवंताची इच्छा तीच माझी इच्छा असें म्हणावें, आणि अभिमान सोडून कर्म करीत राहावें; प्रयत्न करून जें कांहीं होतें तें रामाच्या इच्छेनें झालें म्हणावें. कर्तेपणाचा अभिमान सोडल्यानेंच स्वास्थ्य लाभतें. मागें घडलेल्या चांगल्या-वाईट गोष्टी आठवत राहणें यामुळेंहि आनंदात बिघाड येतो. तसेंच उद्याची काळजी करीत राहाणें यामुळेंहि मनाच्या स्वास्थ्यांत व्यत्यय येतो. होतें जातें तें सर्व भगवंताच्या इच्छेनें होतें हें मनानें पक्कें ठरविल्यावर मग विनाकारण काळजी का करावी ! वयाला साठ वर्षें झालीं आणि आता लोभांत गुंतलों नाहीं तर काय विशेष झालें ! विकार जिंकले अशी ज्याला आठवण राहते त्यानें ते जिंकले आहेत असें कसें म्हणावें ! दुःख करणें अथवा न करणें हा मनाचा धर्म असल्यामुळें ज्या माणसानें मनाला योग्य वळण दिलें आहे, तो प्रत्यक्ष दुखणें भोगीत असतानाहि आनंदात राहूं शकेल. म्हातारपणीं तर आनंद हें मोठें शक्तिवर्धक औषध आहे. ज्याला नामाचें प्रेम आलें त्याला शरीराच्या कोणत्याहि अवस्थेत आनंदाचा लाभ होतो. आणि ज्याला असा आनंदाचा लाभ झाला त्याच्यावर रामानें कृपा केली असें खचित समजावें. भगवंतासाठीं एकच दान खरें आहे, आणि तें म्हणजे आत्मदान होय. सतत भगवंताच्या नामांत राहून देहाची विस्मृति होणें हा आत्मदानाचाच प्रकार आहे.

---

२१४. जिथें नाम आहे तिथें सत्संगति आणि भगवंत हीं असतातच. नाम, संत आणि भगवंत हीं एकमेकांना लागून आहेत.

# नेहमीं आनंदांत राहण्यासाठीं आनंदमय अशा भगवंताचा आधार घ्यावा

**२ ऑगस्ट**

इच्छित वस्तु मिळणें यांत समाधान असतेंच असें नाहीं. ती इच्छाच नाहींशी करणें यांत समाधान आहे. हाव संपेल तेव्हाच समाधान येईल. याकरितां वासनाक्षय कशानें होईल तें पाहावें. समाधान जर मनाचा धर्म आहे तर तो नुसता बाहेरून दाखविण्यांत काय अर्थ आहे ? कशांत सुख आहे, कशाची कास धरावी इकडे लक्ष द्यावें. खरा आनंद, आणि समाधान भगवंताचें होण्यांतच आहे. ‘ भगवंता, तुझ्यावांचून माझें कोणी नाहीं ’ हें ज्या दिवशीं मनानें पक्कें ठरेल त्याच दिवशीं समाधान मिळेल. जितकी विषयाची आवड धरावी तितकें दुःखच पदरांत येतें. विषयसुख न मागतांहि येतें. परंतु जें परमार्थाच्या आड येणारें आहे तें मागत कशाला राहायचें ? माझ्यामागें राम आहे म्हटलें म्हणजे प्रपंचांतल्या विषयांत जरी राहिलों तरी भिण्याचे कारण नाहीं. भगवंताचा आधार कायम ठेवला कीं मग विषयाची नाहीं भीति वाटत. नेहमीं अनुसंधानांतच राहिलें म्हणजे मग ‘ सावधच ’ राहिलें पाहिजे असें नाहीं. दिवाळी हा आनंदाचा दिवस असतो, पण दिवाळीचा दिवस हा इतर दिवसांसारखाच असतो. इतकेंच नव्हे, तर आदल्या दिवसाची परिस्थिति, संकटें आणि अडचणी त्या दिवशींहि कायम असतातच. याचा अर्थ असा कीं, परिस्थितींत बदल होत नाहीं दिवाळीचा दिवस हा दिवस या नात्यानें निराळा नाहीं. पण काल आपण जें केलें तें दिवाळीच्या दिवशीं आपण करीत नाहीं, हाच मुख्य फरक होय. आपण दिवाळीच्या दिवसाला आनंदाचा दिवस करतो. हें जर खरें, तर तसा तो आपण नेहमींच कां करू नये ? आपल्याला नेहमींच दिवाळी असावी, आपण नेहमींच आनंदांत असावें आणि त्याकरितां आनंदमय अशा भगवंताचा आधार घ्यावा. आपण दिवाळीच्या सणाचा आधार घेऊन आनंदीआनंद करतों, मग जो आनंद निर्माण करतो त्या भगवंताच्याच आश्रयाला नेहमीं कां न जावें ? भगवंताचा आनंद हा फार बलवत्तर आहे. तो एकदां मिळाल्यावर प्रपंचांतल्या लाभहानीचें महत्त्व वाटत नाहीं. भगवंताचें स्वरूपच मुळीं आनंदमय आहे. असा आनंदमय भगवंत आपल्या अंतर्मध्यें असून आपण दुःख भोगतों, याचा अर्थ असा कीं, भगवंताला प्रकट व्हायला आपणच आपल्या अंतर्मध्यें काहीं तरी उगीच आडकाठी करीत असतों. आपल्या अंतर्मध्यें “ भगवंत तर आहेच, पण त्याचबरोबर “ मी ” सुद्धां आहे. हा “ मी ” कोण हें जाणण्याकरितां इंद्रियांची गडबड शांत करून अंतर्मध्यें आपण आनंदाचा शोध करावा, म्हणजे आपल्याला या “ मी ” चें स्वरूपहि आनंदमय असल्याचें प्रत्ययाला येईल. अशी परमात्म्याची ओळख करून घेणें हीं खरी जीवनाची सुरुवात आहे. आणि परमात्म्यांत विलीन होणें हेंच जीवनाचें सर्वस्व होय.

---

२१५. नामाशिवाय जगांत दुसरें सत्य नाहीं अशी दृढ भावना धरावी.

# भगवंताशीं एकरूप झाल्यावर सर्व आनंदच आहे

**३ ऑगस्ट**

भक्त झाल्यावर माणूस ज्या आनंदात असतो त्या आनंदाचें वर्णन करून समजणार नाहीं. भक्त व्हावें आणि मग तो अनुभव पाहावा हें जरी खरें असलें, तरी पण एवढें सांगता येईल कीं, आपण ज्या आनंदात हल्लीं आहोंत असें वाटतें तो आनंद खरा असें कशावरून समजायचें ? भक्ताला सर्वच ठिकाणीं आपण आहोंत असें दिसतें, म्हणजे सर्व चराचर वस्तु तो भगवद्रूपच पाहात असतो. एखाद्या खोलीत सर्व बाजूंना आरसे ठेवलेले असले आणि आपण प्रत्येकांत पाहिलें तर आपल्याला काय दिसेल ! आपल्याशिवाय दुसरें कांहींच दिसणार नाहीं. म्हणजे, सर्व ठिकाणीं एकभाव झाला तिथें दुःखाचें कारणच नाहीं. तिथें सर्वच आनंद असतो. त्याप्रमाणें भक्त भगवंताशीं एकरूप झाला तिथें आनंदाशिवाय दुसरें काय असणार ! आनंद हा शब्द जिथें दुःख असतें तिथेंच आजूबाजूला असतो; पण जिथें दुःखच नाहीं तिथें आनंद हा शब्द तरी सांगायला कोण राहणार ? या स्थितींत व्यवहारी माणसाप्रमाणें व्यवहार करणें हें फार कठीण असतें. याप्रमाणें या जगांत जे लोक वावरत असतात ते आपल्या आनंदांत राहूनहि इतर लोकांप्रमाणें वागत असतात. तुकारामांनीं अशा स्थितींत राहून लोकांना सन्मार्ग दाखविला. समर्थांनीं ती स्थिति सांभाळून सर्व जगाचा व्यवहार केला आणि इतर लोकांना आपल्या पदाला नेलें. म्हणूनच गुरुआज्ञेप्रमाणे वागावें; कारण, ज्यांनीं कधीं त्या आनंदाकडे जाण्याचा मार्ग पाहिला नाहीं त्यांनीं, ज्या गुरूनें तो आनंद पाहिला आहे आणि जो त्या आनंदांत सदैव राहिला आहे, त्याच्या सांगण्याप्रमाणें वागणें हेंच श्रेयस्कर आहे. जसें आपल्याला वाटाड्या भेटतो आणि त्याच्यावर विश्वास ठेवून आपण चालतों, त्याप्रमाणें गुरुवचनावर आपण विश्वास ठेवून वागावें म्हणजे आपलें हित होतें. एखाद्या आंधळ्या माणसानें साखर समजून जर मीठ खाल्लें तर तें खारट लागल्यावाचून राहणार नाहीं. त्याप्रमाणें आपण आनंद मिळेल या कल्पनेनें विषयाची संगत धरली, पण त्यापासून दुःखच प्राप्त झालें. पुष्कळ वस्तु मिळाल्या तर त्यांमध्यें पुष्कळ सुख मिळतें असें मानणें हा भ्रम आहे. खरें किंवा पुष्कळ सुख म्हणजे कायमचें आणि सनातन सुख होय. तें सनातन वस्तूपाशींच म्हणजे भगवंतापाशींच असतें. **भगवंताच्या स्मरणांत कर्तव्य केलें कीं जीवनांत आनंद होतो. असें कर्म करा कीं जें बंधनाला कारण न होतां भगवंताकडे नेईल.** तोंड गोड करण्यासाठीं जशी साखर खावी लागते, तसें आनंद प्राप्त व्हायला नाम घ्यावें लागतें.

भगवंताचें स्मरण ज्याचें चित्तीं । समाधानाची त्याला येते प्रचीति । म्हणून म्हणावें आपला राम । तोच पावेल चित्तीं समाधान ।। ज्यानें रामाची केली संगति । शांति सुख लोळे पायांप्रति ।। माझा राम हें जाणून चित्तीं । अखंड राखावी समाधानी वृत्ति ।।

---

**२१९. ज्याचा जसा अधिकार तसें त्यानें नाम घ्यावें; पण घ्यावें तर नामच घ्यावें.**

# देवाचें स्मरण म्हणजे वासनेचें मरण, समाधानाला कारण

**४ ऑगस्ट**

कितीहि विद्वान् पंडित जरी झाला तरी त्याला स्वतःला अनुभव आल्यावाचून ज्ञान सार्थकी लागलें असें होत नाहीं. वेदान्त हा रोजच्या आचरणात आणला पाहिजे तर त्याचा खरा उपयोग. म्हणूनच सर्व प्रचीतींमध्यें आत्मप्रचीती ही उत्तम होय. शब्दज्ञान नसलें तरी जो भगवंताला शरण गेला त्याला मिळवायचें कांहींच उरत नाहीं. जो शब्दज्ञानाच्या मागें जातो त्याचा अभिमान बळावतो. जो शब्दज्ञानी नसतो त्याला अभिमान नसेलच असें नाहीं, अज्ञानी माणसालाहि अभिमान असतो; परंतु तो घालविणें सोपे असतें. "सद्गुरूला शरण जा" म्हटलें तर असा अज्ञानी माणूस मुकाट्यानें शरण जाईल, त्याला शंका येणार नाहीं. काशीला जाणारे पुष्कळ रस्ते आहेत; पण कोणत्याहि रस्त्यानें जायचें तरी आपलें घर सोडल्याशिवाय जाता येत नाहीं; हें जसें खरें, तसें कोणत्याहि साधनात वासना बाळगून किंवा ती निराळी ठेवून भागणार नाहीं. ती देवाची करायला, तिला मारायला, देवाचें स्मरण पाहिजे. **भगवंताचें होणें हें माझें या जन्मातलें मुख्य काम आहे असें समजावें.** रात्रंदिवस, मीं भगवंताचा कसा होईन याचा सारखा विचार करावा. मीं दुसऱ्या कोणाचा नाहीं ही खात्री असली म्हणजे भगवताचें होता येतें. आपली वासना कुठें गुंतते हें पाहावें. आपलें मन वासनेच्या आधीन होऊन तात्पुरत्या सुखाच्या मागें गेल्यामुळें थप्पड खाऊन परत येतें. लोक समजतात तितकें वासनेला जिंकणें कठीण नाहीं. जी गोष्ट आपल्या हातांत नाहीं तिच्याविषयी वासना करणें वेडेपणाचें आहे हें ध्यानात ठेवावें; म्हणूनच **विचार आणि नाम यांनीं वासनेला खात्रीनें जिंकतां येईल.** मग आपलें कर्तेपण आपोआप मरून जाईल. हिमालयावर ज्या वेळी आकाशांतून बर्फ पडतें त्या वेळीं तें अगदीं भुसभुशीत असतें. पण तें पडल्यावर कांहीं काळानें दगडापेक्षाहि घट्ट बनतें; त्याचप्रमाणें वासनाहि सूक्ष्म आणि लवचिक आहे, पण आपण तिला देहबुद्धीनें अगदीं घट्ट बनवून टाकतो. मग ती काढणें फार कठीण जातें. भगवंताची वासना ही वासना होऊंच शकत नाहीं. ज्याप्रमाणें कणिक अनेक वेळां चाळून गव्हाचें सत्त्व काढतात, त्याप्रमाणें विषयाची वासना सर्व नाहींशी झाल्यावर जी उरते ती भगवंताची वासना होय.

पोथी ऐकून प्रपंचाविषयीं ज्याला वैराग्य आलें त्यालाच पोथी खरी कळली असें म्हणावें. पोथींत सांगितलेलें ऐकून जो तें आचरणांत आणतो तोच खरा श्रोता होय. ज्याप्रमाणें एखादा गवई पुष्कळ ताना मारतो, पण शेवटीं समेवर येतो, त्याचप्रमाणें भगवंताजवळ लक्ष ठेवून मग आपण कांहींहि केलें तरी त्याला हरकत नाहीं. समेला विसरून मात्र उपयोग नाहीं. इथें तबला वाजविणारा भगवंतच आहे; म्हणून त्याचा ठेका बरोबरच चालतो. ठेक्याप्रमाणें ( भगवंताच्या ठेक्याला अनुसरून, म्हणजे त्याच्या स्मरणात, ) जो गवई गाईल तो बरोबर मार्गावर राहील आणि शेवटीं समेवर येईल.

---

२१७. मी कुणाचें अंतःकरण दुखविणार नाहीं असा नियम करावा. प्रथम चार महिने करावा, मग वर्षभर पाळावा, आणि नंतर जन्मभर ठेवावा !

# नितिधर्मानें वागून शुद्ध मनानें परमेश्वराचें नामस्मरण करणाऱ्यास समाधान लाभतेंच

५ ऑगस्ट

एक गृहस्थ नेमानें पंढरीची वारी करीत असे. पुढें तो म्हतारा झाला. त्याला वारी करणें अशक्य झालें. तो मुलाला म्हणाला कीं, "आतां तूं वारीला जात जा." पुढें मुलगा दोनतीन वर्षें नेमानें वारी करीत होता. परंतु पुढें उद्योगधंदा वाढल्यानें त्याला वारीला जाणें अवघड होऊं लागलें. तेव्हां त्याला बाप म्हणाला, "कांहीं हरकत नाहीं. तूं रोज रात्रीं झोंपताना, सगळीं झोपलीं कीं, जें जें दिवसाकाठीं घडलें असेल तें तें सर्व पांडुरंगाजवळ सांगत जा." त्याप्रमाणें तो मुलगा रोज झोंपताना पांडुरंगाला सर्व हकीकत सांगून झोंपत असे. अशीं कांहीं वर्षें गेलीं. पुढें एकदां त्या गांवांत फार मोठा दुष्काळ पडला आणि तो मुलगा कर्जबाजारी झाला. पुढें सरकारांत त्याच्याविरुद्ध निकाल होऊन सावकारानें त्याच्या घरावर जप्ती आणली. जप्ती काढणारा माणूस संध्याकाळीं आला आणि म्हणाला, "उद्यां सकाळीं आम्ही जप्ती बजावणार आहोंत." त्यावर तो मुलगा म्हणाला, "तुम्हांला व्यवहारानें जें कांहीं करायचें असेल तें करा, पण आज रात्रीं जेवणखाण इथेंच करा." नंतर रात्रीं नित्याप्रमाणें त्यानें पांडुरंगाला सांगितलें, "देवा, मला जप्तीचें कांहीं वाटत नाहीं, परंतु माझी आई म्हातारी आहे, तिला वाईट वाटेल; ती म्हणेल की, मुलानें वडिलांच्या मागें दिवाळें काढलें आणि माझी म्हातारपणीं ही दशा आणली. बरें, असो." त्याला नुसता हुंकार ऐकूं आला. त्या वेळीं तो दुःखानें म्हणाला, "आतां, पांडुरंगा, नुसता हुंकार येऊन भागणार नाहीं" तेव्हां त्याच्या कानांत कोणीतरी येऊन सांगितलें कीं, "तूं उद्यां सकाळीं नदीवर जाऊन तिथें मारुति आहे त्याचें दर्शन घेऊन ये. कांहीं घाबरूं नकोस." त्याप्रमाणें तो दुसऱ्या दिवशीं नदीवर जाऊन मारुतिरायाचें दर्शन घेऊन परत येत असतांना एका दुकानदारानें त्याला हांक मारली आणि म्हटलें, "बरें झालें, मी आज कितीतरी दिवस तुम्हांला भेटावें म्हणून म्हणत होतो. माझ्याजवळ तुमच्या वडिलांनीं पूर्वीं यात्रेला जातांना पुरचुंडी ठेवली होती, ती घेऊन जा." तेव्हां तो म्हणाला, "आतांच नको, मी गडबडींत आहें." त्यावर दुकानदार म्हणाला, "तसें नको; मी आतां म्हातारा झालों आहें, माझा भरंवसा नाहीं आणि पुढें मागें मुलें काय करतील याचाहि भरंवसा नाहीं, तेव्हां तुम्ही आपली ही पुरचुंडी घेऊन जा." त्याप्रमाणें तो पुरचुंडी घेऊन निघाला आणि वाटेंत सोडून पाहतो तों त्याला नेमके जप्तीच्या रकमेइतके पैसे त्या पुरचुंडींत आहेत असें आढळून आलें! **देव कसें आणि केव्हां साहाय्य करील याचा आपण कसा अदमास घेऊं शकूं बरें!** खरोखर, तुम्हां सर्वांना आतां पुनः एकच सांगतों कीं, सदैव नामांत राहण्याचा प्रयत्न करा, नीतीला धरून राहा. त्यानेंच तुम्हांला भगवंत भेटेल. परमार्थांत नीतीला, शुद्ध आचरणाला, फार महत्त्व आहे. शेतांत खूप बीं टाकलें आणि पाऊसहि उत्तम पडला, पण शेत जर चांगलें राखलेलें नसेल तर चांगलें पीक येणार नाहीं हें ध्यानांत ठेवा. जो शुद्ध मनानें परमेश्वराचें चिंतन, नामस्मरण करतो त्याला साहाय्य करायला परमेश्वर सदैव तत्पर असतो. आपण त्याला शरण जाऊन त्याच्या नामाचें प्रेम मागूं या. दीनदयाळू भक्तवत्सल परमेश्वर आपल्यावर कृपेचा वर्षाव करील याची खात्री बाळगा.

---

**२१८. सर्व विसरून भगवंताला आळवलें कीं तो कृपा करतो.**

# आनंद म्हणजे आत्मचिंतनानें येणारें मानसिक समाधानच

६ ऑगस्ट

प्रत्येक मनुष्याची प्रवृत्ति भगवंताकडे जाण्याची असते, कारण त्याला आनंद हवा असतो, आणि हा आनंद भगवंतरूपातच आहे. स्वानंद-स्मरणाव्यतिरिक्त जें स्फुरण तोच विषय समजावा. ज्यानें मनुष्य जास्त आनंदी होतो ती खरी सुधारणा होय. दारूचा आनंद हा दारूची धुंदी आहे तोपर्यंतच असतो, त्याचप्रमाणें विषयापासून होणारा आनंद तो विषय भोगीत असेतोपर्यंतच टिकतो. वास्तविक जो आनंद चिरकाल टिकून राहतो तोच खरा आनंद होय. जो दुसऱ्याचा आनंद बिघडवतो तो पाप करतो, आनंदाला जें मारक आहे तें न करणें म्हणजे वैराग्य, आणि आनंदाला बळकटी येण्यासाठीं जें करणें त्याचें नांव विवेक होय. खरी आनंदी वृत्ति हीच दसरा-दिवाळीची खूण आहे. हास्य हें आनंदाचें व्यक्त रूप आहे. ज्या आनंदातून दुःख निघत नाहीं तोच खरा आनंद, आणि ज्या दुःखातून आनंद निघत नाहीं तेंच खरें दुःख होय. विषयाचा आनंद परावलंबी असतो तर भगवंताचा आनंद निरुपाधिक असतो. कोणतीहि वस्तु अस्तित्वांत नसतांना होणारा जो आनंद तेंच परमात्म्याचें व्यक्त स्वरूप आहे. थोडक्यांत, आनंद म्हणजे आत्मचिंतनानें येणारें मानसिक समाधानच होय. जगण्यामध्यें कांहींतरी आनंद असला पाहिजे हें निश्चित. जगणें जर आनंददायक आहे, तर मग आपल्याला दुःख कां होतें ? वास्तविक आपण कशाकरितां काय करतों हेंच विसरतों. म्हणजे, मनुष्य जगतो आनंदासाठीं, पण करतो मात्र दुःख ! मनुष्याला आनंदाशिवाय जगतां येत नाहीं, पण सध्याचा आपला आनंद हा नुसत्या आशेचा आनंद आहे; तो कांहीं खरा आनंद नाहीं. एखादा मरणोन्मुख रोगी ऑक्सिजन गॅसवर थोडा जास्त वेळ जगतो, पण तें जगणें कांहीं खरें नव्हे. त्याचप्रमाणें, उद्यां सुख मिळेल या आशेवर आपण जगतों, पण तें सुख फार क्वचितच मिळतें. बाळंत झाल्यावर स्त्रीला गरोदरपणाच्या कष्टांचा विसर पडून अपत्यदर्शनांत आनंद होतो, त्याचप्रमाणें परमात्म्याच्या दर्शनाचा आनंद साधनाचे कष्ट विसरायला लावतो. त्या आनंदाची कल्पना आज आपल्याला येणार नाहीं. जे लोक देह विसरले त्यांनाच त्याची कल्पना येईल. जो निःस्वार्थ बुद्धीनें प्रेम करतो त्याला आनंद खास मिळतो. घेणारा ' मी ' जेव्हां देणारा होईल त्याच वेळेस स्वतःला खरा आनंद होईल.

---

२१९. प्रपंचामध्यें कसेंहि प्रसंग येऊं द्या, तुम्ही नामाला सोडूं नका.

# भगवंताचें स्वरूप ज्याला समजलें त्याला सृष्टीमध्यें सर्व ठिकाणीं आनंदच दिसेल

**७ ऑगस्ट**

नुसत्या शास्त्रपठणामुळें होणाऱ्या ज्ञानापेक्षां भक्ति ही निश्चित श्रेष्ठ आहे. भक्ति म्हणजे परमात्मस्वरूपाचें परमप्रेम होय. कर्म, ज्ञान-योग हीं साधनें असून भक्ति हें साध्य आहे. कर्ममार्गामध्यें, नुसतें कर्म बरोबर करण्याच्या हिशेबात मन अडकून जातें; म्हणून नुसता कर्ममार्गी कर्मठ आणि जड बनतो आणि त्याला भगवंताचा विसर पडतो. योगामध्यें वृत्तींना आवरून धरण्याची खटपट करावी लागते. वृत्ति आवरणाऱ्याला भगवंताचें प्रेम असेलच असें सांगतां येत नाहीं. वृत्ति शांत झाल्या म्हणजे मन शून्याकार होतें. ज्ञानमार्गामध्यें आत्मानात्मविचाराला प्राधान्य असल्यानें तिथें बुद्धीच्या सामर्थ्यावर फार भर असतो. पण मायेचा जोर फार विलक्षण असल्यामुळें साधकाला ती केव्हां फसवील याचा नेम नसतो. ज्ञानमार्ग तसा फार कठीण आहे. ज्ञानमार्गी माणसाला अभिमानाची बाधा लवकर होते. तो माझें मतच तेवढें खरें असें धरून चालतो. ज्ञानी मनुष्य जगताला मायाकार्य समजतो. म्हणजेच जगत् मिथ्या आहे असें मानतो. परमात्मा जर सर्वव्यापी आहे तर हें जगत् त्याच्यामध्येंच असलें पाहिजे, **म्हणून खरा भक्त या सृष्टीला मिथ्या न मानतां भगवंताची लीलाच समजतो.** या सृष्टीमध्यें सर्व ठिकाणीं भगवंताचा महिमा, त्याचें विभूतिमत्त्व आणि त्याचा आनंद भरलेला दिसून येतो. भगवंताचें स्वरूप ज्याला समजलें आहे त्याला असेंच दिसेल यांत शंका नाहीं; इतकेंच नव्हे तर सृष्टीमधलें सौंदर्य, माधुर्य, मनोहर भाव, पावित्र्य आणि प्रेम पाहून जीव मोहित होतो, पण सृष्टीमधली विभूतिरूपाची उपासना करून जीवाची तृप्ति होत नाहीं, कारण विभूति हे साक्षात् भाव नाहींत. म्हणून भगवंताच्या साक्षात् गुणांची आणि भावाची जरूरी आहे; त्याच्या प्राप्तीनें जीवाची तृप्ति होते. मात्र सौंदर्यानें आणि माधुर्यानें भरलेलें हें भगवंताचेंच रूप आहे हें समजायला त्याला भगवंताचें नाम देणें जरूर आहे, कारण त्या रूपाला भगवंताचें नाम दिलें नसेल तर तें रूप मायाची राक्षसाचें देखील ठरेल. कुंभारानें एकाच मातीपासून अनेक प्रकारचीं भांडीं तयार केलीं; प्रत्येक भांड्यांत मातीशिवाय दुसरें कांहींच नाहीं, तरी प्रत्येक भांड्याचें नाव निराळें! तुकारामबुवा एवढे मोठे संत बनले, पण भगवंत सर्व ठिकाणीं व्यापून आहे म्हणून ते विठोबाला राम म्हणाले नाहींत, किंवा दत्ताला महादेव म्हणाले नाहींत. रूपाची ओळखण खऱ्या नामानेंच होते. जगत् हें भगवंतापासून भिन्न नाहीं. जगतांत आढळणारीं सर्व रूपें भगवंताचीं आहेत. प्रत्येक वस्तूमध्यें तिचें मूलद्रव्य आणि तिचें रूप हीं दोन अंगें दृष्टीस पडतात. पदार्थाला आकार आला तर नाव देतां येतें. आधीं आकार तयार होऊन मग नाव प्राप्त होतें, परंतु खरें सत्य जर आपण बघितलें तर देशकालाच्या पलीकडे जें कायम राहतें तें खरें सत्य. प्रत्यक्ष आकाराला आलेलीं अनेक रूपें नाहींशीं झालीं तरी त्यांचें नाव टिकून राहातें. **म्हणजे नाम हें देशकालाच्या मर्यादेच्या पलीकडे असतें. म्हणून तें रूपापेक्षां जास्त सत्य होय, आणि जें सत्य आहे तें श्रेष्ठ असलेंच पाहिजे.** सत्य वस्तु ओळखणें हाच परमार्थ.

---

२२०. आपली वृत्ति आणि भगवंत यांना जोडणारी सांखळी म्हणजे भगवंताचें नाम होय। म्हणून आपली वृत्ति नामामध्यें गुंतवून ठेवावी.

# समाधान ही आंतरिक सुधारणेची खूणच आहे

८ ऑगस्ट

एक गृहस्थ होता. तो एका दवाखान्यात गेला. त्याला एक रोगी भेटला. तो रोग्याला म्हणाला, "अरे अजून इथेंच किती वर्षे आहेस !" त्यावर तो रोगी म्हणाला, "काय करू, माझा रोगच बरा होत नाहीं." तेव्हां त्या गृहस्थानें डॉक्टरांची गाठ घेतली. डॉक्टर म्हणाले, "औषध बरोबर आहे, परंतु रोगी पथ्यच पाळत नाहीं त्याला काय करणार !" प्रपंचांत काय किंवा परमार्थांत काय, काहीं पथ्यें पाळायला लागतातच. नेहमीं "राम कर्ता" ही भावना मनांत जागृत ठेवा. शोक, चिंता, भीति, आशा, तृष्णा, ह्या सर्व 'राम कर्ता' म्हटल्यानें नाहींशा होतात. तेव्हां ज्याअर्थी त्या अजून नाहींशा होत नाहींत, त्याअर्थी रोग कायमच आहे असें म्हटलें पाहिजे. तरी आजपासून, ह्या घटकेपासून, नामांत राहण्याचा निश्चय करा आणि 'राम कर्ता' ही भावना दृढ करा. **जें मिळाल्यानें दुसरें कांहींहि हवेंसें वाटणार नाहीं तें पूर्ण समाधान.** तें मिळविण्यासाठीं प्रपंच सोडण्याची जरूरी नाहीं. एखाद्याला कोणीं म्हटलें, "तुम्ही मोठे भाग्यवान् आहात," तर भाग्यवान् म्हणजे काय ! तो पुष्कळ पैसा कमवितो आहे म्हणून का ! कुणीं आपल्याला बरें म्हटलें म्हणजे तेवढ्यापुरतें बरें वाटतें. तें समाधान म्हणतां येईल का ! प्रपंच सोडून कितीहि लांब गेलें तरी त्याची आठवण येतेच. तेव्हां तसा तो सोडतां येत नाहीं; तो एक 'राम' म्हटल्यानेंच सुटूं शकेल. कोणतेंहि कर्म करतांना भगवंताच्या नामांत करा. त्यामुळें समाधान टिकून मनुष्य सुखदुःखाच्या द्वंद्वांत गुरफटला जाणार नाहीं. जो कोणी स्वतःचा उद्धार करून घेईल तो खरा ज्ञानी; काहीं न करणारा हा खरा अज्ञानी होय. वासनेचें परिणत स्वरूप म्हणजे बुद्धि होय. जी बुद्धि बंधनामध्यें काम करते ती खरी स्वतंत्र बुद्धि होय. बंधनाला न जुमानतां मनाप्रमाणें वागणारी ती स्वैराचारी बुद्धि होय. वासना नष्ट होणें म्हणजे देहबुद्धि नष्ट होणें होय. समाधान ही आंतरिक सुधारणेची खूणच आहे. प्रापंचिक मनुष्याला विषय टाकतां येतील हें शक्य नाहीं. त्याचें विषयाचें प्रेम रक्तांत इतकें भिनलें आहे कीं तें काढून टाकायला सूक्ष्म अस्त्र पाहिजे. नाम हें अतिशय सूक्ष्म अस्त्र आहे. तें घेतल्यानें विषयाचें प्रेम नष्ट होईल. खरोखर थोडा मनापासून निश्चय करा, तो परमात्मा फार दयाळू आहे. तो खात्रीनें आपल्या निश्चयाच्या पाठीशीं राहील. **दोष न पाहतांहि जो दुसऱ्याला जवळ करतो तो दयाळू खरा.** भगवंत अत्यंत दयाळू आहे; त्याच्या नामाच्या सहवासांत राहिल्यानें देहावरचें प्रेम नष्ट होईल, आणि देहावरचें प्रेम नष्ट झालें कीं त्यानें मांडलेल्या संसारावरचेंहि प्रेम कमी होईल आणि आपल्याला सर्वत्र राम दिसूं लागेल. प्रत्येक जीवाची ओढ चिरंतन समाधानाकडेच असते. ती ओढ परमेश्वरप्राप्तीनेंच पुरी होऊं शकते. ही प्राप्ति व्हायला अत्यंत सुलभ साधन जर कोणतें असेल, आणि त्याचा सतत सहवास जर कशानें लाभत असेल, तर एका नामानेंच. ज्यानें नाम हृदयांत अखंड बाळगलें त्याला सर्वत्र परमेश्वरच दिसेल. हें भगवंताचें नाम आवडीनें घ्या, श्रद्धेनें घ्या, मनापासून घ्या, आणि आतांपासूनच घेण्याचें ठरवा.

२२१. इतर साधनामध्यें उपाधीमुळें थोडी तरी चलबिचल आहे. नाम हें स्थिर आहे.

# समाधान हें आपलें आपल्यालाच घ्यायचें असतें

**९ ऑगस्ट**

ज्याचें हवेपण जास्त असतें तो गरीब जाणावा, आणि ज्याचें हवेपण कमी असतें तो श्रीमंत जाणावा. परमार्थी म्हणजे भिकारी असें ज्याला वाटतें त्याला श्रीमंतीची खरी कल्पनाच नाहीं. ज्याला नेहमीं समाधान वाटतें तोच खरा श्रीमंत. आमचा आधार पैशाचा. तो आज आहे अन् उद्यां नाहीं. पायाच जिथें डळमळीत तिथें इमारत कुठें पक्की होईल ? ज्यामध्यें कर्म करीत असतांनाच समाधान मिळतें तोच खरा परोपकार, तेंच खरें कर्तव्य होय. श्रीमान् याचा अर्थ भगवंताशिवाय श्री असणारा असा होऊं नये याची श्रीमंतांनीं काळजी घ्यावी. खरें म्हणजे समाधान हाच खरा पैसा, हीच खरी श्रीमंती, हेंच खरें भाग्य, आणि हेंच खरें ऐश्वर्य होय. ज्याला समाधान जास्त तो जास्त भाग्यवान् समजावा. समाधान हें आपलें आपल्यालाच घ्यायचें असतें, दुसरा कोणी तें आपल्याला देऊं शकत नाहीं. खरोखर समाधानासारखें औषधच नाहीं. तें मिळत नाहीं. म्हणून इतर औषधें घ्यावीं लागतात. काळजी नाहींशी झाली कीं अखंड समाधान, शांति आणि आनंद मिळतो. पैलवानासारखा दिसणारा एक गृहस्थ होता. त्याला विचारलें तर तो म्हणाला, " अहो मला मधुमेह झाला आहे, मी आंतून पोखरलों गेलों आहें ! त्यापेक्षां तुम्ही बरे." खरोखर त्याचप्रमाणें पैशापासून प्राप्त होणाऱ्या ऐश्वर्याची अवस्था आहे. फक्त भगवंताच्या निष्ठेमध्यें समाधान आहे. तें राजवाड्यामध्यें नाहींच नाहीं, पण तें झोपडीमध्येंहि नसेल. असमाधान हा रोग सर्वांनाच असल्यामुळें रोगांच्या यादींतून त्याचें नांवच निघून गेलें आहे. व्यक्ति काय किंवा समाज काय, यांची सुधारणा घडवून आणायला चित्त स्थिर पाहिजे. चित्ताची ही स्थिरता धर्माशिवाय येणें शक्य नाहीं. सध्यां जगांत पुष्कळ सुधारणा झाल्या आहेत; पण त्यांनीं माणसाला समाधान मिळालेलें नाहीं. जीवन सुखी न होतां मनाला जिच्यामुळें हुरहुर लागते ती सुधारणा कसली ? हल्लींचें तत्त्वज्ञान नुसतें अभ्यासी असून अनुभवाचें नाहीं, म्हणून त्यानें खरें समाधान लाभणार नाहीं. खरोखर प्रत्येक जीवाला भगवंताची तळमळ लागली पाहिजे. भगवंताशिवाय जो राहतो त्याला सुखदुःख येतें; आणि सुख म्हणजे तरी काय, दुःखाची कमतरता तें सुख. राजापासून रंकापर्यंत प्रत्येकाला कांहींतरी मिळावेसें वाटतें, म्हणजे प्रत्येकाला कांहींतरी कमी आहे. पण कुणी असा विचार करीत नाहीं कीं, जें आज कमी आहे तें पूर्वी आपल्याजवळ असतांना तरी आपण सुखी होतों का ! याचें उत्तर नाहीं असेंच मिळतें. ताजी जिलबी कल्पनेनें खाण्यापेक्षां शिळ्या जिलबीचा तुकडा प्रत्यक्ष खाण्यामध्यें जास्त समाधान आहे. बुद्धीचा आनंद हा उपाधीचा आणि कल्पनेचा आनंद आहे. भगवंताचा आनंद हा उपाधिरहित आहे. हा आनंद मिळवायला भगवंताला शरण जाऊन त्याच्या नामांत राहणें हा एकच उपाय आहे. नामस्मरणाच्या योगानें आनंदाचा आणि समाधानाचा लाभ सहजीं होतो यांत शंकाच नाहीं.

---

२२२. ज्याचा आनंद कायम टिकतो त्याला नित्य दिवाळीच आहे.

# अखंड राखावें समाधान । चुकों न द्यावें अनुसंधान

१० ऑगस्ट

[ चतुर्मासात बायका कांहींतरी नियम करतात. एका बाईनें नियम काय करावा असा प्रश्न विचारला असतां त्याला उत्तर म्हणून श्रीमहाराजांनीं पुढील पत्र लिहिलें–] ऐसा करावा कांहीं नेम । जेणें जोडेल आत्माराम ।। नेम असावा शाश्वताचा । जेणें राम कृपा करील साचा ॥ नेम असावा वाचा मन । जेणें संतुष्ट होईल रघुनंदन ।। कर्तव्यांत गुंतवावें शरीर । जेणें संतोषें रघुवीर ॥ सतीला नसे दुजे दैवत जाण । तिला पति एकच प्रमाण ।। न पाहावे त्याचे दोष गुण । आपलें कर्तव्य करावें जतन ।। पतिव्रताधर्म श्रेष्ठ भारी । वंदितातो संत महामुनि ।। पतिआज्ञा प्रमाण । हेंच मुख्य साध्वीचें लक्षण जाण ।। न बोलावें उणेंपुरे । जें परमात्म्यास न आवडेल खरें ।। संतति व संपत्ती । भगवत्कृपेनें ज्याची प्राप्ती । त्याचें करावें रक्षण । पण न गुंतू द्यावें मन ।। जें आवडेल पतीला पाहीं । तो तो आपला धर्मच राही ॥ मनानें करावें भगवंताचें स्मरण । जेणें चुकेल जन्ममरण ।। अखंड राखावें समाधान । चुकों न द्यावें अनुसधान ।। काया गुंतवावी प्रपंचात । मन असावें रघुनाथात ।। प्रपंचांत राखावी खबरदारी । मन लावावें रामावरी ।। त्याचा राम होईल दाता । न करावी कशाची चिंता ।। मुखीं असावें नामस्मरण । हृदयांत भगवंताच्या अस्तित्वाची जाणीव ॥ शुद्ध राखावें आचरण । पवित्रतम अंतःकरण । मुखानें भगवंताचें स्मरण । त्यावर कृपा करील रघुनंदन । हा ठेवावा विश्वास । अनुभव येईल नक्की खास ।। पतीस करावें एकदा तरी नमन । रामरूप जाणून ।। त्याचें जाणावें मनोगत । तैसें वर्तणें हें आपलें हित ।। नेम तुम्हीं विचारला । थोडाबहुत सांगितला ।। ऐसा नेम ज्याचें घरीं । राम उभा त्याचें दारीं ।। आल्या अतिथा अन्न द्यावें । कोणास विन्मुख न पाठवावें ॥ राम कर्ता हा ठेवावा भाव । कर्तेपणाला नाहीं ठाव ॥ सर्व स्थितिलय-कर्ता । एकच प्रभू माझा राम त्राता । सर्वांचें उगमस्थान एक । हें धरावें चित्तीं । त्याला नाहीं कशाची भीति ॥ रामाविण न पाहावें जग । समाधानाची खूण हीच सत्य । जें जें कांहीं यावें । तें तें रामापासून आलें । हा ठेवावा भाव ।। दुश्चित न व्हावें मन । साक्षित्वानें देहाचा प्रपंच पाहावा । अंतरीं रघुनाथ भजावा ।। रघुनाथाविण ठाव । सत्य सत्य नाहीं दुजा जाण ॥ आतां रामा एकच द्यावें । तुझें अनुसंधान टिकावें ॥ देहाची गति प्रारब्धाचें हातीं । ऐसें शास्त्रें सांगती । परी न येई हें चित्तीं । एकच जगतीं माझा रघुपति ।। मुखानें घ्यावें रामनाम । हृदयीं परमात्म्याचें प्रेम । याहून दुजा न करावा विचार । हा ठेवावा निर्धार ॥ चातुर्मासात करावी सुरुवात । अखंड चालवावा हा हेत ॥ थोडा नेम सांगतो कांहीं । तो करूनिया पाहीं ।। घ्यावें भगवंताचें नाम । खातपीत करीत असतां काम । होईल तेवढें करावें जतन । परमात्मा पुरें करील हें जाणावें ।। सर्वांस सांगावे आशीर्वाद । सर्वांनीं जोडावा भगवंत ।।

---

२२३. काया गुंतवावी प्रपंचात । मन असावें रघुनाथात ।।

# समाधान भगवंताशिवाय कोठेंहि नाहीं हें निश्चयानें ठरवा

**११ ऑगस्ट**

खरोखर जें आपल्या बुद्धीला पटतें आणि अनुभवाला येतें तें सत्य आहे असें धरून चालायला हरकत नाहीं; मग त्याच्या आड कोणीहि येत असेल तरी त्याची आपण पर्वा करूं नये. पण तें सत्य अनुभवास यायला आमची बुद्धि स्थिर पाहिजे. हल्लीं जगांत बुद्धिभेद फार झाला आहे; अशा वेळीं माणसाची बुद्धि स्थिर रहाणें फार कठीण झालें आहे. अगदीं अत्यंत सदाचारानें वागणाऱ्या माणसाची सुद्धा बुद्धि केव्हा फिरेल हें सांगतां येणार नाहीं. केवळ शास्त्र सांगतें म्हणून अमुक एक सत्य आहे असें धरून चाला, असें मी म्हणत नाहीं मी सांगतों तेंच सत्य आहे असें तुम्हीं म्हणा, असेंहि मी म्हणत नाहीं. तुम्हीं आपल्या स्वतःच्या विचारानेंच ठरवा कीं, जीवनांत तुम्हांला समाधान पाहिजे आहे ना? तें समाधान भगवंताशिवाय दुसरें कोठेंहि आपल्याला मिळणार नाहीं, अगदीं निश्चयानें ठरवा. एकदा तुमचा निश्चय कायम झाल्यावर तुमच्या आड कुणीहि येऊं शकणार नाहीं; निश्चय मात्र कायम पाहिजे. या निश्चयाचें बळ किती विलक्षण असतें तुम्हांला सांगूं! एका वकिलाचें त्याच्या आईवर अत्यंत प्रेम होतें. तो तिच्या आज्ञेंत नेहमीं राहायचा. पण त्याला दारूचें व्यसन होतें. हें त्याच्या आईला माहीत होतें. कांहीं दिवसांनीं तिचा अंतकाळ जवळ आला आणि ती रडूं लागली. हें पाहून तो वकील म्हणाला, 'आई, तूं कां रडतेस! तुझ्या प्राणाशपथ, तुला दुःख होईल असें मी कांहींहि करणार नाहीं.'' त्यावर आई म्हणाली, ''बाळ, तूं माझ्या म्हणण्याप्रमाणें सर्व कांहीं करतोस हें खरें, परंतु तुला दारूचें व्यसन आहे. आजपर्यंत तुला दुःख होईल म्हणून मीं तुला त्याबद्दल कांहीं सांगितलें नाहीं, परंतु तुला माझें ऐकायचें असेल तर दारू न पिण्याचें तूं मला वचन दे.'' त्या वकिलानें आईला तसें वचन दिलें. पुढें एके दिवशीं तो वकीलमंडळींत गेला असतां, त्यांच्यापैकीं एकजणाचा सत्कारसमारंभ होता, आणि त्या ठिकाणीं दारूसह सर्व तयारी होती. वकिलांनीं त्यास दारू घेण्याचा आग्रह केला, परंतु त्यानें आईला वचन दिल्याचें सांगितलें. सरतेशेवटीं मंडळींनीं त्याला अत्याग्रहानें दारू प्यायला प्रवृत्त केलें. त्यानें दारूचा पेला हातांत घेतला मात्र, त्या पेल्यांत त्याला त्याच्या आईचें प्रतिबिंब दिसूं लागलें, आणि पेला त्याच्या हातांतून गळून पडला. निश्चयाचें असें विलक्षण सामर्थ्य आहे. भगवंत आम्हांला हवा आहे असें म्हटलें तरी जग आमच्या आड येतें आहे असें तुम्हांला वाटतें. जग आडवें कां येतें, तर जगाशीं आमचे स्वार्थाचे संबंध आहेत म्हणून. जगाशीं वागतांना आम्हांला निःस्वार्थीपणानें व्यवहार करण्याची सवयच नसल्यानें जगाचा मोह आम्हांला सुटत नाहीं. हें सर्व नाहींसें होण्यासाठीं आम्हीं निःस्वार्थी बनणें खरोखर अवश्य आहे. त्यासाठीं आम्हांला आमचें मन ताब्यांत ठेवतां आलें पाहिजे, आणि त्याकरितां नाम हेंच एक साधन आहे. सद्‌बुद्धि उत्पन्न करण्याचें सामर्थ्य फक्त भगवंताच्या नामांतच आहे.

---

२२४. नाम हें अत्यंत सूक्ष्म आहे आणि वृत्तीसुद्धा सूक्ष्म आहे. दुसऱ्या कशासाठीं नाम न घेतां तें वृत्ति सुधारण्यासाठीं घ्यावें. वृत्ति सुधारली कीं चित्त शांत होईल.

# भगवंताच्या आनंदाचें व्यक्त स्वरूप म्हणजे सृष्टि

१२ ऑगस्ट

आपण स्वतः साखर होण्यापेक्षा वेगळें राहून साखर खाणें जास्त गोड आहे. भगवंतसुद्धा स्वतः निर्गुणनिराकार असून त्यानें सृष्टि निर्माण केली आहे. ज्याला मी मालक म्हणतो त्याची ओळख व्हावी, ज्याचें गुणवर्णन करतो त्याला पाहावें, एकदा तरी त्याला भेटावें, असें नाहीं का मनांत येत? भगवंत सगुण असून तो निर्जीव आहे असें कसें म्हणावें? तो ओळखण्यासाठीं कोणता मार्ग धरायला पाहिजे हें आपण प्रथम पाहावें. तो इतकीं वर्षें माझेजवळ असून मला त्याची ओळख पटली नाहीं, यांत चूक कुणाची? **मनांतल्या सर्व वासना सोडून द्याव्या म्हणजे भगवंत आपल्याशी बोलू लागतो.** बाकीच्या सर्व विषयवासनांचा विसर पडला म्हणजे भगवंताची ओळख होते. प्रपंचांत सतत त्याची आठवण ठेवावी. "भगवंता, तुझी कृपा व्हावी," असें अनन्यतेनें त्याच्यापाशीं म्हणावें. कोणतीहि वासना, मग ती चांगली कीं वाईट असो, मनांतच बाळगूं नये. वासना कितीहि सात्त्विक असली तरी "मीपणा" यायला ती कारणीभूत होते हें लक्षांत ठेवावें. नामाचा विसर नाहीं पडला म्हणजे स्वतःला विसरतां येतें. विद्वत्ता अभिमान उत्पन्न करते, म्हणून विद्वत्ता आणि भगवंताची निष्ठा एके ठिकाणीं सांपडणें कठीण असतें. **जे पंथ नुसत्या तत्त्वावर आधारलेले असतात आणि ज्यांना भगवंताचें अधिष्ठान नसतें, ते टिकत नाहींत.** मूळ वस्तुमध्यें दोष असता तर तो सर्वांना तसाच दिसला असता; पण प्रत्येकाला वस्तु निराळी दिसते याचा अर्थच असा कीं, मुळांत वस्तु आपण समजतो तशी नाहीं. मनुष्य सहज एकटा रस्त्यानें चालला असतां आपणच शिट्टी वाजवतो आणि आनंदित होतो. आपल्यातून निघालेली आपलीच शिट्टी आपणच ऐकून आपण आनंद पावतो, भगवंताच्या सृष्टीच्या बाबतींत असेंच आहे. सृष्टि म्हणजे भगवंताच्या आनंदाचें व्यक्त स्वरूप. आपला आनंद आपणच भोगल्याशिवाय मजा नाहीं. सृष्टि आनंदमयच आहे, आपण ती दुःखमय समजतो. सृष्टीवर प्रेम करणें म्हणजेच भगवंतावर प्रेम करणें होय. जो फक्त स्वतःलाच आवडतो तो वाईट मनुष्य होय. आज जें करण्याची आपल्या मनाला संवय नाहीं तें बळजबरीनें त्याला करायला लावलें म्हणजे अभ्यास होतो. **अभ्यास म्हणजे झांकलेल्या अग्नीवरची राख नाहींशी करणें.** वासना ही मुळांत नव्हतीच. आपण तिला आहे म्हटलें म्हणून ती अस्तित्वात आली. आतां ती नाहीं असें आपण म्हटलें कीं ती नाहींशी होईल. मनाला रिकामें ठेवलें कीं तें विषयाच्या मार्गें धांवलेंच समजा. याकरितां आपलें मन नेहमी गुंतवून ठेवावें. आज जेवढा वेळ रिकामा मिळतो तेवढा सगळा भगवंताच्या नामांत घालवण्याचा प्रयत्न करावा.

---

**२२५. अखंड नाम घेणें ही कांहीं सोपी गोष्ट नाहीं.**

# देहाचे भोग आणि आनंद

**१३ ऑगस्ट**

जन्म, मृत्यु वगैरे सर्व काहीं परमात्मसत्तेनें घडतें ही गोष्ट खरी; आणि त्याच्या इच्छेविरुद्ध जाऊं नये असें म्हणणें, ज्यानें परमात्मा आत्मसात् केला आहे, जो त्याच्यात मिसळून गेला आहे, भिन्नपणानें उरलाच नाहीं, त्यालाच शोभेल. उदाहरणार्थ, ज्याचे डोळे गेले तर त्याच्या आनंदांत यत्किंचितहि भंग होणार नाहीं, अशाला हें म्हणणें शोभेल. पण तुम्हांला आपल्या हिताकरितां दुसऱ्याच्या उपयोगी पडणें जरूर आहे, तुम्हीं असें नाहीं म्हणतां कामा कीं परमात्म्यानेंच याला अशा स्थितींत ठेवला आहे, त्याच्याविरुद्ध कसें जावें ? तुम्हांला परमात्म्याच्या विरुद्ध जाणें शक्यच नाहीं, पण आपल्या हिताकरितां, म्हणजे आपली देहबुद्धि कमी होण्यासाठीं, दुसऱ्याच्या उपयोगी पडणें जरूर आहे. परमात्म्यानें पाठविलेलीं दुखणीं, संकटें यांत आनंद मानला पाहिजे. मीं जर तुम्हांला एखाद्या आजारी माणसाची देहकष्ट घेऊन शुश्रूषा करायला सांगितली, तर तें काम तुम्ही आनंदानें कराल. सद्गुरूंनीं आपल्याला हें काम सांगितलें याचा आनंदच वाटेल. मग परमात्म्यानें पाठविलेलीं दुखणीं, संकटें, यांचा कां नाहीं मानूं आनंद ? पण परमात्मा आपला सर्वस्वी हितकर्ता आहे असा तुमचा दृढविश्वास आहे कुठें ? परमात्म्यानेंच धाडलेलीं संकटे त्यालाच दूर करायला कशीं सांगावीत ? दुसरें असें कीं, भोग हा भोगलाच पाहिजे; आतां जर भोगला नाहीं, तर पुढें तरी भोगावा लागणारच ना ? मग असें मनांत येत असलें तर तसें सद्गुरूपुढें तोंडानें बोलण्यांत कुठें बिघडलें ? तो काय नाहीं करूं शकणार ! पण त्यानें तसें न केलें तर नावें ठेवूं नयेत; तसें न करण्यांतच आपलें हित अधिक आहे असें समजावें. जसें लहान मुलांना खाऊ वगैरे दिला म्हणजे घरच्या यजमानाला पोहोंचतो, तद्वत् लोकांच्या उपयोगी पडलें म्हणजे ते परमात्म्याला पोहोंचतें.

देह सुस्थितींत असला म्हणजे देहाचा विसर पडतो असें तुम्हीं म्हणतां, पण तुम्हांला देहाचा खरा विसर कधींहि पडत नाहीं. त्याची आठवण सामान्यपणें असतेच. दुखणें वगैरे आलें म्हणजे ती विशेषत्वानें भासते इतकेंच. दुखणें आणि त्याचें दुःख हीं दोन निराळीं असल्यामुळें, दुखणें आलें तरी मनुष्याला आनंदात राहतां येईल. त्याच्याजवळ भगवंत असेल त्यालाच आनंदाचें जगणें प्राप्त होईल, म्हणून ज्याला जगायचे आहे त्यानें नाम घ्यावें व भगवंताच्या अनुसंधानांत राहावें.

अनुसंधान कशाला म्हणावें ? उठणें, बसणें, जप करणें, वाचन करणें, गप्पागोष्टी करणें, चेष्टा-विनोद करणें, वगैरे सर्व क्रियांमध्यें भगवंताशीं संबंध आणि संदर्भ असावा हेंच अनुसंधान. **जगाच्या प्रवाहाच्या उलट पोहणें म्हणजे भगवंताचें अनुसंधान टिकविणेंच होय.** भगवंताचें होऊन प्रपंच करणें ही सर्वश्रेष्ठ कला आहे. भक्ताला ही कला अवगत झाल्यानें भक्त भगवंतमय होऊन त्याला सर्व जगतांत आनंदच दिसतो.

---

**२२६. भगवंताचा आनंद हा फार बलवत्तर आहे, तो एकदां मिळाल्यावर प्रपंचांतील लाभ-हानींचें महत्त्व वाटत नाहीं.**

# आनंदाचें मूळ कोणते ?–नाम

१४ ऑगस्ट

जगांत आज प्रत्येक मनुष्य स्वतःला आनंद मिळावा म्हणून धडपडतो आहे; किंबहुना, आनंद नको आहे असा मनुष्य मिळणारच नाहीं; म्हणजे मनुष्याला आनंद हवाच असतो. मग इतक्या धडपडींतून त्याला आनंद, समाधान, कां बरें न मिळावें ? याला कारण असें कीं, हा शाश्वत आनंद एका भगवंतावांचून दुसऱ्या कुठेंहि मिळणें शक्य नसल्याकारणानें त्याचें प्रयत्न व्यर्थ आहेत. तो आनंद, तें समाधान, एका भगवंताजवळच आहे, आणि त्या आनंदासाठीं मला भगवंत पाहिजे असें मनापासून वाटलें पाहिजे; आणि त्यासाठींच आपण सर्वांनीं नाम घेणें आवश्यक आहे. तुम्ही सर्व माणसें फार चांगलीं आहांत, भगवंताचें नाम घेतां, हें मला माहीत आहे. परंतु त्या नामाचें प्रेम तुम्हांला येत नाहीं हें पाहून मला फार वाईट वाटतें. खरोखर, तुमच्यापैकीं प्रत्येकानें अगदीं खूप डोकें खाजवून आणि मनापासून विचार करून ठरवा कीं मला नामाचें प्रेम येण्याच्या आड काय येत असेल बरें ? अगदीं सर्वांनीं विचार करून मला सांगा. तुम्हांला तुमची परिस्थिति आड येत असेल तर त्याचाहि आपण विचार करून ठरवूं. निदान इथें मंदिरांत राहणाऱ्या माणसांनीं तरी नामाचें प्रेम यायला परिस्थिति आडवी येते असें म्हणणें बरोबर नाहीं. मी त्यांना "तुम्हीं इथें आनंदानें राहा, मंदिरांत जेवा, आणि सर्वांनीं 'राम राम' म्हणा," म्हणून सांगतो. पण या लोकांनींसुद्धां नामाचें प्रेम यायला परिस्थिति आड येते असें म्हटलें, तर बाहेरून इथें येणाऱ्या लोकांना मी काय सांगूं ? ( श्रीयुत पाठकमास्तर जवळच बसले होते. त्यांना ऐकूं कमी येई. त्यांना उद्देशून श्री म्हणाले, "मास्तर, तुम्हांला ऐकूं येत नाहीं, हें नामाचें प्रेम यायला आडवें येत नाहीं ना ?")

खरोखर, मनुष्य आनंदासाठीं न जगतां वस्तूसाठीं जगतो असेंच म्हणावें लागतें. वस्तु ही सत्य नसल्यामुळें तिचें रूप अशाश्वत असतें. अर्थात् तिच्यापासून मिळणारा आनंद हा देखील अशाश्वत असतो. खरा आनंद हा वस्तूमध्यें नसून वस्तूच्या पलीकडे आहे. आपण भगवंताजवळ आनंद मागावा. त्यानें वस्तु आणि आनंद दोन्हीं दिलें तर फारच बरें, मात्र चिरकाल टिकणारा आनंद हा नेहमीं वस्तुरहितच असतो. एका स्टेशनवर पेरू चांगलें मिळतात म्हणून एकजण गाडींतून खालीं उतरला; तो पेरू खाण्याच्या नादीं किती लागेल, तर आपली गाडी न चुकण्याइतका ! हें जसें खरें, त्याप्रमाणें आनंदाच्या आड येणाऱ्या वस्तूंच्या मागे लागणें बरोबर नाहीं. आनंद जोडणाऱ्या गोष्टीचा आपण विचार करूं या आणि नामस्मरणांत राहूं या. भगवंताचा जन्म झाला कीं आनंदीआनंद भरून राहिला पाहिजे. **काल जें झालें त्याबद्दल दुःख करूं नये, उद्यां काय होणार याची काळजी करूं नये, आज मात्र आनंदांत आपले कर्तव्य करावें.**

---

२२७. सावधानता ठेवून नाम घ्यावें, नामाची सतत धार धरावी, म्हणजे तें वृत्तीपर्यंत पोंचतें. **वृत्ति शांत होणें हाच नामाचा अनुभव.**

# भगवंताच्या कृपेची खूण म्हणजे वृत्तीचें समाधान असणें

१५ ऑगस्ट

आपला देह पंचमहाभूतांचा आहे. यामधला 'मी' कोण हें पाहावें. जें नासणार तें 'मी' कधीं असणार नाहीं, म्हणजे पंचमहाभूतांचा 'मी' नाहीं हें ठरलें. जो शाश्वत असतो तोच सच्चिदानंद असतो. प्रत्येक मनुष्याची "मी भगवंतस्वरूप व्हावें" अशी सुप्त अगर प्रगट इच्छा असते, तेंव्हा त्यापैकीं थोडा तरी 'मी' असल्याशिवाय मला असें वाटणार नाहीं, भगवंताचें स्वरूप आनंदमय आहे, आणि आपण सर्व लोक आनंदात राहावें असें म्हणतो. मी या आनंदापासून वेगळा होतो तेव्हा कुठेतरी चुकलें असें समजावें. अपूर्ण सृष्टि पूर्ण करण्यासाठींच मनुष्याची उत्पत्ति भगवंतानें आपल्या अंशरूपानें केली. आपल्या आनंदात व्यत्यय आणणारे विषय जाणून घेतले म्हणजे मग आनंदात बिघाड नाहीं येणार. या वाटेनें चोर आहेत असें समजलें म्हणजे त्या तयारीनेंच आपण जातों. जो भक्त झाला त्याला विघ्नें येत नाहींत. भगवंताचे म्हणून कोणतेंहि काम केलें म्हणजे त्रास नाहीं होत. आनंदाचा सांठा कुठें निश्चित असेल तर तो भगवंताजवळ आहे. नाटकात राजाचें काम करणारा माणूस जसा मी खरा भिकारीच आहें हें ओळखून काम करतो, त्याप्रमाणें आपण आपलें खरें स्वरूप ओळखून प्रपंच करावा. प्रत्येक नाशवंत वस्तूवर आपण प्रेम करतों, तसेंच लहानसहान गोष्टींत अभिमान धरतो, इथेंच तर आमचें चुकतें. मी जें नाहीं तें व्हावें यांत सुख आहे असें वाटतें. कामधेनूजवळ आपण विषय मागतों आणि मग दुःख झालें म्हणून रडत बसतों, त्याला काय करावें ? खरोखर, परमार्थात जो जाणता तोच खरा जाणता होय. परमार्थ म्हणजे बावळटपणा कसा असेल ? अनेक बुद्धिमान, विद्वान् लोकांना जिथें आपल्या बाजूला वळवायचें असते तिथें बावळटपणाला वावच नाहीं. विद्वान् लोक वेदान्त अत्यंत कठीण करून जगाला उगीच फसवतात. मग सामान्य माणसाला असें वाटतें कीं, "अरे, हा वेदान्त आपल्यासाठीं नाहीं." परंतु ही चूक आहे. वेदान्त हा सर्वांसाठीं, सर्व मनुष्य मात्रासाठीं आहे. वेदान्ताशिवाय मनुष्याला जगताच येत नाहीं, घराच्या छपराखालीं ज्याप्रमाणें सर्व लहान लहान खोल्या येतात, त्याप्रमाणें वेदान्तात इतर सर्व शास्त्रें येतात. शास्त्रांचें मार्ग हे वृत्तीला भटकूं न देण्यासाठीं आहेत. ते वृत्तीला हलूं देत नाहींत, त्यांत नामाची गाठ पडली की भगवंतापर्यंत साखळी जोडली जाते. आपण व्यवहारासाठीं जन्माला आलों नसून भगवंतासाठीं आलों आहोंत. यासाठीं आपण "एखादी वस्तु नाहीं" म्हणून कष्टी होण्यापेक्षा "दुसरी एखादी वस्तु आहे" म्हणून समाधानात राहावें समाधान ही वस्तु फक्त भगवंताजवळ मिळते, आणि ती मिळविण्याच्या आड काहींहि येऊं शकत नाहीं. **वृत्तीचें समाधान असणें ही भगवंताच्या कृपेची खूण आहे** आणि त्याकरितां भगवंताचें सतत अनुसंधान ठेवणें अत्यंत आवश्यक आहे।

---

**२२८. विषयाचें विष मन पीत असल्यामुळें त्यासाठीं आतून निर्माण होणारें औषध पाहिजे. असें औषध म्हणजें नाम होय. मनानें भगवंताचें नाम घेतलें तर आतून दुरुस्ती होईल.**

# नामाशिवाय इतर कशानेंहि खरें समाधान मिळणार नाहीं

**१६ ऑगस्ट**

मनुष्य चूक करतो आणि पुनः पुनः " देवा, कृपा कर " म्हणतो, आणि पुनः चुका करीतच राहतो. हें काहीं योग्य नव्हे; अशानें काहीं देव त्याला क्षमा करणार नाहीं. " देवा, कृपा कर " हें म्हणणें इतकें सहज होऊन बसलें आहे कीं त्याचा अर्थच आपल्या ध्यानात येत नाहीं. तो जर ध्यानात येत असता तर मनुष्य त्याच चुका पुनः न करता. आपण आपल्या बुद्धीच्या जोरावर परमेश्वराची प्राप्ति करून घेऊं असें म्हणणें कदापिहि योग्य होणार नाहीं. जी बुद्धि त्याचें अस्तित्व मानायलाहि साशंक असते अशा मिथ्या बुद्धीनें त्याची प्राप्ति कशी होणार ! एक चोर होता, तो नेहमीं चोऱ्या करायचा आणि त्याला शिक्षा व्हायची. एकदा तो पंढरीच्या वारीला गेला असतांना त्यानें चोरी केली, आणि तो पकडला गेला. न्यायाधीशासमोर उभें केल्यावर चोर त्यांना म्हणाला, " तुम्हीं भाविक आहात; तुम्हीं सर्व जाणते आहात; देहानें चोरी केली खरी; परंतु बुद्धिदाता परमेश्वर त्यानें मला तशी बुद्धि दिली, त्याला मी काय करणार ? मला तुम्ही खात्रीनें दोषी ठरवणार नाहीं. " न्यायाधीश त्याच्यापेक्षा हुशार असलाच पाहिजे ! त्यानें चोराला सांगितलें, " त्याच बुद्धिदात्या परमेश्वरानें तुला शिक्षा देण्याची बुद्धि मला दिली आहे, आणि मी तुला त्याप्रमाणें शिक्षा सांगतों आहे." मग मला सांगा; बुद्धीच्या जोरावर जर मनुष्यालाहि आपण फसवूं शकत नाहीं तर परमेश्वर कसा फसेल ? तेव्हां शरणागतीशिवाय मार्ग नाहीं. तें तुम्हीं करा.

परिस्थितीवर काहीं समाधान अवलंबून नाहीं. कशीहि परिस्थिति असेना, समाधान हें निरुपाधिक आहे. कितीहि पुराणें वाचलीं, ग्रंथ मुखोद्गत केले, प्रवचनें ऐकलीं, तरी मनाला समाधान लाभणार नाहीं. काहीं तरी आचरण केलें पाहिजे. नामांत राहिलें पाहिजे. नाम हें सौभाग्यतिलका-सारखें आहे. पंगत बसली आहे, सर्व पदार्थ वाढून झालें आहेत, सर्व मंडळी भुकेनें व्याकुळ होऊन बसली आहेत, पण कुणी जेवायला सुरुवात करी ना. तेव्हां एकानें विचारलें, " असें कां " तेव्हां कुणी म्हणाले, " संतर्पणाचें पाणी फिरलें नाहीं अजून. " नाम हें त्याप्रमाणें आहे. नामाशिवाय इतर कोणत्याहि गोष्टीनें पूर्तता येऊं शकत नाहीं. नामाशिवाय खरें समाधान नाहीं मिळणार; तेव्हां तुम्हीं अनन्यभावानें भगवंताला शरण जाऊन त्याचें नाम आवडीनें आणि सतत घ्या.

एक गरीब वारकरी पंढरपूरला चालला होता. मोठ्या काबाडकष्टानें तो पायीं चालला होता. वाटेंत एक रेल्वेचें फाटक लागलें, तेव्हां तिथें एक मोटार येऊन उभी राहिली. आंत एक मोठा श्रीमंत माणूस बसला होता. तोहि पंढरपूरलाच चालला होता. वारकऱ्याच्या मनांत आलें, " देवा, तुझी एवढी निस्सीम भक्ति मी करतो, परंतु माझी ही दशा, आणि हा लबाड व्यापारी, याला मात्र तूं सर्व ऐश्वर्य देऊन आरामांत पंढरपूरची यात्रा घडवितोस. काय तुझा हा न्याय ! एवढ्यांत मोटारीचें दार उघडून दोन नोकरांनीं त्या श्रीमंत माणसाचे हात आपल्या खांद्यावर ठेवून त्याला खालीं उतरविलें ! तो पांगळा होता ! वारकऱ्यानें विचार केला, पांगळा होऊन आरामांत पंढरपूरला जाण्यापेक्षा गरिबीत पायीं जाणें बरें. ज्याचें समाधान भगवंतावर अवलंबून आहे त्याचें समाधान कोणत्याहि परिस्थितीमध्यें टिकेल.

---

२२९. नाम हें आंतून आणि बाहेरून घेता येतें. नामांत राहावें म्हणजे अंतःकरणाची शुद्धता होईल. अंतःकरण शुद्ध झालें कीं भगवंताचें प्रेम येईल.

# अगदीं शेवटच्या घटकेपर्यंत निष्ठेनें भगवंताच्या स्मरणांत राहण्यांतच समाधानाचें रहस्य आहे

**१७ ऑगस्ट**

भगवंतावर पूर्ण निष्ठा ठेवून प्रपंचात आपलें कर्तव्य केलें तर तुम्हाला केव्हांहि दुःख करण्याची वेळ येणार नाहीं. आमच्याकडे आठवड्याचा बाजार असतो. एक नवरा-बायको असे बाजाराला आले होते. संध्याकाळ झाली. त्यांचें घर फार लांब होतें. तीं दोघें आपसांत बोलत होतीं कीं, "आतां उशीर झाला आहे, रात्रीचें जाणें नको. तेव्हां आज इथेंच राहूं आणि सकाळीं जाऊं." त्यांचें बोलणें दोन माणसांनीं ऐकलें. ते लोक त्यांना म्हणालें, "तुम्हीं कां घाबरतां? आम्ही बरोबर आहोंत ना! आम्हांला तुमच्या पुढच्या गांवाला जायचें आहे. आम्ही रामासाक्ष सांगतो आहों; तेव्हां आपण जाऊं या." त्या नवराबायकोला तीं माणसें वाईट आहेत असें वाटलें नाहीं. पुढें एका दरींत गेल्यावर त्या लोकांनीं त्या बाईच्या नवऱ्याला झाडाला बांधलें आणि त्या बाईच्या अंगावरचे दागिने काढून घेतले. पुढें त्या बाईच्या पदराला हात लावतांच ती बाई रामाचा धांवा करून म्हणाली, "रामा! मी या लोकांच्या विश्वासावर आलें नाहीं, त्यांनीं तुझी साक्ष ठेवली, तुझी शपथ वाहिली, त्या शपथेच्या विश्वासावर मी आलें. माझें रक्षण करणारा आता तूंच आहेस!" एवढ्यांत बंदुकीचे आवाज झाले, आणि दोन शिपाई तिथें धावत आलें. तेव्हां चोर पळून गेले आणि त्या शिपायांनीं त्यांना मुक्त केलें, त्यांचें दागिने आणि सामान त्यांना दिलें, आणि त्यांना घरीं पोहोंचवलें. घरीं गेल्यावर ती बाई म्हणाली, "तसे जाऊं नका, थोडें गूळपाणी घेऊन जा." ते म्हणालें, "नको, आम्हांला फार कामें आहेत." ती म्हणाली, "थांबा जरा, मीं आत्तां आणतेंच." म्हणून ती आंत वळली तेवढ्यांत ते गुप्त झालें. निष्ठा ही अशी पाहिजे. **सगुणभक्तीचा जर कांहीं मोठा फायदा असेल तर, जेव्हां आपण रामाच्या पायावर डोकें ठेवतों तेव्हां आपल्या भावना उचंबळून येतात.** अशा वेळीं आपण रामाला सांगावें, "रामा! आतां तुझ्याशिवाय मला कोणी नाहीं. मला तूं आपलासा करून घे. मी अवगुणी असेन, परंतु माझा अव्हेर करूं नकोस, मी तुला शरण आलों आहे." खरोखर तुम्हीं सर्व चांगलें आहांत. मी तुम्हांला चांगलें म्हणतों, पण उगीच तोंडावर म्हणायचें म्हणून नव्हे. तुमचा हा विश्वास, हीं निष्ठा अशीच कायम ठेवा, अगदीं शेवटच्या घटकेपर्यंत देवाच्या स्मरणात राहा. आजवर कितीकांच्यावर किती बिकट प्रसंग आले असतील, परंतु त्यांच्या निष्ठेमुळेंच ते त्यांतून पार पडले. निष्ठेचा परिणाम फार आहे. भगवंतावर पूर्ण निष्ठा ठेवून प्रपंच करा, तो खात्रीनें सुखाचा होईल. संतति संपत्ति लौकिकाची प्राप्ती। सर्व वैभव जरी आलें हातीं। तरी रामाविण आहे फजिती॥ म्हणून अखंड असावें भगवंताचें स्मरण। तो दूर करील दुःखाचें कारण॥ कधीं न व्हावें मानसीं। एक रघुनाथ भजावा अहर्निशीं॥

---

२३० जगांत असें कोणतेंहि पाप नाहीं कीं जें नामासमोर राहूं शकेल. नामाची सत्ता फार बलवत्तर आहे.

# वृद्धांनीं भगवद्भजनांत वेळ घालवावा आणि तरुणांनीं भगवत्स्मरणांत कर्तव्याला चुकूं नये. हाच समाधानाचा मार्ग

१८ ऑगस्ट

प्रपंचात देवाची आवश्यकता आहे हें सांगणें नको. इथें आलेल्या प्रत्येकानें आपापल्या परिस्थितीचा जर अनुभव पहिला तर त्याला असें खचित आढळून येईल कीं, त्याचें हें सर्व वैभव केवळ श्रीरामकृपेचेंच आहे. त्याला जो कांहीं पैसाआडका, मानमरातब मिळतो आहे, हें सर्व भगवंताच्या कृपेमुळेंच आहे हें तो जाणून आहे. म्हणून जें जें कर्म आपल्या हातून घडत असतें तें त्याच्याच सत्तेनें होत असतें याची खात्री बाळगून; कोणत्याहि बऱ्या वाईट कर्माचा अभिमान धरूं नका किंवा खेद करूं नका. गर्व झालाच तर रामाची आठवण करा, तो तुमचा अभिमान नष्ट करील. ब्रह्मानंदांनीं ( श्रीब्रह्मानंदमहाराज, बेलधडी. ) कशाचीहि इच्छा ठेवली नव्हती. स्वतःचें लग्न व्हावें किंवा मानमतरातब मिळावा ही कल्पनासुद्धां त्यांना शिवली नाहीं; त्यांनी सर्वस्वी रामाला वाहून घेतलें होतें. त्यानंतर भीमरावांनीहि ( भीमराव गाडगुळी, गदग, ) रामाची सेवा उत्तम प्रकारें चालू ठेवली होती. ते मोठे वकील होते, परंतु त्यांनीं कधींहि कशाचा अभिमान ठेवला नाहीं. वकिली संपवून त्यांनींहि रामाला वाहून घेतलें. ब्रह्मानंदांनीं लावलेल्या परमार्थरूपी वृक्षाची जोपासना भीमरावांनीं उत्तम प्रकारें चालू ठेवली, तीच आपण यापुढेंहि चालू ठेवूं या. याला पैशाची गरज नाहीं, खऱ्या प्रेमाची मात्र अत्यंत जरूरी आहे. प्रत्येक गोष्ट भगवंताच्या इच्छेनें होत आहे हे समजून समाधानांत राहा वाईटाबद्दल कंटाळा नको किंवा सुखाबद्दल आसक्ति नको; यामुळें हवे नकोपण नाहींसें होतें आणि अहंपणाला जागाच उरत नाहीं. तेव्हां आतां एक करा, रामाला अनन्यभावें शरण जा. " रामा ! तूं ठेवशील त्यांत आनंद मानीन, " अशी त्याच्या चरणीं मस्तक ठेवून प्रार्थना करा. तो तुम्हाला मदत करायला सदैव तयार आहे. आपण अभिमानामुळें मदतीकरितां हातच पुढें करींत नाहीं त्याला तो काय करणार ? तुम्हांला खरोखर परमेश्वराजवळ काय पाहिजे तें मागा, तो तुम्हांला खचित देईल. पण जें मागाल तें मात्र हिताचें मागा. समर्थ रामदास हे मनोभावें रामाचें दास झाले म्हणून ते ' समर्थ ' होऊं शकलें. ज्यानें जगताची आस सोडली आणि रामाची सेवा पत्करली तो जगताचा स्वामी होईल याबद्दल खात्री बाळगा. म्हातारे असतील त्यांनी भगवत्-स्मरणांत कर्तव्याला चुकूं नये, हाच समाधानाचा मूलमंत्र आहे; यांतच सर्वस्व आहे. जो भगवंताच्या प्रेमांत नेहमी निमग्न राहतो त्याला उपदेश करण्याची जरूरी नसते. भगवंतानें गोपींना उपदेश केल्याचें कांहीं आठवणींत नाहीं. त्या सदैव त्याच्या प्रेमांतच रंगून गेल्या होत्या. भगवंताचे प्रेम एक त्याच्या नामानेंच साधेल; ' म्हणून नेहमी भगवंताच्या नामांत राहून आनंदांत आयुष्य घालवा. भगवंत खास कृपा करील हाच माझा आशीर्वाद.

---

२३१. अंतकाळी अगदीं शेवटीं सुटणारी वस्तु म्हणजे भगवंताचें नाम पाहिजे. नामांत शेवटचा श्वास गेला पाहिजे,

# होणारें प्रत्येक कर्म त्याच्या कृपेनें होत आहे ही भावना निर्माण झाली पाहिजे; हीच समाधानाची खूण

**१९ ऑगस्ट**

एक मनुष्य प्रवासाला निघाला. त्यानें बरोबर सर्व सामान घेतलें. तो पानतंबाखू खाणारा होता, त्यानें तेंहि सर्व साहित्य बरोबर घेतलें होते. गाडी सुरू झाल्यावर थोड्या वेळानें त्यानें पानाचें साहित्य काढलें तेव्हां त्याच्या ध्यानांत आलें कीं आपण चुन्याची डबी विसरलों आहों. त्यानें पुनः पुनः सामान हुडकलें. त्याला मोठी चुटपुट लागली. कुठें कांहीं पडल्याचा आवाज झाला कीं, त्याला वाटे चुन्याची डबीच पडली. कुणी त्याच्याशीं बोललें कीं त्याला वाटे आपल्याला हा चुना हवा का म्हणून विचारील. नडीनें खरोखर किती प्रेम उत्पन्न होतें ! ज्या गोष्टीवर आपलें प्रेम असतें त्या गोष्टीची आपल्याला नड लागते; ती नसेल तर हळहळ वाटते. आपल्याला देवाची कधीं नड लागली आहे का ? आपल्याला देवाची कधीं नड भासत नाहीं म्हणून आपल्याला देवाचें प्रेम लागत नाहीं. आपण आपल्या घरांतल्या सर्व वस्तु आपल्या म्हणतों, बायका, मुलें, घरांतल्या इतर वस्तूंची आपल्याला इत्थंभूत माहिती असतें; परंतु देवघरांतला देव, ज्याची आपण रोज पूजा करतों, तो कधीं आपलासा वाटला आहे का ? आपल्याला कधीं कुणी विचारलें कीं, "तुझ्या देव्हाऱ्यांत किती गोपालकृष्ण आहेत, किती देवी आहेत, शाळिग्राम, गणपति किती आहेत ?" तर आपल्याला कितीसें आठवेल ? ही जर आपली स्थिति आहे तर आपल्याला देवाचें प्रेम कसें लागेल ? देवाचें प्रेम लागायला हवें असेल तर जगताची आशा सोडली पाहिजे. देवावांचून आपलें नडतें असें वाटलें पाहिजे. ज्याचा आपण सहवास करतों त्याचेंच आपल्याला प्रेम लागतें. ज्याचें प्रेम लागते त्याचीच आपल्याला नड भासते. आपण पाहतोंच सहवासांत किती प्रेम आहे. प्रवासांत आपल्याला कुणी चांगला माणूस भेटला, त्याच्याशीं आपण बोललों, बसलों, कीं, त्याचें प्रेम आपल्याला लागतें. तो त्याच्या स्टेशनवर उतरून जातांना आपण त्याला म्हणतों, "तुमच्या बरोबर वेळ किती आनंदांत गेला ! तुम्ही आणखी बरोबर असतां तर बरें झालें असतें." थोड्याशा सहवासानें जर एवढें प्रेम उत्पन्न होतें, तर मग भगवंताचा अखंड सहवास ठेवल्यावर त्याचें किती प्रेम मिळेल ? भगवंताच्या सहवासांत राहायचें म्हणजे अहंपणा विसरून कर्ता-करविता तो आहे ही भावना दृढ झाली पाहिजे. होणारें प्रत्येक कर्म त्याच्या कृपेनें होते आहे ही भावना निर्माण झाली पाहिजे. तुमची कळकळीची हाक ऐकून तो तुमच्यापाशीं आनंदानें धावत येईल. त्याच्या नामाचा सतत सहवास ठेवा. **'नामानें काय होणार आहे' असें मनांत देखील आणूं नका. नामांत किती शक्ति आहे याचा अनुभव नाम घेऊनच पाहा.** ज्याला नामाचें प्रेम आलें त्यानें भगवंतालाच आपलेसें केलें यांत शंका नाहीं.

---

**२१२. नामाबद्दल सुरुवातीला सर्वांचीच साशंक वृत्ति असते. पण आपण सतत नाम घेत घेल्यानें विकल्प कमी होतात. विकल्प जाऊन भगवंताचें प्रेम वाढूं लागलें की आपलें काम झालें.**

# दास विषयाचा झाला । सुखसमाधानाला आंचवला

२० ऑगस्ट

सर्व दुःखाचें मूळ देह हाच होय ।। त्यांतच देहाला दुखणें । म्हणजे दुःखाचा कळस होय ।। मिठाचें खारटपण । साखरेचें पांढरेपण । यांस नसे वेगळेपण । तैसें देह आणि दुःख जाण ।। देहानें जरी सुदृढ झाला । तेथेंहि दुःखाचा विसर नाहीं पडला ।। सांवली जशी शरीराला । तसा रोग आहे शरीराला ।। रामकृष्णादिक अवतार झाले । परी देहानें नाहीं उरले ।। स्वतःचा नाहीं भरंवसा हें अनुभवास येई । परी वियोगाचें दुःख अनिवार होई ॥ देहदुःख फार अनिवार । चित्त होई नित्य अस्थिर ।। देहाचे भोग देहाचेच माथीं । ते कोणास देतां येत नाहींत । कोणाकडून घेतां येत नाहींत ॥ सर्व दुःखाचें कारण । आपल्या देहाचें मीपण ।। जोपर्यंत देहीं मी ही भावना । तोंपर्यंत दुःखाच्या यातना ।। सारांश देह-तादात्म्यक । याचेंच नांव दुःख ।। आजवर जें जें कांहीं आपण केलें । तें तें प्रपंचाला अर्पण केलें ।। स्वार्थाला सोडून नाहीं राहिलें ॥ अधिकार संतति संपत्ति । लौकिकव्यवहार जनप्रीति । या सर्वांचें मूळ नाहीं स्वार्थापरतें । अखेर दुःखालाच कारण होतें ॥ ढगामाजीं चित्रें विचित्र जाण ॥ तैसें व्यवहारी लौकिकाचें जाण ।। व्यवहार लौकिक सांभाळला । त्यानें आनंद नाहीं टिकविला ।। जो जो प्रयत्न केला आपण । तेंच सुखाचें निधान समजून । कल्पनेनें सुख मानलें । हातीं आलें असें नाहीं झालें ॥ ज्याचें करावें बहुतभारी । थोडें चुकतां उलट गुरगुरी । ऐसे स्वार्थपूर्ण आहे जन । हें ओळखून वागावें आपण ।। प्रपंचांत आसक्ति ठेवणें । म्हणजे जणूं अग्नीला कवटाळणें । म्हणून आजवर खटाटोप बहुत केला । परी कामाला नाहीं आला ॥ प्रपंच हाच आधार । प्रपंचाविण निराधार ॥ ऐसी होई ज्याची वृत्ति । समाधान न ये त्याचे हातीं ॥ प्रपंचाची संगति । म्हणजेच काळजीची उत्पत्ति ।। यासाठीं प्रपंचाची धरितां कास । दुःखचि पावे खास ।। ज्याचा आदिअंत दुःखरूप । तें न होई कधीं सुखरूप ।। विषयांतून शोधून काढलें कांहीं । दुःखाशिवाय दुसरें निघणारच नाहीं ।। म्हणून प्रपंचानें सुखी झाला । ऐसा न कोणी ऐकिला वा देखिला ।। ज्याची धरावी आस । त्याचें बनावें लागे दास ।। दास विषयाचा झाला । तो सुखसमाधानाला आंचवला ।। ज्या रोपट्यास घालावें खतपाणी । त्याचेंच फळ आपण घेई ॥ विषयास घातलें खत जाण । तरी कैसें पावावें समाधान ? ।। प्रपंचीं सुखाची अपेक्षा । जैसी वेश्येची पातिव्रत्याची ईर्षा ।। प्रपंचांतील संकटें अनिवार । कारण प्रपंच दुःखरूप जाण । आजवर नाहीं सुखी कोणी झाले । ज्यानीं विषयीं चित्त गुंतविलें ।। कडू कारलें किती साखरेंत घोळलें । तरी नाहीं गोड झालें । तैसें विषयांत सुख मानलें । दुःख मात्र अनुभवास आलें ।। प्रपंचांतील उपाधि । देत असे सुखदुःखाची प्राप्ति ।। संतति संपत्ति वैभवाची प्राप्ति । जगांतील मानसन्मानाची गति । आधुनिक विद्येची संगति । न येईल समाधानाप्रति ।। प्रपंचांतील सुखदुःखाची जोडी । आपणाला कधीं न सोडी ॥ नामांतच जो राहिला । नामापरता आठव नाहीं त्याला ॥ परमात्मा तारतो त्याला । हाच पुराणींचा दाखला ।। नका करूं आटाआटी । राम ठेवावा कंठीं ॥

---

२३३. सर्वांनीं नामाला लागावें । जन्माचें सार्थक करून घ्यावें ।!

# सुख जगावर अवलंबून नसून स्वतःवरच आहे

**२१ ऑगस्ट**

सुखाचा उगम आपल्यातच आहे. तें जगाकडून मिळत नसतें. मनुष्य जगाकडून सुख मिळविण्याचा प्रयत्न करतो, पण तें त्याला मिळत नाहीं याचें कारण असें कीं, सुख बाहेरून मिळवायचें नसून स्वतःकडून मिळवायचें असतें. आपण आहों तिथपर्यंत जग आहे अशा अर्थाची म्हण आहे. याचें स्पष्टीकरण म्हणजे, जगाचें अस्तित्व आपल्या अस्तित्वावर अवलंबून असतें. समजा, आपल्या घरांत विजेचे दिवे आहेत; ते बटन दाबल्याबरोबर लागतात. पण जर का त्या विजेच्या उगमाच्याच ठिकाणीं बिघाड झाला तर घरांतलें बटन दाबून दिवे लागणार नाहींत. फार काय, पण घरांतील दिव्याची दुरुस्ती करण्याचा प्रयत्न केला तरी मूळ ठिकाणच्या बिघाडाची दुरुस्ती होईपर्यंत कांहीं उपयोग होत नाहीं. त्याप्रमाणें आपल्या स्वतःमध्येंच सुधारणा झाल्याशिवाय बाहेरून सुख मिळणार नाहीं. समुद्र सर्व पृथ्वीच्या पाठीवर दूरवर पसरलेला आहे, पण असें कधीं झालें आहे का, कीं अमुक एका ठिकाणचें पाणी कमी खारट आहे? तसें जगांत कुठेंहि गेलें तरी सुखाच्या बाबतींत अनुभव सारखाच येणार. म्हणजे, सुख जगावर अवलंबून नसून स्वतःवरच आहे. त्याला उपाय म्हणजे स्वतःचीच सुधारणा हा आहे. आतां ती सुधारणा कशी करायची? ईश्वरानें मनुष्याला बरेंवाईट जाणण्याची बुद्धि दिलेली आहे, ती इतर प्राण्यांना नाहीं. त्या बुद्धीचा पुरेपूर उपयोग करून, आपण वाईट गोष्टी करण्याचें टाळावें आणि चांगल्या गोष्टी करण्याचा प्रयत्न करावा. वाईट गोष्ट टाळणें प्रत्येकाला शक्य आहे, कारण त्यांत कृति न करणें एवढेंच काम असतें, आणि तें कृति करण्यापेक्षां केव्हांहि सोपेंच. म्हणून वाईट करण्याचें टाळावें आणि चांगलें करण्याचा शक्त्यनुसार प्रयत्न करावा; कारण चांगल्या गोष्टी सर्वांनाच करतां येतील असें नाहीं. सारांश, सुखी होण्याचा मार्ग म्हणजे वाईट गोष्टी करण्याचे विचारानें टाळावें आणि चांगल्या गोष्टी शक्त्यनुसार करीत राहाव्या. आणि हें सर्व करतांना सर्वकाळ भगवंताचें चिंतन करावें. असें केल्यानेंच सुख मिळेल. जगाकडून सुख मिळेल ही कल्पनाच चुकीची आहे. 'तुझें आहे तुजपाशीं। परि तूं जागा चुकलासी ॥' कारण आपण स्वतः जगासारखें वागत नाहीं किंवा भगवंतासारखें वागत नाहीं मग जगानें आपल्यासारखें वागावें असें आपण का म्हणावें! गीतेमध्यें भगवान सांगतात कीं, "मन हें मीच आहे" याचा अर्थ असा कीं, भगवंतावांचून मनाची तयारी होणार नाहीं. म्हणून आपण भगवंताला घट्ट धरावें आणि मग समाधानांत राहावें. आपण खऱ्या ब्राह्मणत्वानें राहिलों तर आपल्या उलट जाण्याची कोणाची छाती नाहीं. पण ब्राह्मणत्व म्हणजे काय? तर भगवंताचें सदासर्वकाळ स्मरण ठेवणें आणि वृत्ति निर्लोभ असणें. वृत्ति स्थिर झाली कीं त्याच्या मागोमाग समाधान येतेंच येतें.

---

**२३४. आपल्याला हव्या त्या गोष्टी देण्यामध्यें भगवंताची खरी कृपा नसून, असेल त्या परिस्थितीमध्यें आपलें समाधान टिकणें ही त्याची खरी कृपा होय.**

# समाधानाचें शास्त्र प्रपंचापासून शिकतां येत नाहीं

**२२ ऑगस्ट**

प्रत्येकाला असें वाटतें कीं, मी कुणाची निंदा करीत नाहीं, धर्मानें वागतो, तरी मी दुःखी; आणि वाईट माणसें सुखांत वावरतांना दिसतात, हें कसें काय ? अगदी कितीहि सात्त्विक मनुष्य असला तरी त्याच्या हें मनांत आल्यावांचून रहात नाहीं. नामाचा विटाळ ज्यानें मानला तो सुखी दिसावा आणि नाम ज्यानें कंठीं धरलें त्याला दुःख व्हावें, यावरून भगवंताला न्यायी कसें म्हणावें, अशीहि पुष्कळांना शंका येते. खरोखर याचें वर्म जर आपण पाहिलें तर आपल्याला असें आढळून येईल कीं, बाहेरून जे सुखी दिसतात ते अंतर्यामीं दुःखांत बुडलेले असतात. विषय त्यांना पुष्कळ मिळालें, पण त्यामुळें मनाची शांति लाभली तर उपयोग ! दोन रस्ते लागले, त्यांतला एक चांगला दिसला पण तो आपल्या गांवाला नेणारा नव्हता; आणि दुसरा खडकाळ व काट्याकुट्यांचा होता. पण तो आपल्या गांवाला नेणारा होता; तर कोणता रस्ता आपण धरायचा ? भगवंताकडे जाणाऱ्या लोकांचे गीतेमध्यें दोन वर्ग सांगितले आहेत; एक सांख्यमार्गी आणि दुसरे कर्मयोगी. ज्यांची स्वभावतःच वासना कमी असून ज्यांचा इंद्रियांवर ताबा चालतो, जे जन्मापासून तयार असतात, ते सांख्यमार्गी होत. ज्यांच्या वासना पुष्कळ असून जे इंद्रियाधीन असतात पण ज्यांना भगवंत असावा असेंहि वाटतें, म्हणजे आपल्यासारखें सामान्य जन, ते कर्मयोगी होत. सांख्याचा साधनमार्ग अर्थात् सूक्ष्म आणि उच्च प्रतीचा असतो; आपला मार्ग जड, सोपा आणि सुखकारक असतो. सांख्य हा भगवंताकडे चट्दिशी पोहोंचतो, पण आपण क्रमाक्रमानें जातों. सामान्य माणसांचा मग मार्ग कोणता ? तो मार्ग असा–वासना आहे तोंपर्यंत योग्य मार्गानें तीं तृप्त करण्याचा प्रयत्न करावा, पण सृष्टीमधल्या सर्व घडामोडी ईश्वराच्या सत्तेनें घडत असल्यामुळें आपल्या प्रयत्नांचें फळ ईश्वरावर अवलंबून आहे हें ध्यानांत बाळगून समाधान ठेवावें. आपल्या मनासारख्या गोष्टी घडून आल्या तरी आपलें असमाधान कायम राहतेच याला काय करावें ? बरें, दहा माणसांना त्यांच्या असमाधानाचें कारण आपण विचारलें तर तीं माणसें दहा निरनिराळी कारणें सांगतील. यावरून असें दिसतें कीं जगांतली कोणतीहि वस्तु समाधान देणारी नाहीं. समाधानाचें शास्त्र निराळेंच आहे. तें प्रपंचापासून शिकतां येत नाहीं. ज्याच्या जवळ अगदीं " थोडें " आहे त्याच्यापासून तो ज्याच्याजवळ अगदीं " पुष्कळ " आहे त्याच्यापर्यंत प्रत्येकाला कांहीं तरी कमी असणारच. पण मजा अशी कीं; प्रत्येकाची समजूत मात्र अशी असते कीं, आपल्याजवळ जें कमी आहे त्यामध्यें समाधान आहे म्हणून त्याचें दुःख कायम राहतें. भगवंतावांचून असणारें वैभव आणि ऐश्वर्य हे कधींच सुखसमाधान देऊं शकत नाहींत. समाधान हीं परमेश्वराची खरी देणगी आहे, ती मिळविण्याचा उपाय म्हणजे भगवंताचें स्मरण होय.

---

२३५. प्रत्येकाला त्याची गरज भागेल एवढें भगवंत देतच असतो, म्हणून जें आहे त्यांत समाधान मानावें.

# संतांच्या ग्रंथांचें वाचन आणि साधन बरोबर चाललें तर साधकाला खरा आनंद मिळेल

२३ ऑगस्ट

कोणत्याहि संतांचा ग्रंथ वाचताना, तो कृतींत आणण्याकरितां आहे ही भावना ठेवून वाचावा. लोकांनीं कांहींतरी आचरण करावें, अशी मूळ ग्रंथ लिहिणाराची तीव्र इच्छा असते. भाषांतरकार हा भाषांतरामध्यें आपलें थोडें घालतोच; म्हणून मूळ ग्रंथ वाचणें हें केव्हांहि चांगलें. त्यावरची टीका वाचतांना मूळ ग्रंथांतला मतितार्थ लक्षांत आणावा; आईनें दूध पाजणें आणि दाईनें दूध पाजणें यांमधला फरक जाणून घ्यावा. ज्ञानदानासारखें पवित्र दान नाहीं हें अगदीं खरें आहे; आणि तें चिरकाल टिकणारेंहि आहे. पुष्कळ लोक आपल्या शिक्षकाची आठवण काढतात याचा अर्थ हाच आहे. नुसतें बोलणें हें एकांत एक मिसळतें. पण लिहिणें स्पष्ट येतें. म्हणून कोणतीहि गोष्ट लिहून काढण्यानें जास्त कळतें. छापण्याची कला नव्हती तेव्हांपासून वैदिक ब्राह्मणांनीं वेद आपल्या डोक्यामध्यें ठेवून आज आपल्याला ते उपलब्ध करून दिले हे त्यांचें खरे उपकार आहेत. ते लोक पूर्वीं अगदीं निर्लोभपणानें विद्यार्जन करीत असत. कालचक्र फिरतें आहे। आज ना उद्यां असा काल येईलच येईल कीं, ज्या वेळीं पूर्वीं समाजव्यवस्था कशी होती हें पाहण्याची बुद्धि होईल त्या वेळीं आपल्या साधुसंतांचे ग्रंथ आणि शास्त्रें ही अत्यंत उपयोगीं पडतील. **गीता ही सर्व ग्रंथांची आई आहे.** प्रवृत्ति आणि निवृत्ति, कर्मयोग आणि कर्मसंन्यास, यांचें एकीकरण करण्यासाठीं गीता सांगितली आहे हें लक्षांत ठेवून ती वाचावी. वाचन हें सुद्धां एक व्यसन आहे. उगीच ग्रंथ वाचीत बसण्यांत फायदा नाहीं. वाचनाचें मनन झालें पाहिजे मनन झालें कीं, तें आपल्या रक्तामध्यें मिसळतें, साधन आणि वाचन बरोबर चालावें. मग साधकाला वाचनापासून खरा अर्थ कळतो आणि आनंद होतो. वेदान्त हा आचरणांत आणल्याशिवाय त्याचा उपयोग नाहीं. हितकारक गोष्ट आचरणात आणलीच पाहिजे. नुसत्या वाचनानें कांहीं साधत नाहीं. जितकें वाचावें तितका घोटाळा मात्र अधिक होतो. वाचावें कुणी ? तर ज्याला पचविण्याची शक्ति आहे त्यानें ! बाकीच्या लोकांनीं फार वाचूं नये, आणि त्यांतहि वर्तमानपत्र वाचीत वेळ घालविणें म्हणजे आपण होऊन जगाला घरीं बोलावणेंच होय. उपनिषदें, गीता, योगवासिष्ठ यांसारखे वेदान्तपूर्ण ग्रंथ वाचणें आणि ते समजावून घेणें आपल्या उपासनेला आवश्यक असतें. समजा आपण एका गांवाला जायला निघालों आहोंत आणि मोठ्या रस्त्यानें जात आहोंत. वाटेंत एक माहीतगार इसम भेटला आणि त्यानें आपल्याला जवळची एक पायवाट दाखविली. त्या पायवाटेनें आपण आपल्या गांवीं लवकर पोहोचतो. तसें उपासनेच्या मार्गामध्यें स्वतःचा दोष स्वतःला कळत नाहीं, आपलें मन ताळ्यावर राहात नाहीं; अशा वेळीं गीतेसारख्या ग्रंथाच्या वाचनानें आपला दोष आपल्याला कळतो, आणि आपली चूक आपल्याला कळली तर आपण लवकर सुधारतों. कधीं चुकणें, कधीं बरोबर येणें, याचेंच नांव अभ्यास व नित्य असा जो भगवंत त्याच्यासाठीं नेहमीं जें करणें तो नित्यनेम. भगवंताचें नाम घेणें हाच खरा नित्यनेम होय.

---

२३६. वेदांत हा रोजच्या आचरणांत आणला पाहिजे.

# जेथें संत आहे, तेथें आनंद व समाधान आहेच

**२४ ऑगस्ट**

पुष्कळ लोक बोलून गोड असतात, पण अंतर्यामीं काळे असतात; तसेंच कांहींजण वरून अज्ञानी दिसतात, पण अंतरंगीं ज्ञानी असतात. खरोखर, संतांची बाह्यांगावरून पुष्कळदा ओळख पटत नाहीं. आपले दोष जोंपर्यंत नाहींसे होत नाहींत, किंवा लोकांचे दोष दिसणें जोपर्यंत बंद होत नाहीं, तोपर्यंत संतांची पूर्ण ओळख आपल्याला होणार नाहीं. संतांचें दोष दिसणें म्हणजे आपलेच दोष बाहेर काढून दाखविण्यासारखें आहे. संतांचें होऊन राहिल्यानें किंवा त्यांनीं सांगितलेल्या साधनांत राहिल्यानेंच त्यांना नीट ओळखतां येईल. जो भगवंताविषयीं सांगेल तोच संत खरा; आणि संतांना जें आवडतें तें आपल्याला आवडणें म्हणजेच त्यांचा समागम करणें होय. "मी करतों" हें जें बंधनाला कारण असतें तें नाहींसें करणें म्हणजे "गुरूचें होणें" समजावें. तसेंच, कधीं चुकतो आणि कधीं बरोबर असतो तो साधक समजावा आणि जो नेहमीं बरोबर असतो तो सिद्ध समजावा. संत हा हिरव्या चाफ्याच्या फुलासारखा असतो. सुंदर वास तर येतो, पण हिरव्या पानांमध्यें तें फूल शोधून काढतां येत नाहीं. त्याप्रमाणें जिथें संत आहे तिथें आनंद आणि समाधान असतें, पण तो सामान्य माणसासारखाच वागत आणि दिसत असल्यामुळें आपल्याला ओळखतां येत नाहीं. आपण वेदान्त नुसता लोकांना सांगतों, पण संत वेदांत स्वतः आचरणांत आणतात आणि निःस्वार्थ बुद्धीनें ग्रंथ लिहितात. त्यांच्यावर कठीण प्रसंग आला तरी ते डगमगत नाहींत. संशय नाहींसा करायला आपली वृत्ति बदलली पाहिजे. संत हे निःसंशय असतात. आपण संशयांत असतों, त्यामुळें त्यांना समाधान मिळतें, तर आपल्या पदरांत असमाधानच पडतें. ज्याला कांहींतरी करण्याची सवय आहे त्यानें कांहीं काळ मुळींच कांहीं करूं नये; आणि नंतर भगवंताचें अनुसंधान ठेवायला शिकावें. आपण एकदा परीक्षा नापास झालो तरी पुनः परीक्षेला बसतों, पण भगवंताचें अनुसंधान ठेवण्यांत एकदां प्रयत्न करून यश आलें नाहीं तर तें आपण सोडून देतों, हें बरें नाहीं. नुसतें इंद्रियदमन हें सर्वस्व मानूं नये. तें ज्याच्याकरितां आहे, त्याचें अनुसंधान पाहिजे, मनानें संत बनायला पाहिजे, नुसतें बाहेरून संत बनणें हें योग्य नव्हे. ज्याला एका संताचें वर्म कळलें त्याला बाकीच्या सगळ्यांचें वर्म कळलें. देवाचें बोलणें हें बापाच्या बोलण्यासारखें आहे. त्याच्या जवळ तडजोड नाहीं. पण संत हे आईसारखे आहेत, आणि आईपाशीं नेहमीच तडजोड असते. आई म्हणते, "अरे! तुझें प्रेम पुष्कळ ठिकाणीं वाटलें गेलेलें आहे. अशी एकहि वस्तु नाहीं कीं जिच्यासाठीं तूं सर्वस्व द्यायला तयार होशील. पण बापाला तूं निदान नांवें तरी ठेवूं नकोस." तो मोठा न्यायी आहे, म्हणून तूं त्याच्या न्याय-अन्यायाच्या तडाक्यांत सांपडूं नकोस.'' याचा अर्थ, तूं आपलें कर्तव्य बरोबर करीत जा, हेंच संतांचें सांगणें आहे.

---

२३७. संत हे भगवंतावाचून दुसरीकडे राहिलेच नाहींत, म्हणूनच ते संत झाले, म्हणजे देवस्वरूप बनले.

# आपली वृत्ति परिस्थितींत अडकलेली असल्यानें आपल्याला समाधान नाहीं

२५ ऑगस्ट

आपण स्वप्नांत असतो तोंपर्यंत स्वप्नच खरें आहे असें वाटतें. त्याचप्रमाणें जोंपर्यंत भगवंताचें सत्यत्व आपल्याला नीट समजत नाहीं, तोंपर्यंत हें सर्व मिथ्या असणारें जग आपण भ्रमानें सत्यच मानीत असतों. प्रपंच मिथ्या वाटला कीं भगवंत सत्य हें कळतें. आपला मार्ग चुकला आहे एवढें जरी समजलें तरी सत्याकडे जाता येतें. मन विषयाकडे लावून नाहीं समाधानाचा अनुभव येणार. समाधान जेथें भंगतें तो मार्ग खास चुकीचा आहे. जें चिरकाल राहतें तेंच खरें सत्य होय. मुंगळा गुळाच्या खड्याला चिकटतो त्याप्रमाणें, मान तुटली तरी आपण विषयसुख सोडीत नाहीं, याला काय करावें ? जे अनुभवानें खरें शहाणे होतात ते या विषयसुखाचा त्याग करतात; आणि ज्यांची ही विषयाची आसक्ति सुटली त्यांनाच तें मिथ्या आहे हें प्रत्ययाला येतें. आपलें समाधान का बिघडतें ? आज आहे त्यापेक्षां निराळें असावें असें वाटतें म्हणून ! जो जिन्नस जिथें ठेवला आहे ती जागा सोडून आपण त्रिभुवन जरी शोधलें तरी तो सापडत नाहीं, त्याप्रमाणें ज्या वस्तूमध्यें समाधान नाहींच त्यामध्यें कितीहि शोधलें तरी तें आपल्याला मिळत नाहीं. समाधान फक्त भगवंताजवळ आहे. समाधानाशिवाय इतर गोष्टींनीं आपल्या जीवाची तळमळ आणि हुरहुर नाहींशी होणार नाहीं. खरें म्हणजे आपली वृत्ति परिस्थितींत अडकलेली असल्यामुळें ती स्थिर राहात नाहीं; म्हणून आपल्याला समाधान नाहीं. आपण ज्या कार्यासाठीं आलों तें कार्य झालें कीं समाधान होतें. मग जोपर्यंत आपल्या कृतीनें आपल्याला समाधान होत नाहीं तोंपर्यंत आपण त्या कार्यासाठीं आलों नाहीं असें म्हणायला काय हरकत आहे ? मनुष्य आहे त्या स्थितीला कंटाळून, सुख मिळावें यासाठीं जें करायला जातो तें शेवटीं दुःखाचेंच होतें. म्हणून आहे त्या परिस्थितींत समाधान मानायला शिकावें. आपण भगवंतासाठींच आलों आहोंत आणि त्याच्या प्राप्तीमध्येंच आनंद आहे. जगांतली कोणतीहि दृश्य वस्तु, मग तें राजाचें वैभव असो किंवा विद्वानाची विद्या असो, आपल्याला मनाचें स्वास्थ्य देऊं शकत नाहीं, किंवा तें नेऊं शकत नाहीं. मन भगवंताजवळ गुंतेल तेव्हांच त्याला स्वास्थ्य मिळेल. त्याकरितां नेहमीं भगवंताचें नामस्मरण करावें, त्याचें गुणवर्णन ऐकावें, त्याच्याशिवाय दुसरी गोष्ट काढूंच नये. नामस्मरण हें जागें करण्यासारखें आहे. मिथ्या समजून प्रपंच करावा आणि भगवंताचें होऊन राहावें. नामाच्या उलट सांगतील त्यांच्यावर विश्वास ठेवूं नये. कोरडा वेदान्त ऐकूं नये. प्रत्येक नामागणिक भगवंताची आठवण होते. म्हणून नामच सर्वस्व मानावें. तीर्थक्षेत्रांत किंवा संतांच्याकडे जाऊन 'वस्तु' मिळवायची नसून समाधान मिळवायचें असतें, आणि हें नामस्मरणाच्या योगेंच घडून येतें. म्हणूनच नामांत काय आहे हें सांगण्यापेक्षां तें घेतल्यानेंच सर्व कांहीं कळून येतें.

---

२१८. आगगाडींत ड्रायव्हरवर विश्वास ठेवून आपण स्वस्थ झोंप घेतों, त्याप्रमाणें भगवंतावर पूर्ण श्रद्धा ठेवून काळजी न करतां स्वस्थ राहावें.

# कोणत्याहि परिस्थितींत आनंद वाटणें म्हणजे भगवंताजवळ जाणेंच होय

२६ ऑगस्ट

खरा वैद्य तोच कीं जो बिनचूक निदान करतो. समर्थ ज्याला जें नडतें तें सांगतात. प्रापंचिकांची नड बरोबर ओळखून त्यांनीं त्याप्रमाणें त्यांना मार्ग सांगितला. मनुष्यजन्माची महती त्यांनी सांगितली. बुद्धीचा उपयोग स्वार्थाकरितां न करतां परमार्थाकडे कसा करतां येईल हें समर्थांनी दाखवून दिलें. बुद्धि जर स्वार्थ साधण्याकडेच खर्च झाली तर मग पशूंत आणि मनुष्यांत फरक तो कोणता! खरोखर आपल्या जन्माचें सार्थक करून घ्यावें असें किती जणांना वाटतें? बुद्धीचा उपयोग स्वार्थापलीकडे केला नाहीं तर तिचा दुरुपयोग केला असें नाहीं का होणार? पुण्य नाहीं केलें तरी निदान पाप तरी करूं नका. भगवंताची प्राप्ति व्हावी असें वाटणें हें जन्माचें सार्थक आहे. ज्याचें अस्तित्व आपण मानतों तो प्राप्त करून घेण्यांत काय बिघडलें? मी आनंदांत राहावें असें प्रत्येकाला वाटतें; म्हणजेच भगवंताकडे जावें असें वाटतें, कारण भगवंत आनंदस्वरूपच आहे. आपल्याला अशी एक वाईट संवय लागली आहे कीं कांहींतरी कारणाशिवाय आपण आनंद भोगूंच शकत नाहीं. प्रत्यक्ष कारण सांपडत नसेल तर आपण आपल्या कल्पनेचें राज्य उत्पन्न करतों आणि त्यापासून आनंद भोगतों. आनंद मिळविण्यासाठींच प्रत्येक मनुष्याची खटपट आहे; पण कारणावर अवलंबून असणाऱ्या आनंदाची वाट दुःखामधून आहे, आणि त्या आनंदासाठीं मनुष्य दुःखदायक प्रपंचाची कास धरतो. म्हणून कोणतेंहि कारण नसलेला आनंद भोगण्याची आपण संवय लावून घ्यावी. कारणावर अवलंबून असणारा आनंद हा अर्थात् अशाश्वत असणार, म्हणून तो खरा आनंद नाहीं. कारणाशिवाय आनंद मिळविण्यासाठीं अगदीं स्वस्थ बसायला शिकावें. हें 'कांहींहि न करणें' ही फारच उच्च अवस्था आहे. कांहीं तरी करण्यापेक्षां ती फारच कठीण आहे. भगवंताशीं अगदीं अनन्य होणें, आपलें कर्तेपण पूर्ण मारणें, ही ती अवस्था आहे. दिवस कसा घालवावा हें आपल्या हातांत आहे. आनंद पाहिजे असेल तर तुम्ही आनंदांतच राहा! कशाहि परिस्थितींत आनंद राहावा. आपल्या मनासारखी गोष्ट घडून आली तर समाधान वाटावें पण आनंद वाटूं नये. कुणीहि मनुष्य स्वतःसाठींच सर्व करतो. समजा, आपल्याला त्रास देणारा कुणी आहे; आपल्याला त्रास दिला तर त्याला बरें वाटतें; म्हणजे आपल्याला दुःख दिलें तर त्याला आनंद होतो; म्हणून तो नुसता स्वतःसाठींच माझ्याशीं तसा वागतो हें जसें खरें, तसेंच त्यानें दिलेला त्रास मी कां घ्यावा! त्यानें कांहींहि केलें तरी आपला आनंद कां बिघडूं द्यावा! असें आपण वागावें. काल जें झालें त्याबद्दल दुःख करूं नये, उद्यां काय होणार याची काळजी करूं नये, आज मात्र आनंदांत आपलें कर्तव्य करावें व भगवंताच्या अनुसंधानांत राहावें यांतच सर्व आलें.

---

२३९. तुम्हीं तुमच्या स्वतःवर जितकी निष्ठा ठेवतां तितकी जरी भगवंतावर ठेवलीत तरी आपलें काम होईल.

# खरें समाधान ही भगवंताची देणगीच आहे

२७ ऑगस्ट

जेथें प्रत्येकाला "राम माझा दाता आहे" ही भावना आहे तें खरें रामराज्य होय. "राम दाता आहे" या भावनेनें भिक्षा मागणें हें मोठेपणाचें आणि तेजस्वीपणाचें लक्षण आहे. सर्व ठिकाणीं राम भरलेला जो पाहील त्यालाच समाधान मिळेल. ज्या घरांत समाधान । तेथें भगवंताचें राहणें जाण ।। जें घडतें तें भगवंताच्या इच्छेनें घडतें, अशा खऱ्या भावनेनें एक वर्षभर जो राहील त्याला समाधान हें काय तें खात्रीनें कळेल. समाधान हा वृत्तीचा गुण आहे, देहाचा नव्हे. प्रपंचाबद्दल कांहींहि न सांगणारा आणि अत्यंत समाधान असणारा मनुष्य भेटावा असें वाटतें. त्याच्या मागें सारें जग लागेल. जगामध्यें आपल्याला समाधान कुणी देत नाहीं. समाधानाला निष्ठेची अत्यंत जरूरी आहे. पांडवांना वनवासांत जें समाधान होतें, तें राज्यपदावर असणाऱ्या कौरवांना नव्हतें; म्हणून परमात्मा ठेवील त्यामध्यें सुखी राहावें. "ठेविलें अनंतें तैसेंचि रहावें । चित्तीं असो द्यावें समाधान ।।" हेंच संतश्रेष्ठ श्रीतुकारामबुवांचेंहि सांगणें आहे. भगवंताची देणगी सर्व बाजूनें गोड असली पाहिजे. पैसा ही भगवंताची देणगी नव्हे. त्याने तळमळ आणि अतृप्ति होते. खरोखर समाधान ही भगवंताची देणगीच होय. मनुष्याला किती असलें म्हणजे पुरें होईल हे ठरलेलें नाहीं. आहे त्या परिस्थितींत आपण समाधान मानलें कीं, जें आहे तें पुरेल ज्याचें मन समाधानांत आहे, त्याचें शरीर कसेंहि असलें तरी चालेल. समाधानालाच खरें महत्त्व आहे. घेण्यापेक्षां देण्यामध्येंच फार समाधान आहे; शिवाय घेण्याला कांहीं अंतच नाहीं. कितीहि मिळालें तरी आपली मागण्याची बुद्धि कायम राहते. पण आपलें सर्व कांहीं दिलें कीं देण्याला अंत आला, म्हणून त्यामध्यें समाधान आहे. शिवाय आपण उपाधीनें झाकलें गेलों आहोंत एक एक उपाधि टाकीत गेलें तर आपलें खरें स्वरूप प्रकट होईल. तिथें खरें समाधान होतें. "राम कर्ता आहे" ही भावना होणें हें वासनेचें मरण होय. मनुष्य कांहीं तरी हेतु ठेवून कर्म करतो. पण प्रत्येक ठिकाणीं "भगवंताच्या इच्छेनें काय व्हावयाचें आहे तें होऊं दे" असें अनुसंधान असेल तर फलाविषयीं सुखदुःख राहणार नाहीं. आपल्याला सगळें कळतें, पण आयत्या वेळेला आपण विसरतो. आलेली ऊर्मि आपण सहन करावी. दिवा बरोबर नेला कीं अंधार नाहींसा होतो, तसें अनुसंधानाचा दिवा बरोबर घ्यावा म्हणजे आपण आपल्या ऊर्मींना आवरूं शकूं. प्रत्येकाचा रोग निराळा असला तरी औषध एकच आहे, ते म्हणजे भगवंताचें अनुसंधान. हें औषध जरी चांगल्या डॉक्टरकडून घेतलें तरी रोग्याला पथ्यें सांभाळावींच लागतात. शास्त्रानें, सद्धर्मानें आणि अभ्यासानें वागून अनुसंधानांत राहणें जरूर आहे. अनुसंधानानें जें साधेल तें शतकोटी साधनांनीं साधणार नाहीं. असें हें अखंड नामानुसंधान म्हणजेच खरी भक्ति.

२४०. इतर साधनांनीं जें साधायचें तें नुसत्या अनुसंधानानें साधते हाच या युगाचा महिमा आहे.

# आनंदापासून मला जी दूर करते व विषयांत लोटते ती माया

२८ ऑगस्ट

वस्तु आहे तशी न दिसता विपरीत दिसणें म्हणजे माया होय. माया म्हणजे जी असल्याशिवाय राहात नाहीं पण नसली तरी चालते. उदाहरणार्थ छाया. माया ही नासणारी आहे. ती जगते आणि मरते. मला विषयापासून आनंद होतो, पण तो आनंद भंग पावणारा आहे. आनंदापासून मला जी दूर करते ती माया. आपल्याला विषयापासून शेवटीं दुःखच येतें हा आपला अनुभव आहे. माया आपल्याला विषयांत लोटते; विषयांचें आमिष दाखवून चटकन् निघून जाते. आहे त्या परिस्थितींत चैन पडूं न देणें हेंच तर मुळीं मायेचें लक्षण आहे. पैसा हें मायेचें अस्त्र आहे. मायेचें थोडक्यांत वर्णन करायचें म्हणजे भगवंतापासून मला जी दूर करते ती माया. भगवंताची शक्ति जेव्हां त्याच्याच आड येते तेव्हां आपल्याला ती माया बनते; आणि तिचें कौतुक जेव्हां आपल्याला वाटतें तेव्हां ती त्याची लीला बनते. एक भगवंत माझा आणि मी भगवंताचा असें म्हटलें म्हणजे मायेचें निरसन झालें. मायेचा अनर्थ माहीत असूनहि तो आपल्या आपण पत्करतों याला काय करावें !

जगाचा प्रवाह हा भगवंताच्या उलट आहे. आपण त्याला बळी पडूं नये. जो प्रवाहाबरोबर जाऊं लागला तो खडकावर आपटेल, भोंवऱ्यांत सांपडेल, आणि कुठें वाहात जाईल याचा पत्ता लागणार नाहीं. आपण प्रवाहांत पडावें पण प्रवाहपतित होऊं नये, आपण प्रवाहाच्या उलट पोहत जावें; यालाच अनुसंधान टिकविणें असें म्हणतात. भुताची बाधा ज्या माणसाला आहे त्याला जसें तें जवळ आहे असें सारखें वाटतें, तसें आपल्याला भगवंताच्या बाबतींत झालें पाहिजे. परंतु बाधा ही भीतीनें होते; त्याच्या उलट, भगवंत हा आधार म्हणून आपल्याजवळ आहे असें वाटलें पाहिजे. मनाच्या कमकुवतपणामुळें माणसावर भुताचा अंमल बसतो. तसेंच आपण योग्य भावना केली तर भगवंताचा अंमल आपल्यावर बसेल. मनांत वाईट विचार येतात, पण त्यांच्यामागें आपण जाऊं नये म्हणजे मग ते आपोआप कंटाळतील, आणि मग वाईट संकल्प-विकल्प येणार नाहींत. सर्वांना मी माझें असें म्हणतों, मात्र भगवंताला मीं " माझा " असें म्हणत नाहीं; याला कारण म्हणजे माया. वकील हा लोकांचें भांडण " माझें " म्हणून भांडतो पण त्याच्या परिणामाचें सुखदुःख मानीत नाहीं, त्याचप्रमाणें प्रपंच " माझा " म्हणून करावा पण त्यामधल्या सुखदुःखाचे धनी आपण न व्हावें. खटल्याचा निकाल कसाहि झाला तरी वकिलाला फी तेवढीच मिळते; तसें प्रपंचात प्रारब्धानें ठरवलेलेच भोग आपल्याला येत असतात. आपलें कर्तव्य म्हणून वकील जसा भांडतो त्याप्रमाणें कर्तव्य म्हणून आपणच प्रामाणिकपणें प्रपंच करावा. त्यामध्यें भगवंताला विसरूं नये, अनुसंधान कमी होऊं देऊं नये, कर्तव्य केल्यावर काळजी करूं नये; म्हणजे सुखदुःखाचा परिणाम आपल्यावर होणार नाहीं. हें ज्याला साधलें त्यालाच खरा परमार्थ साधला.

---

२४१. " मी कसा जगलों " याचें कारण कोणाला सांगता येणार नाहीं. म्हणून राखणारा भगवंत आहे ही श्रद्धा असावी.

# स्वार्थ = द्वैत = माया = अहंकार = असमाधान
# परमार्थ = अद्वैत = नाम = शरणागति = शांति

२९ ऑगस्ट

द्वैत आणि अद्वैत ही काय भानगड आहे ? भगवंतापासूनच सर्व झालें. एकापासून दोन झाले. आपण मूळ स्वरूपापासून बाजूला झालों म्हणून द्वैत आलें. मायेमध्यें सापडलें नाहीं म्हणजे अद्वैतात राहता येईल. माया कल्पनेचीच झाली; तिला कल्पनेनेंच मारावी. एकच करावें : अद्वैतात जे राहिले त्यांच्या नादीं आपण राहावें. भगवंताचें होण्याकरितां, ज्यानें मी वेगळा झालों तें सोडावें. ज्याच्यापासून माया निर्माण झाली त्यालाच शरण जावें. माया तरी भगवंतामुळेंच झाली. जो भगवंताचा होतो त्याला माया नाहीं बाधत. मायेचा जोर संकल्प-विकल्पात आहे. अखंड स्मरणात राहावें म्हणजे नाहीं माया बाधत. भगवंताचें नाम हें स्थिर आहे, पण रूप मात्र सारखें बदलतें. प्रत्यक्ष साकाररूप हेंच कांहीं रूप नव्हे. जें जें आपल्या कल्पनेमध्यें येऊं शकेल तें तें सर्व रूपच होय. भगवंताच्या नामात मोबदल्याची अपेक्षा नाहीं, म्हणून तें पूर्ण आहे. समाधान हा पूर्णत्वाचा स्वभाव होय. म्हणूनच, जें पूर्ण नाहीं तें असमाधान. भगवंताकडून येणारी शांति हेंच समाधान होय, आणि हेंच पूर्णपण आहे. जें शास्त्र समाधान देतें तेंच शास्त्र खरें होय, आणि ज्यानें शांति आणि समाधानाचा लाभ होतो तोच खरा धर्म होय. **धर्म म्हणजे नीति आणि अध्यात्म यांचा संयोगच.** जो दुसऱ्याच्या हिताकडे न पाहता आपल्या हिताकडेच पाहतो तो स्वार्थीच होय स्वार्थ म्हणजे द्वैत, आणि परमार्थ म्हणजे अद्वैत, माया, म्हणजे अभिमान, द्वैताचें कारण होय. कांहींतरी सुख व्हावें ही मनुष्याला इच्छा असल्यामुळें अस्वस्थपणा येतो. या अस्वस्थतेमधून तळमळ निर्माण होते. या तळमळीमुळें जगाच्या सर्व सुधारणा बाहेर पडतात. पण ह्या सुधारणा जितक्या जास्त होतात तितकें मनुष्याला दुःख जास्तच होतें. जी विद्या नोकरीचें साधन आहे ती अपूर्णच असते. असली विद्या पोटापुरतीच समजावी, ती समाधान देऊं शकणार नाहीं. समाधान देणारी विद्या निराळीच आहे. म्हणून लौकिक विद्येला फार महत्त्व देऊं नये. बाहेर हिंडण्यासाठीं जोडा अत्यंत आवश्यक आहे खरा, पण तो पायामध्यें घालून देवघरात जाऊं नये. एखादे वेळीं आपल्याला असा संशय येतो कीं, जगात कुठें सुख, समाधान, आणि आनंद आहे का ! पण जी वस्तु जगात नाहीं तिचें नांवच कसें निघेल ! असमाधान याचा अर्थच " समाधान नाहीं तें. " यावरून असें स्पष्ट दिसतें कीं, आधीं समाधान असलेंच पाहिजे. दिवाळीमध्यें, सुखाचें जें असेल तें आज करतों आणि दुःखाचें जें असेल तें आपण उद्यावर टाकतों. ह्याचा अर्थ असा कीं, आपली काळजी नाहींशी झालेली नसूनहि आपण आजचा दिवस चांगला म्हणजे काळजीविरहित घालवितों उद्या पुन्हा काळजी आहेच. पण जो भगवंताचें स्मरण ठेवील त्याला काळजी केव्हाच नसते. ज्याची प्रत्येक कृति रामाच्या स्मरणामध्येंच होते, तोच रामराज्यात खरा राहतो हें निश्चित समजा.

---

**२४२. " भगवंत आहे " या भावनेपासून साधकानें सुरुवात करावी, आणि " भगवंत आहेच " या भावनेमध्यें समाप्ति करावी.**

# समाधानाचें स्थान एका रामावांचून नाहीं जाण !

**३० ऑगस्ट**

विषयीं गुंतले सर्व जन । चित्त मन तेथें केलें अर्पण । तेथें कोणास न येई समाधान । पावे सुख दुःख समसमान ॥ विषयाचा केला कंटाळा । परि मनावर बसला त्याचाच थारा । पैका हातीं खेळवला । त्यानें हात काळा झाला । हा दोष नाहीं पैक्याला । आपण त्याला सत्य मानला ॥ एका मानापोटीं दुःखाचें मूळ । हें जाणती सर्व सकळ ॥ वैभव संपत्तीचा सहवास । हाच दुःखास कारण खास ॥ संतति संपत्ति मान अपमान । हें जर मानावें समाधानाचें ठाण । तर तें आहे जगाचे संतांचे अनुभवाचें उलट ज्ञान ॥ प्रपंचीं समाधान । न सांपडे तेथून जाण ॥ म्हणून प्रपंचापरती नाहीं गती ॥ कैसें समाधान राहावें चित्तीं । कोळसा उगाळला भारी । तरी पण आपलें काळेपण कधीं न सोडी ॥ ऐसी विषयाची संगति तेथें कशी व्हावी समाधान वृत्ति ॥ व्यवहाराच्या चालीनें चालावें । वेळ प्रसंग पाहून वर्तावें । चित्तीं समाधान राखावें ॥ जोंवर जरूर व्यवहारांत राहणें । तोंवर त्याला जतन करणें । ज्याचा घ्यावा वेष । तैसें वागणें आहे देख ॥ आधीं स्वार्थ साधून घ्यावा । नंतर त्याचा त्याग करावा । कोणाचाहि ओळखावा धर्म । वागावें जाणोनिया वर्म ॥ जगाचें ओळखावें अंतःकरण । तैसें वागत जावें आपण । व्यवहारांत जैसें जगानें वागावें आपल्यापाशीं । तैसेंच वर्तन ठेवावें आपण दुसऱ्यापाशीं ॥ ज्याचा जो जो संबंध आला । तो तो पाहिजे रक्षण केला ॥ आपलेकडून कोणाचें न दुखवावें अंतःकरण । तरी व्यवहारांत जें करणें जरूर तें करावें आपण ॥ संगत धरावी पाहून । बाह्य भाषणावर न जावें भुलून ॥ मिष्ट भाषण वरिवरि । विष राहे अंतरीं । असल्याची संगत नसावी बरी ॥ ज्याचा त्यास द्यावा मान ॥ लहानाचें राखावें समाधान । मोठ्याचें पुढें व्हावें लीन । वागत जावें जगीं सर्वांस ओळखून ॥ मनानें व्हावें श्रेष्ठ । बाह्यांगीं राहावें कनिष्ठ ॥ न करावा कोणाचा उपमर्द । गोड भाषण असावें नित्य । आळसाला न द्यावा थारा । सगळ्या जीवनाचा घात ज्यानें केला ॥ पराधीनता अत्यंत कठीण हें खरें असे । पण त्याच्याशिवाय जगतांत कोणी नसे ॥ तरी व्यवहारांत मिंधेपणें न राहावें । आळशी-पण नसावें ॥ देह आळशी न ठेवावा हें जरी खरें । तरी त्याची परिस्थिति ओळखून वागणें बरें । प्रयत्नावांचून व्हावें हित । ऐसें न आणावें चित्तांत ॥ मागें काय झालें हें न पाहावें । उद्यां काय होईल हें मनीं न आणावें । आज व्यवहारांत योग्य दिसेल तसें वागावें ॥ प्रयत्नाचा कंटाळा न करावा । आज जें मिळालें तें घ्यावें । पुढें जास्त मिळविण्याचा प्रयत्न करावा ॥ विना केलें काम । न मिळत असे दाम ॥ धन संग्रहीं राखावें । सर्वच खर्चून न टाकावें ॥ थोडें थोडें लोकाचें देणें देत जावें । आणखी जास्त न करावें ॥ नोकरी ज्याची करणें जाण । त्याचें मानावें प्रमाण ॥ व्यवहारांत असावी दक्षता । अचूक प्रयत्न करावा सर्वथा ॥ प्रपंचांत असावें दक्ष । सत्याचा धरावा पक्ष ॥ जों जों प्रसंग येईल जैसा । प्रपंचांत वागेल तैसा । याचें नांव प्रपंचांत दक्षता ॥ व्यवहार करावा ऐसा जतन । कोणा न दाखवावें दैन्यपण ॥ व्यवहार करावा ऐसा जपून । कोणाचें नुकसान न होऊं द्यावें चुकून ॥ म्हणून भगवंताचें आहों आपण । ही मनीं ठेवावी ओळखण ॥ सर्व ठिकाणीं पाहावें रामाचें अधिष्ठान । तेणें मिळेल मनाला समाधान ॥ समाधानाचें स्थान एका रामावांचून नाहीं जाण । म्हणून राम ठेवील त्यांत मानावें समाधान । राखून नामाचें अनुसंधान ॥

---

२४३. प्रयत्नावांचून व्हावें हित । ऐसें न आणावें चित्तांत ॥

# " मी समाधानरूप आहें; ज्याच्या घरांत समाधान आहे तेथें मी आहें "

**३१ ऑगस्ट**

मनुष्य मला भेटला कीं तो सुखी किती आहे हें मी पाहतो. त्याच्या इतर गोष्टी मी पाहत नाहीं. पण तुम्ही त्याची श्रीमंती, विद्या, मान, यांवरून तो सुखी आहे कीं नाहीं हें ठरवतां. भगवंतावाचून मनुष्य कसा सुखी होईल ? लोकांना श्रीमंत आवडतो तर मला गरीब आवडतो. लोकांना विद्वान् आवडतो, तर मला अडाणी आवडतो. असें माझें सगळें जगाच्या उलट आहे. पण म्हणूनच जगाच्या उलट माझ्याजवळ समाधान आहे. मला रिकामपण पुष्कळ होतें, म्हणून मीं समाधान कशांत आणि कुठें आहे याचा शोध लावला. प्रपंचांत परमार्थ कसा आणावा, परमार्थ व्यवहारांत कसा वापरावा, याचें शास्त्र मला चांगलें माहीत आहे. जो माझा आहे पण समाधानी नाहीं त्याच्याजवळ राहायला मला कष्ट होतात. मी समाधानरूप आहे. ज्याच्या घरांत समाधान आहे तिथें मी आहें. मला जें आवडतें तेंच रामाला आवडतें. आजपर्यंत मी एकच साधन केलें, कोणाचें मन कधीं दुखवलें नाहीं, आणि एका नामावांचून दुसऱ्या कशाचीहि आठवण ठेवली नाहीं. मी अत्यंत समाधानी आहें, तसें तुम्हीसुद्धां अत्यंत समाधानी राहा कीं झालें ! माझ्याजवळ काय आहे तें सांगा ! विद्या नाहीं, पैसा नाहीं, किंवा कला नाहीं. पण सर्वांवर मी अत्यंत निष्कपट प्रेम करतो, त्यामुळें लोकांना मी हवासा वाटतो आणि त्यांना माझा आधार वाटतो. जगाचा स्वभाव मला पक्का माहीत आहे. म्हणून आजपर्यंत मला कोण काय म्हणतो हें मी पाहिलें नाहीं. मी त्याला काय सांगायचें एवढेंच मी पाहिले. माझें सांगणें ऐकल्यानंतर पुनः तुम्ही ऐकायला येतां, याचीं तीन कारणें असूं शकतील. एक, मला चांगलें सांगतां आलें नसेल, दुसरें, तुम्हांला तें समजलें नसेल, किंवा तिसरें, सांगितलेलें तुम्ही विसरला असाल. तुम्हीं माझ्याशीं अगदीं स्वाभाविक रीतीनें बोलावें; आपण आपल्या घरांतल्या माणसांशीं जसें बोलतों तसें अगदी आपलेपणानें माझ्याशीं बोलावें पण माझ्याशीं कुणी कसाहि आणि कांहींहि बोलला तरी मला जें सांगायचें तेंच मी त्याला सांगत असतों. मी एखाद्याला सांगत असतांना " **यानें माझें ऐकलें तर त्याचें कल्याण होईल** " असें आपोआपच माझ्या मनांत येतें. " **माझें जो ऐकेल त्याचें खास कल्याण होईल** " याची मला खात्री असतें. पण कल्याण म्हणजे प्रपंचातील सुधारणा नसून, आहे त्या परिस्थितीमध्यें समाधानानें राहणें होय. माझ्या माणसाच्या प्रपंचाला मी मदत करणार नाहीं असें नाहीं; पण त्याचा प्रपंच त्याच्या परमार्थाचा प्राण घेईल इतकी मदत मी करणार नाहीं; अशी केली नाहीं तर तो रडेल, त्याची माझ्यावरची श्रद्धा थोडी कमी होईल. पण तो जगेल हें मात्र निश्चित होय; आणि जगल्यावर तो आज ना उद्यां नाम घेईल. रोगी मेल्यानंतर त्याला औषध देऊन काय उपयोग आहे ! मीं एकदां बीज पेरून ठेवतों. आज ना उद्यां त्याचें झाड झाल्याशिवाय राहणार नाहीं.

---

२४४. साधकानें बाहेर गोड बोलावें आणि आत भगवंताचें गोड नाम घ्यावें; त्यानें आंत-बाहेर गोड असावें.

# जीवाचें कल्याण व्हावें म्हणून भगवंताचें स्मरण करावें

१ सप्टेंबर

सृष्टीच्या स्वरूपाचें आणि भगवंताच्या स्वभावाचें ज्ञान आपल्याला आहेच, पण दुसऱ्यावर प्रसंग आला असतांना तें ज्ञान आपल्यामध्यें जागृत राहतें, आणि आपल्या स्वतःवर प्रसंग आला म्हणजे आपण तें विसरतों; याचें कारण म्हणजे भ्रम किंवा माया. आपलें ज्ञान हें देहबुद्धीचें आहे; तेव्हां ही देहबुद्धि कमी करायला आपण स्वतःच स्वतःला शिकवायचें असतें. आपलें जगणें अशाश्वत आहे हें प्रत्येकाला कळतें, पण हें कळूनदेखील आपण आपलें खरें हित करून घ्यावें ही बुद्धि होत नाहीं याला काय करावें ? आपल्या बायकामुलांची तरतूद जशी आपण आपला विमा उतरून करतों त्याच-प्रमाणें, आपल्या जीवाचें कल्याण व्हावें म्हणून भगवंताचें स्मरण करणें अवश्य नाहीं का ? सध्याच्या सुधारणेनें देहाचें सुख पुष्कळ वाढविण्याचा प्रयत्न केला, पण तें शेवटीं दुःखालाच कारण झालें. समजा, देहाचें पुष्कळ सुख समोर आहे, पण तें भोगण्याची जर आपल्याला शारीरिक शक्ति अथवा सांपत्तिक सुबत्ता नसेल तर त्याच्या प्राप्तीमुळेंसुद्धां दुःखच पदरांत पडेल. सगळ्यांना सगळें सुख मिळणें केव्हांच शक्य नसल्यामुळें प्रत्येकजण धडपड करून शेवटीं दुःखीच राहतो. सुख आणि दुःख हीं दोन्हीं वस्तुतः उत्पन्न झालींच नाहींत. तीं आपण आपल्या भ्रमानें उत्पन्न केलीं आहेत. मनाच्या सुलट झालें कीं सुख होतें आणि मनाच्या उलट झालें कीं दुःख होतें. मुळांत सुखहि नाहीं आणि दुःखहि नाहीं. "मी देही" ही भावना जोंपर्यंत आहे तोंपर्यंत अनुभवाच्या बरोबर भ्रम हा असायचाच. सृष्टि ही आनंदमय असूनहि तशी ती आपल्याला दिसत नाहीं हा आपला भ्रम आहे; त्या भ्रमाचें मूळ आपल्या आंतमध्यें आहे. भगवंत तिथें माया, काया तिथें छाया, हें जसें खरें त्याप्रमाणें, अनुभव तिथें भ्रम असायचाच हा नियम आहे. पांचजण मिळून प्रपंच बनतो, त्यामध्यें प्रत्येकजण स्वार्थी असतो; मग सर्व सुख एकट्यालाच मिळणें कसें शक्य आहे ? एका गांवाहून दुसऱ्या गांवीं बदली झालेला मनुष्य, आतां दोनतीन वर्षें तरी निदान आपली बदली होत नाहीं म्हणून निश्चित असतो. या प्रपंचामध्यें आपल्या आयुष्याची तितकीसुद्धां निश्चिती नाहीं. याकरितां आपण आयुष्याचा एकएक क्षणसुद्धां फुकट न घालवितां सत्कर्मांत, म्हणजेच भगवंताच्या अनुसंधानांत, व्यतीत करावा. आपला शत्रु भेटून त्याच्याशीं भांडण झाल्यामुळें गाडी चुकली काय, किंवा कोणी मित्र भेटून त्याच्याशीं प्रेमानें बोलण्यांत गाडी चुकली काय, दोन्ही सारखेंच. त्याप्रमाणें प्रपंच अत्यंत अनुकूल असून त्यामध्यें गुंतून राहिल्यामुळें भगवंताला विसरलें काय आणि प्रपंचामध्यें आघात झाल्यामुळें भगवंताला विसरलें काय, दोन्ही सारखेंच. नुकसान एकच. म्हणून भगवंतावांचून जगांत दुसरें सत्य नाहीं असें मनापासून वाटल्यावर जो कांहीं प्रपंच घडतो तो परमार्थ समजायचा.

---

२४५. समुद्राचा तरंग असतो, तरंगाचा समुद्र असतो असें नव्हें. त्याप्रमाणें "देव माझा आहे" असें म्हणण्याऐवजीं "मी देवाचा आहे" असें म्हणावें, म्हणजे श्रद्धा उत्पन्न होते.

# नामस्मरणानें काय साधतें हें ज्याला कळत नाहीं त्यानेंच दुःख करावें

२ सप्टेंबर

मानवी उपचार कितीहि केले तरी जगणें आपल्या हातचें नाहीं. तसेंच, परमेश्वर ज्याचें रक्षण करतो त्याला कोणीहि मारूं शकत नाहीं. भगवंताची माया हीच कीं, आईच्या पोटांतून बाळ बाहेर आला कीं 'हा जन्माला आला' असें आपण म्हणतों आणि देवाला नवस करून त्याला जगवायचा प्रयत्न करूं लागतो. पण एक दिवस हा जाणारच हें ज्याला खरें पटलें तो नाहीं देवाजवळ असें मागणार. खरोखर ज्ञानी तोच कीं ज्याला संतांजवळ किंवा देवाजवळ काय मागावें हें बरोबर समजतें. 'मुलगा जगला तर त्याला देवाला अर्पण करीन' असें माणूस म्हणतो. अर्पण करणार म्हणजे आपलेपणा सोडणार; मग तो आज मेला तरी कुठें बिघडलें ! जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटणें हें मागून घेण्यापेक्षां, मरण चुकवावें हें म्हणणें किती वाईट आहे ! मरणाला जें कारण झालें तें चुकवावें. मूल जन्माला आलें कीं तें रडतें, कीं आतां पुढें कसें होईल; आणि आम्ही मात्र साखर वाटतो ! मुलगा जगावा असें आम्हांला वाटतें तें आमच्या सुखाकरितां. वास्तविक आम्हीं दररोज जगतों आणि मरतों. एकदां निजला आणि पुन्हां नाहीं जागा झाला कीं तें मरणच नव्हे का ? स्वतःला विसरणें, "मी कोण" हें न जाणणें, हें मेल्याप्रमाणेंच आहे. मरण येणार हें नक्की ठरलेलेंच आहे; मग तें चांगलें यावें असें नाहीं का वाटूं. ज्यानंतर पुनः जन्म नाहीं तें चांगलें मरण. जो मरतो त्याचा आपण शोक करतों, पण तो आपण आपल्या सुखाकरितांच करतों. 'देव आज लोपला' असें म्हणतो. मी जसा विषयांत मरतों तसेंच सर्वांनीं व्हावें असें आपल्याला वाटतें. खरोखर, नामस्मरणानें काय होतें हें ज्याला कळत नाहीं त्यानेंच दुःख करावें. **भाग्याचा दिवस तोच कीं ज्या दिवशीं नामस्मरणामध्यें देहाचा अंत झाला.** याकरितां आलेली संधि वायां जाऊं देऊं नये. बुद्धि जोंवर स्थिर आहे तोंवर कार्य साधून घ्यावें. आजची बुद्धि उद्यांला टिकत नाहीं असें आपलें आज चाललें आहे. संकल्पविकल्पांनीं आपण बेजार होतों. तेव्हां ज्या वासनेंत आपला जन्म होतो ती वासनाच भगवंताच्या नामानें मारून टाकावी. नामांत राहणें म्हणजेच वासना मारणें, म्हणजेच मरणातीत होणें. भगवंताचें होऊन राहणें हाच मरण टाळण्याचा खरा उपाय आहे. काळाचाहि जो काळ त्याला ओळखल्यावर मरणाची भीति कसली ! ज्ञानी नाहीं मरणाची काळजी करीत. नुसतें जिवंत राहणें हें कांहीं खरें नव्हे. जगणें दुसऱ्या कशासाठीं तरी असलें पाहिजे, ही वृत्ति असावी. जगून अनुसंधानामध्यें राहावें. जगामध्यें लढाई ही नेहमींच चालूं असते. आपल्या आंतमध्येंसुद्धां लढाई चालूं आहे. जगामध्यें अस्वस्थता ही असायचीच. जगाची ही वहिवाटच आहे. त्यामध्यें वाईटाबरोबर चांगल्यालाहि थोडा त्रास होत असतोच. आपण मात्र भगवंताच्या अनुसंधानांत असावें.

---

२४६. ज्याच्या प्रपंचामध्यें पाठीराखा परमात्मा आहे त्याचा तोच परमार्थ होतो. ज्याचा पाठीराखा अभिमान आहे तो प्रपंच समजावा.

# भगवंत साक्षात् पुढें उभा आहे असें समजून नामस्मरण करावें

३ सप्टेंबर

आपापल्या स्वभावानुसार प्रत्येकाला कोणत्या ना कोणत्या तऱ्हेनें भगवंताची ओळख करून घेता येईल. मारुतीनें दास्यत्वानें भक्ति केली, दशरथानें पुत्राप्रमाणें देवाला मानलें, भगवंत माझा कसा होईल याचा आपण विचार करावा. भगवंताच्या प्राप्तीसाठीं भक्ति हें सर्वांत श्रेष्ठ साधन सांगितलें आहे. मनुष्य जें प्रेम व्यसनात लावतो तें भगवंताकडे लावलें तर सर्व काम होतें; हट्टी आणि व्यसनी माणसें एक प्रकारें चांगली. त्यांचें मन त्यांना सांगत असतें कीं या व्यसनापायीं आपल्या मुलाबाळांचेंहि नुकसान होतें आहे, पण आपलें व्यसन ते हट्टानें सोडीत नाहींत. हाच हट्ट किंवा निश्चय भगवंताकडे लावला कीं परमार्थ झाला ! माझे गुणदोष मीं देवाला वाहिले कीं अर्पणभक्ति होते. आपण देवाची भक्ति करतों, परंतु त्या भक्तींत खरे प्रेम येत नाहीं; याचें कारण म्हणजे आपली दृष्टि चारी दिशांना फाकलेली असते. ती प्रथम एकाग्र करावी. थोडें करावें, पण एकाकार होऊन करावें. कंटाळवाणेपणानें परमार्थ करूं नये. माझ्या भावनेला व्यक्त व्हायला योग्य दिशा कशी मिळेल इकडे लक्ष द्यावें. परमात्मा पंढरपुरांत आहे असें साधुसंत म्हणत आले, परंतु आपल्याला तो दगडच दिसतो, हा दोष कुणाचा ? आपल्या भावनेचाच. सूर्य प्रकाशला असतांना मी तळघरांत दार लावून बसलों तर उजेड कसा मिळेल ? भगवंताजवळ आपला पूर्ण भाव ठेवावा. दिवा थोडा बाजूला झाला कीं वाट चुकते; म्हणून सतत भगवंताकडे नजर ठेवून वागावें. साधनावर सतत जोर द्यावा तालसुरावांचून प्रेम येत नाहीं असें थोडेंच आहे ! मी ज्याच्यापुढें भजन म्हणतो तो तें ऐकतो या समजुतीनें म्हटलें म्हणजे झालें. जशी भावना ठेवूं तशी कृति होते. भगवंताचा मी आहे असें म्हणवून घ्यावें, त्याची कृपा केव्हा होईल ही तळमळ बाळगावी, आणि मी जें करतों तें मनापासून करतों कीं नाहीं हें पाहावें. झाल्या गेल्याचें दुःख करूं नका, उद्यांची काळजी करूं नका आणि आजचें अनुसंधानहि चुकवूं नका. भगवंत साक्षात् पुढें उभा आहे असें समजून नामस्मरण करावें. देवळांत जाऊन देवाला भेटावें. प्रत्येक नामांत "भगवंत कर्ता" असें म्हणावें, म्हणजे अभिमान वाट अडवणार नाहीं. लहानींचें सुखदुःख न वाटणें ही खरी भक्तीची प्रगति होय. देहाच्या कर्तव्याच्या मर्यादा सांभाळून विषयांतली वृत्ति भगवंताकडे लावणें हेंच खरें सीमोल्लंघन होय. जो अत्यंत आकुंचित्त आणि स्वार्थी आहे, तसेंच जो "माझ्या सुखाकरितां सर्व जग आहे" ही बुद्धि ठेवतो, तो मनुष्य अभिमानी समजावा, मनुष्य जितका स्वार्थी तितका तो पराधीन असतो. पांचजणांपासून सुख मिळविण्याचा मार्ग म्हणजे प्रपंच, आणि एकापासून सुख मिळविण्याचा मार्ग म्हणजे परमार्थ होय. 'मी नाहीं आणि तूं ( म्हणजे भगवंत ) आहेस,' किंवा 'मी तोच ( म्हणजे भगवंत ) आहें' असें जाणणें, आणि नंतर तसें कृतींत घडणें, हेंच परमार्थाच्या तत्त्वज्ञानाचें सार आहे; आणि हें साधायला भगवंताचें अनुसंधान हेंच मुख्य साधन आहे.

---

**२४७. तुम्ही इतक्या लोकांना नामस्मरण करतांना पाहून मला एक समाधान असें वाटतें कीं, मला जी गोष्ट आवडते ती इतक्या लोकांना आवडूं लागली आहे.**

# प्रपंचांतील गढूळपणा पांडुरंगाची आठवण ठेवल्यास नाहींसा होईल

**४ सप्टेंबर**

संतांना वरवर पाहून त्यांचें अंतरंग कसें जाणता येईल? राग संतांनासुद्धां येतो पण तो त्यांचें स्वाधीन असतो हें नाहीं आपण पाहात. या जन्मांत पुण्य करून पुढें स्वर्गसौख्य भोगावें असें वाटतें, पण साधुसंतांकडे गेल्यावर भगवंत कसा भेटेल म्हणून विचारतां याला काय म्हणावें! संगतीप्रमाणें, स्मरणाप्रमाणें, रूप बनतें आणि रूपाच्या मागें गुणहि येतात. वैभव सोडून परमेश्वराच्या पाठीमागें जे लागले त्यांच्या पाठीमागें वैभव लागतें हें तुम्ही पाहातांच. पांडुरंगाची आठवण हेंच सत्यतेला मुख्य कारण. पण हेंच मोठें कठीण असतें स्मरण तरी कशासाठीं करायचें हें समजलें पाहिजे. गंगामाईंत स्नान केलें तर मी पवित्र झालों असें वाटलें पाहिजे. वाहात आलेले नाले जरी तिच्यांत मिसळले असले तरी गंगामाईचें पवित्रपण कायम राहतें, त्याप्रमाणें आमचा प्रपंच कितीहि गढूळ असला तरी पांडुरंगाची आठवण त्यांत ठेवली तर त्याचें गढूळपण मग कोठून राहील? संतांच्या शब्दाचें प्रेमळ पाणी मातीनें भरलेल्या हातावर घातलें तर तें स्वच्छ होतीलच. भगवंताचें स्मरण तर सर्व तीर्थांचा राजाच आहे. भगवंताच्या विस्मरणाला जें कारण होतें तें टाकणें किंवा सोडणें हें वैराग्य होय; आणि भगवंताचें स्मरण होईल अशा गोष्टी करणें हा विवेक होय. खरें म्हणजे आपल्याला भगवंताच्या प्राप्तीची तळमळ लागायला पाहिजे. **मागचें सोडलेलें आहे आणि पुढचें हातीं आलेलें नाहीं, अशी जी मधली अवस्था ती तळमळ होय.** बाह्य जगाचें जे आघात आपल्यावर होतात त्यामुळें आपल्या मनाची जी प्रतिक्रिया होते (ती सुखाची, दुःखाची, अभिमानाची, कामाची किंवा लोभाची असूं शकेल.) तिचें नाव वृत्ति. ही वृत्ति स्थिर ठेवणें हा खरा परमार्थ होय. परमात्म्याकडे वृत्ति वळविणें म्हणजेंच भक्ति करणें होय. संगतीनेंच पुढें बेमालूम संवय लागते; त्याचप्रमाणें भगवंताच्या भक्तीनें विषय बेमालूम नाहींसा होतो. भक्ति अत्यंत स्वाभाविक आहे. ती प्रत्येकाला हवींच असते; कारण भक्ति म्हणजे आवड, आणि कसल्यातरी आवडीशिवाय मनुष्यच सांपडणार नाहीं. अभिमानरहित राहिल्याशिवाय मात्र भक्ति करतां येणार नाहीं, आणि भक्तिविणें भगवंत नाहींच प्राप्त होणार. खरोखर रामरायाचें अंतःकरण कर्तव्याला कठोर, निष्ठुर आहे, पण भक्ताला तें अत्यंत कोंवळें आहे. कर्तव्यासाठीं त्यानें सीतामाईला अरण्यांत सोडली तर त्यानें प्रेमासाठीं भरताला सांभाळला भगवंताचें प्रेम हें भगवंतावांचून इतर कोणाला देतां येत नाहीं, तोंच तें देऊं शकतो. भक्त आणि भगवंत हे दोन नाहींतच. म्हणून भगवंत हा जसा सर्व ठिकाणीं आहे तसा भक्त पण सर्व ठिकाणीं असतो. भक्त भगवंतमय होतो म्हणून त्याला सर्व जगतांत आनंदच दिसतो. शिष्याला जो भगवंताचा आनंद मिळाला तो कदाचित् गुरूलाहि मिळाला नसेल, कोणीं सांगावें!

**२४८. भगवंताच्या स्मरणांत कर्तव्य केलें, कीं जीवनांत आनंद उत्पन्न होतो.**

# अहंकारादि अपवित्र वस्त्रें टाकून नीतीनें जो नामांत राहील त्याला खचित भगवंताची प्राप्ति होईल

५ सप्टेंबर

एकदा एक बाई सोवळें नेसून स्वयंपाक करीत होती. बाईचें मूल झोंपून उठल्यावर अंथरुणातच "आई, मला घे," म्हणून रडूं लागलें. आई म्हणाली, "बाळा, मी तुला घ्यायला आतुर झाले आहे रे, पण तूं कपडे तेवढे काढून ये. परंतु मुलगा कपडे काढायला तयार होईना, आणि "आई, आई" म्हणून रडूं लागला. तेव्हां शेजारच्या बाईनें येऊन मुलाचे कपडे काढले, आणि मग आईनें मुलाला पोटाशीं घेतलें. आपलेंहि त्या लहान मुलाप्रमाणेंच झालें आहे. वासना, विकार, अहंभाव, इत्यादींचें कपडे न काढतांच आपण परमेश्वराला भेटायची इच्छा करतों, मग त्याची नि आपली भेट कशी होणार ? परमेश्वर मातेप्रमाणेंच अत्यंत प्रेमळ आणि ममताळू आहे. त्याला आपल्याला भेटायची अतिशय इच्छा आहे, परंतु जोंपर्यंत आपण आपल्या अंगावरचीं अपवित्र आवरणें काढून टाकीत नाहीं तोपर्यंत परमेश्वर आपल्याला जवळ घेत नाहीं. संत आपल्याला परमेश्वराकडे जायचा रस्ता सांगतात, त्या मार्गानें गेलों तर आपल्याला खचितच भगवंताची प्राप्ति होईल. आपण पुराणांत वाचलेंच असेल कीं, श्रीकृष्णाकडे दुर्योधन आणि अर्जुन गेले असतांना श्रीकृष्ण परमात्म्यानें सांगितलें कीं, "ज्याला मी हवा असेन त्याला माझें सर्व सैन्य आणि इतर गोष्टी मिळणार नाहींत." हें ऐकून दुर्योधनानें त्याचें सर्व सैन्य मागून घेतलें. अर्जुनाला खरा आनंद झाला कीं आपल्याला हवी असलेली गोष्टी मिळते आहे. कारण तो हे जाणून होता कीं, एका परमेश्वरावांचून बाकी सर्व व्यर्थ आहे. प्राणावांचून हजारो शरीरांचा काय उपयोग ? कोणी आपल्याला सांगतीलहि कीं परमेश्वर सातां समुद्रापलीकडे आहे, तो शेषशायी आहे, तेव्हां आपल्यासारख्या सामान्य माणसाला तो प्राप्त होणें अत्यंत कठीण गोष्ट आहे. परंतु संतांनी आपल्यावर फार मोठे उपकार करून ठेवले आहेत. त्यांनी नामरूपी जादूचा दिवाच आपल्या हातीं दिला आहे, त्यांत सत्संगतीचें तेल घातलें म्हणजे झालें. हा दिवा विझूं नये म्हणून मात्र फार काळजी घ्यावी लागते. मी त्रिवार सत्य सत्य सांगतों कीं, नीतीनें वागून जो नामांत राहील त्याला नामाचें प्रेम लागल्याशिवाय राहणार नाहीं. नीति हा सर्वांचा पाया आहे, त्या पायाशिवाय इमारत टिकूं शकणार नाहीं. तीन गोष्टींना अत्यंत जपा. परस्त्री मातेसमान माना, परधन आणि परनिंदा विष्टेसारखी माना (विष्टा कितीहि चांगली झाली म्हणून ती का कोणी अंगाला लावून घेतो !), आणि कशाहि परिस्थितींत नामस्मरणाला सोडूं नका; तुम्हाला भगवंताचें प्रेम खात्रीनें लागेल. इतर ठिकाणीं एक वेळ माणूस खोटें बोलेल, परंतु मी इथें रामापुढें त्याच्या दारीं बसून खोटे कसें सांगेन !

---

२४९. माझ्याकडे येऊन शिकायचें असेल तर हें हेंच कीं परमात्मा सर्व करतो ही भावना ठेवायला शिकावें.

# नाम घेत असतां विचार विसरावा व परमेश्वर आठवावा

६ सप्टेंबर

[ बेलधडी येथें काकड आरतीनंतर झालेलें निरूपण :–] ही पहाटेची वेळ खरोखर फार चांगली. ह्या वेळीं कोणी मानसपूजा करीत असतील तर तें फारच उत्तम. कोणी या वेळीं झोपेंत असतील, तर कोणी मनोराज्येंहि करीत असतील. या पहाटेपासून तो रात्रीच्या झोपेपर्यंत, मग तो राजा असो किंवा रंक असो, सर्वांची एकच धडपड चालू असते, आणि ती म्हणजे समाधान मिळवायची. प्रत्येकाच्या जीवनाला समाधानाची ओढ लागलेली असते, वास्तविक खरें समाधान हें कशावरहि अवलंबून नाहीं. तें " राम कर्ता " ही भावना बाळगल्यानेंच मिळूं शकतें. समाधान मिळवायचें एक अत्यंत सोपें साधन सर्व संतांनीं स्वतः अनुभव घेऊन आपल्याला सांगितलें आहे, आणि तें म्हणजे नामस्मरण. तहान खरी लागली म्हणजे सहजपणें कोणत्याही नदीचें पाणी प्यालें तरी तहान भागते, त्याचप्रमाणें खरी तळमळ असली म्हणजे सहजपणें नामस्मरण होऊन समाधानाची प्राप्ति होते. पहाटेच्या वेळीं केलेला अभ्यास चांगला होतो असें म्हणतात. तेव्हां या नामस्मरणाच्या अभ्यासाला आपण पहाटेपासून सुरुवात करूं या. नाम घेत असतांना इतर विचार मनांत येत राहातात अशी सर्वांचीच तक्रार आहे; परंतु असें पाहा, एखादा मनुष्य रस्त्यानें चालला असला कीं त्याला रस्त्यांत कोण भेटावे हें कांहीं त्याच्या हातांत नसतें. शिवाय, त्याला कुणीं विचारलें कीं, 'तुला रस्त्यांत कोण कोण भेटलें ?' तर तो म्हणतो, माझें लक्षच नव्हतें. त्याप्रमाणें आपण नाम घेत असतांना या विचारांकडे दुर्लक्ष करावें, त्यांच्या पाठीमागें जाऊं नये किंवा त्याच्याबद्दल विचार करीत वेळ फुकट घालवूं नये. मला विचार विसरला पाहिजे, विसरला पाहिजे, असें म्हणून का त्याचें विस्मरण होणार आहे ? नामाकडेच जास्त लक्ष द्यावें म्हणजे विचारांचा आपोआप विसर पडतो आणि पुढें ते येईनासे होतात. एकदां वाट चुकल्यावर ती चुकीची वाट परत उलट दिशेनें चालावी लागते, आणि मग मुख्य रस्ता आल्यावर त्या रस्त्याला लागायचें. हाच अभ्यास, आणि हें सर्व ध्येय गाठेपर्यंत चालूं ठेवणें हीच तपश्चर्या. तपश्चर्या म्हणजे चिकाटीच होय. ब्रह्मानंदबुवांनीं खरी तपश्चर्या केली. पुढें भीमरावांनींहि तेंच चालू ठेवलें. त्यांनीं ज्या श्रद्धेनें हें सर्व चालू ठेवलें त्या श्रद्धेनेंच आपणहि चालू ठेवावें. ब्रह्मानंदबुवा एवढे विद्वान, परंतु त्यांनीं आपली सर्व बुद्धि रामचरणीं लावली. जगातल्या इतर गोष्टींपेक्षा हें केल्यानें आपलें खचितच कल्याण होईल असें वाटलें म्हणून त्यांनीं हा मार्ग पत्करला, आणि त्याला सर्वस्वीं वाहून घेतलें. तेव्हा मोठ्या लोकांनीं जें केलें त्या मार्गानें आपण संशयरहित होऊन चालावें, त्यांत आपलें कल्याणच आहे. नामांत राहा, आणि राम कर्ता ही भावना दृढ करा म्हणजे सर्व उत्तम होईल. काकड आरती झाली म्हणजे देवाचें स्मरण संपवावें असें नाहीं. किंवा सारखी काकड आरतीच करावी असेंहि नाहीं. भगवंताचें अखंड स्मरण आणि भाव पाहिजे. यांत सर्व कांहीं आलें. मला खात्री आहे, तुम्हीं आवडीनें आणि तळमळीनें हा अभ्यास चालू ठेवाल, तर राम तुमचें कल्याण करील.

---

**२५०. माझ्याजवळ जें आहे तें व्यावहारिक जगांत कुठेंहि तुम्हांला मिळायचें नाहीं, तें म्हणजे भगवंताच्या नामाचें प्रेम.**

# नारायणाच्या स्मरणांत लक्ष्मी मिळवावी व काळजीला दूर करावी

**७ सप्टेंबर**

काळजीचें कांहीं कारण नसतांना काळजींत राहण्याचें कांहींना व्यसन असतें. व्यवहारांत काळजी हा मोठा विकल्प आहे. काळजी जर पैशामुळें वाटूं लागली तर तो पैसाच दूर केला तर नाहीं का चालणार ? पैसा टाकून देऊं नका, पण पैशाच्या प्रेमांतहि राहूं नका. त्याच्यापासून वेगळेपणानें राहतां येतें याचा अनुभव घेऊन पाहावा जिवापाड श्रम करून जो कमवायाचा तोच जर दुःखाला कारण होऊं लागला तर काय उपयोग ? पैसा हा कांहीं आयुष्याचें सर्वस्व नव्हे किंवा सर्वश्रेष्ठ ध्येय नव्हे. व्यवहारामध्यें जीवाला पैसा असा आवश्यक आहे, आणि तो नीतीनें वागून आपल्या पोटापुरता कमावणें जरूर आहे. पैसा हा नीतिधर्मानेच मिळवावा. तो वाटेल त्या मार्गानें मिळविणें इष्ट नाहीं. पैसा गेला म्हणून कांहीं अब्रू जात नाहीं. आपली अब्रू आपल्या आचरणावर अवलंबून असते. समजा आपलें वय सध्यां बत्तीस वर्षांचें आहे' आणि एक ज्योतिष्यानें आपली कुंडली पाहून आपल्याला असे सांगितलें कीं, "पस्तीसाव्या वर्षी तुम्हाला मोठा धनलाभ होईल, आणि नंतर दोन वर्षांनीं तुमची एका सत्पुरुषाशी भेट होणार आहे." तर यांपैकीं कोणतें भविष्य आपल्या लक्षांत राहील ? पैसा मिळावा हें व्यवहारदृष्ट्या योग्यच आहे पण जर तो मिळाला नाहीं तर आपलें जीवन व्यर्थ आहे, असें कोणीं समजूं नये अशी म्हण आहे कीं, "पैसा पुरून उरावा इतका मिळावा." पण आपल्याला जगांत काय आढळतें ? जीवनामध्यें पैसा आपल्याला पुरतो आणि आपल्या उरावर नाचतो. हें कांहीं 'पुरून उरणें' नव्हे. याच्या उलट आपण त्याला पुरावें आणि त्याच्या छातीवर नाचावें. मनुष्य नेहमीं म्हणतो कीं, "माझ्या मुलांबाळांची तरतूद मला केली पाहिजे; मी काय, आज आहे आणि उद्यां नाहीं." पण आपण जसे खात्रीचे नाहीं तशीं आपलीं मुलेंबाळें तरी खात्रीचीं आहेत का ? ही गोष्ट माणसाच्या लक्षांतच येत नाहीं. आज आपली स्थिति अशी आहे कीं पैसा नसल्याबद्दल उदासपण आहे, कारण तो प्रपंचातल्या सुखाचें साधन आहे; पण त्याबरोबरच भगवंत हवा असेंहि आपल्याला वाटतें. आतां आपण आपल्या पैशाचे बरोबर दोन भाग करूं. आपल्या प्रपंचाला लागेल इतका पैसा प्रामाणिकपणें मिळवून आपण जगावें. जास्तीची हांव करूं नये; हा झाला आपला पैसा. अर्थात् राहिलेला सगळा तो दुसऱ्याचा. त्याचा लोभ करू नये. पैशाबद्दल रामचंद्राला उदासपण आलें असें योगवासिष्ठांत वर्णन आहे. तसें ते आपल्यालाहि लागूं आहे, पण फरक एवढाच कीं, रामाचें उदासपण पैसा असणेंपणाचें होतें आणि आपलें उदासपण पैसा नसणेंपणाचें आहे. श्रीमंत मनुष्य हा पैशासाठीं, म्हणजे लक्ष्मीसाठीं, सर्व जीवन खर्च करतो, पण ती त्याचा मुळासकट नाश करते. **म्हणून नारायणाच्या स्मरणांत लक्ष्मी मिळविली, कीं ती आपला नाश न करतां आपल्या आनंदाला कारण होते. लक्ष्मीची पूजा करण्याच्या आधीं नारायणाची आठवण करावी, म्हणजे मग काळजीचें कारण उरणार नाहीं.**

---

२५१. आनंद कृतीमध्यें आहे; फळांत किंवा फळाच्या आशेंत तो नाही. नामस्मरणरूपी कृति केली असतां शाश्वत आनंद खचितच मिळेल.

# भगवंताच्या स्मरणांत असणें म्हणजेच मायेच्या बाहेर असणें

**८ सप्टेंबर**

माया म्हणजे काय, तर जें परमात्म्याशिवाय असतें ती माया. जें दिसतें आणि नासतें ती सर्व माया. आपण जोंपर्यंत नामस्मरणांत आहोंत तोपर्यंत आपण मायेच्या बाहेर आहोंत, आणि जेव्हां त्याचें विस्मरण होतें तेव्हां आपण मायेच्या आधीन आहोंत असें समजावें. माया ही शब्दावडंबर केल्यानें सांगता येते. आंब्याचें चित्र दाखवून त्याच्या आकाराचें आणि गोडीचें कितीहि वर्णन केलें तरी तुमचें समाधान होईल का ? परंतु तोच आंबा प्रत्यक्ष तुमच्याकडे ठेवून तो खाल्यावर कांहींहि न सांगतां तुम्हांला त्याचें खरें ज्ञान होईल. म्हणून सर्व कांहीं करण्यामध्यें आहे, सांगण्यांत आणि ऐकण्यांत नाहीं. निर्गुणाचें कितीहि वर्णन केलें तरी निर्गुणरूप समजायचें नाहीं. म्हणून सगुणरूपच आपण पाहावें आणि त्याचेंच पूजन करावें. मागें एकजण मला म्हणाले, "मी निर्गुणाची उपासना करतो." असें जो म्हणतो त्याला खरें म्हटलें म्हणजे निर्गुण हें काय तें समजलेंच नाहीं. कारण तिथें सांगायलाच कुणी उरत नाहीं. एकानें मला सांगितलें कीं, "मीं सर्व वेदान्तग्रंथ वाचले आहेत." त्यावर मीं त्याला म्हटलें कीं, "तर मग तुम्हांला समाधान मिळालेंच आहे." त्यावर तो म्हणाला, "तेवढेंच काय तें मिळालें नाहीं." मग एवढें वाचून काय उपयोग झाला ! आपल्याला त्या वेदान्ताला घेऊन मग काय करायचें आहे ? आपण आपली भोळीभाबडी भक्तीच करावी. देवाला अनन्य शरण जाऊन त्याचें नामस्मरण करीत जावें म्हणजे सर्व कांहीं मिळतें. जो जेवायला बसतो तो माझे पोट भरावें असें कधीं शब्दांनीं म्हणतो का ? पण जेवण झालें कीं आपोआपच पोट भरतें ! तसें आपण वाचनाच्या वगैरे फारसें नादीं लागूं नये. कारण त्यानें खरें साधन बाजूलाच राहतें आणि त्या वाचनाचाच अभिमान वाढूं लागतो. म्हणून थोडेसें वाचावें आणि थोडें मनन करावें, पण सर्व स्वतःचें आहे असें समजूं नये.

शरीराच्या अगदीं लहान भागाला लागलें तरी सबंध देहाला वेदना होतात, त्याप्रमाणें दिवसाची एक घटका जरी आपण भगवंताच्या स्मरणांत घालविली तरी सबंध दिवस त्यामध्यें जाईल; आणि दिवसांचेच महिने, महिन्यांचेंच वर्ष आणि वर्षांचेंच आपलें आयुष्य बनलेलें असतें, या दृष्टीनें आपलें सर्व आयुष्य भगवंताच्या स्मरणांत जाईल. प्रपंचातलीं कर्तव्यें करणें हें पवित्र आहे खरें, पण त्यामध्यें गुंतून राहणें बरें नव्हे. म्हणून आपण मनानें भगवंताचें होऊन राहावें. आपण मनापासून भगवंताला स्मरलें तर तो आपल्याला सुखासमाधानांत ठेवल्याविना राहणार नाहीं. प्रपंचांत सुखी होणें म्हणजे भगवंताचें होणें हेंच होय. देवाला मानावें, आणि त्याला आवडेल तेंच करावें, हेंच परमार्थाचें सार आहे.

---

२५२. फार थोड्या लोकांनीं मला ओळखलें. नामामध्यें जे स्वतःला विसरले त्यांनाच खरा मी कळलों.

# " तूं आहेस, मी नाहीं " हीं स्थिति नामस्मरणाच्या योगानें झाली पाहिजे

९ सप्टेंबर

खरोखर, भगवंताचें अस्तित्व जिथें पाहावें तिथें आहे. भगवंत आहे कीं नाहीं हें जाणण्याकरिताच बुद्धीची देणगी आपल्याला मिळाली आहे. भगवंताचें वर्म ओळखायला, मीं कसें वागावें हें पाहावें. ज्यांनीं भगवंताला जाणलें त्यांनीं भगवंताला काय आवडतें हें सांगून टाकलें आहे. " सर्व विषयवासना सोडून मला शरण यावें." हें त्यांच्या सांगण्याचें सार आहे. हें आप्तवाक्य आपण प्रमाण मानलें पाहिजे; कारण स्वतः अनुभव घेऊन, म्हणजेच स्वतः मुक्त होऊन, त्यांनीं आपल्याला मुक्तीचा मार्ग दाखविला. जन्ममरणापासून जो आपल्याला मुक्त करतो तो खरा आप्त. जे भगवंताचे होऊन राहिले त्यांना जगाची भीति नाहीं वाटत. आपण विषयांना नेहमीं शरण जातोंच कीं नाहीं ? मग भगवंताला शरण जायला कां भ्यावें ? खरोखर सर्व चमत्कार करतां येतात. पण भगवंताला शरण जाणें फार कठीण आहे.

नामस्मरण करूं लागलों तर विषय हात धुऊन मागें लागतात. म्हणजे मी आंतबाहेर विषयानें किती भरलेला आहे ! तथापि कांहीं झालें तरी दृढनिश्चयानें नाम चालूं ठेवावें. प्रपंच करीत असतांना नाहीं कां वाईट विचार मनांत येत ? मग परमार्थ करीत असतांना तसे आले म्हणून भ्यायचें काय कारण ? प्रल्हादानें एकदां नाम जें घेतलें तें शेवटपर्यंत कांहीं सोडलें नाहीं; त्या नामानेंच तो तरला, त्या भावनेनेंच तो उद्धरून गेला. म्हणून ही भावना वाढण्याकरितां आपण नामाचें अखंड स्मरण ठेवावें. मागलीं पापें मनांत आणूं नयेत. माझा पूर्व संस्कार मी आपल्या बुद्धीनेंच ठरवितो; नाहीं का ? स्वतःचें मनच स्वतःला खातें याला काय करावें ? काल झालेलें आज नाहीं सुधारतां येणार, पण चालूं क्षण मात्र वायां दवडूं नका. निराश कधींच होऊं नका. प्रत्येक साधन आपल्या परीनें श्रेष्ठच आहे. साधनाला पतिव्रतेसारखें मानावें. भगवंताचें होणें हें सर्व साधनांचें आणि धर्माचें मूळ आहे हें पक्कें ध्यानांत ठेवावें. भगवंत जें जें करील ते तें सर्व होईलच. प्रपंच पुरा होण्याकरितां आपण मरेपर्यंत कामें करतों, मग भगवंताचें होण्याकरितां, भगवंत जोडण्याकरितां, थोडे कष्ट कां घेऊं नयेत ? खरोखर, भगवंताचा विसर पडणें ह्याहून दुसरें मोठें पाप नाहीं. देव हवा असें वाटणें ही देवाची बुद्धि, आणि विषय हवा असें वाटणें ही देहाची बुद्धि. वासना म्हणजे देवाच्या विरुद्ध असलेली आपली इच्छा. ही वासना, म्हणजे विषयाचें हवे-नको-पण, जसजसें कमी होईल तसतशी बुद्धि नामांत स्थिर होत जाईल. अशा तऱ्हेनें " तूं आहेस, मी नाहीं " ही स्थिति जेव्हां नामस्मरणाच्या योगानें आपली होईल तेव्हांच परमेश्वर आपण जोडला किंवा मी परमेश्वराचा झालों असें सार्थपणानें म्हणतां येईल. **निदिध्यासानें आनंदसाक्षात्कार होणें हाच मोक्ष होय.**

---

२५३. भगवंताकडे एकदा दृष्टि लागली कीं बाकीच्याचा त्याग आपोआप होतो.

# रामापायीं ठेवा मन । नाम ध्यावें रात्रंदिन

१० सप्टेंबर

राम हा तारक मंत्र निराकार । जपा वारंवार हेंचि एक ॥ हेंचि एक करा राम दृढ धरा । पुनरपि संसार येणें नाहीं ॥ येणें नाहीं पुन्हां सांगितली मात । जानकीचा कांत आळवावा ॥ पार्वतीरमण जपे राम नाम । विषाचें दहन तेणें झालें ॥ दीनदास म्हणें वाल्मीक तरला । पापी उद्धरिला अजामेळ ॥ जयासी लागला रामनामचाळा । आठवी गोपाळा सर्वकाळ ॥ सर्वकाळ मनीं संतांचे संगती । जोडिला श्रीपती येणें पंथे ॥ तिन्हीं लोकीं श्रेष्ठ रामनाम एक । धरूनी विवेक जपे सदा ॥ हनुमंतें केलें लंकेसी उड्डाण । रामनाम ठाण हृदयामाजीं ॥ दीनदास म्हणे वानर तरले ॥ नामीं रूपीं कोटि कुळें उद्धरती । रामनामाविणें साधन हे जनीं । बरळती प्राणी स्वप्नामाजी ॥ स्वप्नींचा विचार तैसा हा संसार । सोडुनि असार राम ध्यावा । रामनाम ध्वनि उच्चारित वाणी । पापाचीं ते धुरी होय तेणें ॥ सिंधूचें मंथन रत्नाची हीं खाण । तैसे हें साधन रामनाम ॥ वेदांचेंही खंड योगाचें तें बंड । त्याचें काळें तोंड दास म्हणें ॥ मन हेंचि राम देहीं आत्माराम । जनीं मेघश्याम पाहे डोळा ॥ पाहूनियां डोळा स्वरूपीं मुरावें । वाचेसी असावें रामनाम । नारायणनामें प्रल्हाद तरला । अजामिळ झाला एकरूप ॥ एकरूप झाले वसिष्ठ महामुनी । तया चापपाणी वश झाला ॥ दीनदास म्हणे स्मरे रघुनाथा । संसाराची चिंता त्यासी नसे ॥ जनीं जनार्दन रामाचें चिंतन । सत्याची ही खाण रामनाम ॥ गाईचें रक्षण भूतदया जाण । अतिथासी अन्न घाला तुम्हीं ॥ संताचा संग विषयाचा त्याग । रामनामीं दंग होऊनियां राहे ॥ राम कृष्ण हरि एकचि स्वरूप । अवताराची लीला वेगळाली ॥ दीनदास सांगे लावूनियां ध्यान । तुम्हीं आत्मज्ञान जतन करा ॥ यत्नपरोपरी साधनाचे भरी । औषळें घेतां करी तैसें होय । तैसें होय । म्हणुनी करा त्याग । साधावा तो योग रामनामें ॥ रामनामीं आस ठेवूनियां खास । वृथा न जाय श्वास ऐसे करा ॥ ऐसे करा तुम्ही संसारी असतां । वायां आणिक पंथा जाऊं नका ॥ दीनदासाचें बोल मानुं नका । फोल भक्त वत्सल राम हृदयीं धरा ॥ मनाचिया मागे जाऊं नका तुम्हीं । येतो आतां आम्ही, कृपा करा ॥ शेवटची विनवणी ऐका तुम्हीं कानीं ॥ संसारजाचणीं पडूं नका ॥ रामपाठ तुम्हां सांगितला आज । आणिकाचे काज नाहीं आतां ॥ नित्यपाठ करी माणगंगातीरीं । होसी अधिकारी मोक्षाचा तूं ॥ ब्रह्मचैतन्य नाम सद्गुरुचे कृपें ॥ दीनदास जपे राम सदा ॥

---

२५४. मनीं धरा राम हातीं धरा काम । वाऊगाची श्रम करूं नका ॥

# फाजील चिकित्सा न करतां भगवंताच्या स्मरणांत निर्धास्त असावें

**११ सप्टेंबर**

भगवंत आपलासा करून घेण्याचा प्रयत्न करावा. अभिमान सोडून जर असा प्रयत्न चालू ठेवला तर सद्‌गुरुकृपा झाल्याशिवाय राहात नाहीं. अमुक एक साधन करीत जा म्हणून सद्‌गुरूनें सांगितलें, आपण तें अट्टाहासानें करूं लागलों, पण आपले विचार जर आहेत तसेच राहिले तर भगवंताचें प्रेम येणार कसें? चारपाच वर्षे खूप कष्ट केले, विषय बाजूला ठेवले, पण अजून कसा अनुभव येत नाहीं; असें म्हणूं लागलों तर साधनाचा जोर कमी होतो आणि निष्ठा घसरायला लागते. जें काहीं होणार तें सद्‌गुरूच्याच इच्छेनें, त्याच्याच प्रेरणेनें होतें, अशी आपली ठाम श्रद्धा पाहिजे. साधनाचें प्रेम तो भगवंतच देतो हें आपण विसरून जातों. आठाचे आठ लक्ष झाले ते भगवंतानें केले असें एखादा साधा मनुष्य म्हणूं लागतो; पण आपण साधक, पूर्वी काहीं साधन करीत नव्हतों ते आतां करूं लागलों असा साधनाबद्दलच अभिमान बाळगूं लागलों तर काय उपयोग! सद्‌गुरूच्या पायावर एकदा डोकें ठेवलें कीं काहींचें काम होतें, यांत सद्‌गुरु पक्षपात करतात असें कसें म्हणतां येईल? आपलेंच कोठेतरी चुकत असलें पाहिजे याचा विचार करावा. मला पैका देतो म्हणतो, मग साधन मात्र मी करतो असें कसें म्हणावें? आजवर देवाचें नाव घेणें बरें असें वाटत होतें, परंतु घ्यायचें काहीं जमलें नाहीं; तें आतां घेऊं लागलों हें त्याच्या कृपेनें घेऊं लागलों हें नाहीं का समजूं? "कर्ता राम आहे" असें ज्याला वाटलें त्यानें सर्व काहीं साधलें. प्रपंचात मनुष्याला धीर हवा. आपण भगवंताच्या स्मरणांत निर्धास्तपणें असावें. फार चिकित्सा करण्यानें नुकसान होतें. विद्येचें फळ काय तर आपल्या मनाला जें बरें वाटेल त्याची चिकित्सा न करता तें करायचें, आणि आपल्याला जें करायचें नाहीं त्याची चिकित्सा करीत बसायचें! चिकित्सा मर्यादेपर्यंतच असावी. ती मर्यादेबाहेर गेली कीं, आपण काय बोलतों हें आपलें आपल्यालाच कळत नाहीं. आपण ग्रंथामध्यें जें वाचतों तें जर आचरणामध्ये आणलें नाहीं तर त्या वाचनाचा उपयोग काय? समजा, एक मुलगा रोज तालमीत जातो आणि चांगलें दूध, तूप खातो; पण तो जर दिवसेंदिवस वाळूं लागला आणि हडकुळा दिसूं लागला तर त्याला काहीं तरी रोग आहे असें नक्की समजावें. त्याचप्रमाणें सध्याच्या सुधारणेनें माणूस पाण्यावर, हवेंत, जिकडे तिकडे वेगानें जाऊं लागला आहे खरा, पण तो दिवसेंदिवस जास्त असमाधानी बनत चालला आहे, हें काहीं खऱ्या सुधारणेचें लक्षण नाहीं. परिस्थिति वाईट आली म्हणून रडूं नका, कारण ती बाधतच नसते. कोणत्याहि काळांत, कशाहि परिस्थितींत, आपल्याला आनंदरूप बनतां येईल. आजपर्यंतचा आपला अनुभव पाहिला तर "आपण केलें" असें थोडेंच असतें; म्हणून परिस्थितीबद्दल फारशी काळजी न करतां आपण आपलें कर्तव्य तेवढें करावें. आपल्या वृत्तीवर परिणाम होऊं देऊं नये. अभ्यास केला तर थोड्या दिवसांत हें साधेल.

---

**२५५. तुम्ही नुसतें 'नाम' घ्या, बाकीचें सर्व मी करतों.**

# अभिमान घालविण्यासाठीं भगवंताला मनापासून शरण जावें

**१२ सप्टेंबर**

आपण पाहतों ना, कीं लहानापासून मोठ्यापर्यंत आणि रावापासून रंकापर्यंत मनुष्याची सारखी धडपड चालूं असते, आणि ती म्हणजे समाधानासाठीं. लहानाचे मोठे झालों, विद्या झाली, नोकरी मिळाली, पैसा अडका मिळतो आहे, बायको केली, मुलेंबाळें झालीं, ज्या ज्या गोष्टींत समाधान मिळेल असें वाटलें त्या त्या करितां प्रयत्न केला, परंतु मग तरी समाधानाचा लाभ झाला का ? कोणतेंहि कर्म आपण करतों त्याचा मोबदला आपल्याला पाहिजे असतो. आपण नोकरी करतों, पण महिनाअखेर पगार मिळाला नाहीं त त्या नोकरीचा काय उपयोग ? तसें कोणतेंहि कर्म आपण त्या कर्मासाठीं करीत नसून त्याच्यापासून आपल्याला मोबदला पाहिजे असतो. जगांत अनेक शोध लागत आहेत, त्यांत शरीरसुखभोगाच्या साधनांचेच शोध जास्त आहेत. परंतु खऱ्या सुखाचा शोध, शाश्वत समाधानाचा शोध, एक साधुसंतच करूं शकतात. त्यांनीं समाधानाचीं म्हणून जीं कांहीं साधनें सांगितलीं आहेत त्यांचा अवलंब केला तर आपल्यालाहि खात्रीनें समाधान मिळेल. आज आपल्याला समाधान कां मिळत नाहीं ? तर आपला अभिमान त्याच्या आड येतो. कर्म करीत असताना, किंवा केल्यावर जर त्याबद्दल अभिमान झाला नाहीं तर आपल्याला भगवंताचें प्रेम लागून समाधानाची प्राप्ति होईल यांत शंका नाहीं. किती साध्या गोष्टींत आपला अभिमान डोकें वर काढीत असतो पाहा. एक गृहस्थ होते. त्यांना एक मुलगी होती. ती वयांत आली. दिसायला ती साधारण बरी होती. जवळ पैसाहि होता; परंतु त्या मुलीचें लग्न पांचसहा वर्षें कुठेंहि जमूं शकलें नाहीं. पुढें एकदां तिचें लग्न झाल्यावर तो म्हणाला, "माझ्या मुलीचें लग्न मीं थाटांत करून टाकलें." त्यावर त्याला कोणीं विचारलें, "मग दोनचार वर्षें आधींच कां नाहीं केलेंत!" तेव्हां तो म्हणाला, "त्यावेळीं जमलें नाहीं." मग लेका, आतां 'जमलें' म्हण कीं, 'मीं केलें असें कशाला म्हणतोस ? असो. अभिमान घालवायला भगवंताला मनापासून शरण जाणें हा उपाय साधुसंतांनीं स्वतः अनुभवून मग सांगितला आहे. एकदां माणूस एखाद्या घराण्याला दत्तक गेला, कीं त्याच्या मुलाला कांहीं त्या घराण्याचें नाव लावण्यासाठीं पुनः दत्तक जावें लागत नाहीं. तसेंच एकदां रामाच्या पायावर डोकें ठेवून, 'रामा, मी तुझा झालों आणि तूं माझा झालास,' असें अनन्यतेनें म्हटल्यावर, त्यापुढें होणारें आपलें प्रत्येक कर्म हें त्याचेंच होईल. तें त्याला अर्पण करण्याची जरुरी नाहीं. म्हणून होईल तें कर्म त्याचेंच मानावें. कोणतेंहि कर्म अर्पण केलें असताना 'अर्पण करणारा' उरतोच, तर तसें न व्हावें. भगवंताजवळ असें कांहीं मागा कीं पुनः दुसरें कांहीं हवेसेंच वाटणार नाहीं. भगवंताच्या नामाची एकदां गोडी लागली ना कीं सर्व कांहीं साधतें. नाम अभिमानाचा नाश करतें. नामानें हवे-नको पणाची बुद्धीच होत नाहीं. हेंच साधुसंतांनीं आवर्जून सांगितलेलें नाम तुम्हीं सतत घेऊन समाधानाचा शाश्वत ठेवा मिळवा, हाच माझा आशीर्वाद.

---

**२५६. शुद्धीमध्यें नाम घेण्याची जबाबदारी तुमची आहे, मग झोपेंत आणि बेशुद्धींत नाम घेण्याची जबाबदारी माझी आहे, ती मी सांभाळीन.**

# भगवंताला शरण जाऊन मनानें भगवंताशीं नातें जोडून ठेवावें

**१३ सप्टेंबर**

भगवंताला शरण जाण्यांत देहबुद्धि, अभिमान आड येतो, परिस्थिति आड येत नाहीं. ती व्यसनाच्या आड कुठें येते ! अभिमान जाण्यासाठीं उपाय म्हणजे जें जें कराल तें तें भगवंताला अर्पण करावें. तोंच कर्ता, आपण कांहींच करीत नाहीं, अशी भावना ठेवावी; म्हणजे अभिमानहि भगवंताला अर्पण करावा. आपण भगवंताशीं कांहीं ना कांहीं कारणानें संबंध ठेवावा. त्याच्याशीं बोलावें; त्याचें नाम घ्यावें; नामासारखें दुसरें खरें साधन नाहीं. एकदा ज्याला नामाची गोडी लागली त्याला प्रपंचाची भीति वाटूं लागते, इतके विषय त्याला कडू वाटूं लागतात. **वासरूं घेऊन गेलें म्हणजे जशी गाय पाठीमागून आपोआप येते, त्याप्रमाणें नाम घेतलें कीं भगवंत त्यामागें येतो.** परमात्म्याच्या नामानें संसार बिघडतो, हें म्हणणें चुकीचें आहे. नाम घ्यायचें म्हणून कर्ममार्ग सोडूं नये. नांवाची गोडी ज्याला आली त्याचीच कर्में सुटतात. नामांत प्रेम येईल असें करावें. नामाचा अनुभव नाहीं असें म्हणणें खोटें आहे; आपण तें जितकें घ्यावें तितकें घेतच नाहीं. जन्माला आल्यासारखें नामाचें होऊन राहावें. भगवंत आपल्या नामस्मरणांत आहे. वाचेनें खरें वा खोटेंहि बोलतां येतें. पण खऱ्याकरितां परमेश्वरानें वाचा दिली आहे. 'तुझ्या नामांत मला गोडी दे' हेंच भगवंताजवळ मागावें. शुद्ध भावनेशिवाय सर्व व्यर्थ आहे; आणि भाव शुद्ध होण्यासाठीं सत्समागमावांचून दुसरा उपाय नाहीं. एकदां त्याचें होऊन राहिलें म्हणजे तोच सर्व उपाय काढतो. मी अमुक एक साधन करीन असें म्हणूं नये. परमेश्वरा, तूंच माझ्या हातून करवून घेणारा आहेस अशी दृढ भावना ठेवावी. समजा, आपण एक व्यापार केला, पण त्यासाठीं एकानें आपल्याला भांडवल दिलें, तर त्या माणसाला आपण कधींहि विसरत नाहीं; त्याच-प्रमाणें ज्या भगवंतानें आपल्याला विद्या, पैसा, प्रकृति दिली त्याला आपण कधींहि विसरूं नये. भगवंत हा सहजसाध्य आहे, सुलभसाध्य नाहीं निसर्गानें जें आपल्याकडे येतें, तें सहज होय. म्हणून, सहजसाध्य याचा अर्थ फलाची अपेक्षा नसणें आणि कर्तव्याचा अभिमान नसणें हा समजावा.

सूर्याजवळ ज्याप्रमाणें काळोख नाहीं, त्याप्रमाणें ज्या अंतःकरणामध्यें भगवंत आहे, तेथें बिलकुल संशय नाहीं. भगवंतानें आपल्याला ज्या स्थितींत ठेवलें आहे त्यांत समाधान मानून त्याचा विसर पडूं न द्यावा. जो स्वतःपासून दूर आहे त्याला भगवंत दूर आहे, जो बाह्य दृष्टीनें पाहतो त्याला भगवंत दूर आहे; जो अंतरंग पाहतो त्याला तो जवळ आहे. आपण मनुष्यजन्माला आलों हीच आपण भगवंताचें होण्याची खूण आहे. भोग आणि दुःख यांत वेळ न घालवितां भगवंताकडे लक्ष दिलें पाहिजे. याच जन्मांत सुविचारानें आणि सद्बुद्धीनें भगवंत आपलासा करणें हेंच आपलें खरें कर्तव्य आहे. याकरितांच सतत त्याचें ध्यान करावें आणि मनांतून आपलें भगवंताशीं नातें जोडून ठेवावें यासारखा दुसरा सुलभ उपाय नाहीं.

---

२५७. आयुष्यांत कांहीं दिवस तरी "मी कोणाचा नोकर नसून मी भगवंताचा आहे" असें माणसाला वाटावें.

# अवगुणांत अवगुण म्हणजे भगवंताचें विस्मरण हाच होय

**१४ सप्टेंबर**

जो पुष्कळांना मनापासून आवडतो तो मनुष्य चांगला; असा मनुष्य अजरामर होतो. तो निःस्वार्थीपणानें राहून मनावर संयम ठेवतो. स्वतःच्या स्वार्थासाठीं दुसऱ्याला बुडविण्याचा दुष्टपणा त्याच्याकडून होणेंच शक्य नाहीं. असा सत्पुरुष म्हाताऱ्याला म्हातारा, पुरुषाला पुरुष, बाईला बाई, मुलाला मुलासारखा दिसतो; म्हणजेच, जो ज्याप्रमाणें असेल त्याप्रमाणें त्याचें त्याच्याशीं वर्तन असतें. असा मनुष्य कोणाविषयीं काहीं ( निंदा किंवा स्तुती ) बोलत नाहीं. मान घ्यायला योग्य असूनहि मानाची अपेक्षा तो करीत नाहीं. स्वतःच्या विकारावर त्याचा पूर्ण ताबा असतो, आणि दुसऱ्यांच्या दुःखात तो त्यांना सुख देण्याचा प्रयत्न करीत असतो. तो सहजावस्थेंत राहतो; म्हणजेच उपाधीमुळें बांधला जात नाहीं. असा योगी मनुष्य खरोखरच मुक्त समजावा. समर्थ असे होते, आणि स्वतः आचरण करून मगच लोकांना त्यांनीं सांगितलें. भगवत्कृपेनें मी सर्व कृत्यें करतों असें म्हटले म्हणजे अभिमान कशाला वाढेल ? **दक्ष असल्याशिवाय संत होणेंच कठीण आहे.** ज्याला देहाचें प्रेम नाहीं तो खरा बुवा. बुवाला आपण बावळट नाहीं समजूं.

अंतरंग ओळखायला स्वतःपासून सुरुवात करावी. माझें चुकतें कोठे हें पाहावें, दुःख भोगण्याची मला पाळी आली म्हणजे मार्ग चुकला म्हणावें. ज्याला सुखदुःख बाधत नाहीं तोच खरा समाधानी. मी रोज नामस्मरण करतों, चार वर्षें माझे भजन नाहीं चुकलें, असें आपण म्हणतो; पण 'मी हें सर्व करतों' अशी सारखी आठवण ठेवली तर काय उपयोग ? मी मेहनत घेतों पण थोडक्यानें नासतें, तें या अभिमानामुळें. जोपर्यंत अभिमान सोडून भगवंताचें स्मरण मी करीत नाहीं तोपर्यंत तें स्मरण कसें म्हणावें ? भगवंताशिवाय इतर जाणीव ठेवून, मी अनन्यपणें वागतों असें कसें म्हणतां येईल ? मी तुम्हाला खरेंच सांगतों, तुम्ही रामाकडे कर्तेपण द्या आणि त्याच्या इच्छेनें वागा, तुमची देहबुद्धि नष्ट झाल्याशिवाय राहणार नाहीं. खुणेनें जावें, संतांनीं सांगितलेल्या मार्गानें जावें, म्हणजे मार्ग सांपडतो. खरी तळमळ लागली म्हणजे मार्ग दिसतो. आणि खरी कळकळ असली म्हणजे त्यांत प्रेम निर्माण होतें, भगवंतानें माझी आपत्ति दूर करावी हें म्हणणें वेडेपणाचेंच आहे. संकटें, आपत्ति आल्या म्हणून भगवंताला विसरणें हें केव्हांहि योग्य नाहीं. देहबुद्धीचा नाश नामाच्या स्मरणांत आहे खास ! नामांत प्रेम येत नाहीं याचा विचार करीत राहिलों तर नामाचाच विसर पडतो, हें कुठे ध्यानांत येतें ! शंकरालाहि जें प्रिय होतें तें आपल्याला अप्रिय का करून घ्यावें ? उगीच विचार करीत नाहीं बसूं. **समुद्र ओलांडून जाण्याकरितां रामाचें नांव घेऊन जी वीट ठेवली ती राहिली, हें लक्षांत ठेवा.** भगवंताच्या स्मरणांत राहिल्यावर "मी देही" हें विसरून जाणेंच योग्य. तीर्थामध्यें जाऊन आल्याची खूण, काहीं पालटावे अवगुण आणि; अवगुणांत अवगुण म्हणजे भगवंताचें विस्मरण हाच होय.

---

**२५८. जन्मल्यापासून जाईपर्यंत मी एका नामाशिवाय कशाचीहि आठवण ठेवली नाहीं हेंच माझें चरित्र होय.**

# देहाच्या कोणत्याहि अवस्थेमध्यें भगवंताचें अनुसंधान असणें हेंच संताच्या चरित्राचें सारें मर्म आहे

१५ सप्टेंबर

कोणत्याहि देवाच्या उत्सवाचा मुख्य हेतु हा कीं, आपल्याला त्याचें स्मरण अधिकाधिक व्हावें, भगवंताचें स्मरण भगवंताच्या प्राप्तीसाठींच करावयाचें असतें. भगवंताच्या नामानें सर्व प्रकारच्या दुरितांचा नाश आपोआप होतो. **नाम घेऊन प्रापंचिक सुख मागणें म्हणजे कामधेनु मिळत असतांना ती टाकून गाढव मागण्यासारखें आहे.** नामानें प्रत्यक्ष भगवंत घरी येत असतांना पैसा, लौकिक किंवा संतति आपण मागितली, तर तें दुःखालाच कारण होतें. नामांत स्वतःला विसरायला शिकावें; असें स्वतःला विसरणें म्हणजे समाधीच समजावी. नाम घेत असतांना स्वतःचा विसर पडणें ही सर्वोत्कृष्ट समाधि होय. जो नामामध्यें इतका रंगला कीं त्याला स्वतःचा विसर पडला, त्यालाच माझें चरित्र कळेल; नुसत्या तर्कानें तें कळणार नाहीं. सत्पुरुषाचें चरित्र हें जास्त मानसिक असतें. त्याच्या चरित्रामध्यें देहाच्या हालचालींना दुय्यम महत्त्व असतें. आणि चमत्कारांना तर फारच कमी महत्त्व द्यायला पाहिजे. देहाच्या कोणत्याहि अवस्थेमध्यें भगवंताचें अखंड अनुसंधान असणें हेंच संताच्या चरित्राचें खरें मर्म आहे. आपण स्वतः भगवंताला चिकटल्याशिवाय दुसरा तसा चिकटलेला आहे किंवा नाहीं हें कळत नाहीं; म्हणून संतांच्या चरित्रकारानें स्वतः नामामध्यें दंगून जावें आणि नंतर त्याची आज्ञा घेऊन चरित्र लिहावें. खरें म्हणजे संतांचा चरित्रकार जन्माला यावा लागतो.

मी रामाचा उपासक आहें तरी मला शंकराचा भक्त फार आवडतो. श्रीशंकर आणि श्रीकृष्ण ही एकाच परमात्मस्वरूपाचीं दोन व्यक्त रूपें आहेत. हरिहरांमध्यें भेद नाहीं असेंच श्रुतिस्मृतीहि सांगतात. श्रीशंकरालाहि अत्यंत प्रिय असलेलें रामनाम आपण अखंड घ्यावें. श्रीशंकरापासून श्रीसमर्थांच्यापर्यंत जे जे महासिद्ध होऊन गेलें त्या सर्वांनीं रामनाम कंठीं धारण केलें. रामनामाचा साडेतीन कोटी जप जो करील त्याला त्याच्या देवतेचा अनुभव आल्याशिवाय राहणार नाहीं. रामनामाचा आधार घेऊन सर्वांनीं राम जोडावा. राम तुमचें कल्याण करील हा विश्वास बाळगावा. **मी देव पाहिला आहे, पण ज्या डोळ्यांनीं देव पहायचा असतो ते हे डोळे नव्हेत; ते ज्ञानचक्षु असतात, आणि भगवंताचें नाम सतत घेत गेल्यानें ते प्राप्त होतात.** जिथें नाम आहे त्याच्या आसपास मी घोटाळत राहतो. तुम्ही अखंड नाम घ्या म्हणजे सदा सर्वकाळ माझ्या संगतीचा लाभ घडेल. ज्याच्या मुखीं नाम आहे त्याच्या हृदयामध्यें माझी वसति आहे.

चैतन्य सर्व ठिकाणीं भरलेलें आहे; तें कुठेंहि प्रकट होऊं शकेल. त्याला प्रकट करणें हें आपल्या भावनेवर अवलंबून आहे. ज्याची भावना खरी शुद्ध म्हणजे निःसंशय असते त्याला दगडाची मूर्तीदेखील देव बनते. भावना मात्र शंभर नंबरी पाहिजे; त्यामध्यें कसलीहि भेसळ उपयोगाची नाहीं. माझ्याकडे येऊन शिकायचें असेल तर तें हेंच कीं, काळजी न करता परमात्मा सर्व करतो ही भावना ठेवायला शिकावें.

---

२५९. तुम्ही सगळे मला रामरूप दिसतां, माझ्या गुरूंनीं मला जग रामरूप बघायला सांगितलें; तें तसें मी बघितलें आणि मला समाधान झालें.

# भगवंताकडे मन लावावें व देह प्रारब्धावर सोपवावा

११ सप्टेंबर

खरोखर, प्रारब्धाचे भोग कुणालाहि टळत नाहींत. प्रारब्धाचा संबंध देहापर्यंतच असतो, मनाशीं नाहीं. प्रारब्ध म्हणजे कृतकर्माचें फळ. हें चांगलें वा वाईट असूं शकतें. सुखाचे भोग आले तर माणसाला कांहीं वाटत नाहीं, पण दुःखाचे प्रसंग आले कीं मनुष्य म्हणतो, "मीं देवाचें एवढें केलें, मी अमक्या अमक्या सत्पुरुषाचा आहें, मग मला असें दुःख कां भोगावें लागतें ?" पण त्याला हें समजत नाहीं कीं हा सर्व आपल्याच कर्मांचा परिणाम आहे, त्याला देव किंवा संत काय करील ? समजा, आपल्याला कांहीं पैशाची जरूरी आहे आणि आपल्या ओळखीचा किंवा अगदीं जवळचा नातेवाईक एखाद्या मोठ्या बँकेचा मॅनेजर आहे; पण आपल्या स्वतःच्या नांवावर बँकेंत जर पैसे नसले तर तो मॅनेजर कांहींहि करूं शकत नाहीं. फारच झालें तर तो आपल्या स्वतःच्या खिशांतून कांहीं पैसे देईल. त्याचप्रमाणें आपल्या प्रारब्धांत जर सुख नसेल तर तें कुठून मिळणार ? फार तर एखादा संत जरूरीप्रमाणें आपलें दुःख स्वतः सोसून आपला भार हलका करील इतकेंच. म्हणूनच आपल्या प्रारब्धानें आलेल्या बऱ्यावाईट गोष्टी देहानें भोगाव्या आणि मनानें भगवंताचें स्मरण ठेवावें. खरा भक्त हा प्रारब्ध टाळू शकतो, पण तो देहाला विसरलेला असल्यानें देहाचें भोग भोगणें वा न भोगणें या दोन्हींची त्याला फिकीर नसते, म्हणून तो भोग टाळीत नाहीं. मनुष्याच्या देहाच्या अवयवांत जसा कमीजास्तपणा असतो, त्याचप्रमाणें मनुष्याचे विकार आणि गुण पूर्वजन्माच्या संस्काराप्रमाणें, म्हणजेच प्रारब्धाप्रमाणें कमीजास्त प्रमाणांत येतात. आपल्या देहाला होणारे भोग आपल्या कर्माचेंच फळ असतें, पण तें अमुक कर्माचें फळ आहे असें कळत नसल्यामुळें आपण त्याला प्रारब्ध असें नांव देतों. जगांतल्या घडामोडी जशा चालतात, तशाच आपल्या सर्व गोष्टी प्रारब्धानेंच चालतात. आपल्याला येणाऱ्या आपत्ति आपल्या प्रारब्धाच्या असतात; त्या भगवंताच्या नसतात; त्या पाहुण्यासारख्या असतात. त्या जशा येतात तशा जातात देखील. आपण होऊन त्या आणूं नयेत, आणि प्रारब्धानें आल्या तर त्यांना घाबरूं नये. प्रारब्धाची आणि ग्रहांची गति देहापर्यंतच आहे, मनानें भगवंत भजायला त्यांची आडकाठी नाहीं. जो संताची किंवा सद्‌गुरूची आज्ञा पाळतो, त्याचें प्रारब्ध बदललें जातें; त्याला त्याचें प्रारब्ध हें प्रारब्धरूपानें राहातच नाहीं. जें प्रारब्धानें आलें तें आपल्याला तोडतां येतें, पण जें संवयीनें बनलेलें आहे तें आपण तोडूं शकत नाहीं. याकरितांच भगवंताच्या अनुसंधानाची संवय लावून घ्यावी, म्हणजे आपण प्रारब्धावर विजय मिळविल्यासारखेंच आहे.

---

२६०. प्रारब्ध टाळणें म्हणजे लोकांचें कर्ज बुडविणें होय.

# परमेश्वराची नड–परमेश्वराविषयीं तळमळ–परमेश्वराला शरणागति–परमेश्वरप्राप्ति

१७ सप्टेंबर

परमेश्वर आपल्याला खरोखरच हवा आहे का? आणि तो कशासाठीं? बाकी एवढे सर्व कष्ट करून तुम्ही इथें येता, तेव्हां भगवंत तुम्हाला नको आहे असें कसें होईल? तुम्हाला खात्रीनें तो हवा आहे; पण कशासाठीं? तर आपला प्रपंच नीट चालावा म्हणून. असें जरी असलें तरी त्यांत वाईट नाहीं, त्यांतूनच आपल्याला पुढला मार्ग सापडेल. परंतु केवळ परमेश्वरासाठींच परमेश्वर हवा असें ज्याला वाटत असेल तो खरोखर भाग्यवान् होय. मोठमोठया साधुसंतांना खरोखरच तशी नड भासली; त्यांनीं मग परमेश्वर आपलासा करून घेतला. संत तुकाराम, रामदास, यांना एका परमेश्वरावांचून दुसरें कांहींहि हवेंसें वाटलें नाहीं. भगवंताची नड भक्त संतांनाच निर्माण होऊं शकते. लग्नाच्या वेळी 'सावधान' म्हणतांच रामदास खरे 'सावध' झाले. रामदासांना परमेश्वराच्या उपदेशाची फार गरज भासूं लागली. त्यांनीं आपल्या मोठ्या भावाला उपदेश करण्यासाठीं विनविलें, परंतु भाऊ म्हणाला "बाळ, तूं अजून लहान आहेस" परंतु रामदासांची तळमळ शमली नाहीं. त्यांनीं लग्नाच्या आधींच पळ काढला. देवाच्या ध्यासांत बारा वर्षें घालविल्यावर परमेश्वरानें त्यांना उपदेश दिला, तेव्हांच त्यांची तळमळ शांत झाली. परमेश्वराची प्राप्ति ही वयावर, श्रीमंतीवर, जातिधर्मावर, अवलंबून नाहीं ती एका तळमळीवर अवलंबून असते. ही तळमळ असणें अत्यंत जरूरीचें आहे. ती तळमळ जर कशानें लागत असेल तर केवळ एका शरणागतीनेंच होय. रामदासांनीं रामाच्या पायावर डोकें ठेवून सांगितलें कीं, "रामा! तुला मीं आतां देह अर्पण केला आहे. आतां याची मला गरज नाहीं. तुझ्यावाचून जगणें मला अशक्य आहे. एवढें प्रेम, एवढें आपलेपण, एवढी तळमळ असल्यावर परमेश्वर दूर किती वेळ उभा राहणार! **परमेश्वर अत्यंत अल्पसंतुष्ट आहे. आपण त्याच्याजवळ एक पाऊल पुढें गेलों तर तो दोन पावलें आपल्याजवळ येईल.** परंतु आपल्याला त्याच्याकडे जायची तळमळच लागत नाहीं. आपले विकार, आपला अहंपणा, आपली देहबुद्धी, आपल्याला मागें खेंचते. या सर्वांचे बंध तोडून जो भगवंताकडे जातो तो पुनः मागें फिरत नाहीं. परमेश्वर मातेसारखा अत्यंत प्रेमळ आहे, परंतु मध्येच हे विकार आड येतात, आईला आपलें मूल जवळ घ्यावेंसें वाटणार नाहीं? खरोखर, भगवंताचें नाम हें मधला आडपडदा दूर सारतें, आपली देहबुद्धीची आसक्ति दूर करतें. परमेश्वराकडे जायची वाट मोकळी करतें, आणि सरळ आपल्या हाताला धरून थेट भगवंतापर्यंत नेऊन पोंचवतें. हेंच नाम तुम्हीं आपल्या हृदयांत सतत जागृत ठेवा.

---

२६१. पुष्कळ मंडळी याविंत, आलेल्याला खायला घालावें, आणि भगवंताचें नाम घ्यावें, या तीन गोष्टी मला फार आवडतात.

# रामरायाला शरण जाऊन त्याची उपासना वाढवावी

**१८ सप्टेंबर**

[ एकदा गोंदवलें येथील श्रीरामाच्या वैशिष्ट्याबद्दल बोलतांना श्रीमहाराज म्हणाले:– ] मी इकडच्या लोकांना गोंदवल्यास जावें असें म्हटलें नसतें, पण गोंदवल्यास जा म्हणतों त्याचें कारण, प्रत्येकानें तिथल्या श्रीरामाचें एकदा तरी दर्शन घ्यावें असें मला फार वाटतें. त्या श्रीरामाचें वैशिष्ट्य असें आहे कीं, त्याच्यापुढें उभें राहिलें म्हणजे आपल्या अवगुणांची तो जाणीव करून देतो, हेंच विशेष महत्त्वाचें काम आहे. कारण दोषांची जाणीव झाली तरच मनुष्य त्यांतून सुटण्याच्या प्रयत्नाला लागेल. आपल्याला एखादा रोग झाला आहे असें समजलें तरच मनुष्य त्यांतून मोकळें होण्याच्या प्रयत्नाला लागेल. तसें, दोषांची जाणीव झाली तरच मनुष्य त्यांतून सुटण्याकरितां श्रीरामाची प्रार्थना करून त्याला शरण जाईल; शरणागताचें रक्षण करणें हें श्रीरामाचें ब्रीद असल्यामुळें तो त्याला त्यांतून सोडवीलच, आणि त्याचें काम होईल. चांगला वैद्य कोण ? कीं जो रोग्याला भूक उत्पन्न होईल असें औषध देऊन नंतर त्याला भरपूर खायला देतो, आणि तें पचेल असें औषध देऊन त्याला निरोगी आणि सशक्त बनवितो तो. तशी स्थिति त्या श्रीरामाची आहे. म्हणून प्रत्येकानें त्याला एकदा तरी पाहावें असें मला मनापासून वाटतें.

मंदिरामध्यें मुक्तद्वार असावें पण तें कुणाला ? तर फक्त भगवंताच्या उपासकाला ! भगवंताच्या उत्सवाला थोडेच लोक जरी जमले, पण ते नामांत राहणारे असले, तर तो खरा आनंद आहे. उगीच पुष्कळ लोक जमावेत हा हेतु नसावा. मंदिर हें भगवंताच्या उपासनेचें मुख्य स्थान आहे; म्हणून तें अगदी साधें असावें, आणि तिथें उत्तम उपासना चालावी. मंदिर नेहमीं भिक्षेवरच चालावें. मंदिरांतून व्रताचीं आणि ब्रीदाचीं माणसें उत्पन्न झाली पाहिजेत. भगवंताला उपासना प्रिय आहे. म्हणून सोन्याचीं मंदिरें बांधण्यापेक्षा दगडमातीच्या मंदिरामध्येंच उपासना वाढवायचा प्रयत्न करा. भगवंताच्या इच्छेनेंच सर्व चालले आहे ही भावना ठेवून, जें येईल त्याला नको म्हणूं नये, आणि जें येत नाहीं त्याबद्दल दुःख करूं नये. आपल्याला भगवंताचा विसर पडला आहे. त्याचें स्मरण होण्यासाठीं आणि तें सतत टिकविण्यासाठीं भगवंताचे उत्सव करणें जरूर आहे. पंढरीचा विठोबा पंढरीस आहे खरा, पण त्याचा प्रकाश सर्व ठिकाणीं आहे. एखाद्या माणसाला पुष्कळ नातीं असून तो जसा वेगळा राहूं शकतो, त्याप्रमाणें भगवंत सगळ्या ठिकाणीं राहूनहि आपल्या हृदयांत राहूं शकतो. तो सूर्याच्या प्रकाशासारखा आहे. तो एके ठिकाणीं राहून सर्व ठिकाणीं सत्तारूपानें राहतो. नामाचा अनुभव जसा नामांतच घ्यायचा असतो, तसा भगवंताचा अनुभव अनुसंधानांत येतो.

---

२६२. आंतमध्यें भगवंताचें अनुसंधान ठेवून बाहेर वृत्ति आवरण्याचा जो प्रयत्न करील त्याला परमार्थाचा अनुभव फार लवकर येईल.

# भगवंताचें होण्यानेंच काळाच्या पलीकडे जातां येतें

**१९ सप्टेंबर**

आपल्या जीवनाचा सारखा विकास होतो आहे. म्हणून, आपण आज इथें आहोंत त्याच्या मागें काल होतों, आणि आज जिथें आहोंत त्याच्या पुढें उद्यां आपण जाऊं. हें जरी खरें, तरी आज आपण जें करायला पाहिजे तें न केलें तर एखाद्या वेळीं उद्यां मागें जाण्याचा प्रसंग आपल्याला येईल. पुढचा जन्म हा आजच्या जन्मांतूनच निर्माण होतो. तेव्हां आपण आज चांगलें असलों तर, "अन्ते मतिः सा गतिः" या नियमाप्रमाणें पुढचा जन्म आपल्याला चांगलाच येईल. काळ मुख्यतः तीन प्रकारचा असतो. कालचा, आजचा आणि उद्यांचा. जो काळ होऊन गेला तो कांहीं केलें तरी परत येणार नाहीं; म्हणून त्याची काळजी करूं नये. एखाद्याचें कोणी गेलें तर आपण त्याला असें सांगतो कीं, "अरे, एकदां गोष्ट होऊन गेली; आतां काय त्याचें ! आतां दुःख न करणें हेंच बरें." हें जें तुम्ही लोकांना सांगतां तसें स्वतः वागण्याचा प्रयत्न करा. विवेकानें मागें होऊन गेल्याची विस्मृति पाडतां येतें. तसेंच पुढें काय होणार हें माहीत नसल्यामुळें त्याची काळजी करूं नये. आजचें आपलें कर्तव्य आपण केल्यानंतर जें व्हायचें तें होणारच. म्हणून स्वस्थ असावें, मागची आठवण करूं नये किंवा गेल्याचें दुःख करूं नये, आणि उद्यांची किंवा होणाऱ्या गोष्टीची काळजी करूं नये. सध्यां आपल्याला कालाच्या पलीकडे जातां येत नाहीं, आणि कालाच्या पलीकडे गेल्याशिवाय भगवंत मिळणार नाहीं, अशी अवस्था आहे. जगांत घडामोडी सारख्या होत आहेत आणि आपली तळमळ कायम आहे ! आपल्याला जी तळमळ लागते ती आपल्या अपुरेपणामुळें, अपूर्णतेमुळें लागते. कोणीहि मनुष्य जन्माला आला कीं भगवंताला आनंद होतो. कारण सत्यस्वरूप प्रत्येकाला कळावें अशी भगवंताची इच्छा आहे, आणि हें कार्य फक्त मनुष्यजन्मामध्येंच शक्य आहे. यासाठीं, भगवंत आपल्याला समजण्यासारखा आहे हें प्रत्येकानें लक्षांत ठेवावें. याकरितांच आपल्याला भाव, इच्छा, तळमळ, आंच, मनांतून उत्पन्न व्हायला पाहिजे. पुष्कळ चांगला स्वयंपाक केला आणि मीठ घालायचेंच राहिलें तर काय उपयोग ! भाव जर दुजा ठेवला तर भजन चांगलें झालें असें कसें म्हणावें ! भक्तीचे नऊ मार्ग सांगितले आहेत, त्यांतल्या कोणत्याहि एकाचेंच पूर्ण भाव ठेवून परिशीलन केलें तरी त्यांत बाकीचे आठ येतात. आपल्याला जें कळलें तें आपल्या आचरणांत आणावें हें खरें ऐकणें होय. **जो आपल्या रक्तमांसांत मिसळतो आणि रोजच्या वागण्यांत आणतां येतो तोच खरा वेदान्त होय**, आणि आपल्या कर्तव्यामध्यें भगवंताचें स्मरण ठेवणें हेंच सर्व वेदान्ताचें सार आहे.

---

२६३. मीं सुखाचा शोध केला आणि तें मला सांपडलें. म्हणून मी तुम्हांला त्याचा निश्चित मार्ग सांगेन. तो मार्ग म्हणजे भगवंताचें अनुसंधान होय.

# एकच क्षण ऐसा यावा । जेथें सर्वांचें विस्मरण करून राम आठवावा

**२० सप्टेंबर**

भगवंताचें देणें हें त्याच्या इच्छेनेंच असतें. आपण त्याजपाशीं मागावें एक । "तुझे इच्छेनें सर्व जगत् चालतें देख । त्यांतील मी एक पामर । रामा ! तुला कसा झालों जड ? ।। रामा, अन्यायाच्या कोटी । तूंच माय घाली पोटीं ।। मातेलागीं आलें शरण । त्याला नाहीं दिलें मरण । ऐसें ऐकिलें आजवर । कृपा करीं तूं रघुवीर ।। दाता राम हें जाणून चित्तीं । म्हणून आलों दाराप्रति ॥ आतां रामा नको पाहूं अंत । तुजवीण शून्य वाटे जगत् ।। ज्याचा ज्याचा मी केला स्वार्थ । तें तें झालें दुःखाला कारण ।। आतां, रामा, सुखदुःख दोन्ही । केलें अर्पण तुझे चरणीं ॥ आतां मनास येई तसें ठेवीं । याविण दुजें न मागणें कांहीं ।। आतां, रामा, कोठें जाऊं । तुला टाकून कोठें राहूं ! ।। ऐसें कोठें पाहावें स्थान । जेथें होईल समाधान ! ॥ आतां, असो नसो भाव । मीं रामा ! तुझा झालों देख ।। आतां कसें तरी करी । मी पडलों तुझ्या दारीं ।। आतां लौकिकाची चाड । नाहीं मला त्याची आवड । हें ठसावें चित्तीं । कृपा करीं रघुपती ।। भिकारी आला दारीं । त्याला दाता दूर न सारी । ही आजवर ऐकिली कीर्ती । धांवत आलों रघुपति ।। आतां मनास येई तसें करीं । माझें मीपण हिरोनि जाई ॥ जोंवर देहाची संगति । तोंवर मी माझें ही वृत्ति । राहील अभिमानाला धरून । तेथें न राहे कधीं अनुसंधान । काळोख अत्यंत मातला । घालवायला उपाय न दुजा सुचला ॥ होतां सूर्याचें आगमन । काळोख जाईल स्वतः आपण ।। प्रपंचांतील संकटें अनिवार । माझ्या बोलण्याचा करावा विचार । आतां कष्टी न व्हावें फार ॥ एकच क्षण ऐसा यावा । जेथें सर्वांचें विस्मरण करून राम आठवावा ।। प्रपंचाची आठवण । हेंच दुःखाचें मूळ कारण ।। तेंच घोकीत बसल्यानें । न होई आनंदरूप स्मरण ॥ सुखदुःखाची उत्पत्ती । आपलेपणांत आहे निश्चित ।। स्वार्थ म्हणजेच आपलेपण । म्हणून माझे मीच दुःखाला कारण ॥ आपण आपलेपणानें वागत गेलें ! सुखदुःख चिंता शोक यांचे मालक व्हावें लागलें ॥ अमुक व्हावें, अमुक होऊं नये । याचें कसें होईल, त्याचें कसें होईल । ही चित्ताची अस्वस्थता । याचें नाव चिंता ॥ सुखदुःखें चित्ताची न राहे स्थिरता । तीच त्याची खरी अवस्था ॥ सुखदुःख परिस्थितीवर नसतें । आपल्या जाणीवेवर अवलंबून राहातें ।। ज्यांत एकाला सुख वाटतें । तेंच दुसऱ्याला दुःखाला कारण होतें ।। दुःखाचें मूळ कारण । जगत् सत्य मानलें आपण ।। देहानें कष्ट केले फार । त्यातील फळाचा धेऊन आधार । फळ नाहीं हातीं आलें । दुःखाला कारण तें झालें ।। आपलें चित्त झालें विषयाधीन । नाहीं दुःखास दुसरें कारण ॥ मागील गोष्टींची आठवण । पुढील गोष्टींचें चिंतन । हेंच दुःखाला खरें कारण ।। याला एकच उपाय जाण । अखंड असावें अनुसंधान ॥ प्रपंच न मानावा सुखाचा । तो असावा कर्तव्याचा । वृत्ति होऊं द्यावी स्थिर । चित्तीं भजावा रघुवीर । असा करा कांहीं नेम । जेणें जवळ येईल राम । जेथें नाम तेथें राम । हा ठेवावा विश्वास । कृपा करील रघुनाथ खास ।

---

२६४. रामा, सुखदुःख दोन्ही । केले अर्पण तुझे चरणीं । आतां मनास येई तसें ठेवी । याविण दुजे न मागणें कांहीं ।।

# भगवंताचें स्मरण करून काम करीत असतां जें योग्य दिसेल तें त्याच्याच इच्छेनें समजून करावें

२१ सप्टेंबर

दुसऱ्याच्या मनांतलें ओळखणें ही फारशी मोठी विद्या नाहीं. ज्याच्या मनांतलें ओळखायचें आहे त्याच्या मनाशीं आपलें मन एकरूप झालें की आपल्याला कळायला लागतें; पण अंतःकरण शुद्ध असेल तरच हें साधेल हें साधण्याच्या कांहीं क्रिया असतात. त्या क्रिया चालू असतात तोंपर्यंत ती शक्ति राहते. त्या क्रिया बंद झाल्या कीं ती नाहींशी होते. जो मनुष्य या शक्तीचा बाजार मांडतो, त्याच्याजवळ भगवंताची कृपा असेलच असें मात्र नाहीं, आणि ती नाहीं म्हणजे कांहींच नाहीं ! मनोगत कळायला एकमेकांना एकमेकांची भाषा कळायला पाहिजेच असें नाहीं. ऐकणारा खऱ्या उत्सुकतेनें आला असेल तर सांगणाऱ्याचा भावार्थ त्याला आपोआप कळेल. पण ऐकणारा तसा आला नसेल तर सांगणाऱ्यानें स्पष्ट सांगूनसुद्धां त्याला कळायचें नाहीं. समजा, तेलंगणांतला एक भिकारी आपल्या दारीं भीक मागायला आला आणि तो एक तेलंगी गाणें म्हणूं लागला, त्या गाण्याचा अर्थ आपल्याला मुळींच कळत नाहीं; पण हा भीक मागतो आहे, हें आपण ओळखतों. त्याचप्रमाणें मनोगताचा भावार्थ कळतों. प्रत्यक्ष वाक्याचा अर्थ कळला नाहीं तरी हरकत नसते, तत्त्वज्ञान हें कायम आणि कधींहि न बदलणारें आहे, स्थळ-कालानुसार निराळ्या भाषेंत तें मांडावें लागतें इतकेंच. समजा आपण गाडींत बसून दिल्लीला चाललो. गाडी दर क्षणीं पुढें पुढें जाते, पण आपण आपल्या जागेवर बसूनच असतो. त्याप्रमाणें परिस्थिति सारखी बदलत असते; पण आपण जर भगवंतालाच चिकटून राहिलो तर खात्रीनें आपण आपल्या नियोजित स्थळीं पोहोंचू शकूं; मग परिस्थिति कितीहि बदलूं दे !

रामासमोर जाऊन " मी अमुक अमुक करीत आहे " असें त्याला सांगावें, आणि आपल्या कार्याला लागावें भगवंताला स्मरून काम करीत असताना जें योग्य दिसेल, तें त्याच्याच इच्छेनें आहे असें समजून काम करावें. जो असें करील त्याला समाधान झालेंच पाहिजे. भगवत्कृपेनें मी सर्व कृत्यें करतों म्हटलें म्हणजे अभिमान कशाला वाढेल ! अंतरंग ओळखायला स्वतःपासून सुरुवात करावी. माझें चुकतें कुठें हें पाहावें. समर्थांनीं स्वतः करून पाहिलें आणि मगच लोकांना सांगितलें. तर्कशास्त्र शिकून तर्कटी बनूं नये; तसेंच संतांच्या अनुभवी वचनाकडे फार चिकित्सेनें पाहूं नये. संतांचें सांगणें अगदीं सोप्या भाषेंत असते. गंमत अशी कीं, ' भगवंत आहे कीं नाहीं ' इथपासून लोक चिकित्सेला सुरुवात करतात आणि मोठ्या घोटाळ्यांत पडतात आणि शेवटीं आहे तिथेंच थांबण्याची त्यांच्यावर पाळी येते; म्हणजे त्यांची प्रगति खुंटते. याकरितां भगवंताचें बूड कायम ठेवून चिकित्सा करावी. देहांत आल्यावर आपलें ज्याच्याशीं जें कर्तव्य आहे तें बरोबर करणें हें रामचरित्राचें सार आहे.आणि हें प्रत्येकानें जाणलें पाहिजे.

---

२६५. नामापरतें न माना दुजें साधन । जैसें पतिव्रतेस पति प्रमाण ।।
नामावर निष्ठा ठेवावी पूर्ण । मनीं असो नसो, करावें नामस्मरण ।।

# भगवंताला शरण गेलें म्हणजे त्याच्या प्राप्तीचे मार्ग खुले होतात

**२२ सप्टेंबर**

एखाद्या मोठ्या यंत्रामध्यें एक चक्र सुरू झालें कीं बाकीचीं सर्व चक्रें आपआपल्यापरी हळू किंवा जलद फिरूं लागतात. त्याचप्रमाणें आपल्या मनाचें आहे. मनाची एक शक्ति काम करूं लागली कीं तिच्याबरोबर इतर सर्व शक्तीदेखील हालचाल करूं लागतात. मनाला आपल्या शक्तीनें ताब्यात आणणें फार कठीण आहे. तें थोर माणसालाच जमण्यासारखें आहे. ज्याप्रमाणें, पारा समोर टाकला तर तो दिसतो, पण काठीनें मारला तर तो मारला जात नाहीं, त्याचप्रमाणें, मन आहे हें समजतें, पण तें आवरतां येत नाहीं. म्हणूनच भगवंताला शरण जावें. आरशावर घाण पडली म्हणून साफ करण्याचा प्रसंग आला. अंतःकरणाची घाण पुसण्याचे काम साधनानें होतें. मिरच्या, मिरे, मीठ इत्यादि पदार्थ एकत्र करून जसा सुंदर मसाला तयार करतात, त्याप्रमाणें भगवंताच्या प्राप्तीसाठीं तीन गोष्टींचा मसाला पाहिजे. शुद्ध आचरण, शुद्ध अंतःकरण, आणि भगवंताचें नामस्मरण, या त्या तीन गोष्टी आहेत. शुद्ध आचरण म्हणजे प्रामाणिकपणा, धार्मिक आचार आणि नीतीचें वर्तन. शुद्ध अंतःकरण म्हणजे अभिमान नसणें, द्वेषमत्सर नसणें आणि सर्वजण सुखी असावेत अशी भगवंताची प्रार्थना करणें. भगवंताचें नामस्मरण म्हणजे भगवंताचा केव्हाहि विसर न पडणें. नवऱ्याला देव आवडत नाहीं म्हणून बायकोनें नामस्मरण सोडण्याचें कारण नाहीं. तिनें नाम घेतलें तर पत्नीधर्म सोडला असें होत नाहीं. मनात येणारे भलते-सलते विचार हे नामाच्या प्रेमाला आडकाठी करतात. त्यांचा बंदोबस्त करण्याचा उपाय म्हणजे या विचारांना थाराच देऊं नये म्हणजे झालें. एक मोठा पोलिस अंमलदार चोर पकडण्यांत हुशार होता. तो असें करी कीं, चोर ज्या बाईच्या नादीं असेल तिला फितुर करून घ्यायचा म्हणजे चोर आपोआप नेमका सापडे. त्याचप्रमाणें आपलें मन जिथें गुंततें तिथें भगवंताला ठेवला, कीं मन आपल्या ताब्यांत आलेंच म्हणून समजा. मनाचें संयमन करायला दोन उपाय आहेत. एक म्हणजे पातंजल योग, आणि दुसरा म्हणजे भगवंताची भक्ति. पातंजल योग म्हणजे युक्ताहार-विहार, नियमित राहणें आणि इंद्रियांचा निरोध करणें. भगवंताची भक्ति म्हणजे ईश्वराविषयीं अत्यंत प्रेम. या प्रेमाचीं साधनें कोणतीं, तर भगवंताचें नामस्मरण, त्याचें कथाकीर्तन, साधुसमागम, आणि त्यातल्या त्यात सद्‌गुरूची कृपा, हीं होत. भगवंताच्या स्मरणाशिवाय जीं कर्में होतात तीं वाईट कर्में होत. कोणताहि खाण्याचा किंवा पिण्याचा पदार्थ भगवंताचें नाम घेतल्याशिवाय खायचा नाहीं असा नेम ठेवला तर नाम आपोआप येतें. कोणत्याहि परिस्थितींत आपण नामस्मरणापासून ढळूंच नये. जो नामांत प्रपंच करील त्याचा अभिमान नष्ट होऊन त्याला सुखसमाधानाचा लाभ झाल्यावाचून राहणार नाहीं.

---

२६६. नामाचा ठेवावा संग । तेथेंच मिळेल सत्संग ॥
अखंड करा नामस्मरण । जेणें कृपा करील रघुनंदन ॥

# भगवंताला शरण जाऊन त्याला भक्तिपूर्वक आळवल्यास तो चटकन् धांवून येतो

**२३ सप्टेंबर**

ज्या देवाची पूजा करायची ती त्याला ज्याची आवड असेल तशी करावी लागते. खंडोबाला जसें आवडतें तशी त्याची पूजा करावी. रामाला फक्त नाम आवडतें, तेव्हां त्याच्या नामांत राहिल्यानें तो आपलासा होईल. आपण आपल्या सर्व व्यवहारांत, ' परमेश्वर कर्ता, ' ही बुद्धि ठेवावी. प्रत्येक व्यवहारांत त्याला हांका मारल्यावर आपल्याजवळ येणेंच त्याला भाग पडतें. आमच्याकडे रान उठवून मग शिकारी शिकार साधतो. रानांत शिकारी गेल्यावर हांकारी चहूंबाजूनें हांका घालतात; मग अनायासें सावज शिकाऱ्याच्या पुढ्यांत येतें. त्याप्रमाणें आपण सर्व बाजूंनीं भगवंताला हांका मारल्यावर तो खात्रीनें आपल्याजवळ येईल. एकदां उद्धवानें श्रीकृष्णाला विचारलें कीं, " हे परमेश्वरा ! तूं तुझ्या मुखानेंच आम्हांला सांग कीं आम्हांला तुझी प्राप्ति कशी होईल ? कोणत्याही देवतेची पोथी काढली कीं तिचें माहात्म्य, तिच्यासारखें दैवत नाहीं, असें पोथींत लिहिणारे सांगतात. तसेंच, खंडोबाचें वाचलें कीं त्यांतहि तेंच असतें. तेव्हां अशा परिस्थितींत आम्हीं काय करावें ? " तेव्हां परमात्मा म्हणाला, " माझी भक्ति केल्यानेंच मी त्यांना पावूं शकतो आणि त्यांना माझी प्राप्ति होऊं शकते. माझ्या भक्तीचीं तीन साधनें आहेत :– शास्त्रवचन, थोरवचन, आणि आत्मप्रचीति. " आपलें सध्या सगळेंच विपरीत झालें आहे. शास्त्रवचन म्हणावें तर आपण आतां इतके सुधारक झालों आहोंत कीं हल्लींच्या ज्ञानानें आपल्याला पुराणावर विश्वास ठेवण्याची लाज वाटते. थोरवचन म्हणावें तर मुलगा मोठा होऊन बापापेक्षां जरा जास्त शिकला कीं त्याला वाटतें, मी या गावढळ बापाचे कसें ऐकूं, त्यापासून माझा काय फायदा होणार ? तसेंच आत्मसंशोधनाचें. आपण शोधन करतों तें कसलें, तर पांडव कुठें राहात होते ? श्रीरामाचा जन्म कोणत्या गांवीं झाला ? कौरव-पांडवांचें युद्ध कोणत्या ठिकाणीं झालें ? मला सांगा, अशा संशोधनापासून आपला कसा फायदा होणार ? आपण जर आपलें वर्तन पाहिलें, मनांतले विचार बधितले; तर आपल्याला असें आढळून येईल कीं, लोकांना जर ते कळले तर लोक आपल्याकडे ढुंकूनहि पाहणार नाहींत, इतके ते घाणेरडे असतात; आणि असें असूनहि आपण आपल्या संशोधनाचा आणि विचाराचा अभिमान बाळगतो याला काय म्हणावें ! अशानें का आपल्याला भगवंताचें प्रेम लाभणार ! आपला परमार्थ कसा चालला आहे हें दुसऱ्या कुणीं सांगण्याची गरजच नाहीं, आपल्याला तो पुरता ठाऊक असतो. अभिमान खोल गेलेला, विचारांवर ताबा नाहीं, साधनांत आळशीपणा; मग अशा परिस्थितींत आपल्याला परमात्म्याचें प्रेम कसें लाभणार ! साधुसंतांनीं यावर एकच उपाय सांगितला आहे, आणि तो म्हणजे पूर्ण शरणागति. रामाला अगदीं विनवणी करून सांगा कीं, ' रामा, आतां मी तुझा झालों; ह्यापुढें जें कांहीं होईल ती तुझीच इच्छा मानून मी राहीन, आणि तुझें नाम घेण्याचा मी आटोकाट प्रयत्न करीन, तूं मला आपला म्हण. ' देव खरोखरच किती दयाळू आहे ! लोकांचे शेंकडों अपराध पोटांत घालूनहि शरण आलेल्याला मदत करायला तो सदैव सिद्धच असतो.

---

२६७. नामांतच जो राहिला । नामापरता आठव नाहीं ज्याला ॥
परमात्मा तारतो त्याला । हाच पुराणींचा दाखला ॥

# आसक्ति व आग्रह टाळून मनानें भगवंताचें होऊन राहावें

**२४ सप्टेंबर**

बाप स्वतः मुलाला नांवें ठेवीत असला तरी दुसऱ्यानें त्याला ' रावसाहेब' म्हटलें म्हणजे याला आनंदच होतो. बाप आपल्यापरीनें घरांत वागतो, पण मुलगा त्याप्रमाणें वागतोच असें नाहीं. घरांत अत्यंत समाधान असावें. मुलांनीं वडील माणसाचे दोष पाहूं नयेत. बाप जसा सच्छील आहे तसें मुलांनीं व्हावें म्हणजे कुळाची कीर्ति वाढते. पेन्शन घेतल्यावर आपण मनानें भगवंताचे नोकर होऊन राहावें. बाईनेंहि पतीपरतें दैवत न मानावें. सर्वांनीं भगवंताच्या नामांत राहावें. जो मनुष्य तरुणपणीं स्वाभाविक रीतीनें वागेल त्याला म्हातारपणीं स्वाभाविक रीतीनें वागतां येईल; म्हणजेच म्हातारपण त्याला मुळींच दुःखदायक होणार नाहीं. आपण अस्वाभाविक रीतीनें म्हणजेच आसक्तीनें वागत असल्यामुळें म्हातारपणीं कर्तेपण कमी होतें आणि आसक्ति मात्र टिकते, आणि ती तापदायक बनते. ज्या माणसाची आसक्ति किंवा आग्रह म्हातारपणीं सुटलेला असतो, त्याचा देह जरी अशक्त झाला तरी तो सर्वांना हवासा वाटेल. अशक्तपणामुळें त्याला ऐकायला कमी येईल, त्याला दिसायला कमी लागेल, त्याला मागच्या गोष्टीची आठवण राहाणार नाहीं. त्याची झोप कमी होईल; पण हें सर्व होऊनहि त्याचा कोणी कंटाळा करणार नाहीं। आणि त्याला स्वतःलाहि जीवनाचा कंटाळा येणार नाहीं. म्हातारपणीं आपण कसें मीपणानें वितळून जावें ! " पण मी सांगतों ना । " ही कर्तेपणाची वृत्ति नाहींशी करावी, म्हणजे मग दुःख नाहींच नाहीं.

वयाचीं १६ ते २५ वर्षें हा काल असा असतो कीं मनुष्याची बुद्धि वाढीला लागलेली असते. ती वाढ योग्य मार्गानें व्हायला बंधनाची अत्यंत आवश्यकता असते. बंधनांत उत्तम बंधन म्हणजे आईबाप सांगतील त्याप्रमाणें वागणें हें होय. कारण आपलें हित व्हावें यापलीकडे त्यांचा दुसरा हेतु नसतो. जगामध्यें प्रत्येक गोष्ट आपण स्वतःच्या अनुभवानें शिकणें कसें शक्य आहे ! म्हणून आईबापांच्या अनुभवाचा फायदा आपण जरूर करून घ्यावा. आपले आईबाप एखादे वेळीं चुकणार नाहींत असें नाहीं, कारण चुकणें हा मनुष्याचा धर्मच आहे. परंतु आपल्याविषयीं त्यांची जी हितबुद्धि असते तिच्यामुळें त्यांची चूक आपलें कायमचें नुकसान करणार नाहीं. कोणता काल कुणाच्या मार्गानें येतो हें सांगतां येत नाहीं. म्हणून आपण कधीं कष्टी होऊं नये. **सत्कर्म जेवढें मोठें तेवढीं विघ्नें अधिक. भगवंताचें अनुसंधान हें सर्वांत मोठें सत्कर्म आहे.** आपण निश्चयानें आणि निःशंकपणानें त्याचें नाव घेऊं या आणि आनंदांत राहूं या.

---

२६८. नका करूं आटाआटी । राम ठेवावा कंठीं ॥
नामांत ठेवावें प्रेम । तेथें प्रगटेल पुरुषोत्तम ॥

# अखंड अनुसंधान ठेवण्याकरितां काय करावें

२५ सप्टेंबर

भगवंतानें आपल्याला बुद्धि दिली आणि ती चालवून आपण काम करतों, म्हणजे भगवंतच आपल्याकडून सर्व कर्मे घडवीत असतो. त्याच्या प्रेरणेनेंच सर्व घडतें आहे अशी भावना प्रत्येक कर्मात ठेवली म्हणजे भगवंतावर प्रेम जडतें. जें जें कांहीं करायचें तें भगवंताकरितां करावें, म्हणजे पापपुण्याची बाधा आपल्यावर होणार नाहीं. एकदां कबीराच्या घरीं पाहुणे आले. घरांत तर त्यांना जेवूं घालायला कांहीं नव्हतें, आणि अतिथीला भगवत्स्वरूप पाहावें असें शास्त्र आहे, तेव्हां कबीरानें त्यांना पुरेल इतक्याच धान्याची चोरी केली. चोरी करणें हें वाईट असलें तरी ती भगवंताकरितां केल्यामुळें तिचें पाप त्याला नाहीं लागलें. निदान कर्म झाल्यावर तरी भगवंताचें स्मरण करून तें त्याला अर्पण करावें, म्हणजे हळूहळू अभिमान कमी होऊन भगवंतावर प्रेम जडेल. आपण भगवंताचें आहोंत, जगाचे नाहीं असा एकदां दृढ निश्चय करावा. हा निश्चय इतका दृढ असावा कीं, आपण मनुष्य आहोंत याची जाणीव जितकी दृढ असते तितका. तथापि हें साधणें फार कठीण आहे. त्याच्या खालोखालचा उपाय म्हणजे, जें कांहीं घडतें आहे तें भगवत्प्रेरणेनें, त्याच्या सत्तेनें आणि इच्छेनें घडतें आहे अशी अंतःकरण पूर्वक भावना ठेवावी. आणि हेंहि साधत नसेल तर वैखरीनें अखंड नामस्मरण करावें. या अनुसंधानाच्या प्रक्रियेंत मन भगवंताच्या ठिकाणीं चिकटून असतें. सध्यां आपलें उलटें चाललें आहे; आपण देहानें पूजा करतों, यात्राबित्रा करतो, पण मन मात्र प्रपंचाकडे ठेवतो. सासरीं असलेली सून कुटुंबातल्या सर्वांकरितां कष्ट करते. कदाचित् नवऱ्याचें ती फारसें करीतहि नसेल. पण अंतःकरणांत मात्र ती फक्त त्याच्यासाठींच असते. तसें प्रपंचांत सर्वांकरितां सर्व करावें, पण मनांत मात्र "मी रामाचा आहे" ही अखंड आठवण ठेवावी. आपलें स्टेशन ठरून आपण गाडींत बसल्यावर मध्यें अनेक गोष्टी घडतील, उभें राहावें लागेल, निरनिराळ्या तऱ्हेचे लोक भेटतील, पण स्टेशनावर उतरल्यानंतर त्या आनंदामध्यें मागचें सगळें आपण विसरून जातों, तसें भगवंताचें ध्येय निश्चित ठरून आपण अनुसंधानांत राहिल्या-नंतर प्रपंचांतल्या अडचणींना अगदीं तात्पुरतें महत्त्व येतें. ध्येय मात्र आधीं निश्चित करावें. भगवंता-प्रमाणें आपणदेखील, प्रपंचांत असून बाहेर राहावें, आपल्या देहाकडे साक्षित्वानें पाहायला शिकावें. पण तें साधत नसेल तर व्यापांत राहून अनुसंधानांत असावें. **वाचलेलें विसरेल, कृति केलेली विसरेल, पण अंतःकरणांत घट्ट धरलेलें भगवंताचें नाम कधीं विसरायचें नाहीं.**

---

२६९. कलियुगांत अवतार नसला तरी "नामावतार" आहे आणि तोच खरा तारक आहे.

# भगवंताला विसरणें ही आत्महत्याच

**२१ सप्टेंबर**

मुख्य लग्न पांचदहा मिनिटांचेंच असतें. पण आपण आधीं चार दिवस व नंतर चार दिवस त्याचा सोहळा करतों. दासबोधासारख्या ग्रंथामध्यें मुख्य विषय थोडाच असतो, पण तो समजावून देण्यासाठीं मागेंपुढें पुष्कळ सांगावें लागतें. एकदा एका माणसानें पक्वान्नें कशीं तयार करावीं हें शिकविण्याची शाळा काढली. त्या शाळेमध्यें तो मनुष्य शब्दांच्या साहाय्यानें, निरनिराळीं पक्वान्नें कशी तयार करायचीं हें आपल्या विद्यार्थ्यांना समजावून सांगे, पण त्या विद्यार्थ्यांना घरीं भाकरी करून खाण्यापुरतें पीठदेखील मिळत नसे. त्यांना त्या पक्वान्नांच्या ज्ञानाचा काय उपयोग होईल बरें ! हें जसें खरें, त्याचप्रमाणें वेदान्ताच्या गोष्टी किंवा ज्ञान हें पक्वान्नाच्या ज्ञानासारखें आहे. जो मनुष्य त्या वेदान्ताचा नुसताच अभ्यास करतों, त्याला त्यापासून तसा कांहीं फायदा होत नाहीं. आपल्यांत आणि संतांमध्यें फरक हाच कीं, आपण जगतासाठीं देव मानतों, तर संत देवासाठीं जगत् मानतात. खरें म्हणजे, जी गोष्ट आचरायला अतिसुलभ असते, ती समजावून सांगायला फार कठीण असते; ती खरीं अनुभवानेंच जाणायची असते. ज्याचा अनुभव दुसऱ्यावर अवलंबून आहे तो अपूर्ण समजावा; म्हणजेच, जेव्हां मिश्रणानें पदार्थाला चव येते तेव्हा ते दोन्ही पदार्थ अपूर्णच समजावेत. या जगांत सर्व दृष्टीनें पूर्ण असा एक भगवंतच आहे; त्याला विसरणें ही आत्महत्याच आहे. तेव्हा नेहमीं त्याच्या सान्निध्यांत म्हणजेच त्याच्या नामांत, राहण्याचा प्रयत्न करावा. सर्व कीर्तनाचें सार एकच असतें, फक्त मांडणी निराळी. खरोखर तुम्ही मारुतिरायाच्या सान्निध्यांत राहतां हें उत्तम आहे. त्याच्या सान्निध्यांत जो राहील त्याला देव भेटायला अवघड जाणार नाहीं. मारुतिरायाची भक्ति फार मोठी. श्रीरामाला वाटलें कीं याला आतां कांहीं तरी "चिरंजीव" असें दिल्याशिवाय याचें समाधान होणार नाहीं; म्हणून चिरंजीव असें "नाम" त्याला त्यांनीं दिलें. त्यामुळें त्या नामाबरोबर मारुतीहि चिरंजीव झाला. श्रीरामांनीं सर्वांना सीतामाईचा शोध करायला सांगितलें. जो तो "हूं हूं" करून शोधार्थ निघून गेला. परंतु मारुति अतिबुद्धिमान, त्यानें श्रीरामाला 'सीतेला कसें ओळखायचें' म्हणून विचारलें, त्यावर श्रीरामांनीं तिचें पुष्कळ वर्णन केलें. सुंदर आहे म्हणून सांगितलें, परंतु सुंदर स्त्री कशी दिसते हेंच त्याला माहिती नाहीं ! तेव्हा श्रीरामप्रभु त्याला म्हणाले, "तुम्हांला मी काय सांगतों हें कळलेलें दिसत नाहीं; तुम्ही आतां एकच गोष्ट लक्षांत ठेवा. कीं जिथें तुम्हांला रामनामाचा सारखा ध्वनि ऐकूं येईल तिथें सीतामाई आहे म्हणून समजा." तेव्हा ती खूण मारुतिरायाला पटली. **ज्याला भगवंताच्या नामाची खूण मनापासून समजली त्याच्या जन्माचें सार्थक झालें, त्याचा परमार्थ सफल झाला, आणि त्याला जगांत मिळवायचें बाकी असें कांहीं राहिलेंच नाहीं.** सर्व संतांचें सांगणें आहे कीं, मनापासून भगवंताचें नाम घ्या आणि आपलें कर्तव्यकर्म करा.

---

२७०. वासना नदी ओलांडण्यास । भगवंताच्या नामाचा सेतु पाहिजे ॥
देहाचें चलन ज्याचे सत्तेनें । त्या रघुपतीचें स्मरण असावें आनंदानें । ।

# भगवंताचें अनुसंधान म्हणजे प्रपंच आणि परमार्थाच्या उंबरठयावरचा दिवाच

२७ सप्टेंबर

गुरूनें सर्व करावें ही गोष्ट सत्य आहे आणि तो करतो हीहि गोष्ट तितकीच सत्य आहे. पण आपण खरोखर सच्छिष्य आहोत कीं नाहीं हें पाहावें. देहातीत व्हायला, गुरुआज्ञेप्रमाणें वागणें यापरतें दुसरें काय आहे ! मी देही नाहीं असें म्हणत राहिलों तर केव्हातरी देहातीत होईन दुसरा मार्ग म्हणजे 'भगवंत माझा' म्हणावें; म्हणजे देहाचा विसर पडतो. समर्थांचें नांव घेऊन सांगतों कीं आपला नीतिनेम सांभाळा आणि कोणताहि प्रसंग आला तरी नामाला विसरूं नका. मीं जें जें करतों तें तें भगवंताकरितां करतों असें जो म्हणतो तो खरा आणि उत्तम भक्त होय. कर्तेपण घालवायला उत्तम भक्त व्हावें लागतें. भक्ताचें लक्षण म्हणजे भगवंतप्राप्तीशिवाय दुसरें कांहीं नको असें वाटणें. भगवंतापासून आपल्याला जें दूर सारतें तें खरें संकट होय. तो काळ सुखांत जातो कीं जो भगवत्स्मरणांत जातो. **खरोखर स्मरण ही कृति आहे. आणि विस्मरण ही वृत्ति आहे. भगवंताचें स्मरण करणें म्हणजे हवन करणें होय, आणि अभिमान नष्ट करणें म्हणजे पूर्णाहुति देणेंच होय.** वृत्ति भगवंताकार झाली पाहिजे. विसरायला शिकणें हें एक शास्त्र आहे. आपल्याला ज्याची आवड असते त्याचें स्मरण आपोआप राहतें. विषय अंगभूत झाले असल्यानें त्यांचें स्मरण सहज राहतें; पण भगवंताचें स्मरण आपण मुद्दाम करायला पाहिजे. हें करणें अगदींच सोपें नाहीं परंतु तें फार कठीण देखील नाहीं तें मनुष्याला करतां येण्यासारखें आहे. भगवंताची भक्ति ही सहज साध्य आहे. ती अनुसंधानानें साध्य होते. अनुसंधान समजून केलें पाहिजे. तिथें अनुभव लवकर येईल. पहाऱ्यावर शिपाई जसा जागृत राहतो त्याप्रमाणें अनुसंधान जागृत ठेवलें तर विषयांच्या संकल्पाचे पाय मोडतील. चोर चोरी करायला केव्हां येईल हें ओळखून अनुसंधान चुकूं देऊं नये. ताप आला कीं तोंड कडू होतें; मग जिभेवर साखर जरी चोळली तरी तोंड गोड होत नाहीं. त्यासाठीं अंगांतला ताप गेला पाहिजे. त्याप्रमाणें, वरवर क्रिया करून दुःख नाहींसें होणार नाहीं, त्यासाठीं अनुसंधानच पाहिजे. एक मुलगा परीक्षेसाठीं मुंबईला आला. परीक्षा होईपर्यंत तो अडकून होता. परीक्षा संपली तेव्हां तो म्हणाला, "आतां मी मोकळा झालों बाबा !" नंतर चार दिवस तो मजेंत मुंबईत हिंडला. त्याप्रमाणें आपण अनुसंधान ठेवून प्रपंचाच्या आसक्तींतून मोकळें व्हावें, आणि मग मजेनें संसार करावा. आपल्याला अगदी आनंदच मिळेल. उंबरठयावर दिवा ठेवला असतांना ज्याप्रमाणें दोन्ही बाजूला उजेड पडतो, त्याप्रमाणें भगवंताचें अनुसंधान हा उंबरठयावरचा दिवा आहे; त्यानें परमार्थ आणि प्रपंच दोन्हीकडे उजेड पडेल. प्रपंचामध्यें वागतांना मनानें थोडें लक्ष द्यावें लागतें. त्याला भगवंताचें अधिष्ठान असणें म्हणजेच अनुसंधान ठेवणें असें म्हणतात. भगवंताच्या इच्छेनें अकर्तेपणानें कर्म करणें हेंच अनुसंधान ठेवणें किंवा भक्ति करणें होय. खरोखर, नाम साधन सोपें आहे पण तें घेणें कठीण आहे.

---

**२७१. आतां काळ कठीण । नामाचा आधार पाहिजे धरला ।।**
**प्रपंचांत धरितां नामाची संगति । काळजीविरहित आनंद देई ।।**

# अनुसंधानांत राहिल्यावर अभिमान गळून जातो

२८ सप्टेंबर

अभिमान सोडून जो गृहस्थाश्रम पाळील तोच खरा परमार्थी. अभिमान सोडल्यानें गृहस्थाश्रम चांगला होतो. " मी म्हणेन तसें होईल " असें कधींहि म्हणूं नये. अभिमानाच्या पायावर उभारलेली इमारत डळमळीत होणारच. अभिमान हा देहाचा आणि तत्संबंधीं विषयांचा असतो. अभिमानाचें मूळच काढून टाकावें; म्हणजे मी देहाचा आहें म्हणतो हेंच काढून टाकावें. हा देह माझा नाहीं हें आपल्याला पटतें, पण अखंड सहवासानें आपलें त्यावर प्रेम जडतें. एकदां देहावर प्रेम जडलें म्हणजे मग अभिमान आला, त्याच्या पाठोपाठ लोभ, क्रोध येणारच. अभिमान म्हणजे " मी कर्ता " ही भावना असणें. ही भावना टाकून काम केलें तर व्यवहारांत कोठें नडतें ? आपल्या देहाचा आणि मनाचा फार निकटचा संबंध आहे, पण देह केव्हांतरी जाणार असल्यानें त्याला इतकें महत्त्व नाहीं. नुसता जाडजूड देह कामाचा नाहीं. आपलें मन तयार झालें पाहिजे. " मी भगवंताचा आहें " हें एकदां मनानें जाणून घेतलें म्हणजे मग अभिमानरहित होतां येतें. नेहमीं भगवद्भजनांत राहण्याचा प्रयत्न करा म्हणजे अभिमान शिवणार नाहीं. डोळ्यांत पाणी आणून भगवंताला आळवावें, त्याला शरण जावें; भगवंत कृपा केल्याशिवाय राहाणार नाहीं. आपण आपल्या मर्यादा ओळखून वागावें. अमुक एक गोष्ट अमक्या तऱ्हेनें घडावी असें जोंपर्यंत आपल्याला वाटत आहे, तोंपर्यंत व्यवहाराच्या मार्गानें जो योग्य प्रयत्न आहे तो आपण केला पाहिजे. पण प्रयत्न केल्यावर मात्र त्याचें फळ भगवंतावर सोंपवावें, आणि जें काहीं घडेल त्यामध्यें समाधान मानावें. आपलें अंतःकरण नेहमी शुद्ध ठेवावें. रात्रीं निजण्यासाठीं अंथरुणावर पडलें असतांना आपलें अंतरंग शोधून पाहावें कीं, " मी कुणाचा द्वेष-मत्सर करतों का ? " तसें असेल तर तें मनांतून जबरीनें काढून टाकावें; तें थोडें जरी शिल्लक राहिलें तरी आपल्या परमार्थाच्या आड येणार आहे. आपल्या मनानें आपल्याला निश्चयानें असें सांगितलें पाहिजे कीं, " मी कुणाचाहि द्वेष करीत नाहीं. " आपलें अंतःकरण इतकें शुद्ध आणि सरळ असावें कीं, आपण कुणाचा द्वेषमत्सर करूं नयेच नये, परंतु दुसरा कुणी आपला द्वेष करीत असेल ही कल्पनासुद्धां आपल्याला येतां कामा नये. एखाद्यानें बारा वर्षें एखाद्या घराची वहिवाट केली तर कायद्यानें तें घर त्याचें होतें. असें जर होऊ शकतें तर बारा वर्षें तपश्चर्या करून, म्हणजे " मी भगवंताचा आहें, या देहाचा नाहीं " असें अखंड अनुसंधान ठेवून, आपल्याला भगवत्स्वरूप कां होतां येणार नाहीं ? जो आंतबाहेर भगवंतानें भरून राहील किंवा त्या ज्ञानानें भरून राहील तोच खरा ज्ञानी होय. आणि जाणीव ज्याप्रमाणें देहाला व्यापून असते त्याप्रमाणें भगवंताचें स्मरण ज्याचें मन व्यापून टाकील तोच खरा साधक, तोच खरा अनुसंधानी, आणि तोच खरा मुक्त समजावा.

२७२. नामाविण जगणें । तेंच खरें लाजिरवाणें ॥
सर्वांनीं नामाला लागावें । जन्माचें सार्थक करून घ्यावें ॥

# भगवंताच्या अनुसंधानांत राहणें हाच सुखाचा शोध आहे

२९ सप्टेंबर

तुम्हाला नाम घ्यायला सांगितलेलें तुम्हीं केलें नाहीं म्हणून मी गेलेला पुनः आलों. आता असेंच कितीहि जरी मी सांगत राहिलों, तरी तुम्ही तें घेणार तरी कधीं ? म्हणून आजपासून नामाशिवाय राहायचें नाहीं असा निश्चय करा. तुम्ही कोणाच्याहि नादीं लागूं नका. त्यांत मीसुद्धां आलों; पण भगवंताच्या नामाच्या नादीं मात्र लागा. कोणत्याहि परिस्थितींत अखंड अनुसंधान तुम्हीं टिकवावें ही माझी खरी इच्छा आहे. माझ्याकडे जो येईल त्याला मी "राम" म्हणायला लावीनच. निदान "मी राम म्हणणार नाहीं" असें वदवून तरी त्याला राम म्हणायला मी लावीन. मला भविष्य कळत नाहीं आणि तें कळायला लागलें तरी 'तें कळूं देऊं नकोस' असें मी रामाजवळ मागेन. "मला सर्व कळतें" असें जें माझ्याबद्दल तुम्ही म्हणतां तें मनापासून नव्हेच; कारण ज्याला असें खरोखर वाटत असेल त्याच्या हातून पापकर्म होणारच नाहीं. ज्याची वृत्ति माझ्याशीं एकरूप होईल त्यालाच असें कळेल कीं मला सर्व कळतें आहे. तुमचा भोग मी कमी करीत नाहीं. तो तुमच्या कर्मांचा परिणाम असल्यामुळें तो कमी करणें हें पाप आहे. पण मनुष्य कशाहि प्रसंगांत असो, त्याचें दुःख त्याला विचारून मी त्याला खात्रीनें समाधान देईनच देईन. प्रपंची माणसाच्या दुःखाची मला पूर्ण जाणीव आहे. ती जाणीव ठेवूनच, भगवंताचें नाम घ्या असें मी म्हणतों. ज्याला परमार्थबुद्धि नसेल त्याच्यांत माझ्या बोलण्यानें ती जागृत होईल, जो साधनांत आहे त्याला पुढचा मार्ग प्रकाश पावेल, आणि ज्याला सापडलें आहे त्याचें तें स्थिर होईल. माझें बोलणें प्रत्येकाला कळतें; ज्याची जेवढी तयारी असेल तेवढें त्याला कळतें, पण वायां कोठेंच जात नाहीं. एखाद्या वर्गातलीं पुष्कळ मुलें पास झालीं तर तो वर्ग शिकवणाऱ्या मास्तरांना बढती मिळते, त्याप्रमाणें माझ्याशीं ज्याचा संबंध येईल ते चांगले वागले तर त्यामध्यें मला फायदाच आहे. अशी निश्चित खात्री आहे, नव्हे माझी अशी प्रतिज्ञा आहे कीं, जो मी सांगितल्याप्रमाणें वागेल त्याचें काम, मी रामाचा हात धरून त्याच्याकडून करवून घेईन. कारण रामानेंच हें काम करायला मला सांगितलें आहे. गोंदवल्याच्या रामासारखें जाज्वल्य स्थान सांपडणें कठीण आहे. परंतु ज्याप्रमाणें लहान मुलाला आपल्या बोलण्याचा अर्थ कळत नाहीं, त्याचप्रमाणें आपण साधनांत न राहिल्यामुळें आपल्याला रामाचें महत्त्व कळत नाहीं. खरोखर जें संतांनीं सांगितलें आहे तेंच मी सांगतों तें सत्य आहे असें समजा. मी सांगतों असें वागा, राम तुम्हाला सुखी करील हें हमखास समजा. जगांतलें दुःख मला पाहवत नाहीं. दुःख नसावें असें मला वाटतें. तुमचें दुःख पाहून मला दुःख वाटतें; पण तुमचें दुःख जसें खरें नसतें, तें वरवरचें असतें, तसें माझें दुःखहि वरवरचें असतें; कारण ज्याला खरें दुःख झालें तो जगणारच नाहीं. सुखाचा शोध, शोध, शोऽऽध केला आणि तें मला सांपडलें म्हणून मी तुम्हाला त्याचा निश्चित मार्ग सांगेन. तो मार्ग म्हणजे भगवंताचें अनुसंधान होय. तुम्हीं सर्वांनीं नामांत राहावें, राम तुमच्यावर कृपा करील, हा तुम्हा सर्वांना माझा आशीर्वाद आहे.

---

२७२. मी अत्यंत समाधानी आहे, तसे तुम्ही समाधानी राहा. जें मी सुरुवातीला सांगितलें तेंच मी शेवटीं सांगतों. तुम्ही कसेहि असा पण भगवंताच्या नामाला सोडूं नका.

# प्रपंचांत असावी खबरदारी । मन लावावें रामावरी

**३० सप्टेंबर**

सर्वांचें राखावें समाधान । पण रामाकडे लावावें मन ।। रामाला स्मरून वागावें जगांत आपण । तेथें पश्चात्तापाला नाहीं कारण ।। म्हणून कृतीस असावा साक्षी भगवंत । हा जाणावा खरा परमार्थ ॥ व्यवहारांत असावें जपून । मी कोणाचा हें जाणून ।। भगवंताचें होऊन राहणें । याहून दुजें कांहीं न करणें ॥ राम कर्ता सर्वस्वीं पाहीं ।। **व्यवहार करावा व्यवहारज्ञानानें । परमार्थ करावा गुरुआज्ञेनें ॥** कली अत्यंत माजला । गलबला चोहोंकडून जरी झाला । चित्त ठेवावें रामावर स्थिर । कार्य घडतें बरोबर ॥ स्वस्थ बसावें एके ठिकाणीं । राम आणत जावा मनीं ।। प्रयत्नांतीं परमात्मा । ही खूण घालावी चित्ता । व्यवहारीं ठेवावी दक्षता ।। मागील झालें तें होऊन गेलें । पुढील होणार तें होऊं द्यावें भलें । त्याचा न करावा विचार । आज चित्तीं स्मरावा रघुवीर ॥ आंतबट्ट्याचा नाहीं व्यापार । ज्यानें घरीं आणला रघुवीर ॥ नुसत्या प्रयत्नानें जग सुखी होतें । तर दुःखाचें वारें न भरतें ।। म्हणून परमात्मा आणि प्रयत्न । यांची घालावी सांगड । म्हणजे मनीं न वाटे अवघड ।। जेथें वाटतें हित । तेथें गुंतत असतें चित्त । चित्त गुंतवावें भगवंतापाशीं । देह ठेवावा व्यवहाराशीं ।। चित्तीं ठेवावी एक मात । कधीं न सुटावा भगवंत ।। राम माझा धनी । तोच माझा रक्षिता जनीं । हें आणून चित्तीं । विषयाची योग्यतेनें करावी संगती ।। आपण वर्तावें जगांत ऐसें । भगवंत ज्यांत सोडावा न लगे ॥ म्हणून दाता राम हें आणून चित्तीं । आपण वर्तावें जगतीं ।। देह करावा रामार्पण । मुखीं घ्यावें नामस्मरण ।। संतांची संगति । रामावर प्रीति । तोच होईल धन्य जगतीं ।। व्यवहार सांभाळून । करावा परमार्थ जतन ।। राम ठेवावा हृदयांत । जपून असावें व्यवहारांत ।। रामाचें चिंतन नामाचें अनुसंधान । वृत्ति भगवत्परायण साधुसंतास मान । आल्या अतिथा अन्नदान । भगवंताला भिऊन वागणें जाण । याविण परमार्थ नाहीं आन ।। प्रपंचांत असावी खबरदारी । मन लावावें रामावरी । त्याचा राम होईल दाता । न करावी कशाचीहि चिंता ।। करवंटीचें कारण । खोबरें राहावें सुखरूप जाण । तैसें आपले देहाचे संबंध ठेवून । चित्तीं असावा रघुनंदन ।। परमार्थ करावा जतन । मन करून रामाला अर्पण ।। प्रपंचीं असावें सावध । कर्तव्यीं असावें दक्ष । तरी न सोडावा रामाचा पक्ष ।। प्रयत्नांतीं परमेश्वर हे सज्जनाचें बोल । मनीं ठसवावें खोल ।। **पण आरंभीं स्मरला राम । त्यालाच प्रयत्नांतीं राम । हा ठेवावा विश्वास । सुखे साधावें संसारास** ।। कर्तव्यांत भगवंताचें स्मरण । हेंच समाधान मिळण्याचें साधन ।। प्रयत्न करावा मनापासून । फळाची अपेक्षा न ठेवून ।। कर्तव्यांत असावें तत्पर । निस्वार्थ बुद्धि त्याचे बरोबर ।। जोंवर देहाची आठवण । तोंवर व्यवहार करणें जतन । म्हणून प्रयत्न करावा कर्तव्य जाणून । यश देणें न देणें भगवंताचे आधीन ।। प्रपंचांत प्रत्येकजण कर्तव्यांत राहील । तर समाधान घरीं चालत येईल । कारण कर्तव्यांत राहणें हेंच समाधानास बोलावणें ।।

---

**२७४. दाता राम हें आणून चित्तीं । आपण वर्तावें जगतीं ।।**

# देवदेवतांचे उत्सव भगवंताचें प्रेम वाढीस लागावें एवढ्यासाठींच असतात

१ ऑक्टोबर

प्रत्येक गोष्ट घडण्यासाठीं योग्य वेळकाळ यायला पाहिजे. लग्नामध्यें खऱ्या विवाहाविधीला, म्हणजे अंतरपाट धरून सप्तपदी होईपर्यंत, थोडाच वेळ लागतो, पण या संस्काराचें महत्त्व आणि गांभीर्य मनावर ठसावें म्हणून चार दिवस एवढे सोहाळे करतात. त्याचप्रमाणें उत्सवामध्यें भगवंताचें प्रेम हें मुख्य आहे. बाकी आनंद आणि उत्साह हे त्याला पोषक म्हणून असावेत. आपला प्रत्येक सण आपल्याला भगवंताची आठवण करून देण्यासाठीं आहे. देवदेवतांच्या उत्सवाचें स्तोमहि भगवंताचें प्रेम वाढीला लागण्यासाठीं मुख्यत: आहे. दिवाळीमध्यें फटाके उडवणें, गोड खाणें, फराळ करणें, या सर्व गोष्टी मागचें दुःख विसरण्यासाठीं म्हणून आहेत. उत्सव काय, सण काय, धार्मिक कृत्यें काय, तीर्थक्षेत्रें, पूजापठण इत्यादि सर्वांचें कार्य भगवंताचें प्रेम मिळविणें हेंच मुख्यतः आहे; पण याचा कुणी कधीं विचारच करीत नाहीं. आपल्या हातून घडणारें प्रत्येक कर्म भगवंताच्या कृपेनें होतें आहे ही भावना निर्माण झाली पाहिजे, म्हणजे हवे-नको-पण नाहीसें होऊन त्याच्या ठिकाणीं प्रेम उत्पन्न होईल. देवाचें प्रेम यायला त्याची भीति गेली पाहिजे. आपण भुताखेतावर आपला विश्वास नाहीं असें म्हणतों; पण कुणी करणी केलेला माणूस भेटला असतांना किंवा पछाडलेला माणूस बघितल्यावर आपल्याला त्याची भीति उत्पन्न होते. जी आपल्याला भुताखेताची वाटते तीच देवाबद्दल वाटली तर आपल्याला त्याच्याबद्दल प्रेम कसें उत्पन्न होणार ! तेव्हा प्रथम देवाबद्दलची भीति मनातून काढून टाका. देव कधींहि कोणाचें वाईट करणार नाहीं याची खात्री बाळगा. **परमेश्वर दयेचा सागर आहे.** कोणत्या माउलीला आपल्या बाळाला दुःख व्हावें असें वाटेल ! आपण तिला मनापासून हाकच मारीत नाहीं, भगवंताचें नाम मनापासून घेतच नाहीं. इथेंच आपलें सर्व चुकतें. तेव्हा गोंदवल्यास आल्यासारखें, रामाजवळ जाऊन आतां तुम्ही एकच मागा, “ रामा, तुझें प्रेम आम्हाला दे. ” तुम्ही मागाल तें तो तुम्हाला खात्रीनें देईल ह्यावर विश्वास ठेवा. तो त्याच्या-साठींच इथें उभा आहे. **रामाची भक्ति करण्यानें आपला संसार आपली कल्पनाहि होणार नाहीं इतका सुखाचा होईल** कोणत्याहि परिस्थितींत नामाला सोडूं नका. भगवंताच्या नामानेंच त्याचा सहवास घडेल आणि त्याचें प्रेम उत्पन्न होईल. **नाम हें भगवंताला अत्यंत जवळचें आहे.** या नामाची तुम्ही संगत धरा, त्याचा सतत सहवास ठेवा, त्याला प्राणापलीकडे जपा; मग हेंच नाम तुम्हाला थेट भगवंतापर्यंत पोंचविल्याशिवाय राहणार नाहीं. जिथें राम तिथें नाम आणि नाम तिथें राम. खरोखर तुम्हीं नामांत दंग होऊन स्वतःला विसरा, मग राम तुमच्यापुढेंच उभा आहे.

---

२७६. दृश्यामध्यें असणारी भगवंताची खूण म्हणजे नाम होय. “ हेंच माझें सर्वस्व आहे ” असें नामांत प्रेम असावें.

# भगवंत माझ्यांत आहे तसा इतरांतहि आहे ही जाणीव ठेवावी

२ ऑक्टोबर

सर्वां भूती भगवंत आहे याची खात्री पटायच्या आधीं तो माझ्यात आहे हें पटलें पाहिजे. सोन्याचा दागिना 'मला सोनें भेटवा' असें म्हणत नाहीं; त्याचप्रमाणें, मला भगवंत बाहेरून कुठून भेटायचा आहे असें नाहीं समजूं. तो आपल्याजवळच आहे. मनुष्य बोलतो तसा जर वागला तर त्याला त्याची प्रचीति आल्याशिवाय राहणार नाहीं. मी 'कुणाचा' आहें हें जर जाणलें तर मी 'कोण' हें कळायला वेळ लागायला नको. सत्समागम केला म्हणजे मी कोण आहे हें कळतें. साक्षीरूपानें नटलेला जो मीं, त्याला पाहायला जंगलांत जायला नको. 'माझेंपण' सोडावें म्हणजे 'मी' चा बोध होतो. भगवंत चोहोंकडे भरलेला आहे असें आपण नुसतें तोंडानें म्हणतो. पण त्याप्रमाणें वागत नाहीं हें आपलें मूळ चुकतें. भगवंत माझ्यात आहे तसाच तो दुसऱ्यातहि आहे हें आपण सोईस्करपणें विसरून जातो. जसा खोलींतला दिवा प्रकाशानें सर्व खोली व्यापून टाकतो, तसें हें सर्व जग भगवंतानें व्यापून टाकलें आहे. मी कर्ता नसून राम कर्ता आहे हें म्हटलें म्हणजे त्यांत सर्व आलें. पोशाख निरनिराळे केले तरी मनुष्य हा एकच असतो. संन्यास हा मनाचा असतो पोशाखाचा नसतो. मनावर कशाचाच परिणाम होऊं न देणें हाच संन्यास. नामांत भगवंत आहे असें जाणावें. सगुण भक्ति करावी, पण भक्तीनें नाम घ्यावें आणि भगवताचें होऊन राहावें हाच परमार्थाचा सुलभ मार्ग आहे. साधुसंतांनीं अतिशय परिश्रम घेऊन आणि स्वतः अनुभव घेऊन हा मार्ग आपल्याला दाखवून दिला आहे. आपलें ज्याच्याशीं साम्य आहे त्याच्याशीं आपली मैत्री जमते. आपण देही असल्यामुळे आज आपला देवहि आपल्यासारखाच पण त्याच्याहि पलीकडे असणारा असा पाहिजे. अशा प्रकारचा देव म्हणजे सगुण मूर्ति होय. लहान मुलगा एखाद्या वस्तूसाठीं हट्ट करूं लागला की, आपण त्याच्यापुढें त्या वस्तू-सारख्या इतर पण बाधक नसणाऱ्या वस्तू टाकतो. त्याचप्रमाणें सगुणोपासनेचा परिणाम होतो. दृश्य वस्तूंवर आपलें प्रेम आहे; जें दिसतें तेंच सुखाचें आहें असें आपल्याला आज वाटतें; म्हणून आपणच आपल्या कल्पनेनें भगवंताला सगुण बनविला आणि त्याची उपासना केली. आपली बुद्धि निश्चयात्मक होण्यात या उपासनेचा शेवट होईल. आग्रह आणि प्रेम फक्त एका भगवंताच्या ध्येयाबद्दल असावें. इतर ध्येयें असावीत, पण त्यांचा आग्रह नसावा. प्रपंचामध्यें व्यवहार होत असतांना भगवंतापासून जेव्हां वृत्ति हलत नाहीं तेव्हां तिला "सहजसमाधि" असें म्हणतात. **सहजपणानें जगणें, म्हणजे सहजपणांतून वेगळें न राहणें, हीच सहजसमाधि होय.** "राम सर्व करतो" आणि "राम माझा दाता आहे" ही भावना ज्याची स्थिर झाली, त्याच्यावर भगवंताची कृपा झाली असें समजावें, आणि त्याच्या जन्माचें सार्थक झालें हें सांगणें नकोच.

---

२७६. परा पश्यंती वैखरी वाणी । याच्याही पलिकडे नाम ठेवा स्मरणीं ।
जो नामांत राहिला दंग । त्यानें लुटला रामरंग ॥

# मीपणा ठेवून देवाकडे पाहणाऱ्यास त्याची प्राप्ति होत नाहीं

**३ ऑक्टोबर**

देवाला आपण जाणूं म्हणून तो जाणला जाईल का ? मला ब्रह्म कळलें म्हणून शब्दानें सांगितलें तर ब्रह्म कळलें असे होत नाहीं. जो ब्रम्ह कळलें असें म्हणतो, त्याला खरें म्हणजे कहींच कळलें नाहीं असें होतें. तें कळून घेऊं म्हणून कळत नाहीं; तें न कळतच कळतें आणि मग 'मला कळलें' ही भावनाच तिथें राहात नाहीं. मी ब्रह्माला ओळखीन असें म्हणून जो देवाजवळ गेला, त्याला कांहींच प्राप्ति होणार नाहीं. मीपणानें जो देवाला पाहूं जातो त्याला देवाची प्राप्ती होत नाहीं. आपला अहंकारच देवाच्या प्राप्तीच्या आड येतो; आणि तो बरोबर घेऊनच जर आपण देवाला शोधूं लागलों तर तो कसा सांपडेल ! आपल्या आणि देवाच्यामध्यें आपल्या अहंकाराचा पातळ पडदा असतो, आणि तो असल्यामुळें आपल्याला देव दिसत नाहीं. तो दूर करा म्हणजे देव दिसूं लागेल. व्यापार चांगला चालला नाहीं म्हणजे मग विचारायला येता कीं तुम्हीं व्यापार करायला सांगितला, पण चांगला चालत नाहीं. पण त्याचबरोबर नामस्मरण करायला सांगितलें होतें आणि तें करीत नाहीं, हें मात्र सांगायचें नाही ! नामस्मरण केल्यानें व्यापारांत बिघाड येईल का ? तुम्ही म्हणाल कीं, आपच्या संसारांत तुम्ही बिघाड करायला सांगतां परंतु मी बिघाड करायला सांगत नसून माझ्या सांगण्यावरून तुम्हीं नामस्मरण केलें तर उलट तें चांगलेंच होईल. मी जो आलों आहे तो तुम्ही जास्त काळजी करा म्हणून सांगायला आलों नसून, तुम्ही काळजी न करतां संसार करा म्हणून सांगायला आलों आहें. रामाला जें करायचें तें तुम्हीं कांहीं केलें तरी करायला तो चुकत नाहीं; मग काळजी करून तरी काय होणार आहे ! जें भोगायचें तें कष्टानें भोगण्यापेक्षा आनंदानें भोगलेलें काय वाईट ! जे जे आघात होतील ते त्याचे म्हणून त्याच्याकडे पाठवावेंत. आपल्याला त्यांच्याशी कर्तव्य नाहीं असें समजत जावें. आपल्याला नवस करायचा असेल तर असा करावा कीं, 'मला तूं ज्या स्थितींत ठेवशील त्या स्थितींत आनंद दे. म्हणजे मला समाधान राहील. दुसरें कांहीं मागण्याची इच्छाच होऊं देऊं नको,' असें मागावें, म्हणजे आपल्याला त्याचें होऊन राहतां येईल. मनुष्याची शांति बिघडायला जगामध्यें दोनच कारणें आहेत. एक म्हणजे आपल्याला हवें तें न येणें, आणि दुसरें म्हणजे आपल्याला नको तें येणें. बरें, या दोन्हींपैकीं आपल्या हातामध्यें एकहि नाहीं; मग आपण दुःख कां करावें ! ज्याला माती आणि सोनें सारखें झालें, ज्याला स्त्री आणि पुरुष हा भेद राहिला नाहीं, जो स्वतः वितळला, त्यानें ब्रह्माच्या गोष्टी बोलाव्या. "मी कोण आहें" हें पाहण्याच्या अगोदर "मी काय नाहीं" हें पाहावें, म्हणजे "मी कोण आहें" हें कळेल. जो स्वतःचा मालक बनतो तोच जगाचा मालक बनतो.

---

२७७ रामनाम बोलावें वाचा । काळ न येऊं वाचा काळजीचा !
नाम ज्यानें घेतलें सर्वकाळ । जिंकला त्यानें एक अंतकाळ ॥

# भगवंताच्या संयोग-वियोगांतच खरें सुखदुःख आहे

**४ ऑक्टोबर**

हल्लीं लोकांचें हित करण्यासाठीं जो तो झटत असतो, पण आपलें स्वतःचें हित साधल्याशिवाय दुसऱ्याचें हित आपण काय करणार ! ज्याला स्वतःला सुधारतां येत नाहीं तो दुसऱ्याला काय सुधारणार ! त्यालासुद्धां अभिमानच आड येतो, कारण त्याला वाटतें, "आपण दुसऱ्याचें हित करून देऊं" या अभिमानानें तो फुगलेला असतो. अहंकार जाण्यासाठीं साधनच करावें लागतें, आणि तें साधन गुरु सांगत असतात, म्हणून त्यांच्या आज्ञेप्रमाणें वागलें म्हणजे आपलें हित होतें. ब्रह्म हें कांहीं कुठें शोधायला जावें लागत नाहीं, तें आपल्या जवळच असतें; पण तें दुसऱ्यानें आपल्याला दाखवावें लागतें. हेंच काम सद्गुरु करीत असतात. श्रीकृष्ण, प्रत्यक्ष परब्रह्म, अवतार घेऊन वसुदेवाचे पोटीं आले, परंतु वसुदेव त्यांस आपला मुलगाच समजत होते तोपर्यंत प्रत्यक्ष परमात्मा घरीं असूनहि ओळख पटली नाहीं. तेंच नारदांनीं जेव्हां त्यांना सांगितलें कीं, श्रीकृष्णाला आपला मुलगा न समजतां तो परब्रह्म आहे असें समजा म्हणजे तुमचे हित होईल, तेव्हां खरी ओळख पटली. तसेंच राम अवतारी असूनहि वसिष्ठांनीं जेव्हां सांगितलें कीं, "तूंच प्रत्यक्ष परब्रह्म आहेस." तेव्हांच त्याला तें ज्ञान झालें. आतां हें जरी केवळ आपल्याला दाखविण्याकरितां असलें तरी त्याचा अर्थ हा कीं गुरूनें दाखविल्याशिवाय तो परमात्मा भेटत नाहीं. गुरु तरी काय सांगतात ? नामस्मरण हेंच साधन म्हणून ते सांगतात. तें दिसायला जितकें सोपें तितकेंच करायला कठीण असतें; तें सोपें आहे म्हणून सोडून देऊं नये. आपण देवाला शरण जाऊन साधन करायला लागावें, म्हणजे तें करायला तो परमात्मा शक्ति देतो. आपण त्याचे आहोंत, आणि जें जें होतें तें त्याच्या इच्छेनें होतें, असें, समजून वागावें.

जगांत खरें सुख नाहीं आणि दुःखहि नाहीं. जगांत सुखदुःख आहे असें जें आपल्याला वाटतें तें अपुरें आहे; तें तात्पुरतें आहे. खरें सुखदुःख भगवंताच्या संयोग-वियोगामध्येंच आहे. खरें पाहतां आपली बुद्धि अगदीं लवचिक आहे; आपल्या वृत्तीवर कशाचाहि परिणाम होतो म्हणून आपल्या मागें भगवंताचा आधार हवा. भूक लागली तर आईजवळ खायला मागावें, पण चोरी करूं नये, तसें पोटापुरतें भगवंताजवळ मागावें, पण जास्त मागूं नये. भगवंत अत्यंत जवळ आहे आणि अत्यंत दूरहि आहे. तसाच तो सर्वव्यापी आहे , म्हणून तो आपल्याला दिसत नाहीं. आपण दरवर्षी भगवंताचा जन्म करतों, याचा अर्थ असा कीं, मागच्या वर्षीं आपण जन्म केला हें विसरलों, म्हणून या वर्षीं पुनः त्याचा जन्म करावा लागला ! खरें म्हणजे भगवंताचा वाढदिवस करायला पाहिजे. भगवंत काल होता, आज आहे, आणि उद्यां राहणारच, म्हणून त्याचा खरा वाढदिवस होऊं शकतो. भगवंताचें अस्तित्व आपण जागृत ठेवलें तर दरवर्षी जास्त उत्साह वाढेल आणि आनंदाचा वाढदिवस होईल.

---

२७८. भगवंत ठेवील त्यांत हित मानावें । अखंड नामस्मरण घ्यावें ॥
नामांत स्वतःचा विसर । हेंच देईल रघुवीर ॥

# भगवंत आहे ही जाणीव होण्याकरितां भगवंताचा जन्मोत्सव करायचा असतो

**५ ऑक्टोबर**

पाण्याचा रंग कोणता म्हणून विचारलें तर काय सांगता येईल ! त्याप्रमाणें भगवंत आहे. ज्याप्रमाणें पाहाल त्याप्रमाणें तो आपल्याला दिसेल. आमच्यामधल्या विकारामुळें तो आपल्याला निराळा दिसूं लागतो. खरोखर भगवंताचें खरें स्वरूप जाणणारें विरळाच. ज्याचें विकार कमी त्याला भगवंताची प्रचीति जास्त. एकच राम चोहोंकडे कसा असेल हें म्हणणें भ्रमाचें आहें. सर्व अवतार एका भगवंताचेच आहेत. नारायण हा लहानपणचा अवतार आहें, कारण तो सर्वांचा आदि आहे. राम हा तरुणपणचा अवतार; आणि कृष्ण हा म्हतारपणचा अवतार समजावा. भगवंताला जन्ममरण नाहीं. तो तर सच्चिदानंद आहे, मग त्याचा जन्म कशाला करायचा असें कांहीजण विचारतात. एका घरामध्यें बाहेरच्या खोलींत पोरें धिंगामस्ती आणि आरडाओरडा करीत होती. आजोबा घरांत आहेत हें त्यांना माहीत नव्हतें. आपण घरामध्यें आहोंत ही जाणीव त्या पोरांना देण्यासाठीं, खाकरा आला नसतांना देखील आजोबा नुसते खांकरलें; ते ऐकल्याबरोबर पोरें लगेच गप्प बसली. हें जसें होतें त्याचप्रमाणें, भगवंताला जन्म नसूनसुद्धां, “ तो आहे ” ही जाणीव होण्यासाठीं त्याचा जन्म करायचा असतो. भगवंत आहे ही जाणीव झाल्यानंतर आपण विषयांमध्यें दंगामस्ती करणार नाहीं आणि तो बेतानें भोगूं.

मी जोंवर साकारावर प्रेम करतो तोंवर भगवंतालाहि आकार घेणें प्राप्त आहे. जें वेदांना शक्य झालें नाहीं, जिथें वेदांनी “ नेति नेति ” केलें, तें परमात्मस्वरूप संतांनी जाणलें; म्हणून त्यांनी भगवंताला सगुणांत आणलें. भगवंताच्या अधिष्ठानाशिवाय नुसती नीति ही पोरकी असते. हा आनंदस्वरूप परमात्मा मिळविण्यासाठीं आज आपल्याला सगुणोपासनेची अत्यंत जरूरी आहे. माणसाला जें अत्यंत हितकारक असतें तें शांतमय आणि आनंदस्वरूप असलें पाहिजें. सत्यस्वरूपाची प्राप्ति झाल्याशिवाय तें मिळत नाही; म्हणून भगवंताचीं प्राप्ति करून घ्यावी. विद्वत्ता अभिमान उत्पन्न करते, म्हणून विद्वत्ता आणि भगवंताची निष्ठा एके ठिकाणीं सांपडणें कठीण आहे. मीपणाची आणि अभिमानाची पूर्णाहुति देणें हाच खरा यज्ञ होय. निर्हेतुक कर्म करण्यानें खरी सात्त्विकता उत्पन्न होईल आणि पुढें पूर्णाहुति दिली जाईल, अशा प्रकारें ‘ सर्वस्व ’ अर्पण करणें हेंच यज्ञाचें खरें सार होय. ज्यानें स्वतःला ओळखलें, त्यानें भगवंताला ओळखलें. विकाराच्या आधीन न होण्यामध्यें मनुष्याचें खरें मनुष्यपण आहे. ज्यांत परमात्म्याचा विसर पडत नाही ती खरी चांगली बुद्धि आणि तो खरा सद्व्यवसाय. देवाचें नाम घ्यावें, नीतिधर्माचें आचरण करावें, प्रेमानें वागावें, आणि लोकांना मदत करावी, यालाच परमार्थ म्हणतात; आणि तो प्रत्येकानें मनापासून करावा.

---

**२७९. परमार्थ हा लोकांना उपदेश करण्यासाठीं नाहीं. तो निव्वळ स्वतःकरतां आहे.**

# सच्चिदानंद परमात्म्याला सगुणाच्या आधारानेंच पाहतां येईल

**६ ऑक्टोबर**

भगवंताला पाहणें असेल तर आपल्यालाहि तसें व्हावें लागतें. सत्त्वगुणात भगवंत असतो; तेव्हा आपण त्या मार्गानें जावें. ज्याला निराकार राहता येतें त्यालाच वाटेल त्या आकारात येता येतें. आमच्या भावनेनें भगवंत आकारात आले. आपण भगवंताला सगुणात पाहावें तेव्हाच त्याच्या विभूतींचें आपल्याला आकलन होईल. म्हणूनच समर्थांनी निर्गुण ओळखून सगुणात राहावें असें म्हटलें आहे. मनुष्याची विद्वत्ता त्याच्या देहाशिवाय आपल्याला घेतां येत नाहीं. " तुझें बोलणें मला ऐकायचें आहे पण तुझें तोंड मात्र नको, " असें म्हणून चालणार नाहीं. त्याप्रमाणें परमात्मा सच्चिदानंदस्वरूप आहे, हें जरी खरें, तरी तें स्वरूप सगुणाच्या आधाराशिवाय आपल्याला पाहातां येणार नाहीं. सत्य हें शांत आणि आनंदमय असलें पाहिजे. हेंच भगवंताचें मूळ स्वरूप आहे ही सर्व सृष्टि भगवंतानेंच उत्पन्न केली असून तिच्यामध्यें तो व्यापून राहिला आहे. अर्थात् सर्व सृष्टि आनंदमय असली पाहिजे. साखरेचा एक पदार्थ तयार केला आणि तो दहाजणांनी खाल्ला, त्यांपैकीं नऊजणांना तो गोड लागला आणि एकाला कडू लागला; अर्थात् ज्याला कडू लागला त्याच्या तोंडाची चव बरोबर नाहीं, त्याला ताप आला आहे, असें म्हणायला पाहिजे. सृष्टीच्या बाबतींत असाच पण उलट प्रकार आहे. सृष्टि फक्त एकालाच गोड लागते आणि नऊजणांना ती कडू लागते. मीं मूळ परमात्मास्वरूप असतां त्याचा विसर पडल्यामुळें, सृष्टि आनंदमय असूनहि ती तशी दिसत नाही, हा भ्रम आहे. डोळ्याच्या आंतमध्यें पाहण्याची शक्ति नसेल तर बाह्य डोळा असूनहि दिसत नाहीं, परंतु आंतमध्यें शक्ति असली तरी ती आहे असें बाह्य डोळ्याशिवाय कळत नाहीं. याचप्रमाणें सगुण आणि निर्गुण यांचा संबंध आहे.

सत्य हें अखंड टिकणारें आहे म्हणून तें शांत आहे, तें शांत आहे, म्हणून सनातन आहे, तें शांत आणि सनातन आहे म्हणून त्याच्याच ठिकाणी समाधान आहे, कारण अशांतामध्यें आनंद असणें शक्य नाहीं. म्हणून सत्य हें परमात्मा-स्वरूप होय. परमात्मारूपी सत्य हें व्यावहारिक भाषेंत सांगितलें पाहिजे. पण व्यावहारिक सत्य मात्र निराळें असतें. हीं सृष्टि भगवंतानें निर्माण केली आहे म्हणून तिच्यामध्यें सर्व ठिकाणीं भगवंताचें अस्तित्व असलें पाहिजे. याचा अर्थ असा कीं, प्रत्येकामध्यें भगवंताच्या अस्तित्वाची जाणीव करून देणारा असा एक गुण आहे. हा गुण म्हणजे आनंदाची हौस होय. सर्वांना शांति मिळावी हाच भगवंताचा हेतु आहे. ही शांति परिस्थितीवर अवलंबून नाहीं. शांति एकपणात आहे. द्वैतात नाहीं. एकामध्यें ज्याचें मन गुंतलें, ज्यानें आपलें मन भगवंताकडे ठेवलें, त्यालाच शांतीचा लाभ होतो, मग त्याची इतर परिस्थिति कशीहि असो. प्रपंचाचा अनुभव कष्टमय आहे, पण भगवंताचा अनुभव आनंदमय आहे खास, आणि त्याकरितां त्याच्या नामाचें अनुसंधान हें एकच साधन आजवर सर्व संतांनीं सांगितलें आहे.

---

२८०. सतत करावें नामस्मरण । सर्व इच्छा राम करील पूर्ण ॥
मुखीं असावें एक नाम । पाहून पुण्य दुजें नसे काम ॥

# भगवंताच्या प्राप्तीच्या आड जें येतें तें तें टाकणें म्हणजे यज्ञ करणें; या यज्ञांत वासनांची आहुति द्यावी

**७ ऑक्टोबर**

सदाचरणानें राहणाऱ्या माणसाला खर्च कमी लागतो, कारण खऱ्या समाधानानें पोट भरलें कीं अन्नहि कमी लागतें. मी हें वारंवार सांगतों, कारण सदाचरणाचें, नीतिधर्माचें आचरण हा परमार्थाच्या इमारतीचा पायाच आहे. पाया भक्कम नसेल तर त्यावरची इमारत जास्त दिवस टिकूं शकणार नाहीं, त्याप्रमाणें नीति जर सांभाळली नाहीं तर पुढच्या कर्माचा फारसा उपयोग होत नाहीं. परस्त्री मातेसमान माना, परद्रव्याची अभिलाषा बाळगूं नका, आणि परनिंदेला विष्ठा समजून त्याग करा. या तीन गोष्टींना फार सांभाळा. परमार्थाची इमारत या तीन गोष्टींवर उभी करायची आहे. नुसता पाया बांधून ज्याप्रमाणें घरांत राहतां येत नाहीं, त्याप्रमाणें पायाशिवाय इमारतहि उभी करतां येत नाही. राम कर्ता ही भावना ठेवून नामांत राहणें म्हणजे परमार्थरूपी इमारतींत आनंदांत राहणेंच होय. व्यवहारिक मोठेपणा बाजूला ठेवा आणि देवाला अनन्यभावानें शरण जा, देव खात्रीनें मार्ग दाखवील. देवाला शरण जातांना सर्व विसरून जा. समजा, एखादा माणूस नाटकांत राजाचें काम करीत असला आणि नाटक संपल्यावरहि तो घरीं येऊन जर राजासारखें वागूं लागला, तर त्याचा सर्व व्यवहार बिघडून जाईल. त्याचप्रमाणें देवाला शरण जातांना, मी मोठा भक्त, विद्वान, पैसेवाला, ही सर्व नातीं विसरून गेलें पाहिजे. कर्माचें फळ आपल्या हातचें नाहीं म्हणून त्याची काळजी करूं नये; हें समजलें तरी काळजी न करणें हें देखील आपल्या हातचें नाहीं म्हणून आपण काळजी करतोंच ! यासाठींच भगवंताच्या नामांत राहण्याची संवय करा. कर्म करणें यांत विशेष नाहीं. आपल्याला कर्म केल्याशिवाय चैनच पडत नाहीं. कर्म करा असें गीतेंतहि सांगितलें आहेच. परंतु कर्म केल्यानें पाहिजे तें फळ आपल्याला मिळतेंच असें नाहीं, म्हणून भगवंताला स्मरून कर्म करा आणि मग काय काय होतें तें पहा. हेंच निष्काम कर्म. भगवंताच्या इच्छेनें सर्व घडतें आहे ही भावना ठेवून आपलें कर्तव्य करणें, हें सर्व गीतेचें सार आहे.

जो समजून त्याग करील त्याला फायदा होईल. नाहीं तरी संन्यास आणि त्याग दोन्ही आपल्याजवळसुद्धां आहेत. भगवंताच्या बाबतींत आपण संन्यासी वृत्ति धारण करतो, आणि आपण आपल्या आईबापाला सोडतो असा त्याग करतो, हें काय कामाचें ! त्याग हें यज्ञाचें खरें मर्म आहे. भगवंताच्या प्राप्तीच्या आड जें जें येतें तें तें टाकणें म्हणजे यज्ञ करणें होय. या यज्ञामध्यें वासनांची आहुति द्यावी. कोणत्याच गोष्टीबद्दल हर्ष अगर नको असें न वाटणें हेंच वासनांची आहुति दिल्याचें लक्षण आहे. वासना ही दुसऱ्या कोणत्याहि उपायांनीं तृप्त होण्यासारखी नसून आपण जर भगवंताजवळ " वास " ठेवला तरच नाहींशी होते.

---

२८१. जेथें वासना संपली तेथेंच भगवंताची कृपा झाली.

# रामइच्छेनें सर्व कांहीं होतें ही दृढ भावना ठेवून कर्मांतच गुंतून राहूं नये

**८ ऑक्टोबर**

फळाच्या आशेनें केलेलें कर्म दुःखाला कारण होतें. चातुर्मास माधुकरीला जाईन हा हेतु जो धरतो त्याला "नामस्मरण कर, माधुकरी मी तुला घरीं आणून देतों." असें म्हटलें तर नाही पटत. जगांत कुणीहि सुखी नाहीं असें समर्थ सांगतात, पण एखादा राजाच्या पोटीं जन्माला आला म्हणून सुखी झाला असें आपण मानतो! खाण्यापिण्याची अडचण नसली म्हणजे त्याला इतर काहीं काळज्याच नाहींत असें म्हणून कसें चालेल! "मी मागल्या जन्मीं कुणाचा तरी घात केला म्हणून आज हें दुःख वांट्याला आलें आहे" असें आपण म्हणतो आणि त्याबरोबरच फलाशेनें कर्म करून पुढील जन्माची तयारी आजच करूं लागतो, पण त्यांतून सुटण्याचा कांहीं मार्ग पाहात नाहीं. कर्मामध्यें आजवर मोठमोठे लोक गुंतून राहिले आहेत. जन्माला आलों तो जन्माचें सार्थक करून घेण्याकरितां; पण या फेऱ्यातच आपण अडकून पडलों तर काय उपयोग? आपण एखाद्या कापडाच्या गिरणींत गेलो तर म्हणतो, "काय धोटे फिरतात" परंतु फिरवणारा तर दुसरीकडेच असतो. त्याप्रमाणें देहाचें देहपण जीव असेल तोपर्यंत; त्यामधून तो जीवात्मा नाहींसा झाला कीं देहाचें देहपणहि नाहींसें होतें. आत्म्याच्या संयोगानें सर्व काहीं चालते, माझी छाया मी पाडतो असें आपण म्हणतों, पण तें खरें नाहीं. सावली आहे हें लहान मुलांना कळतसुद्धां नाहीं. त्याचें कर्तेपण आपण देहाच्या आश्रयामुळें त्याच्यावर लादतो; आपल्या कर्तेपणाची त्याला जर जाणीव असती तर तो आपल्यासारखाच "देहाभिमानी" झाला असता. एका गृहस्थाचें त्याच्या भावाशीं भांडण होतें. त्यानें जेव्हां आपलें मृत्युपत्र केलें तेव्हां त्यामध्यें लिहिलें कीं, "माझ्या शवाला माझ्या भावाचा हात लागूं नये," काय ही देहबुद्धीची पराकाष्ठा! आज आपल्याला जे करणें योग्य आहे तें करायचें सोडून मनुष्य कालचें आणि उद्याचें पाहात बसतो. पुष्कळ लोकांना 'उद्यां काय होणार आहे' हें कळायला पाहिजे असतें. पण आपला पुढचा काळ चांगला यावा म्हणून आपण आज चांगलें वागणें जरूर आहे. तसें न करता मागच्याचा किंवा पुढच्याचा विचार करीत बसणें म्हणजे जें करूं नये तें करणें, हें मायेचें लक्षण. जे मायेच्या तावडींत सांपडलेले आहेत ते लोक करूं नये तें करतील आणि उद्याची काळजी करतील. मनुष्याची एक स्थिति कधींच कायम राहत नाहीं, म्हणून आजची वाईट स्थिति जाऊनच चांगली स्थिति उद्यां ना परवां येणारच असते. पण आपला प्रयत्न आपण कधी सोडूं नये **व्यवहारांत नेहमीं प्रयत्न आणि परमेश्वर यांची सांगड घालावी.** कर्माचा हेतु जाळून टाकावा ही पुढची पायरी. रामाच्या इच्छेनें सर्व कांहीं होतें ही दृढ भावना ठेवून मरणाची भीति बाळगूं नये आणि जगण्याची काळजी करूं नये. नेहमीं नामस्मरणांत राहण्याचा प्रयत्न करावा, त्याचें खचितच राम कल्याण करील.

---

२८२. कर्तव्यीं असावें तत्पर। मुखीं नाम निरंतर॥
नामाची ठेवावी गस्त। रामापायीं लागेल मग भिस्त॥

# जो भगवंतावर अवलंबून आहे तोच खरा स्वतंत्र

**९ ऑक्टोबर**

" मी नाहीं, तूं आहेस " हें जाणणें हीच खरी भक्ति होय. भक्तीचा विषय एक भगवंत ठेवला, कीं बाकी सर्वांचा विसर पडतो. भक्ति केली कीं चित्त निर्विषय होतें हें सांगावेंच लागत नाहीं. स्वतःचें विस्मरण आणि भगवंताचें स्मरण हेंच भक्तीचें रहस्य. भगवंताची प्राप्ति पाहिजे असेल तर भक्ति करावी. भगवंताच्या चरित्रांत भक्ताच्या सर्व तऱ्हा आहेत. त्यामध्यें आपण कुठें तरी खासच बसूं! भगवंतानें त्या सर्वांना समाधान दिलें, मग तें आपल्याला का मिळणार नाहीं ! जग प्रगतिपर आहे हें खरें, पण पैसा, मुलें, मान्यता, वगैरे ऐहिक सुखांची वाढ होणें यालाच आपण प्रगति समजतो. भगवंताची भक्ति ही खरी प्रगति होय. हीं प्रगति बाहेर दिसण्यासारखीं नाहीं. भगवंतावाचून यश हें अपयशच समजावें. कित्येक वेळां अपयश हेंच यश बनतें, म्हणून अपयश आलें तरी, तें भगवंताच्या इच्छेनें आलें असें समजून शांत राहावें. " भगवंत आहे " असें म्हणणें किंवा मानणें याचा अर्थ असा कीं, ही सर्व सृष्टि भगवंतानें उत्पन्न केली आहे, त्या सृष्टीचें तो रक्षण आणि पालन करतो. सृष्टीमध्यें अनेक समूह आहेत, त्यांचेंसुद्धां रक्षण आणि पालन तोच करतो. त्या समूहांपैकीं आपण एक जीव आहोंत, आणि आपलेंही रक्षण आणि पालन तो सदा करीत आहे.

खरें पाहिलें असतां प्रत्येक मनुष्य अद्वैताचाच अभ्यास करीत असतो, अद्वैतामध्यें नेणारें द्वैत आपल्याला पाहिजे आहे. भगवंत म्हणजे सगुण परमात्मा असा आहे कीं तो वेगळा दिसतो खरा, परंतु भक्ताला तो आपल्यासारखा करून घेतो. आई आणि मुलगा यांच्यामध्यें साम्य असतें. मुलाचा आवाज आईला नेहमीं गोडच लागतो, त्याप्रमाणें भक्ताचा आवाज भगवंताला गोड लागतो. शेताची राखण करण्याकरितां जसें काठीवर कांबळें घालून त्याचें सोंग करतात, तसेंच सगुण उपासनेचें आहे. राखणदार हजर नसतांना तें सोंग ज्याप्रमाणें शेताचें रक्षण करायला उपयोगी पडतें, त्याचप्रमाणें निर्गुणाच्या अभावीं सगुण हें परमात्म्याची आठवण करून देण्यासाठी उपयोगी पडतें. डोंगराच्या माथ्यावर चढल्याशिवाय आपलें पलीकडे असलेलें गाव जसें आपल्याला दिसत नाहीं तसें सगुणरूपमय झाल्याशिवाय निर्गुण होतां येत नाहीं. आयुष्यांत कांहीं दिवस तरी " मी कोणाचा नोकर नसून मी भगवंताचा आहे " असें माणसाला वाटावें.

जो भगवंतावर अवलंबून आहे तोच खरा स्वतंत्र होय. भगवंताचा ध्यास लागणें म्हणजे तद्रूपच होणें होय. भगवंताची प्रीति याचेंच नाव भक्ति. संकटांचे डोंगर अंगावर पडले तरी ज्याची वृत्ति भगवंतापासून चळत नाहीं तोच खरा भगवंताचा झाला. " माझा त्राता, माझी काळजी घेणारा, माझें रक्षण करणारा आणि पालन करणारा तो भगवंत आहे " असें मानणें आणि तसें वागणें हीच भगवंताबद्दलची खरी अस्तित्व बुद्धि होय. आपलें स्वतःवर जितकें प्रेम आहे, त्याच्यापेक्षा जास्त प्रेम भगवंतावर करणें हीच खरी उपासना, आणि हेंच जीवनाचें सर्वस्व होय.

---

२८३. नामाचें प्रेम करावें जतन । जैसा कृपण राखी धन ।
ऐसा राम जोडा मनीं । दुःखाचा लेश न आणावा मनीं ॥

# राम ठेवील त्यांत समाधान । हें खऱ्या भक्ताचें लक्षण जाण

**१० ऑक्टोबर**

नसावें कशाचें ज्ञान । वाटावें सदा घ्यावें रामनाम । प्रपंचीं राखावें समाधान । हेंच भक्ताचें मुख्य लक्षण जाण ।। डोळे व कान । यांनीं होतें बाह्य जगाचें ज्ञान । त्यांना लावावें नामाचें अनुसंधान ।। राम आणावा चित्तीं । त्याचा प्रपंच करतों ही राखावी स्मृति । स्वार्थहीन व्हावें आपण । तें होईल करता परमात्मस्मरण ॥ संधि साधून जो राहिला । तोच जगीं धन्य झाला ।। नाटकात नट काम करी जैसें । आपण वर्तत जावें तैसें । राजा रंक होई जरी । तरी मी कोण हें जाणून राहे अंतरीं ।। आतां जगणें रामासाठीं । हा निश्चय मानावा चित्तीं ।। पक्षिणी दूर जरी गेली । तरी पिल्लाकडील दृष्टि नाहीं फिरविली । तैसें प्रपंचांतील आघात सुखदुःख जाण । हें रामाहून दूर करण्यास न व्हावें कारण ॥ श्रीरामसेवेची प्राप्ति । निरभिमानी व्हावी वृत्ति ॥ रामाचें होऊन राहावें । तो ठेवील तसें वागावें ।। जग सज्जन-दुर्जन-मिश्रित । त्यांतून शोधून काढावा अवचित । जो लाभेल संगतीला । रामाचें प्रेम दुणावेल त्याला ।। प्रपंचांतील सुखदुःखांचे आघात येऊनसुद्धां । ज्यानें राम नाहीं सोडला । तो जगीं भला झाला ।। द्वेष मत्सर अहंकारवृत्ति । यांची न धरावी संगति ।। मानापमान करावे सहन । साक्ष ठेवून रामचरण ।। सुखदुःखात न गुंतवावें मन । आपण रामाचे झालों ही ठेवावी ओळखण ।। सर्व कांहीं करावें । पण खरें प्रेम साधनावर असावें ।। अभिमानरहित राहावें । हेंच शिष्याचें लक्षण जाणावें ।। राम व्हावा माझा । रात्रंदिवस काळजी ठेवीत जा ।। मन मोहाला पडेल बळी । तरी तें लागावें रामचरणीं ।। लक्ष ठेवावें संतांकडे । देह लावावें प्रपंचाकडे ।। गुणांत उत्तम गुण । आपले कळावे अवगुण । अवगुण कळले ज्याला । तो सुधारण्याच्या मार्गाला लागला ॥ प्रथम स्वाधीन करीं आपले मना । सोडावा अहंभाव विषयवासना । कांहीं पाहिजे हें न वाटावे मना ॥ व्यवहारांत असावें दक्ष । कधीं न घ्यावा विषयी लोकांचा पक्ष ॥ दुर्जनाची संगती । तीच रामाला दूर करती । म्हणून मनासी धरावा सत्संग । रामाविण दुजा नसावा रंग ।। गेल्यानें न मानावें दुःख । येण्याची न धरावी आस । घट्ट धरावें रामरायास । आपलें करून घ्यावें हित । मनीं आणावें हें सतत ॥ उदास व्हावें एकाच वेळीं । केव्हां भेटेल वनमाळी ॥ तळमळीचें मुख्य लक्षण । दुसरे विषयाची न व्हावी आठवण ।। पतिव्रतेला पति जाण । तैसें साधकाला साधन जाण ।। मोहाला बळी पडणें । याहून नाहीं दुजें लाजिरवाणें ॥ विघ्न रामसेवेंत भारी । तरी आपण सांभाळावें हातीं घेऊन शिरीं ।। रामाची सेवा हा जाणावा संसार । मग सुखानें करावा व्यवहार ॥ देवास करावा नैवेद्य अर्पण । प्रसाद घ्यावा त्याचा आपण ॥ चित्त ठेवावें रामापाशीं । ध्यास असावा त्याचा अहर्निशीं ।। **गुरूकडून घेतलेलें नाम पावन करील जगास । हा ठेवावा विश्वास । राम कृपा करील खास** ॥ देहानें नाहीं करता आलें । मन रामापायीं गुंतवलें । रामानें त्याचें कल्याण केलें ।। राम ठेवील त्यांत समाधान । हेंच खरें भक्ताचें लक्षण जाण ।। भगवंतावांचून मनीं न येऊं द्यावें कांहीं । भगवत्स्वरूप तो सर्व ठिकाणीं पाहीं ।। उपासना वाढवावी रामभक्ति करावी ।। आपण व्हावें रामाचें । उदाहरण घालून द्यावें साचें ॥

---

२८४. नामाहून दुजें कांही । सत्य त्रिवाचा नाहीं ।।
निर्हेतुक घ्यावें नाम । जेणें जोडेल आत्माराम ।।

# भगवंताजवळ " वास " ठेवल्यावर वासना राहातच नाहीं

**११ ऑक्टोबर**

एखादा मनुष्य दुष्ट निघाला तर ' मागल्या जन्मीं तो कसाब असेल ' असें आपण म्हणतो, पण हें बरोबर नाहीं. मनुष्याला वासनेनेंच जन्म येतो, कर्मानें नाहीं. म्हणूनच कर्म टाळायचें नसते. त्याच्यामागची वासना टाळावी लागते. केव्हाहि कर्म हें बाधक ठरत नाहीं, तर कर्माचा हेतु बाधक ठरतो. अधिकाऱ्यापुढें शिपाई चालतो आणि कैद्याच्या पुढेंहि चालतो; परंतु यामध्यें जो फरक आहे, तोच संताच्या आणि आमच्या वासनेंत आहे. आम्ही वासनेचें खत विषयाला घालतों आणि विषयांतच गुंतून राहतों. वासनेचा क्षय सत्संगाशिवाय नाहीं होणार. संगतीनें मनावर परिणाम घडतो. वासना ही दुसऱ्या कोणत्याहि उपायांनीं तृप्त होण्यासारखी नसून, आपण जर भगवंताजवळ " वास " ठेवला तरच ती नष्ट होते. ' वासना ' म्हणजे " विषयाजवळचा वास " ना-म्हणजे नको. सकाळपासून संध्याकाळ-पर्यंत आणि रात्रीपर्यंत वासनेमुळें सर्व कर्म एकमेकांत गुंतून गेलें आहे. म्हातारे आणि तरुण या सर्वांना वासना सारखीच आहे. " मी आतां कंटाळलों " असें म्हटलें तरी वासना आपल्याला सोडीत नाहीं, आणि देह ठेवतानाहि आपली वासना आपल्याबरोबर येते. परमात्मा जसा चिरंजीव आहे, तशी वासना पण चिरंजीव आहे. वासनेच्या किंवा हवेपणाच्या तीन अवस्था आहेत : एक आस, दुसरी हव्यास, आणि तिसरी ध्यास. आस म्हणजे वस्तु नुसती हवीशी वाटणें; हव्यासामध्यें वस्तु नेहमींच आपल्याजवळ असावीशी वाटते; आणि ध्यासामध्यें त्या वस्तूशिवाय इतर कांहींच सुचत नाहीं. मोठे झाड तोडायचें असेल तर आपण त्याच्या वरच्या फांद्या आधीं तोडतों, नंतर बुंधा तोडतों. त्याचप्रमाणें वासनेचें झाड तोडण्यासाठीं त्याच्या फांद्या ( म्हणजे आपलें हवे-नकोपण ) आधीं तोडाव्या, आणि शेवटीं वासना मारावी. आपल्याला जें मागायचें आहे तें भगवंताजवळच मागावें. त्यानें तें नाहीं दिलें तर तें न देणेंच आपल्या हिताचें आहे अशी बुद्धि उत्पन्न होईल. त्यानेंच वासना मरेल; आणि वासना नष्ट झाल्यावर बुद्धि भगवत्स्वरूप होईल. कांहींहि न करता मिळावा इतका का परमार्थ सोपा आहे ? त्याच्यासाठीं निदान वाईट वासना तरी मारायला नको का ! आणि चांगल्या वासनासुद्धा नीति आणि धर्माला धरून असतील तेवढ्याच भोगाव्या. श्रीमंताच्या गरजा मरेपर्यंत भागत नाहींत, कारण त्यांना वासना जागृत असते. **काळ हा आपल्याला आशेंत गुंतवून ठेवतो आणि शेवटपर्यंत सुख न देतां आपलें आयुष्य संपवितो.** जो जिवंतपणीं वासनारहित राहिला त्याला सुखदुःख नाहीं. **आपण आपल्याच घरामध्यें पाहुण्यासारखें वागावें; असें राहण्यानें वासना क्षीण होईल.** " राम कर्ता " ही भावना ठेवून नामांत राहण्याचा प्रयत्न करा, म्हणजे वासनेची नांगी मोडलीच म्हणून समजा.

२८५. आजवर राहिला वासनेचा आधार । आतां नामावर प्रेम ठेवा पुरेपूर ।।
रामाचें नांव ज्याला न होईल सहन । त्याची गति नाहीं उत्तम जाण ।।

# माझ्या आणि भगवंताच्या इच्छेंत फरक कोणता ?

**१२ ऑक्टोबर**

भगवंतापासूनच पंचमहाभूतें निर्माण झालीं, आणि तसें बघितलें तर सर्व चमत्कार भगवंताच्या सामर्थ्यानें पंचमहाभूतांचेच असतात. भगवंताच्या ठिकाणी जें जें आहे तें तें सर्व आपल्या ठिकाणीं आहे. भगवंत हा जगाचा मालक आहे. त्याच्या सत्तेनें सर्व व्यवहार घडतात. आपण जीव त्याचा अंश आहोंत; म्हणून आपण कर्तव्य करावें आणि फळ भगवंताच्या इच्छेवर सोपवावें. आतां प्रश्न असा आहे कीं, सर्व गोष्टी जर भगवंताच्या इच्छेनें घडतात तर माझी इच्छाहि भगवंतच उत्पन्न करतो, आणि असें जर आहे तर मीं माझी इच्छा कां मारावी ? अगदीं बरोबर आहे, रात्रीं अंधार पडतो याला कारण कोण ! याला कारण सूर्य ! कारण सूर्य मावळला कीं अंधार पडतो. याचा अर्थ असा कीं, ज्याप्रमाणें प्रकाशाचें कारण सूर्य आहे त्याचप्रमाणें अंधाराचें कारण पण सूर्यच आहे. फरक इतकाच कीं, प्रकाशाचें कारण तो असणेंपणानें आहे, आणि अंधाराचें कारण तो नसणेंपणानें आहे. हें जसें खरें, तसें माझ्या इच्छेचें कारणसुद्धां भगवंतच आहे। पण तो नसणेंपणानें कारण आहे इतकेंच. सारांश, भगवंताचा विसर पडला कीं माझी इच्छा जन्म पावते. म्हणून ज्याला भगवंत हवा असेल त्यानें त्याचें स्मरण करावें आणि आपली इच्छा त्याला अर्पण करावी, आपली देहबुद्धि नष्ट झाली कीं भगवंत ओळखतां येतो. ज्याप्रमाणें इमारतीचा नकाशा कागदावर असतो, त्याचप्रमाणें सगुणमूर्ति हेंच आपलें परब्रह्म. एकदां नकाशा पक्का झाल्यावर मग इमारत बांधणें जड जात नाहीं. सगुणमूर्तीचे ध्यान करावें. " ब्रह्म निराकार आहे, त्याला आकारांत आणणें ही चूक आहे," असें कोणी कोणी म्हणतात. पण मी स्वतः जिथपर्यंत आकारांत आहे तोपर्यंत सगुणमूर्तीचे पूजन आवश्यकच आहे. " मी रामाचा आहें " म्हणणें म्हणजे " मी ब्रह्म आहें " असें म्हणणें होय. **तदाकार वृत्ति होणें याचें नांव अनुसंधान आणि अनुसंधानानें वृत्ति भगवंतमय होणें याचें नांव भक्ति.** " ब्रह्म सत्य आणि जग मिथ्या," याचा थोडक्यांत अर्थ म्हणजे " जग जसें आहे असें आपण समजतों तसें तें नाहीं " अंतर्बाह्य परमात्मा दिसू लागणें हेंच भक्तीचे लक्षण आहे. या करितां आपल्या कृतींकडे भगवंत पाहातो ही जाणीव नेहमी कायम ठेवावी. भगवंतापासून मी दूर आहें ही भावनाच मनांत आणूं नये भगवंताच्या प्राप्तीकरितां देहाचा सांभाळ करावा. मन रामाकडे गुंतलेलें असलें म्हणजे देहाचा विसर पडतो. म्हणून नामस्मरणाच्या योगानें मन भगवंताच्या ठिकाणीं विलीन करावें हेंच परमार्थाचे सर्व सार आहे.

---

२८६. असती पुण्याच्या गांठी । तरच नाम येईल कंठीं ॥
निर्हेतुक घ्यावें नाम । जेणें जोडेल आत्माराम ॥

श्रीराम

# परमात्म्याच्या स्वरूपाविषयीं संशय घेणें हें अज्ञानाचें लक्षण

१३ ऑक्टोबर

पोथीची समाप्ति झाली म्हणजे ऐकण्याचें संपून कृतींत उतरविण्याची वेळ आली असें समजावें. जगांत अशा कितीतरी वस्तु आहेत कीं त्याचें आम्हांला ज्ञान होत नाहीं; पण म्हणून आपण कांहीं त्या खोट्या नाहीं मानीत. आपण आपल्याजवळच्या तुटपुंज्या ज्ञानाचा अभिमान धरतों हें चुकतें आपलें. पोथी ऐकल्याचा मोबदला पुराणिकाला पैका देण्यानें मिळत नाहीं; तो असा असावा कीं दोघांचेंहि कल्याण होईल. भगवद्भक्ति करणें हा खरा मोबदला आहे. गीतेंत असें सांगितलें आहे कीं, सर्व धर्म सोडून द्यावेत, परंतु भगवंताला शरण जावें; पण तें सोडून आपण विषयालाच शरण जातों त्याला काय करावें? भगवंतानें ज्ञान दिलें, आणि आम्ही त्याचा अभिमान धरूं लागलों तर हातांत तरवार दिल्यावर शत्रूचें शिर कापण्याऐवजीं आपलीच मान तोडल्यासारखे झालें! ज्या विद्येनें स्वतःचें हित कळत नाहीं ती विद्या नसून अविद्याच होय. तसेंच जें खरें नाहीं तें खरें असें वाटणें हें अज्ञान होय. म्हणून अविद्या आणि अज्ञान दोन्ही सारखेच. परमात्म्याच्या स्वरूपाविषयीं आपण संशय घेतों हें आपलें अज्ञानच होय. देव आपल्याला आणि आपल्या कृतीला पाहतो ही जाणीव असणें म्हणजेच ज्ञान होय. "सुष्टांचें रक्षण आणि दुष्टांचा नाश करण्याकरितां मी अवतार घेतों" असें भगवंत सांगतात. याचा अर्थ असा कीं, जगांत सुष्ट आणि दुष्ट असे दोघेहि असतात. दुष्टांच्याकडून सुष्टांना त्रास होतो, आणि त्या त्रासामध्येंच भगवंताच्या अवताराची उत्पत्ति आहे असें ठरतें. आजकाल पाहूं लागलों तर आपल्याला असें दिसतें कीं सुष्टांचें अस्तित्वच जवळजवळ दुर्मिळ झालें आहे. म्हणजे ज्यांचा छळ झाला असतां भगवंतानें अवतार घ्यावा, तेच नामशेष झाले; तर मग भगवंताचा अवतार व्हावा तरी कसा? भगवंताचा अवतार होणारच नाहीं असा भावार्थ नाहीं; वस्तुस्थिति काय आहे हें कळण्यासाठींच हें सांगितलें इतकेंच; हरिश्चंद्र-प्रल्हाद वगैरे मोठमोठ्यांचा किती छळ झाला! पण त्यांची निष्ठा अति बलवत्तर असल्यानें ते त्या छळांतून सुखरूप पार पडले. आपली निष्ठा अशी बलवत्तर असावी. तिच्यामुळें आपलें समाधान राहील. परिस्थिति सारखी बदलत असते म्हणून जें फळ आपण आज मागतों तें बदललेल्या परिस्थितीमध्यें सुखाचें होईलच याची खात्री नाहीं. म्हणून जें फळ मिळेल त्यांत समाधान मानावें. प्रत्येकाला त्याची गरज भागेल एवढें भगवंत देतच असतो. म्हणून आहे त्यात समाधान ठेवावे. ज्याचे समाधान भगवंतावर अवलंबून आहे त्याचें समाधान कोणत्याहि परिस्थितींत टिकेल. अर्जुनानें भगवंताला आपल्या बाजूला घेतलें आणि त्यामुळें पांडवांचें जें समाधान टिकलें तें कांहीं कौरवांचें टिकलें नाहीं. पांडवांनीं देहानें वनवास सोसला पण मनानें त्यांनीं भगवंत भजल्यामुळें वनवासांतहि ते समाधानांत राहिलें. भगवंताच्या इच्छेनें सर्व होतें आणि सर्व तोच करतो, अशी भावना ठेवणें यासारखें समाधान नाहीं. आनंद कृतींत आहे. फळाच्या आशेंत तो नाहीं. नामस्मरण-रूपी कृति केली असतां शाश्वत आनंद आणि समाधान आपल्याला मिळाल्यावांचून राहणार नाहीं.

---

२८७. नामाविण जें जें साधन । तें तें कष्टास मात्र कारण
बुद्धि करावी स्थिर । नामीं असावें प्रेम अनावर ॥

# परमात्म्याचें प्रियत्व संपादन केल्यास जनप्रियत्व आपोआप येईल

**१४ ऑक्टोबर**

[ "परमात्म्याला देह अर्पण केल्यावर लोककल्याणार्थ परमात्म्यानें सर्व काहीं शक्ति द्याव्यात" असं एकानें श्रींना विचारलें, त्यावर श्री म्हणालेः-]

परमात्म्याला देह अर्पण केल्यावर अमुक एका देहामार्फतच लोककल्याण व्हावें अशी इच्छा का ? याचा अर्थ देहबुद्धि सुटली नाहीं असा नव्हे का ? शक्ति वापरण्याचें सामर्थ्य आपल्याला आलें तर परमात्मा कदाचित् ती देईलहि. लहानांच्या हातांत तलवार देऊन काय उपयोग ? तुमची लोकांवर छाप बसावी, तुमचें लोकांनीं ऐकावें असें म्हणतां पण ज्यांना तुम्हीं आपले म्हणतां त्यांना आधीं ताब्यांत घ्यायला नको कां ? माझा क्रोध अनावर आहे, माझें मन चंचल आहे वगैरे तुम्ही म्हणतां तेव्हां तुमचे विकार, मन यांच्यावर आपली छाप बसवा आधी, आणि मग लोकांबद्दल बघा ! तुम्हांला जनप्रियत्व पाहिजे ना ? मग जनांचा जो राजा परमात्मा, त्याचें प्रियत्व संपादन करा म्हणजे जनप्रियत्व आपोआपच येईल. तुम्हांला लोक वाईट दिसतात. पण सुधारायला जाऊं नका. तुमच्या मनांत वाईट आहे. म्हणूनच लोक तुम्हांला तसे दिसतात. तुम्ही स्वतःला आधी सुधारा म्हणजे कोणीहि वाईट दिसणार नाहीं. लहान मुली बाहुलीबरोबर खेळतात, तिला जेऊं घालतात; निजवतात. त्यांना ठाऊक असते कीं ही निर्जीव आहे, पण भावनेनें तिला सजीव करून तिच्याशीं त्या खेळतात, तुम्ही अशी भावना का करीत नाहीं कीं परमात्मा आपल्याशीं बोलतो आणि आपण त्याच्याशीं बोलतों ? ही भावना जो जो जास्त दृढ होईल तो तो खरोखर परमात्मा तुमच्याशीं बोलूं लागेल. मनांतून आपलें भगवंताशी नातें ठेवावें. आपलें सगळें जीवन जर भगवंताच्या हातांमध्यें आहे तर जीवनांतील सर्व घडामोडी त्याच्याच हातांत असणार. भगवंत ज्या ठिकाणीं आहे तेथें त्याला शोधा. जो खरा कर्ता आहे त्याचें मोठेपण खरें असते. खरें कर्तेपण भगवंताचें असल्यानें त्याच्याकडे तें द्यावें म्हणजे मोठेपण त्याच्याकडे जातें. आपण सात्त्विक कृत्यें करतो. पण त्याचा अभिमान बाळगतो. सात्त्विक कृत्यें चांगलीं खरीं पण त्यांत अभिमान ठेवला तर फार वाईट एक वेळ वाईट कृत्यें परवडलीं; केव्हां तरी त्यांचा पश्चात्ताप होऊन मुक्तता तरी होईल. पण सात्त्विक कृत्यांतला अभिमान कसा निवणार ! म्हणून परमात्म्याच्या इच्छेनें सर्व घडतें आहे, ही भावना असावी. मी आप्तइष्टांना मदत केली, आणि ते आप्तइष्ट म्हणूं लागले कीं, "यांत त्यानें काय केलें ! परमात्म्यानें दिलें म्हणून त्यानें मदत केली, " तर मला वाईट वाटतें. वास्तविक पाहतां परमात्मा त्यांना आठवला आणि मी मात्र " मीं दिलें " असा अभिमान धरून वाईट वाटून घेतो ! खरें पाहिलें तर परमात्म्यानेंच त्यांना दिलें त्यांत त्याला वाईट वाटण्याचें कारण काय ! आपण परमात्म्याजवळ मागावें कीं, तुला वाटेल त्या स्थितींत मला ठेव, पण माझें समाधान भंगूं देऊं नकोस, माझां मीपणा काढून टाक, तुझा विसर पडूं देऊं नकोस, मला अमुकएक तुजजवळ मागावें अशी इच्छा देऊं नकोस, नामामध्यें प्रेम दे आणि तुझ्या चरणीं दृढ श्रद्धा सतत टिकूं दे "

---

**२८८. देह जरी नाशिवंत । सांगितलेलें नाम आहे सत्य ।**
**नामीं गुंतली ज्याची वाणी । धन्य तो होय प्राणी ॥**

# भगवंताचें होण्यासाठीं अभिमान टाकून लीनता अंगीं बाणवावी

१५ ऑक्टोबर

एकदा असें झालें कीं, एकजण एका बुवाजवळ राहिला. तो कांहींहि करीत नसे। सदा त्या गुरूजवळ राहात असे, आणि तो जिथें जाईल तिथें जात असे. कांहीं दिवसांनीं "मला आता कांहीं करायचें राहिलें नाहीं, मला सर्व मिळालें," असा त्याला अभिमान झाला. एकदा गुरूबरोबर रस्त्यानें जात असताना एके ठिकाणीं एक महारीण रस्ता झाडत असलेली त्यांना दिसली. गुरूनें त्या महारणीला सांगितलें कीं, "ह्या माझ्याबरोबरच्या मनुष्याला ती केरसुणी मार." तेव्हा तो मनुष्य रागावला. त्यावर गुरु म्हणाला कीं, "मी तिथेंच आहे." तेव्हा तो मनुष्य म्हणाला, "असला कसला गुरु कीं जो मारहाणींमध्यें आहे ! मग त्या गुरूंत कांहींच अर्थ नाहीं." सारांश, कांहींना एवढा अभिमान चढतों कीं पुढें ते गुरूलाहि तुच्छ मानू लागतात. म्हणूनच नामस्मरण करायचें तें अभिमान टाकून करीत जावें. परमेश्वराला अनन्यशरण जाऊनच त्याचें नाम घेत जावें. पुष्कळ वेळां आपण साधन करूं लागलों म्हणजे आपल्याला अभिमान चढूं लागतो आणि त्यामुळें साधन व्यर्थ होतें. संताकडे जातांना आपण मनामध्यें कांहीं एक बरोबर घेऊन जाऊं नये; किंवा कांहीं नेलेंच तर भगवंताचें प्रेम न्यावें. आपण प्रपंचाचें प्रेम आणि अभिमान बरोबर घेऊन जातों आणि मग, लिहिलेलें जसें वाचता येत नाहीं तशी अवस्था होते. एखादी वस्तु आपल्याला हवी असें वाटल्यावर आपण तिच्या प्राप्ती-विषयीं विचार करूं लागतों म्हणूनच पहिल्यानें भगवंत हवा असें आपल्याला वाटलें पाहिजे. त्या-नंतर त्याच्या प्राप्तीच्या साधनांचा अभ्यास करायला पाहिजे. हा अभ्यास मनाच्या कष्टाचा आहे. क्रोधाला बाहेर येऊं देण्यापेक्षां, क्रोध गिळणें यांत जास्त श्रम आहेत. असें करण्यामध्यें आज कष्ट आहेत हें खरें, पण पुढें मात्र सुख आहे हें निश्चित. वागण्यांत, बोलण्यांत आणि चालण्यांत आपण सावधगिरी बाळगावी नको तें टाळावें, पण हें ज्याचें त्याला कळूं लागलें पाहिजे.

अनन्यतेला पैसा लागत नाहीं, विद्या लागत नाहीं. त्याला फक्त आपली अभिमानवृत्ति बाजूला ठेवावी लागते. भगवंताचे होण्यासाठीं अंगीं लीनता आलीच पाहिजे. लीन माणसाला भगवंत लवकर साधेल. लीनतेमध्यें बाकीचा विसर पडून भगवंत तेवढा शिल्लक राहतो. **जो वृत्तीनें लहान आहे त्याला भगवंत लवकर वश होतो.** मनुष्य मोठा असून लहानासारखा वागला तर तें फार चांगलें असतें मनानें मात्र आपण बळकट बनलें पाहिजे. आपण स्वतःशीं चोवीस तास उघडा व्यवहार करावा. भगवंतानें आपल्याला केव्हांहि जरी पाहिलें तरी आपल्याला लाज वाटता कामा नये. आपलें वागणें असें असावें कीं भगवंताची आस मनामध्यें वाढत जाऊन तिचें पर्यवसान ध्यासामध्यें व्हावें. रात्रीं जें स्वप्न पडावेसें वाटतें तें दिवसभर करावें. "असावें सर्वांत पण नसावें कोणाचें" अशा वृत्तीनें जो राहील त्याला लवकर परमार्थ साधेल.

---

२८९. नामांत कसलेहि विचार आले । तरी ते नामानें दूर सारावे भले ॥
नामस्मरणीं ज्याचा दृढ भाव । तो जाणा योगियांचा राव ॥

# परनिंदा व विद्येचा अभिमान माणसाला भगवंतापासून दूर नेतात

**१६ ऑक्टोबर**

परनिंदा करण्यासारखें पाप नाहीं. निंदेची संवय फार वाईट असते; तिच्यामुळें आपलें स्वतःचेंच नुकसान होतें. एकानें शिवी दिली म्हणून दुसऱ्यानें मारलें, यात दोघांचीही चूकच झाली! दुसऱ्याला दुःख व्हावें म्हणून माणूस परनिंदा करतो, पण ती ऐकायला तो हजरच कुठें असतो? म्हणजे मग आपण यात काय साधलें? निंदेमुळें आपलेंच मन दूषित होतें. दूषित मन किंवा दुष्कर्म हें माणसाला परनिंदेला प्रवृत्त करतें. ज्याला परनिंदा गोड वाटते त्यानें समजावें कीं आपल्याला भगवंत अजून फार दूर राहिला आहे. तिखट तिखटाप्रमाणें लागूं लागणें ही जशी सापाचें विष उतरल्याची खूण आहे, त्याचप्रमाणें परनिंदा गोड वाटेनाशी झाली कीं देव जवळ येत चालला असें समजावें. म्हणून ज्याला स्वतःचें हित करून घ्यायचें असेल त्यानें परनिंदा सोडून द्यावी आणि जिव्हा नामाला वाहावी. भगवंताच्या मार्गानें जाणाऱ्यानें, दुसऱ्याच्या ठिकाणीं दिसणाऱ्या दोषांचें बीज आपल्यामध्यें आहे हें ध्यानांत ठेवून वागावें आणि अवगुणांचें तण आपल्या अंतःकरणांतून काढून टाकून तिथें भगवंताच्या नामाचें बीज पेरावें.

पुष्कळ वेळां आपले दोष आपल्याला कळतात, ते भगवंताच्या आड येतात हें देखील कळतें, पण त्याला आपला इलाज नसतो. उदाहरणार्थ कांहीं लोकांची दृष्टि फारच बाधक असते, एखादी चांगली वस्तु किंवा गोष्ट त्यांनीं बघितली कीं ती बिघडते. असे दोष पुष्कळ वेळां ज्याचे त्याला सुधारतां येत नाहींत. पण सत्संगति जर लाभली तर मात्र असले दोषदेखील सुधारतात. हाच संतांच्या संगतीचा महिमा आहे. मनुष्य स्वभावतः आपले दोष वाढविण्याचा प्रयत्न करीत असल्यामुळें त्याचें जीवन सुखमय होत नाहीं. तो दुसऱ्याला त्याचा दोष दाखवून देईल. पण त्याला स्वतःला आपला दोष कळणार नाहीं.

विद्या ही बरेच वेळां मनुष्याला भगवंतापासून दूर नेते. वारकरी पंथातले अडाणी लोक "विठ्ठल विठ्ठल" म्हणतां म्हणतां भगवंताला ओळखतात, पण शहाणे लोक परमार्थाची पुस्तकें वाचूनहि त्याला ओळखीत नाहींत. घरांत बदाम आणि खारका यांचीं पोतीं भरून ठेवलीं तरी ते पदार्थ जोपर्यंत हाडामांसांत जाऊन रक्तामध्यें मिसळत नाहींत तोपर्यंत त्यांचा उपयोग नाहीं. त्याचप्रमाणें पुस्तकी ज्ञानाचें पर्यवसान आचरणांत झालें नाहीं तर तें व्यर्थ जातें. भगवंताकरितां कुणीहि कष्ट करूं नका; कष्टानें साध्य होणारी ती वस्तु नव्हे. ती वस्तु सात्त्विक प्रेमानें साध्य होणारी आहे, आणि प्रेमामध्यें झालेले कष्ट मनुष्य चटकन् विसरून जातो. तुम्ही भगवंताच्या प्रेमानें अगदीं भरून जा, आपापसांत प्रेम वाढवा, म्हणजे मग सर्व आनंदमय, प्रेममय दिसूं लागेल, आणि शेवटीं तुम्हांला स्वतःचाच विसर पडेल.

---

**२९०. ज्याला भगवंताचें प्रेम येईल तो सृष्टीकडे कौतुकानें पाहील.**

# भगवंताच्या भक्तीचें रहस्य–अनन्यता

१७ ऑक्टोबर

भक्तीचें रहस्य असें की, ती करताना स्वतःचें विस्मरण होतें आणि भगवंताचें सतत स्मरण राहतें. भगवंतावांचून भक्ति होत नाहीं. भक्ति केली कीं चित्त निर्विषय होतें हें सांगावेंच लागत नाहीं. भक्तीचा विषय एक भगवंतच ठेवला कीं बाकी सर्वांचा विसर पडतो. 'मी नाहीं, तूं आहेस' हें जाणणें हीच भक्ति होय. भगवंताची प्राप्ति हवी असेल तर त्याची भक्ति करावी. ज्याप्रमाणें सौभाग्यवती म्हटली कीं तिला नवरा असायचाच, त्याप्रमाणें भक्ति म्हटली कीं तिथे भगवंत असलाच पाहिजे. भगवंत हा भक्तीचा प्राण आहे. तालमींत जाणारा आणि तालमींत न जाणारा यांच्यामध्यें थोडातरी फरक दिसायला पाहिजे; तालमींत जाणाऱ्याच्या शरीरावर थोडातरी पीळ दिसायला हवा ना! तसेंच जो भक्ति करतो त्याच्या वृत्तीमध्यें थोडा तरी फरक पडला पाहिजे. आपल्याला जर विद्या पाहिजे असेल तर आपण विद्वानांची संगत धरली पाहिजे, त्याचप्रमाणें आपल्याला भक्ति आणि आनंद पाहिजे असेल तर भगवंताची संगत धरली पाहिजे. सर्व सृष्टि रामरूप दिसणें हेंच भक्तीचें फळ आहे. याकरितां अनन्यतेची अत्यंत जरूरी आहे. अनन्यतेंतच भक्ति जन्म पावते. द्रौपदीची अनन्यता खरी. भगवंता-शिवाय मला दुसरा कोणताच आधार नाहीं याची खात्री पटणें हेंच अनन्यतेचें स्वरूप. माझी प्राप्ति करून घ्यायची असेल तर भक्ति हेंच साधन आहे म्हणून स्वतः परमात्म्यानेंच सांगितलें आहे. जसें नामस्मरण विस्मरणानें करता येत नाहीं, त्याचप्रमाणें भक्ति अभिमानानें करता येत नाहीं.

समजा, एखाद्या माणसाचें लग्न झालें. तो काल ब्रह्मचारी होता आणि आज गृहस्थाश्रमी झाला; तरी त्याच्या जीवनातले इतर व्यवसाय चालूच राहतात. त्याचप्रमाणें आपण भगवंताचे झालों तरी आपले प्रपंचाचे सर्व व्यवहार पूर्ववत् सुरळीत चालतात. जी जी गोष्ट घडेल ती ती आपण भगवंताला सांगावी. भगवंताच्या अस्तित्वाची जाणीव ठेवण्यासाठीं, भगवंताला सांगून प्रत्येक काम करावें. भक्तीनें भगवंत साधतो आणि फलाशा आपोआप कमी होतात. म्हणून आपण उपासना किंवा भक्ति वाढवावी. मी देही आहें असें म्हणतां म्हणतां आपण या देहाचे झालों; त्याचप्रमाणें "मी देवाचा आहें" असें म्हणत गेल्यानें आपण देवरूप होऊन जाऊं. पण हें होण्यासाठीं सगुणोपासनेची जरूरी आहे. रस्ता चालून गेल्याशिवाय जसें आपलें घर गाठतां येत नाहीं, त्याप्रमाणें सगुणोपासने-शिवाय आपल्याला उपाधिरहित होतां येत नाहीं. राम कर्ता आहे ही भावना म्हणजेच सगुणोपासना, आणि हेंच खऱ्या भक्तीचें स्वरूप आहे. "तूं जें देशील तें मला आवडेल" असें आपण भगवंताला सांगावें आणि "माझ्या देवाला हें आवडेल का?" अशा भावनेनें जगांत वागावें.

२९१. नामापरतें न मानावें हित । हेंच आजवर सांगत आलों सत्य ॥
अखंड रामनाम निजध्यास चित्तीं । तेथें कांहींच न राहे भ्रांति ॥

# भगवंताच्या प्राप्तीचीं साधनें

**१८ ऑक्टोबर**

भगवंत आणि आपण ह्यांच्यामध्यें अभिमानाचा पडदा आहे। हा दूर झाला म्हणजे आपल्याला भगवत्प्राप्ति झाली. हा दूर व्हायला अनेक मार्ग आहेत. कर्ममार्ग, हठयोग, राजयोग, वगैरे मार्गांनीं हा तितका लवकर दूर होत नाहीं; उलट क्वचित प्रसंगीं वाढतोहि. भक्तिमार्ग सोपा आहे. भक्ति म्हणजे भगवंताला अभिमानरहित अनन्य शरण जाणें, भगवंताचें होऊन राहणें, भगवंताशिवाय दुसरें कांहींच न दिसणें, सर्वत्र भगवत्प्रचीति येणें. अशी भक्ति प्राप्त होण्याचा मार्ग म्हटला म्हणजे सर्व कर्तृत्व भगवंताकडे देणें आणि सर्व त्याच्या इच्छेनें चाललें आहे असें मानणें, आपली प्रत्येक क्रिया त्याला समर्पण करणें. असें केल्यानें आपला अभिमान लवकर नाहींसा होतो. हें साधत नसेल तर गुरुआज्ञेंत राहणें; म्हणजेच, आपला मान, अभिमान, शहाणपण, हें सर्व गुंडाळून ठेवून गुरु सांगतील तसें सबब न सांगता वागणें. हेंहि साधत नसेल तर संताजवळ नुसतें पडून राहणें. त्यांच्या सांगण्यानें, सहवासानें, अभिमान हळूहळू कमी होतो.

भक्ति दोन प्रकारांनीं उत्पन्न करता येते. पहिला प्रकार म्हणजे सर्व सोडून, लंगोटी लावून, 'भगवंता, तूं मला भेटशील तेव्हांच मी उठेन,' अशा निग्रहानें बसणें हा मार्ग कठीण आहे. प्रापंचिकाला हा साधणार नाहीं. दुसरा प्रकार म्हणजे सहवासानें भक्ति उत्पन्न करणें. कांहीं वाचायचें असेल तर भगवंताचें गुणवर्णन वाचणें, त्याचेच गुण श्रवण करणें, त्याच्या दर्शनास जाणें, वगैरे प्रत्येक कृत्य भगवंताकरितां करणें, प्रत्येक कृत्यांत त्याचें स्मरण ठेवणें, असा अखंड सहवास ठेवावा, म्हणजे भगवंताच्या ठिकाणीं प्रेम उत्पन्न होतें. विषयाकरितां केलेली भगवद्भक्ति ही खरी भक्ति होऊं शकत नाहीं. भगवत्सेवा निष्काम पाहिजे; कारण भक्ति म्हणजे संलग्न होणें. मी विषयाशीं संलग्न असतो तेव्हां ती विषयाची भक्ति होते, भगवंताची नाहीं. तेव्हां आपण करतो ही भगवंताची सेवा नसून विषयाची सेवा होते हें ठरल्यासारखें झालें; म्हणजे मी विषयाचाच गुलाम झालों. विषयांचा गुलाम होऊन मी विषय कसचे भोगणार ! मालक होऊन विषय भोगावेत. संत, भगवंत, हे निरतिशय सुख देणारे आहेत. त्यांच्याजवळ विषय मागणें म्हणजे रामाजवळ भिक्षेचें फडकें मागण्याइतकेंच वेडेपणाचें नव्हे का ? आपण सेवेचें फळ मागून भगवंताला मात्र दूर करतो. "भगवंताची प्राप्ति" हेंच आपल्या जीवनाचें ध्येय ठरवून आपण नेहमीं त्याच्याभोंवतीं फिरत असावें. भगवंतामध्यें जे मिसळतात ते परत येत नाहींत हें लक्षांत ठेवावें.

---

२९२. भगवंताला आपलें होणें आवडतें फार । श्रीरामनामीं राहावें खबरदार ॥
नामाला वाहून घ्यावें आपण । याहून दुजें करणें उरलें नाहीं जाण ॥

# भगवंताची श्रद्धा वाढवावी हाच सर्व धर्मांतील संस्कारांचा मूळ हेतु आहे

१९ ऑक्टोबर

धार्मिक संस्कार फार चांगले असतात, कारण त्यांनीं आपल्या मनाला वळण लागतें. प्रत्येक धर्मामध्यें संस्कार असतातच. ज्या मनुष्याला संस्कार नाहीं तो कोणत्याच धर्माचा नाहीं; मग आस्तिक असो वा नास्तिक असो. खरें म्हणजे कोणतेंच कर्म यथासांग घडत नसतें, पण त्यातल्या त्यांत संस्कारकर्म मनुष्यानें शास्त्राप्रमाणें करावें, त्यामध्यें जिथें कमी पडेल तिथें भगवंताचें स्मरण करावें. कारण भगवंताची श्रद्धा वाढावी हाच संस्काराचा मूळ हेतु आहे. संस्कार करीत असताना जरूर असलेला धार्मिक विधि तर करावाच, पण ज्यांना आपल्याविषयीं प्रेम आहे असे, आणि आपल्याला ज्यांच्याविषयीं प्रेम आहे असे जे लोक आहेत, त्यांना जेवावयला बोलवावें. लौकिक मात्र वाढवूं नये. वाईट तें सोडणें आणि चांगलें तें धरणें हाच संस्काराचा मुख्य हेतु. संस्कार हे भगवंताचें स्मरण करून देतात. बंधनांमुळेंच आपल्या धर्माला सनातनत्व आलें आहे. धर्म हा कधींच बुडत नसून बंधनें बुडत जातात. सध्यां बंधनें बुडत चाललीं आहेत, म्हणून बंधनांना अतिशय महत्त्व आहे. पूर्वी धर्मावर श्रद्धा होती, म्हणून इतक्या सुधारणा नसूनसुद्धां स्वास्थ्य होतें. पण आज बाहेरच्या जगांत पुष्कळ सुधारणा झाल्या तरी त्या सुधारणांना धर्माचा पाया नसल्यामुळें मानवाला स्वास्थ्य नाहीं. अलीकडे कांहीं लोक असें म्हणतात कीं, "समाज जसा बदलेल तसे नीतीचे नियम बदलायला पाहिजेत." पण अध्यात्मविद्या असें सांगते कीं नीतीचे नियम कायमच आहेत. ते न बदलतां माणसानें स्वतःलाच बदललें पाहिजे. धर्म जेवढा व्यापक तेवढी त्याचीं बंधनें जास्त. एखाद्या समाजाचा पाया बौद्धिक असूं शकेल किंवा पैसा असेल, किंवा धर्म असेल. पण ज्या समाजाचा पाया धर्म आहे त्या समाजालाच खरें समाधान लाभेल. व्यवहारामध्यें ज्याचा उपयोग करतां येतो तोच खरा वेदान्त होय, आणि जो परमार्थाला उपयोगी पडतो तोच खरा आणि योग्य व्यवहार होय. धर्म म्हणजे एका अर्थानें व्यवस्थितपणाच होय. धर्म वस्तुजातीला संस्कारांच्या रूपानें नीट धरून ठेवतो, कोणत्याहि धर्माचें किंवा आश्रमाचें पालन करतांना अभिमानाचें उच्चाटन करणें जरूर आहे. मी ज्या जातीचा असतों त्या व्यतिरिक्त धर्म करावा असें वाटूं लागलें; म्हणजे अनवस्थाप्रसंग येणारच. औषधाची आलटापालट केली तर वाईट परिणाम होणारच. धर्मानें वागला तो उपाशीं नाहीं राहणार. 'कसें असावें' यापेक्षां 'कसें आहे' तें पाहावें. उद्यां काय होईल हें नसेल आपल्याला कळत, परंतु थोर पुरुषांनीं लिहून ठेवल्याप्रमाणें भगवंताचा विसर न पडतां कर्में करावीं म्हणजे झालें. जन्माला येऊन कांहीं करणें असेल तर भगवंताला न विसरतां कर्में करावीं म्हणजे झालें. नामांत जो प्रपंच करील त्याचाच प्रपंच पूर्णत्वाला जातो.

---

२९३. जो मनुष्य हौसेनें प्रपंच करील तर तो करण्यास चोवीस तास पुरणार नाहींत, पण जो जरूरीपुरतां प्रपंच करील त्याला तीनचार तास पुरतील.

# भगवंताला होतां अर्पण। तेथें सुखदुःखाचें नाहीं कारण।

२० ऑक्टोबर

सर्वस्वीं व्हावें रामास अर्पण। हाच उपाय सांगती साधुजन॥ रामास अर्पण व्हावें कोण्या रीतीं। त्याचा मार्ग सज्जन सांगती॥ प्रयत्नेविण राहों नये। फलाची आशा ठेवूं नये। भगवंताला विसरूं नये। कर्तव्य-दृष्टीनें कर्म करण्यास चुकूं नये॥ प्रथम राखावें भगवंताचें अधिष्ठान। तेथें प्रयत्नाचा उगम। अखंड राखावें अनुसंधान। येणें कर्म होईल सहज रामार्पण॥ उपास्यदेवतेची करावी आठवण। मनानें जावें त्यास शरण॥ सद्गुरूसी झाला जो अनन्य। त्यास दुजें करणें नाहीं अन्य॥ भगवंताला होतां अर्पण। तेथें देहाचें सुखदुःखाचें नाहीं कारण॥ दुसऱ्याला दत्तक झाला। त्याचा भार बापानें घेतला। तैसें व्हावें आपण रामार्पण। त्याचें तो पाहून घेईल जाण॥ सद्वृत्ति सद्गुण दुर्गुणादि विकार। हें सर्व करावें रामार्पण। त्यानेंच रामाचें होऊन राहणें जाण॥ राजापोटीं पुत्र जन्मा आला। राजपद हाती चालत आलें त्याला। तैसें आपण व्हावें रामार्पण। विषयाचा न लागे तेथें लाग जाण॥ मनानें भगवंतास जावें शरण। व्यवहारांत दक्षता ठेवावी आपण॥ अन्याय झालें बहु फार। पश्चात्तापानें होती दूर। ऐसा आहे जरी सिद्धांत। तरी पण व्हावें लागे शरणागत॥ अनन्य व्हावें रामास शरण। तुझेविण नाहीं मानणें कांहीं अन्य। ठेवावा सदा मनीं ध्यास। दया येईल रामरायास॥ जेव्हां मनासकट देह केला अर्पण। मग मरणाच्या भयाचें काय कारण॥ परमार्थाचें मुख्य साधन। शक्य तों न चुकूं द्यावें अनुसंधान। मुखीं करावें नामस्मरण। हृदयीं भगवंताचें ध्यान। याविण नाहीं दुजा उपाय जाण॥ मागिलाची विस्मृति। पुढिलाची न करावी स्मृति। पण आज भजावा रघुपति॥ सर्व कांहीं करीत जावें। परी व्यवहारीं न गुंतावें॥ ऐसें राहावें प्रपंचात। जसा पाहुणा वागे जगांत॥ बाह्य सृष्टि विषयाकार। तेथें मन न गुंतूं द्यावें जाण॥ देह लावावा प्रपंचीं। मन लावावें रामचरणीं॥ लोभ्याचें चित्त पैशावरि परि व्यवहार जैसा करी। तैसें मन ठेवावें रामावरी। प्रपंचात असावी हुशारी॥ चित्त एकाग्र न व्हायला कारण। विषय मानला आपला जाण॥ घार फिरते आकाशांत। तैसें चित्त राहातें विषयांत॥ म्हणून दृष्टि ठेवावी त्याचेवर। जें स्वाभाविक आहे स्थिर॥ एकाग्रतेस करणें साधन। त्याला करणें जरूर नामस्मरण॥ एकाग्रतेस उपाय एकच खरा। नामीं प्रेमा ठेवा पुरा॥ निश्चितपणा राखावा। साधनांत जोर आणावा॥ विषयापासून निवृत्ति॥ जडावी नामाची प्रीति। त्याला दूर नाहीं रघुपति॥ व्यवहारांत असावी दक्षता। परि राम चिंतीत जावा सदा॥ प्रपंचांत असावें लक्ष। तरी त्याचा चित्तीं घेऊं नये पक्ष॥ परमात्म्यानें जें जें दिलें। तें तें त्याचें म्हणून सांभाळणें भलें॥ मुलाबाळांचें करावें जतन। रामानें दिलेलें हें जाणून। त्यांच्या लोभांत न गुंतवावें चित्त। हाच परमार्थ सत्य॥ सर्व कांहीं करावें। मीपणानें न राहावें। कर्तव्याची मुख्य खूण जाण। नसावी मोबदल्याची अपेक्षा हें प्रमाण॥ रामसेवा रामासाठीं। न जाणावी विषयासाठीं॥ प्रपंच न मानावा सुखाचा। तो असावा कर्तव्याचा॥ सदा राहावें सावचित्त। मनानें भजावा भगवंत॥

---

२९४. जें जें म्हटलें मीं माझें। तें तें सर्व रामा तुझें॥
शेवटीं करावी प्रार्थना एक। रामा तुला मी शरण देख॥

# भगवंताचा पाठिंबा असलेला मनुष्य भोग सोशीनें भोगूं शकतो

२१ ऑक्टोबर

आपलें ध्येय काय असावें हें ठरविण्याची बुद्धि माणसाला आहे. ती खालच्या प्राण्यांना नाहीं. हाच माणसांत आणि त्या प्राण्यांत फरक आहे. आतां, प्राण्यांना प्रारब्धानें आलेले भोग भोगावे लागतात. त्याचप्रमाणें विषयी माणसालादेखील आलेले भोग भोगावे लागतात, पण भगवंताचा पाठिंबा ज्याला आहे तो मागे-पुढे सोशीनें भोग भोगूं शकतो. जगातल्या धडामोडी जशा चालतात तशाच आपल्या सर्व गोष्टी प्रारब्धानें चालतात. आपण जें मिळविलें आहे तें स्वतःच्या प्रयत्नानें मिळालें ही कल्पना गेल्याशिवाय देह प्रारब्धावर टाकतां येणार नाहीं. "माझें सर्व हें त्याच्या कृतीचें फळ आहे," असें म्हटलें कीं क्रिया तर चालते, पण कर्तेपण राहात नाहीं. लहान मूल प्रारब्धाचा भोग भोगीत असतांना आपल्या नाकावर बसलेली माशी उडवतें, तसें देह प्रारब्धावर टाकून आपण प्रयत्न करणें जरूर आहे. पुष्कळ गोष्टी अशा आहेत कीं, त्याच्याकडे बोट दाखवून त्याचें कारण अमुक असें आपण सांगूं शकतो; पण कांहीं गोष्टी अशा आहेत कीं, त्यांचें कारण आपल्याला दाखवितां येत नाहीं. अशा वेळीं त्या प्रारब्धानें घडल्या असें आपण म्हणतो. प्रारब्ध म्हणजे न समजणाऱ्या गोष्टींचें कारण होय असें म्हणायला हरकत नाहीं. संतांनादेखील त्यांचें प्रारब्ध भोगावें लागतें, पण त्यांना देहबुद्धि नसल्यानें भोगाचें सुखदुःख त्यांना नाहीं. व्यवहारदृष्ट्या औषध घेऊन मग भोग भोगणें हाच मार्ग खरा आहे. बुवानें आपल्या सिद्धीनें रोग बरा करणें किंवा टाळणें हें बरें नाहीं. त्यामध्यें बुवाची प्रसिद्धी होईल खरी, पण त्यात त्याचें स्वतःचें कल्याण नाहीं, तसेंच लोकांचेंहि पण हित नाहीं. समजा, एक मनुष्य रस्त्यानें चालला असतांना वाटेंत एक दहा रुपयांची नोट पडलेली आढळली. पूर्व संस्काराप्रमाणें ती उचलून घेण्याची वासना त्याला होईल, पण ती प्रत्यक्ष उचलून घ्यावी किंवा न घ्यावी हें ठरविण्याचें स्वातंत्र्य त्याला आहे. म्हणून प्रारब्धानें देहभोग आला असतां त्यामध्यें मनाची वृत्ति कशी ठेवावी हें स्वातंत्र्य आपल्याला आहे. तें प्रारब्धावर अवलंबून नाहीं. भगवंत सगुणांत आला कीं, त्यालादेखील प्रारब्धाचा नियम लागूं झाला. आपला जन्मजात स्वभाव जरी वाईट असला तरी अभ्यासानें तो खात्रीनें सुधारतां येईल. जोपर्यंत आपल्या अंतःकरणात अवगुण आहेत तोपर्यंत आपली प्रगति होणें फार कठीण आहे. शेत पेरण्यासाठीं ज्याप्रमाणें जमिनीची मशागत करायला पाहिजे, त्याप्रमाणें भगवंताचें प्रेम येण्यासाठीं आपलें अंतःकरण दुर्गुणांपासून स्वच्छ केलें पाहिजे. असें एकदा अंतःकरण शुद्ध झालें म्हणजे भगवंतावाचून दुसरा कोणी नाहीं ही भावना टिकविणें म्हणजेच अनुसंधान ठेवणें फारसें जड जात नाहीं. अनुसंधान हें आपलें ध्येय ठरवून त्याला अनुसरून बाकीच्या गोष्टी कराव्या; त्याकरितां सर्वांनीं मनापासून नाम घ्यावें आणि आनंदांत राहावें.

२९५. नीति धर्मांचें आचरण । तुझे कृपेनें व्हावें जतन ॥
सदा राहावें समाधान । जें तुझे कृपेवांचून नाहीं जाण ॥

# रूप ही भगवंताची जड खूण आहे तर नाम ही त्याची सूक्ष्म खूण आहे

**२२ ऑक्टोबर**

व्यवहारदृष्ट्या पुस्तक, मंदिर, आंबा आणि माणूस यांची रूपें निराळी आहेत नांवें निराळीं आहेत म्हणून त्यांचीं मूलद्रव्यें निरनिराळीं आहेत असें वाटतें. रोजच्या व्यवहारांत तें योग्यच आहे. पण जगतामध्यें सर्व परमात्माच भरलेला आहे असें मानल्यावर जगांतल्या यच्चयावत् वस्तूंचें मूलद्रव्य एकच असणार हें ओघानेंच आलें. शिवाय अनेक रूपें आलीं आणि गेलीं तरी तें मूलद्रव्य कायमच राहतें. आपली ज्ञानक्रिया पाहिली तर, पहिल्यानें पदार्थाचें रूप दृष्टीस पडतें आणि नंतर त्याचें नाम येतें. पण आपण असा विचार केला कीं, आपण इंद्रियांनीं रूप आंत घेतों हें खरें. पण तें रूप अमक्याचें आहे हा विचार जो बुद्धीमध्यें उत्पन्न होतो त्याला रंग, वास, आवाज, चव आणि स्पर्श अ.तो का ! नसतो ना ! याचा अर्थ असा कीं, रूप जरी जड असलें तरी रूपाचें ज्ञान सूक्ष्म असतें. आपलें सर्व विचार-शब्दानें चालतात. शब्द हा ज्ञान सांठवितो. भगवंताचें नाम हा शब्दच आहे; म्हणून भगवंताच्या रूपाचें सर्व ज्ञान त्याच्या नामांत सांठविलें आहे, म्हणून नाम केव्हांहि श्रेष्ठच ठरतें. एक नाम घेतलें कीं त्यामध्यें भगवंताचें समग्र वर्णन येतें. उदाहरणार्थ, श्रीसमर्थ रंगानें गोरे होते, शरीरानें मजबूत होते, त्यांना दाढी होती, शिवाजीचे ते गुरु होते, ते भिक्षा मागत असत, त्यांनीं दासबोध लिहिला, कल्याण, त्यांचा शिष्य होता, इत्यादि सर्व गोष्टी "रामदासस्वामी" या नांवामध्यें सांठवल्या आहेत. म्हणून नामाच्या मागें रूप आपोआप येतें.

भगवंत हा नुसता जडच नाहीं तर तो अत्यंत सूक्ष्महि आहे. जड वस्तूमध्यें तिचें रूप आणि नाम हीं निराळीं असतात, पण भगवंताच्या बाबतींत तीं दोन्ही एकच आहेत. **'रूप' ही भगवंताची जड खूण आहे तर 'नाम' ही त्याची सूक्ष्म खूण आहे.** रूपाशिवाय भगवंताच्या लीला होणार नाहींत. आणि लीलावर्णनाशिवाय त्याचें प्रेम येणार नाहीं. या लीला ऐकून मात्र त्याच्या नामावर प्रेम बसेल, आणि त्याचें नाम घेतलें कीं त्याच्या लीला आठवतील; किंबहुना नामामध्यें भगवंताच्या सर्व लीला साठविलेल्या असतात म्हणून त्याचें नाम उच्चारलें कीं आपल्या भावना उचंबळून येतात. भगवंताच्या रूपाचें दर्शन झाल्यावांचून मनाला खरें समाधान होत नाहीं हें अगदीं खरें आहे; पण चोवीस तास दर्शन करीत राहणें हें शक्य आहेत का ? त्याचें नाम मात्र चोवीस तास राहूं शकेल. शिवाय भगवंताचें रूप प्रत्यक्ष पाहात असतांना त्याचें ध्यान करतां येणार नाहीं, त्याचें नाम मात्र घेतां येईल. नाम हें रूपापेक्षा जास्त व्यापक आहे. रूपाशिवाय भगवंताचे गुण आपल्याला कळणार नाहींत ही गोष्ट खरी, पण त्याच्या अनेक रूपांना व्यापून राहणारे गुण नामानेंच ओळखले जातात. त्याचीं रूपें कितीहि आलीं आणि गेलीं तरी नामानें त्याचा बोध होत असल्यानें त्याचें नाम घेतलें कीं त्याचे गुण मनासमोर येतात. भगवंताचीं रूपें जिथून येतात तिथें नामाचें वास्तव्य आहे. नाम हें सृष्टीच्या आरंभी होतें, तें सध्यां आहेच, आणि सर्व सृष्टीचा लय झाला तरी तें शिल्लक उरेल. नाम म्हणजे ईश्वर होय. रूप हें नामाहून निराळें राहूं शकत नाहीं. नाम हें रूपाला व्यापून पुनः शिल्लक उरतेंच या नामांतून अनंत रूपें उत्पन्न होतात आणि अखेर त्याच्यामध्येंच तीं लीन होतात. म्हणून भगवंताचें नाम श्रेष्ठ आहे. हें त्याचें नाम तुम्हीं आवडीनें घ्या, अखंड घ्या आणि आनंदात राहा.

---

२९६. वासना न उठो दुजी काहीं । नामामध्यें प्रेम भरपूर देई ॥
आतां न गुंतवा माझें मन । रामा मी आलों तुला शरण ॥

# तुम्ही नाम घ्यायला लागा, भगवंताचें प्रेम आल्याशिवाय राहाणार नाहीं

२१ ऑक्टोबर

भगवंताचें प्रेम लागायला सत्संगतीचा मार्ग अतिशय उत्तम आहे यांत शंकाच नाहीं. परंतु सत्संगति सर्वांनाच मिळेल असें काहीं निश्चयानें सांगता येणार नाहीं. दुसरा मार्ग विचाराचा आहे. नेहमीं चांगले आणि पवित्र विचार मनात बाळगावेत. भगवंतानें सर्वांवर कृपा करावी, त्यानें सर्वांचें कल्याण करावें, त्याचें प्रेम सर्वांना यावें, असे विचार नेहमीं मनात ठेवून संतांच्या विचारांचें मनन करावें. **सर्वांचें कल्याण चिंतण्यांत स्वतःचें कल्याण अनायासें होत असतें.** पण आपण असें पाहतों कीं आपले विचार-सुद्धां नेहमीं स्थिर राहात नाहींत. नामस्मरणाला बसल्यानंतरसुद्धां किती अपवित्र विचार आपल्या मनात येत असतात याचा सर्वांना अनुभव आहे ना ? तेव्हां चांगले विचार मनात बाळगणें हेंहि आपल्या हातांत नाहीं, आतां तिसरा मार्ग म्हणजे नाम. नाम हें एकच साधन असें आहे कीं आपल्याला तें प्रयत्नानें घेता येईल, तें नाम तुम्ही सर्वांनीं निःशंकपणें घ्या. त्या नामाच्या विरुद्ध तुम्हाला कुणीहि काहींहि सांगितलें तरी त्याचें ऐकूं नका. तें नाम कसें घ्यावें वगैरे चिकित्सेंत तुम्ही पडूं नका. तुम्ही नाम घ्यायला लागा, भगवंताचें प्रेम तुम्हाला आल्याशिवाय राहणार नाहीं. अगदीं सतत निश्चयानें नाम घ्या. **जिथें नाम तिथें माझा राम आहे हा माझा विश्वास तुम्ही बाळगा.** दुसरें काहीं एक न करता सतत निश्चयानें नामांत राहणाऱ्या माणसाला संतांची भेट होऊन ते त्याचें कल्याण करतील. तें नाम तुम्हीं सर्वांनीं मनापासून घ्या, आणि सर्वांनीं अगदीं आनंदात राहून सुखानें संसार करा. भगवंताचें नाम ही ठिणगी आहे. ती फुलवली तर संबंध जग भरून जाईल एवढी मोठी होऊं शकते. ज्याप्रमाणें अग्निहोत्र्याच्या कुंडातला अग्नि थोडा धुगधुगीमध्यें असतो, त्यावर फुंकर घालून त्याचा जाळ करता येतो, त्याप्रमाणें आपण नामाची ठिणगी जागृत ठेवूं या, ठिणगीचा जाळ उत्पन्न होईल आणि तो जाळ जगभर पसरेल. ज्ञानेश्वरमहाराजांनीं भगवंताजवळ एकच मागणें मागितलें "भगवंता, लोकांना दैन्यवाणें ठेवूं नकोस" जो नामात राहिला, त्याचा वासनाक्षय झाला व दैन्यपणा संपला.

ज्या माणसाला आपला स्वार्थ साधायचा नाहीं त्याला कमी पडणें शक्यच नाहीं. जेथें निःस्वार्थीपणा आहे तिथें भगवंताला पुरवठा केलाच पाहिजे. आपण जगावर प्रेम केल्याशिवाय परत प्रेम मिळणार नाहीं. जो भगवंताच्या प्रेमात तल्लीन झाला, त्याला बाकीच्या गोष्टींची आठवण राहात नाहीं. ज्याप्रमाणें मालक घरात आला कीं चोर पळालाच म्हणून समजा, त्याचप्रमाणें जो भगवंताच्या प्रेमात रमला, तो खात्रीनें सुखी बनला, कारण त्याची देहबुद्धि पळून जाते. म्हणून भगवंताला अशा प्रेमानें आळवावें, कीं त्याच्या डोळ्यात पाणी यावें आळवताना आपल्या डोळ्यात पाणी आलें कीं भगवंताच्याहि डोळ्यात पाणी येते. भगवंताकरिता कोणीहि कष्ट करूं नका। कष्टानें साध्य होणारी ती वस्तु नव्हे. ती वस्तु सात्त्विक प्रेमानें साध्य होणारी आहे, आणि प्रेमामध्यें झालेले कष्ट मनुष्य चटकन् विसरून जातो. तुम्ही भगवंताच्या प्रेमानें अगदीं भरून जा, आपापसात प्रेम वाढवा, म्हणजे मग सर्व जग आनंदमय, प्रेममय दिसूं लागेल, आणि शेवटीं तुम्हाला आपल्या स्वतःचाच विसर पडेल.

२९७. न मागणें आतां काहीं । मी तुझ्यासाठीं जिवंत पाहीं ।।
आतां रामा, एकच करीं ।। तुझा विसर न पडो अंतरीं ।।

# परमेश्वराची खरी पूजा

**२४ ऑक्टोबर**

देहाभिमान नाहींसा झाला म्हणजे काळजीचें कारण उरत नाहीं. देहाभिमानामुळें, 'मी साधन करतों' असा अभिमान उत्पन्न होतो. हा साधनाभिमानहि घातुक असतो. तेव्हां, जें कांहीं होतें तें परमेश्वराचे सत्तेनें होतें असें मानीत जावें. त्यालाच आपलें हित कशात असतें तें उत्तम कळतें, आणि तो सर्व तुमच्या बऱ्याकरितांच करीत असतो, तेव्हां कसलीहि काळजी करूं नये. त्याच्यावर विश्वास टाकून आनंदात असावें. चित्तवृत्ति परमेश्वराकडे लावावी. तेथून ती विषयाकडे जाऊं लागली म्हणजे संधि साधावी, म्हणजे, त्यावर लक्ष असावें. मन विषयाकार होऊं लागलें म्हणजे माझें स्मरण करावें, बऱ्याच वेळानें आठवण झाली तरी माझें स्मरण करावें. म्हणजे पुढें पुढें लवकर आठवण होऊं लागेल. ज्याचें मन पूजेंत असतें त्याची खरी पूजा होते. सर्वांभूतीं भगवद्भाव, आणि कोणाचें मन न दुखविणें, ही पूजा खरी होय. पूजेला बाह्योपचाराची गरज नसते, मन मात्र अर्पण होणें जरूर आहे. पूजेंत भाव असणें जरूर आहे. भक्ति आणि वैराग्य यांच्यामध्यें तसा फरक नाहीं. परमेश्वराची आवड म्हणजे भक्ति, आणि विषयाची अनासक्ति म्हणजे वैराग्य. रामराय वनवासात जायला निघाले तेव्हां त्यांनीं सीतामाईला बरोबर न येण्याविषयीं सांगितलें. त्या वेळीं तिनें उत्तर दिलें कीं, "रामा! तुझ्यासह असेन तर मला सर्व कष्ट सुखमय आहेत; आणि तुझ्याशिवाय असेन तर सर्व सुखोपभोग हे मला कष्टमयच आहेत." सीता ही श्रीरामाची मोठी भक्त होती, आणि म्हणून तिची अशी अवस्था होती. तिला परिस्थितीची जाणीव नव्हती. पण आपली गोष्ट तशी नाहीं. आपण एकीकडे परिस्थितीवर अवलंबून आहोत, आणि दुसरीकडे आपल्याला भगवंत पाहिजे. म्हणून आपण मध्यम मार्ग धरावा. तो हा कीं, आपण म्हणावें, "रामा, माझी परिस्थिति तुझ्या इच्छेवर अवलंबून आहे." असें आपण मनःपूर्वक म्हटलें कीं, परिस्थिति बदलली तरी आपला आनंद टिकेल. "माझ्या देवाला हें आवडेल का!" अशा भावनेनें जगात वागणें हाच सगुणोपासनेचा हेतु आहे. जसजशी आपण सगुणाची उपाधि वाढवितो, तसतशी आपली उपाधि कमी कमी होत जाते. सगुणाच्या उपासनेला आज आपण कल्पनेनें प्रारंभ करूं, मागून निश्चयात्मकता आपोआप येईल. "देव आहे" असें खऱ्या अर्थानें वागणारे जगामध्यें थोडेच असतात म्हणूनच भगवंत ज्या ठिकाणीं आहे तेथें त्याला शोधा. तो सर्वांच्या हृदयात आहे. म्हणून तेथें त्याला पाहा.

---

२९८. रामा, जें जें कांहीं तूं करी। त्यात समाधानाला यावें पुरी ।।
आता या नामाचें अखंड स्मरण। देह केला तुला अर्पण ।।

# ईश्वरप्राप्तीचे दोन मार्ग – खरी तळमळ आणि संपूर्ण शरणागति

२५ ऑक्टोबर

नुसता विषयाचा त्याग केल्यानें ईश्वराची प्राप्ति होत नाहीं, आणि विषयसेवनानेंहि होत नाहीं। बायकोचा त्याग करून होत नाहीं, तसेंच वनांत राहिल्यानेंहि होत नाहीं, जनांत राहून होत नाहीं। खरें म्हटलें म्हणजे असें काहीं नाहीं कीं जें केल्यानें त्याची प्राप्ती होईल. असें असतें तर साधु ओळखण्यास काहींच वेळ लागला नसता. संत हे यापैकीं काय करीत नाहींत ! काहीं प्रपंच करतात तर काहीं वनांत राहतात. म्हणून काय, कीं अमुकच केलें म्हणजे ईश्वराची प्राप्ती होते असें नाहीं. मग असें काय आहे कीं जें केल्यानें त्याची प्राप्ति होते ? तर त्यासाठीं एकच लागतें, तें म्हणजे, ईश्वराची प्राप्ति व्हावी ही मनापासून तळमळ लागली पाहिजे. ज्याला अशी तळमळ लागली त्याचे निम्में काम झालें. ज्याप्रमाणें मोठी इमारत बांधण्यासाठीं तिचा पाया अगोदर बळकट असावा लागतो, त्याप्रमाणें खरी तळमळ लागली म्हणजे पुढलें कार्य व्हायला फार अडचण पडत नाहीं। आणि हें व्हायला माण्य लागतें. तळमळ लागल्यावर सर्व भोगांचा त्याग करावाच लागतो असें नाहीं; आपण रामाचे आहोंत असें आपल्याला मनापासून वाटलें पाहिजे, आणि त्याला शरण जाऊन आपण त्याचे आहोत असें वागलें पाहिजे, म्हणजे मनानें त्याचें झालें पाहिजे, असें करण्यानें आपला प्रपंच बिघडेल असें वाटतें का ! आपण नोकरी करतो त्यावेळेस अंमलदाराबद्दल आपलें चांगलें मत असतें का ? तो आपल्याला मनानें आवडत नसूनहि आपण देहानें त्याचें काम करतोच कीं नाहीं ! तसें, आपण मनानें रामाचे आहोंत असें ठरवून देहानें प्रपंच करावा, म्हणजे प्रपंच न बिघडतां उलट चांगला होतो. कारण आपण ज्याला शरण गेलों, त्याला त्याची लाज असते. रामानें तरी काय केलें। त्याला बिभीषण शरण आला तेव्हां त्याला मारून टाकावा असेंच बाकीच्यांनीं सांगितलें. तरी पण रामानें सांगितलें कीं जो मला शरण आला त्याचें रक्षण करणें माझें काम आहे. शरणागताला नुसतें जीवदान देऊन तो राहिला नाहीं, तर त्याला लंकेचें राज्य दिलें. म्हणून सांगतों कीं, जो त्याचा होऊन राहतो त्याची लाज रामाला असते. माझ्याकडे इतकेजण येतात, पण एकानें तरी 'मला रामाची प्राप्ति करून द्या' म्हणून विचारलें का ? मी आलो आहे तो काय तुमचे विषय पुरविण्यासाठीं ! समजा, एकजण चोरी करायला निघाला आणि वाटेंत त्याला मारुतीचें देऊळ लागलें. तिथें त्यानें जाऊन मारुतीला नवस केला कीं, मला जर आज चोरींत यश आलें तर मी तुझ्या देवळावर सोन्याचा मुकुट चढवीन, तर आतां सांगा, त्या मारुतीनें काय द्यावें ? त्यानें त्याच्या नवसाला पावावें असें तुम्हाला वाटतें का ! जर नाहीं, तर तुम्हीं विषय मागितले आणि मी दिले नाहींत तर मला दोष कां देतां ? आपल्याला नवस करायचा असेल तर असा करावा कीं, 'मला तूं ज्या स्थितींत ठेवशील त्या स्थितींत आनंद म्हणजे समाधान राहील, आणि दुसरें काहीं मागण्याची इच्छाच होऊं नये.' म्हणजे मग आपल्याला त्याचें होऊन राहतां येईल. भगवंतामध्यें जे मिसळतात ते परत येत नाहींत.

---

२९९. तुझे नामाची आवडी । पाहून दुजें मागणें नसावें ॥
हेंचि द्यावें मला दान । दीन आलों तुला शरण ॥

# भगवत्कृपेचा लोंढा म्हणजे काय ?

२६ ऑक्टोबर

कोणतेंहि बीं पेरताना तें अत्यंत शुद्ध असावें, म्हणजे, किडलेलें किंवा सडलेलें नसावें. भगवंताशिवाय दुसऱ्या कोणत्याहि फळाच्या हेतूनें केलेली भक्ति ही सडलेल्या बीजासारखी आहे. आता, सुरुवातीलाच उत्तम बी पैदा होईल असें नाहीं, परंतु, प्रयत्नानें तें साधता येतें. पुष्कळ वेळा काहीं तरी ऐहिक सुखाच्या इच्छेनें मनुष्य भक्ति करायला लागतो; म्हणजे त्या वेळीं तो सडकें बीं पेरीत असतो. प्रारंभीं अशा तऱ्हेचें काहीं तरी निमित्त होतच असतें. परंतु थोड्याशा विचारानें शुद्ध बीजाची पेरणी होणें जरूर आहे असें चित्ताला पटतें. तशी भगवंताची अनन्यभावानें प्रार्थना करावी. पाऊस पडणें वा न पडणें ही गोष्ट सर्वस्वी भगवंताच्या स्वाधीन आहे आणि तो यथाकाळ पाडतोहि. असें पाहा कीं, एखादें शेत खोलात असलें कीं त्यात पाणी इतकें साचतें कीं; तें जर बाहेर काढून लावलें नाहीं तर सबंध पीक कुजून जातें, त्याच अर्थानें भगवंताच्या कृपेचा लोंढा जर जोराचा असला तर बंधारा फोडून तो बाहेर सोडणेंच जरूर असतें असें करण्यात दोन्हींकडून फायदा असतो. एक म्हणजे, शेतात जास्त झालेलें पाणी बाहेर काढून लावल्यानें शेतातले पीक न कुजतां शेत उत्तम वाढतें; आणि दुसरें म्हणजे हें बाहेर घालवलेलें पाणी आजूबाजूला शेतात पसरून तिथलेंही पीक वाढवायला मदत होते. बंधारा फोडून पाणी बाहेर लावणें याचेंच नांव परोपकार. साधकाची जशी प्रगति होत जाईल त्याप्रमाणें मध्यंतरी सिद्धि प्राप्त होऊन, बोललेलें खरें होणे, दुसऱ्याच्या मनातलें समजणें, एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं अदृश्य गतीनें जाणें, इत्यादि प्रकार घडूं लागतात. अशा वेळीं मोहाला बळी न पडता त्याचा उपयोग स्वार्थाकडे न होईल अशी खबरदारी घेणें जरूर असतें, आणि उपयोग करायचाच झाला तर दुसऱ्याचें काम करण्यात, परोपकारात व्हावा; यालाच बांध फोडून पाणी बाहेर लावणें असें म्हणता येईल. भगवंताच्या कृपेला देहबुद्धीचा पाटबंधारा घालूं नका.

'भगवंत आहे' असें आपल्याला म्हणता येत नाहीं, कारण आपण तसें वागत नाहीं; आणि 'भगवंत नाहीं' असेंहि आपल्याला म्हणता येत नाहीं, कारण तो आहेच आहे. सोन्याचे निरनिराळे दागिने केले तरी सोनें जसें एकच असतें, तसें भगवंतानें निरनिराळे खेळ केले तरी भगवंत हा एकच आहे. एकच मनुष्य ज्याप्रमाणें निरनिराळे पोशाख घालतो, त्याचप्रमाणें एकाच भगवंताचें निरनिराळे आविष्कार होत असतात. मनुष्याला कितीहि शक्ति आणि युक्ति असली तरी भगवंतावाचून ती व्यर्थ आहे. ती शक्ति आणि युक्ति वेळेवर उपयोजिली पाहिजे. भगवंताच्या इच्छेनें सर्व चाललें आहे, ही भावना ठेवून जें येईल त्याला नको म्हणूं नये, आणि जें येत नाहीं त्याबद्दल दुःख करूं नये, अखंड त्याच्या स्मरणात राहावें,

---

३००. नको नको ब्रह्मज्ञान । काव्यशास्त्र व्युत्पत्तींचे ज्ञान ॥
रामा, मला एकच द्यावें । तुझें अनुसंधान टिकावें ॥

# परमेश्वराकडे कर्तेपण देऊन काळजी सोडून द्यावी

२७ ऑक्टोबर

सर्व कर्तेपण परमात्म्याला देऊन आपण काळजी करण्याचें अगदीं सोडून द्यावें आणि सदैव समाधानात आणि आनंदात राहावें. जें जें कांहीं घडतें आहे तें तें परमात्माच आपल्या हिताकरितां करतो आहे, आणि आपल्याकडून ज्या क्रिया होतात त्या आपण करीत नसून परमात्माच करीत आहे, अशी प्रत्येक गोष्टीमध्यें आणि आपल्या प्रत्येक क्रियेमध्यें जाणीव आणि भावना ठेवावी. अशी भावना ठेवायला तुमचें काय जातें ? तुमचें कोठें बिघडते ? त्यांत अवघड तें काय आहे ? प्रयत्न अवश्य करावा आणि तो कसून करावा; पण तो परमात्माच सर्व करीत असून, त्यांत येणारे यश अगर अपयश हें सर्व आपल्या हितासाठींच आहे, अशी ठाम भावना ठेवली पाहिजे. अशी ठाम भावना ठेवल्यावर काळजीला जागाच कुठें राहिली ? आणि एकदा काळजी गेली म्हणजे आपला आनंद हा स्वयंसिद्ध आहेच आहे. तो कांहीं दुसऱ्या कुठून मिळवायचा नाहीं. आनंदाला ही काळजी झाकाळून टाकते. थोडक्यांत म्हणायचें झालें तर असें सांगता येईल कीं, " मीपण, म्हणजे कर्तेपण, परमात्म्याला द्यावें, म्हणजे काळजी नाहींशी होते आणि निर्भेळ आनंद उरतो " आणि अशा स्थितींत नामस्मरण चालावें, नामस्मरणाला अशा स्थितीची जोड पाहिजे. " **स्वानंदात स्मरण** " म्हणजे हेंच होय. आपलें होतें कसें तें पाहा, कर्माच्या सुरुवातीला काळजी लागते, कर्म करीत असतांना " काय होतंय् कुणास ठाऊक ! " म्हणून काळजी लागते; आणि कर्म झाल्यावर शेवटीं, " अरे हेंच का फळ मिळालें " म्हणून काळजी लागते. याप्रमाणें काळजी करणाऱ्या मनुष्याला आयुष्यांत सुखसमाधान केव्हांच मिळत नाहीं. काळजी ही वाळवीसारखी आहे. कांहीं खात असतांना तर ती दिसत नाहीं, पण कपडा किंवा पुस्तक खाल्ल्यावर मात्र ती दिसते; त्याचप्रमाणें, काळजी आपली निष्ठा कमी करीत असते. त्या अवस्थेंत काळजी ही दिसत नाहीं. परंतु नंतर मात्र ती दिसते. काळजी सोडायची म्हटली तर आपण सुटेल, नाहींतर ती केव्हांच सुटणार नाहीं. अर्जुनानें आपल्या रथाच्या दोऱ्या भगवंताच्या हातीं दिल्या; त्याचप्रमाणें आपण आपल्या जीवनाच्या दोऱ्या भगवंताच्या हातीं देऊं या. भारतीय युद्धात भगवंतानें जिथें रथ नेऊन उभा करावा तिथें अर्जुनानें बाण मारावे. अर्जुनाच्या जागीं एखादें बाण मारणारें यंत्र जरी असतें तरी काम तेंच झालें असतें. तसें आपण भगवंताचें यंत्र बनूं या. यंत्राला चालविणारी शक्ति आणि यंत्राकडून काम करवून घेणारी शक्ति म्हणजे भगवंत आहे. आपण आपल्या मालकावर पूर्ण विश्वास टाकून त्याच्या नामांत राहूं या.

३०१. ज्याचा ज्याचा केला मी स्वार्थ । तें तें दुःखाला झालें कारण ।।
आता रामा, नको पाहू अंत । तुजवीण शून्य वाटे जगत ।।

# परमेश्वर आपल्या हृदयांत आहे अशी दृढ भावना पाहिजे

२८ ऑक्टोबर

जसा सरकारी नोकर वरिष्ठाच्या हुकमाप्रमाणें चालत असल्यामुळें त्याच्यावर वैयक्तिक कसलीहि जबाबदारी येत नाहीं आणि कर्तेपणाहि त्यास शिवत नाहीं, त्याप्रमाणें गुरूवर श्रद्धा ठेवून त्याच्या आज्ञेत राहावें. लाभ-हानि देव जाणे, जबाबदारी गुरूवर; आणि तोच हें साधन करवीत असल्यानें कर्तेपणाहि त्याच्यावरच असणार; त्याच्याहि पुढें म्हणजे, जें जें कांहीं हातून घडतें तें तें सर्व त्याच्याच इच्छेनें आणि सत्तेनें घडतें अशी दृढ भावना असली, म्हणजे कर्तेपण सोडून अजिबात मोकळे होतां येतें, असें झालें म्हणजे जें जें आपल्या हातून घडतें ती त्याचीच सेवा होते. मुख्य गोष्ट ही कीं, परमात्मा आपल्या हृदयांत आहे, आपण त्याच्यांत आहोंत, आपण तोच आहो, अशी दृढ भावना पाहिजे. याच्या मधली पायरी म्हणजे परमात्म्याच्या नजरेखाली, तो पाहात असतांना, आपण सर्व कर्में करीत आहोंत अशी जाणीव असणें आवश्यक आहे. यामुळें अभिमान सर्वस्वी जरी न गळला, तरी आपल्या हातून वाईट कृत्यें तरी घडावयाचीं नाहींत. क्षेत्राला क्षेत्रत्व आपण आपल्या भावनेनें जर दिलें नाहीं, तर तिथें पाणी आणि दगडच आहेत ! 'काशी', 'गंगा', असें म्हटलें म्हणजे पवित्रतेचे संस्कार मनांत उभे राहतात, पण तिथल्या राहणाऱ्या पुष्कळ लोकांचा तसा भाव नसल्यामुळें ते वर्षावर्षांत स्नानासहि जात नाहींत. यावरून, त्यांना तें क्षेत्र असें वाटतच नाहीं असें दिसतें. क्षेत्र हें आपल्या भावनेनेंच नाहीं का निर्माण होत ? मग तें घरच्या घरींच नाहीं का निर्माण करितां येणार ! याला अर्थातच दृढभाव असावयास पाहिजे; तितका तो दृढ होत नसल्यास क्षेत्रास जावें, आणि आर्थिकदृष्ट्या तेंहि शक्य नसल्यास "काशीस जावें नित्य वदावें," म्हणजे काशीचें स्मरण तरी करावें, म्हणजे त्यानें पवित्रतेचे संस्कार उद्भूत होऊन मन पवित्र होईल. देव सर्वत्र भरलेला आहे, पण तो "भावानें" प्रकट केला पाहिजे. प्रल्हाद, द्रौपदी, यांना अगदीं खात्री होती कीं देव आपला साह्यकारी आहे, तेव्हां देवाला प्रकट होणेंच भाग पडलें. सद्‌गुरु मला साहाय्य करतील अशी तुमची खात्री पाहिजे, म्हणजे त्याला साहाय्य करावेंच लागतें. याचा अनुभव घेणें हें तुमच्याच हातीं नाहीं का ? स्वार्थानें कर्में करणें याचें नांव प्रपंच, आणि निःस्वार्थपणानें करणें याचें नांव परमार्थ. जो आसक्तीमध्यें नाहीं तो निःस्वार्थी समजावा. आसक्ति निघण्याची पहिली पायरी असेल तर ती उदासीनता होय. देव आहे असें निःशंकपणें वाटणें हें ज्ञान होय. हें ज्ञान भगवंताच्या अनुसंधानांत राहिल्यानें सहज प्राप्त होतें.

---

३०२. आतां रामा, सुखःदुख दोन्ही । केलें अर्पण तुझे चरणीं ॥
आतां मनास येई तैसें ठेवी । याविण दुजें न मागणें कांहीं ॥

# भगवंताचें होण्यास आपण निर्दोष असणें जरूर आहे

**२९ ऑक्टोबर**

भगवंताचें समाधान आम्हाला न मिळण्याचें कारण, आम्ही ज्याचें आहोत असें वाटतें तें आम्हाला सोडता येत नाहीं; प्रपंच आम्हाला हवासा वाटतो. जगाच्या तोंडाकडे पाहून समाधान मिळेल असें आपल्याला वाटतें. ही प्रपंचाची आणि जगाची आस सोडून भगवंताचे दास झाल्याशिवाय आम्हाला समाधान मिळणें कठीण आहे. हें दास्यत्व येण्यासाठीं भगवंताच्या प्राप्तीची उत्कंठा आम्हाला लागणें जरूर आहे. ही उत्कंठा यावी तरी कशी ? एक बाई सोंवळ्यानें स्वयंपाक करीत होती आणि तिचे मूल पलंगावर रडत होतें; त्याच्या अंगात कपडे असल्याकारणानें तिला मुलाचें प्रेम असूनहि त्याला घेता येईना. शेवटीं शेजाऱ्यानें त्याच्या अंगातले कपडे काढून दिल्यावर तिनें त्या मुलाला जवळ घेतलें. त्याप्रमाणें भगवंताचें होण्यासाठीं, आम्हीं अगदीं निर्दोष असणें अवश्य आहे. हें निर्दोषपण येण्यासाठीं, आपण खरोखरच जसें नाहीं तसें जगाला दिसूं नये. मनानें नेहमीं शुद्ध असावें. आपण खरोखर चांगले नाहीं असें आपल्याला कळत असतानासुद्धा लोक आपल्याला चांगलें म्हणतात याची आम्हाला खंत वाटणें जरूर आहे. **जगांत आपलें वागणें असें असावें कीं आपल्याविषयीं दुसऱ्या कुणाला शंकाहि येता कामा नये.** त्यासाठीं ढोंग मुळींच करूं नका. आचारविचारानें इतकें पवित्र झाल्यानंतर मग आम्हाला भगवंताचें कां बरें होता येणार नाहीं ? आम्हीं भगवंताचे झाल्यावर आम्हाला काळजीचें कांहीं कारण आहे का ? आपण सर्वजण 'आम्हीं भगवंताचे आहोंत' असें म्हणतों ' आणि काळजी करतों, हें किती विपरीत आहे ! एक मनुष्य डोक्यावर ओझें घेऊन चालला होता, त्याच्याबरोबर एक गाय होती. ओझें जड झालें पण तें त्याला गाईवर लादावें असें वाटेना. समोरून एकजण गाढव घेऊन चालला होता, त्याला त्यानें "मी तुला गाय देतों, तूं तें गाढव मला दे," असें सांगितलें. जर आम्ही खरोखरीच भगवंताचे आहोंत असें वाटत असेल, तर प्रपंचाची काळजी करणें म्हणजे गाय देऊन गाढव घेण्याइतकेंच मूर्खपणाचें आहे. ही प्रपंचाची काळजी नाहींशी होण्यासाठीं प्रपंचातलें सर्व वैभव, धनदौलत, ही आपली कर्तबगारी नसून, तें रामाच्या इच्छेनें आलें आहे असें आम्हीं म्हटलें पाहिजे. माझा प्रपंच तुझ्या इच्छेनें चालला आहे, तूं ठेवशील त्यात मी समाधानात राहीन, अशी आमची वृत्ति बनायला पाहिजे. यासाठीं मोठें वैराग्य पाहिजे असें नाहीं. खरोखर तें वैराग्य, त्याग, वगैरेंच्या भानगडींत तुम्हीं पडूं नका. भगवंत ठेवील त्या परिस्थितींत समाधानात राहणें यासारखें दुसरें वैराग्य कोणतेंहि नाहीं. हें साधण्यासाठीं सर्वांनीं निष्ठेनें भगवंताचें नाम घ्या, यातच तुमच्या जीवनाचें कल्याण आहे.

---

३०३. माझें सर्व तुझे पायीं । माझें मीपण हिरोन जाई ॥
रामा, आतां एकचि करीं । वृत्ति सदा राहो तुजवरी ॥

# ठेवतां रामावरच एक विश्वास । त्यालाच समाधान हमखास

**३० ऑक्टोबर**

रामाचा हात माझ्यामागें । हें ठेवावें मनात । व्यवहार सांभाळून वागावें जगात ।। दुष्ट मतीची उत्पत्ति । ही दुर्जनाची संगति ॥ मावें धरितां रघुपति । सर्व संकटें दूर जाती ॥ जें जें कांहीं येतें तें तें रामापासून। हा ठेवावा भाव, दुश्चित न व्हावें मन ।। भोगांत नामाचें न व्हावें विस्मरण । याकरितां राखावें समाधान ।। देहाचे भोग देहाचे माथीं । त्याची न मानावी खंती ॥ देह द्यावा रामसेवेप्रति । त्याची न मानावी आसक्ति ।। पैका न मानावा सखा । एक जाणावा राम दाता ॥ न असूं द्यावी कशाची ममता । भगवंत हीच एक सुखाची वार्ता ।। विश्वास ठेवावा रामापायीं । सर्व कांहीं चांगलें होऊन जाई ॥ आपला भार घेतला रामानें । विश्वासानें सत्य मानणें खरें ।। सद्गुरुआज्ञा प्रमाण । हेंच साधनांतील साधन जाण ।। जो जो प्रसंग येईल जैसा । तो तो सान्निध्य जाणावें रघुपतीचा ।। जगाला ओळखावें, त्याच्यासारखें वागावें । पण आपण मनानें तेथें नसावें ।। मी नाहीं प्रपंचाचा । माझें नाहीं कोणी सत्य त्रिवाचा ।। माझें माझें म्हणत गेलें । माझें मीपणाला विसरलें । असत्य तें सत्य मानलें जरी । असत्याची आली प्रचीती खरी ॥ शरीर आहे दो दिवसांचें । वाया न जाऊं द्यावें साचें ।। रामकृपा त्याजसी होई । ज्यानें नाव ठेवलें हृदयीं ।। मुखीं नाम हृदयीं राम । त्यानें जोडला आत्माराम ॥ गुरुचरणीं ठेवावा विश्वास । निर्भयता त्यानें येत खास ।। जें जें होणार तें होतच जातें । विनाकारण मन कष्टी होतें ।। माझें प्रपंचीं नाहीं सुखदुःख । असें ज्यानें जाणलें चित्तीं । त्याचा संसार सुखाचा झाला निश्चितीं ।। ज्यानें दिली रामाची संगती । त्याचा विषाद न मानावा चित्तीं ।। उद्विग्नतेचें कारण । साधनाचें विस्मरण ।। मुख्य करितां रामाची भक्ति । आपोआप गळते विषयाची आसक्ति ।। भगवंतावर ठेवावा पूर्ण विश्वास । तो करतो तेंच हिताचें मानावें खास ।। अंतकाळीं भगवंताचें नाम । त्याला करीन माझेसमान । हें भगवंताचें वचन जाण । त्याच्यावर ठेवावा विश्वास पूर्ण ।। म्हणून रामावाचून जगतीं । आतां माझा असें न म्हणावें चित्तीं दुःख जाण्यास उपाय सांगती साधुजन । आसक्तींत न गुंतावें आपण ।। म्हणून सर्व कांहीं करावें । पण मीपणानें कोठें न राहावें ।। याला उपाय एकच जाण । सदा राखावें रामाचें अनुसंधान । कशांतहि नसावें आपलेपण ।। राम कर्ता हें जाणून सर्व । मनानें व्हावें रामार्पण ।। सर्व सत्कर्म-साधनाचा कळस जाण । रामाला देह करावा अर्पण । एकांत सेवावा आपण ।। व्यवहाराप्रमाणें करावें वर्तन । त्यांत नसावें मात्र आपण ॥ परिस्थिति निर्माण झाली । कालांतराने विलय पावली ।। म्हणून न मानावें कशाचें सुखदुःख । सर्वांत रामाची जाणीव एक ।। वाचेनें मौन, हृदयांत रामाचें प्रेम । अखंड रामाचें अनुसंधान । याहून दुजें नाहीं साधन । हें मानावें प्रमाण ।। ठेवतां रामावर एक विश्वास । त्यालाच समाधान हमखास । म्हणून रामाचा चित्तीं ठेवावा विश्वास । वळण द्यावें व्यवहारास ॥ साधन असें कांहीं असावें । ज्यानें साध्याला सहज पोहोचावें ॥ राम म्हणावा आपला । साधनांतील साधनाचा लाभ झाला ॥ शुद्ध असावें आचरण । पवित्र करावें मन ।। नामस्मरण ज्याच्या मुखीं । रामकृपें तोच एक सुखी ।। एकच देव, एकच गुरु, एकच साधन । यांवर ठेवतां विश्वास । कृपा करील ईश्वर खास ।।

---

२०४. रामा, मी कोठें जावें । तुजवाचून कोठें राहावें ॥
रामा, सर्व सत्ता तुझ्या हातीं । समाधान राहील अशी करावी वृत्ती ।।

# कोणत्याही जातींतील, धर्मांतील, देशांतील मनुष्य भगवंताच्या प्राप्तीसाठींच जन्माला आला आहे

**३१ ऑक्टोबर**

भगवंत एकच ओळखतो : जो त्याची भक्ति करतो तो त्याला आवडतो. तिथें जातीचें, वर्णाचें, बंधन नाहीं. आपण भाग्यवान् कुणाला म्हणतो ! ज्याच्याजवळ पैसा अधिक असतो त्याला. पण तो कांहीं खरा भाग्यवान् नव्हे. ज्याला भगवंत भेटला तो खरा भाग्यवान्. भगवंताची पूजा कधींहि वायां जात नाहीं. प्रत्येकानें, भगवंत आपल्याला भेटणें हें जीवनातलें मुख्य कार्य समजावें. पैसा भगवंताच्या आड येत नसतो. आपला अहंकार, मीपणा, हाच मुख्यतः भगवंताच्या आड येतो. वैद्य सात्त्विक असेल तर त्याच्या औषधाला विशेष गुण येतो असें आपण पाहतों. थोरपणा कशानें वाढतो हें पाहावें. मी सेवा करतों असें जो म्हणतो त्याची खरी सेवाच होत नाहीं. कर्तेपणा तुम्हांकडे घेतां तोंपर्यंत सेवा नाहीं घडली. भगवंताची आठवण ठेवून जें जें कर्म आपण करतों तें तें पुण्यकर्म होतें. भगवंत माझ्याजवळच आहे अशी श्रद्धा ठेवून वागा. श्रद्धेनें जो करील त्यास फळ येईल खास; पण म्हणून श्रद्धेवांचून केलेलें भजनपूजन वायां जातें असें नाहीं समजूं. भगवंताची भक्ति उत्पन्न व्हावी म्हणूनच भजनपूजन करावें; मनाचें रंजन म्हणून करूं नये. सत्कर्म करणारे पुष्कळ असतात, पण पुष्कळ वेळां त्यांत स्वार्थबुद्धि असते. फळाची आशा न ठेवतां सत्कर्म करणें हीच खरी भक्ति. सर्वांभूतीं भगवद्भाव ठेवावा, हेंच परमार्थाचें खरें सार आहे. माझ्यामध्यें भगवंत आहे हें ओळखलें म्हणजे इतरांच्या ठिकाणीं त्याला पाहतां येईल. "मी कोण" हें न ओळखल्यामुळेंच आपलें सर्व चुकतें आहे. माझ्यात भगवंत आहे हें दोन प्रकारें पाहतां येतें. सर्व चेतना त्याच्याकडून मिळते हें एक. दुसरें म्हणजे, 'देह ठेवला' असें जेव्हां आपण म्हणतों, तेव्हां ठेवणारा कोणी दुसरा असला पाहिजे; म्हणजे देह हा 'मी' नव्हे. जागृति, स्वप्न, सुषुप्ति यांचा साक्षी कुणीतरी आहे हें खास. "मी कोण" हें जाणायला साक्षीरूपानें वागावें. सर्व जगाला मी माझें म्हणतों, पण जो खरा माझा त्याला तसें म्हणत नाहीं. भगवंत माझ्यात आहे ही जाणीव उत्पन्न करून घ्यावी. अनुमानानें आणि अनुभवानें पाहिलें तर भगवंत माझ्यात आहे हें खात्रीनें पटेल. वर्षाचा आनंद पाडव्यापासून, आयुष्याचा आनंद वाढदिवसापासून आणि दिवसाचा आनंद सकाळपासून सुरू होतो. म्हणून भगवंताच्या भक्तीला आपण त्याच्या नामानें सुरुवात करावी; म्हणजे त्यामुळें होणारा आनंद लगेच आपल्याला मिळेल. सुरुवात गोड आणि शेवटहि गोडच होईल. कोणत्याहि जातींतला, देशांतला किंवा धर्मांतला मनुष्य असो, तो भगवंताच्या प्राप्तीसाठीं म्हणजे परमार्थासाठींच जन्माला आला आहे. आकाश हें जसें सर्वांना सारखें आहे, त्याचप्रमाणें मानवजन्माचें ध्येय हें सर्वांना सारखेंच आणि एकच आहे. परमार्थामध्यें वर्ग एकच आहे. त्यामध्यें नंबर मात्र लावलेले आहेत. भगवंतावर अकारण प्रेम करणें हाच परमार्थ.

३०५. आतां रामा, तुझा झालों । कर्तेपणातून मुक्त झालों ॥
ऐसी रामास मारा हांक । तो दूर नाहीं नाहीं नाहीं खास ॥

# मी 'मागें आहें, तूं पुढें चल,' असेंच भगवंतांनीं आपणां सर्वांना गीतेच्या रूपांत सांगितलें आहे

१ नोव्हेंबर

गीता ही सर्व ग्रंथांची आई आहे. गीता ही वेदापेक्षा श्रेष्ठ आहे. वेद हे देवाच्या निःश्वासांतून निघाले, तर गीता ही त्याच्या म्हणजे प्रत्यक्ष भगवंताच्या मुखांतून निघाली. गीतेचा विषय कोणता ? गीतेचा विषय म्हणजे मोहाचा नाश करण्याचें तत्त्वदृष्ट्या आणि साधनदृष्ट्या विवेचन, हा होय. गीतेची सुरवात म्हणजे अर्जुनाला मोह झाला. याचा अर्थ असा कीं, त्याला कर्तेपणाच्या अभिमानानें असमाधान उत्पन्न झालें, आणि त्यामुळें काय करावें आणि काय न करावें याची शंका त्याला उत्पन्न झाली. गीतेचा शेवट म्हणजे अर्जुनाचा मोह नाश पावला. याचा अर्थ असा कीं, कर्ता परमात्मा आहे हें निश्चित झाल्यामुळें जीवाच्या कर्मांचें सुखदुःख संपलें. खरोखर गीतेचें रहस्य सांगावें ज्ञानेश्वरमहाराजांनींच. भारतीय युद्धामध्यें परमात्मा पीतांबर नेसून, अर्जुनाच्या रथावर बसून रणांगणावर अर्जुनाला गीता सांगते झाले. पुढें हजार वर्षांनीं भगवंत कपडे बदलून आले आणि त्यांनीं ज्ञानेश्वरी सांगितली. ज्ञानेश्वरी ही भगवंताचीच वाणी होय. त्यांनीं सांगितल्याप्रमाणें आपण आचरण करावें. "मी मागें आहें. तूं पुढें चल," हेंच भगवंतानीं आपणां सर्वांना सांगितलें आहे. एखादी उपवर झालेली मुलगी जर आपल्या मैत्रिणीच्या लग्नाला गेली, तर तो समारंभ पाहून तिच्या मनामध्यें स्वतःच्या लग्नाचे आणि त्यांतल्या सोहळ्याचे विचार येतील; त्याचप्रमाणें, आपण पोथी ऐकत असतांना त्यामध्यें वर्णन केलेल्या अवस्था आपल्याला कशा येतील याचा विचार करावा. **आत्मनिवेदन म्हणजे मी कोण आहें हें कळणें होय.** प्रारब्धाच्या गतीनें देहाला जीं सुखदुःखें भोगावीं लागतात, त्यांमध्यें आपण असल्यासारखें दिसावें पण खरें मात्र नसावें. वकील जसा अशिलाचा खटला स्वतःचाच आहे असें समजून कोर्टामध्यें भांडतो, पण खटल्याचा निकाल कसाहि लागला तरी त्याचें सुखदुःख मानीत नाहीं, वरून मात्र अशिलाजवळ दुःख दाखवितो, अगदीं असाच व्यवहार मी करतों. व्यवहार सत्य मानणाऱ्या लोकांत वावरायचें असेल तर बाहेरून त्यांच्यासारखें वागणें जरूर आहे. असें वागत असतांना आपलें भगवंताचें अनुसंधान न चुकूं दिलें कीं व्यवहार हा खेळ बनतो. कधीं हार तर कधीं जीत ! आपण खेळांत हरलों काय आणि जिंकलों काय, खऱ्या जीवनाच्या दृष्टीनें सारखेंच. तरी खेळ खेळतांना मात्र तो जिंकण्याचा चांगला प्रयत्न करावा. भगवंताचें नाम घेतलें कीं ही युक्ति आपोआप साधते. म्हणून रात्रंदिवस माझ्या माणसांना मी सांगतों कीं, वाटेल तें झालें तरी भगवंताचें नाम सोडूं नका. नामानें चित्त आराम पावतें. एक अनुसंधान ठेवा, इतर सर्व गुण आपोआप मागें येतील.

---

३०६. आतां तुझ्यासाठीं माझें जीवन । तुला तनमन केलें अर्पण ।।
ऐसें व्हावें अनन्य दीन । तात्काळ भेटे रघुनंदन ।।

# आसक्ति वस्तूंमध्यें असूं नये, भगवंताच्या ठिकाणीं असावी

२ नोव्हेंबर

कोणत्याहि धर्माची आपण कधींहि निंदा करूं नये. प्रत्येक धर्मात निरनिराळे विधि लावलेले असतात. धर्माला विधींची फार जरूरी असते. विषयसुद्धा आम्ही विधीनें भोगतों. आम्ही गंगेवर स्नानाला जातों असें म्हणतों. खरोखर, मनानें आपण गंगेवर गेलों तरी चालूं शकतें. पण गंगेस स्नानाला जाऊन अपवित्र मनानें परत आलों तर त्या स्नानाचा काय उपयोग? पंढरपुरास जाणाऱ्या इसमाला शंभर रुपये दिले, आणि ब्राह्मणभोजन घाला म्हणून सांगितलें, पण तें न करता एका बाईच्या नादीं लागून त्यानें तिच्या हातचा मार खाल्ला; त्याप्रमाणें, नाम घेऊन विषयाचा धंदा केला तर काय उपयोग? कर्माचीं बंधनें तुटावीं म्हणून शास्त्राचीं बंधनें पाळावीं लागतात. **देवाला पैका देण्याचा हेतु हाच कीं, माझा लोभ कमी व्हावा.** खरें म्हणजे आपल्याला कर्म केल्याशिवाय करमतच नाहीं. पण आपण फळाची आशा उगीचच करीत बसतों इथेंच आपलें चुकतें. कांहींहि न करता राहणें मनुष्याला शक्य नसल्यामुळें कोणतीहि चांगली गोष्ट मुद्दाम करावी लागते. उदाहरणार्थ, एखाद्याला सांगितलें कीं, हातपाय न हलवितां, कांहीं न करता स्वस्थ राहा, तर ती त्याला शिक्षाच होईल. जर कांहीं तरी करणें जरूरच आहे तर उचितच गोष्ट करावी. जी गोष्ट बंधनाला कारण होते ती विपरीतच असते. कर्तेपणाच्या अभिमानानें केलेलें कर्म हें असें विपरीत कर्म होय. ज्ञानावस्थेमध्यें झालेलें कर्म पूर्णच असतें, त्या अगोदरचें कर्म पूर्ण होत नाहीं. धर्म तरी काय सांगतो? तर प्रत्येकानें आपलें कर्तव्य करावें. प्रथम तें आपण आचरणात आणलें पाहिजे. पण चांगलें वागायचें तरी कशासाठीं? तर ते भगवंतासाठीं होय. **भगवंताच्या ठिकाणीं श्रद्धा ठेवून कर्तव्य करावें, तरच मानव सुखी होईल.**

सुधारणांनीं सोयी केल्या, म्हणजे देहसुख वाढविलें, त्यानें परावलंबित्व मात्र आलें; आणि परावलंबनात खरें सुख नाहीं. लौकिक विद्या ही खरी विद्या नव्हे, अविद्याच ती. विद्येनें एक समाधान तरी मिळालें पाहिजे, किंवा दुसरें, हमखास पैसा तरी मिळाला पाहिजे. या दोन्ही गोष्टी तिनें साधत नाहींत. विद्वानाला सुद्धां "मला नोकरी द्या" म्हणून अर्ज करावा लागतो; म्हणजे ती विद्या स्वयंप्रकाशी नाहीं. जीवनाला हवा, पाणी, अन्न या वस्तु आवश्यकच आहेत. त्या कशाहि मिळवाव्यात. पण बाकीच्या वस्तु कांहीं आवडीखातर, तर कांहीं लौकिकांत जरूर, म्हणून पाहिजेत. पैसा असेल तर दैन्यवाणें राहूं नये. पण त्यामध्यें आसक्ति असूं नये. आसक्ति भगवंताच्या ठिकाणीं असावी आणि इतर प्रापंचिक वस्तूंबद्दल उदास असावें. "मला कुणी शत्रु नाहीं व मित्र नाहीं," अशी ज्याची खरी वृत्ति तो सुखी. जो कशावरहि अवलंबून नाहीं, ज्याच्या आड कांहीं येत नाहीं तो मुक्त समजावा. देहाला कुठेंहि लागलें तरी आपल्याला जाणीव होते, त्याप्रमाणें मनाच्या सर्व वृत्तींमध्यें भगवंताचें स्मरण असणें हेंच अनुसंधान होय, हीच विद्या होय, हाच खरा धर्म होय आणि हेंच परमार्थाचें सार होय.

३०७. ज्याच्या प्रपंचामध्यें पाठीराखा परमात्मा आहे तोच त्याचा परमार्थ होतो.

# विषय मनांत आले कीं भगवंताची आठवण ठेवून द्यावी

**३ नोव्हेंबर**

[ एक बाई जलोदरानें आजारी होती. श्रीमहाराज तिला म्हणाले, " बाई, दुखणें बरें करूं का ? " बाई म्हणाली, " महाराज, मला जगण्याची इच्छा नाहीं, तसें मरावेंसें पण वाटत नाहीं, पण देहाच्या यातना मात्र सहन होत नाहींत. " बाईच्या अंगाला सगळीकडे सूज आलेली असून कोठें हात लावला तरी फार वेदना होत असत. श्रीमहाराज म्हणाले, " बाई ! देहाच्या यातनांची व्यवस्था मी करतों, तुम्ही फक्त अनुसंधानात राहा. " बाई नंतर तीन दिवस जिवंत होती; पण तिला देहाचा विसर पडलेला होता. तिचा जप शेवटपर्यंत चालूं होता. तिनें देह ठेवल्यावर श्रीमहाराज म्हणाले :– ] अनुसंधानानें जें काय साधायचें तें हेंच. " भगवंता, माझा भोग बरा कर, " असें आपण जर त्याला म्हटलें नाहीं, तर त्याच्या स्मरणाची जाणीव आपल्याला होईल. भगवंताच्या स्मरणांत आनंद आहे, आनंदाची जाणीव झाली कीं दुःखाची जाणीव कमी होईल. जें भगवंताच्या आड येतें त्याची पर्वा करूं नये. भिक्षा मागण्याचा प्रसंग जरी आला तरी भगवंताचें अनुसंधान सोडूं नये. घरादाराला रात्रींच्या वेळीं आपण पहारा ठेवतों, चोर येतील त्या वेळेस सावध राहतों, **तसेंच संधीच्या वेळेस भगवंतापासून दूर होऊं नये म्हणजे झालें.** विषय मनांत आले कीं भगवंताची आठवण ठेवून द्यावी. " अंते मतिः सा गतिः " अशी आपल्यांत म्हण आहे. जन्मांत जें केलें नाहीं तें मृत्यूच्या वेळेला कसें आठवतां येईल ? एवढ्याकरतां भगवंताच्या अखंड स्मरणांत राहावें. **वेळेला सावध राहणें ज्याला साधत नसेल त्यानें अखंड सावध राहावें.** एकच ठिणगी सबंध कापसाचा नाश करण्याला समर्थ असते, त्याप्रमाणें भगवंताचें नाम सर्व पापांचा नाश करण्याला समर्थ असतें. आपण तें आवडीनें, तळमळीनें, भावानें घेत नाहीं. त्यांत नामाचा काय दोष ? कोणत्याहि स्थितींत वृत्ति कायम राहणें हेंच योगाचें सार आहे. नामस्मरण जर शेवटपर्यंत चालूं राहिलें तर तो " योगच " आहे; आणि या ' एका ' शीं योग साधणारा तो योगी समजावा. नामाची भावना वाढविणें हीच उपासना. नाम हें प्रारब्धानें येत नाहीं आणि कर्मानें जात नाहीं. एखाद्या आईला सांगितलें कीं तूं मुलाला जवळ ठेव, पण त्याच्यावर प्रेम करूं नकोस, " तर तें जसें शक्य नाहीं, त्याप्रमाणें नाम घेणाऱ्याला सत्कर्म टाळूं म्हटलें तरी टाळतां येणार नाही. एकवेळ भजनाला देहबुद्धीची झळ लागेल, पण नामाला ती नाहीं हें लक्षांत ठेवावें. मरणाच्या मागें स्मरणाचा ससेमिरा लावून ठेवावा म्हणजे मरणाची भीति नाहींशी होईल. खरोखर, भगवंताच्या नामाची तळमळ मनापासून लागायला हवी. तेरा कोटी जपामध्यें अंतःकरणाची तळमळ ही जास्त उपयोगी पडते यांत शंकाच नाहीं. इतर साधनांनीं जें साधायचें तें नुसत्या अनुसंधानानें साधतें हाच या युगाचा महिमा आहे.

---

३०८. आल्यागेल्यास द्यावें अन्नदान । मुखानें भगवंताचें नाम ।।
हृदयांत रामाची प्रीति । यासच थोर म्हणती जीवन्मुक्ति ।।

# भगवंत सगुणांत आले म्हणजे काय?

**४ नोव्हेंबर**

आमची वृत्ति विषयाकार झालेली आहे, ती काढून संत सन्मार्गाला लावतात. तोच खरा मुहूर्त कीं ज्या दिवशीं आमची वृत्ति भगवंताकडे होऊं लागली. संत दसरा आणतात, मग दिवाळी आपोआप मागें येते. "साधुसंत येती घरा तोचि दिवाळी दसरा" असें आपण म्हणतों. एक गृहस्थ मला भेटले. ते म्हणाले, "हिंदु धर्मासारखा धर्म नाहीं। परंतु देव सगुणात आले हें नाहीं मला कबूल, म्हणे निरनिराळ्या उपासना सांगितल्या. देव जर निर्गुण, निराकार तर राम, कृष्ण, शिव, दत्त अशा या एवढ्या निरनिराळ्या उपासना कशाला ?" पुढें एक दिवस त्याच्याविषयीं एका गृहस्थानें त्यांची घरीं चौकशी केली, तेव्हां प्रत्येकजण निरनिराळें नाव घेऊन सांगूं लागले. कोणीं 'दादा' घरीं नाहींत असें म्हणालें, तर कोणी 'दामोदर' नाहीं घरीं म्हणालें, कोणी 'रावसाहेब' नाहींत म्हणाले. हें सर्व जरी म्हटलें तरी त्यायोगें भेटणारा मनुष्य ज्याप्रमाणें तो गृहस्थ एकच, त्याप्रमाणें हें भगवंताच्या निर्गुणाचें सगुणांत झालें. एकदां पार्वतीनें महादेवाला विचारलें, "तुम्ही कुणाचा जप करतां?" महादेवांनीं म्हटलें, "रामाचा." "तो राम तरी कोणता?" असें पार्वती म्हणाली. त्यावर महादेव म्हणाले, "जो कौसल्येच्या पोटीं आला, जो अयोध्येंत राहिला, ज्यानें राक्षसदैत्यांचा संहार केला, तो राम." पार्वतीमाईला वाटलें, काय हें वेडेपण ! जो बायकोकरतां वेडा झाला त्याचा यांनीं जप करावा का? तेव्हां पार्वतीमाईनीं म्हटलें कीं, "मी त्याची परीक्षा पाहातें." सीतामाईचें सोंग घेऊन त्या रामापुढें गेल्या. रामानें तें ओळखलें आणि म्हटलें, "मी नाहीं शंकराच्या नामाशिवाय राहिलो, त्यांचेच आपण पाय धरावेत." मोठ्यांचा विकल्पहि सहजासहजीं जात नाहीं.

विवेकावाचून वैराग्य हें कांहीं खरें नाहीं. एकच पाय लठ्ठ झाला तर शक्ति आली असें नाहीं म्हणतां येणार ! तो रोगच होय. ज्याच्यापासून गुण उत्पन्न झाले तो त्याहून वेगळा, अलिप्त राहिला म्हटलें, तर कुठें चुकलें ? प्रेम एकच खरें, पण ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें करावें लागतें कीं नाहीं ? जांवयाचा घोडा झाला म्हणून त्याला कांहीं बासुंदी नाहीं खायला घालायची. गवतच घालायचें. सगुणाशिवाय निर्गुण उपासना करतो म्हणतो, त्याला त्याचें वर्मच नाहीं कळलें. खरी तो सगुण उपासनाच करीत असतो। पण त्याला नाहीं तें कळत. आपले वेद, उपनिषदें, ब्रह्मसूत्रें आणि त्यावरचीं भाष्यें यांनीं भगवंताची रूपरेषा (म्हणजे त्याचें निर्गुण स्वरूप) काढून दिली, परंतु संतांनीं तिच्यामध्यें रंग भरला आणि भगवंताचें सुंदर चित्र तयार केलें। हीच सगुणभक्ति होय. भगवंत सगुणामध्यें आला कीं जे नियम आपल्याला लागूं असतात तेच नियम त्यालाहि लागूं होतात. भगवंत हवासा वाटणें यामध्यें सर्व मर्म आहे. भगवंत हवासा वाटणें किंवा त्याची तळमळ उत्पन्न करणें हें भगवंताच्या हातीं नाहीं, तें संतांच्या हातीं आहे, म्हणून सत्संगतीनें तें साधतें. भगवंताकडे एकदा दृष्टि लागली कीं, बाकीच्यांचा त्याग आपोआप होतो.

---

३०९. वृत्ति राखावी अत्यंत शांत । हेंच संतांचें मुख्य लक्षण जाण ॥
जेथें भगवंताचें नामस्मरण । तेथें सर्व संतांचें ठाण ॥

# भगवंत हाच एकमेव आधार वाटला पाहिजे

**५ नोव्हेंबर**

[ अयोध्येचे एक महंत भेटण्यास आले होते तेव्हांचें निरूपण :– ] रामाचा सहवास ज्यांना घडला त्यांच्या भाग्याला काय कमी आहे ? आम्हीं आतां त्यांच्यापासून दूर अंतरावर राहिलों तरी त्यांना इथें मनानें विसरलों नाहीं. भगवंतानें आम्हाला नाम सांगितलें; जें कांहीं वाचलें त्याची प्रचीति आली. आज आपल्यासारखे रामभक्त इथें आले आहेत, म्हणजे अयोध्याच इथें आल्यासारखें झालें. समर्थांनीं ' मुख्य हरिकथानिरूपण ' असें सांगितलें; म्हणजे बाकींच्या गोष्टी आपोआप मागे येतील. ज्यांना एक भगवंतच सत्य आहे हें कळलें तेच कारभारी होतील. आपलें कुठें चुकत असेल तर तें हेंच कीं आम्ही प्रपंच सत्य मानतों. फणस कापण्याला ज्याप्रमाणें हाताला तेल लावावें लागतें त्याप्रमाणें राजकारण घ्या, प्रपंच घ्या, हरिप्रेमाचें तेल आधीं हाताला लावावें. आम्ही कर्तेपण मिरवूं पाहतों इथेंच सर्व बिघडतें. हरीचें अधिष्ठान ठेवण्याआधीं आम्ही आपल्या कर्तेपणाचेंच अधिष्ठान ठेवतों. लग्नाच्या आधीं देवाला नमस्कार करतों, पण पुढें प्रपंचांत देवाला विसरतों हें चुकतें. विषयाच्या ताब्यांत जाणें घातुक आहे. नुसते विषय घातुक नाहींत; त्यांच्यांत आम्हीं आपल्या आवडीनें जीव घालतों हें घातक आहे. इमारत मोठी करावी, कळस सुंदर सोन्याचा करावा म्हटलें, पण पायाच जर चांगला नाहीं घातला तर देऊळ कसें टिकावें ? अमुक एका कार्याला कुणाची गरज नको म्हटलें तर आपण जें म्हणूं तें व्हायला पाहिजे. मदत कोणाची तरी घ्यायचीच, तर मग आपल्यासारख्या बुडत्याचीच घेऊन काय उपयोग ? भगवंताचीच घेतली पाहिजे. आम्हीं जर भगवंताजवळ विषय मागितले तर त्याचें फळहि घ्यावें लागेल. दुर्योधन आणि अर्जुन भगवंताच्या मदतीकरितां आले. एवढें सैन्य सोडलें आणि अर्जुनानें भगवंताला मागितलें. दुर्योधनानें जें मागितलें तेंच नाहीं का आम्ही आज प्रपंचात मागत ? आमचें कार्याकडे लक्षच नसतें. सर्व लौकिकाकडेच असतें. दुसऱ्या कशाचाहि मी नाहीं असें म्हटलें म्हणजे भगवंताला अनन्य शरण होतां येतें. परमात्मा हवा ही नाहीं आम्ही जाणीव करून घेत, जग हवें असें म्हणतों; आणि तिकडे सर्व जग मला नावें ठेवतें असेंहि म्हणतों ! मी म्हणतों, जगाला नावें ठेवूं द्या, पण राम काय म्हणतो इकडे पाहणें जरूर आहे. मी म्हणतों, आपण परमेश्वराचें परमेश्वरालाच दिलें तर कुठें बिघडलें ? जो दिसत नाहीं, भासत नाहीं, त्याचें हें सर्व आहे असें म्हणण्यात कुठें बिघडतें ? तें म्हणण्यात जें समाधान मिळतें तें नाहीं तुम्हाला समजत. खरोखर, परमात्मा साक्षात् कल्पवृक्ष आहे. आपण नेहमीं चिंता वाहतों, म्हणून तो आपल्याला चिंताच देतो. आपण जर त्याच्याकडे आनंद मागितला तर तो आपल्याला आनंदच देईल. भगवंताचा आनंद हा फार बलवत्तर आहे. तो एकदा मिळाल्यावर प्रपंचातील लाभ-हानीचें महत्त्व नाहीं.

---

३१०. अगरबत्ती जळून गेली । परी सुवासानें राहिली ।।
तसें रामचरणीं झाले जे लीन । तेच खरे जिवंत जाण ।।

श्रीराम

# भगवंताच्या कृपेची गरज व ती मिळविण्याचा उपाय

१ नोव्हेंबर

खरोखर, भगवंताच्या कृपेशिवाय बाकी गोष्टी असून वा नसून सारख्याच आहेत. एखादी मुलगी लग्न होऊन सासरीं गेली; तिथें सासू, सासरा, दीर, नणंद, जावा, वगैरे सर्व लोकांशीं तिचें चांगलें आहे पण नवऱ्याशीं मात्र पटत नाहीं, तर तिला खरें सुख, समाधान मिळणार नाहीं. परंतु समजा, नवऱ्याशीं चांगलें आहे पण इतरांशीं तितकेंसें ठीक नाहीं, तर तिचें अडणार नाहीं. तसेंच एखाद्याच्या आजारांत पैसा, डॉक्टर, औषधें, माणसांची मदत, वगैरे सर्व गोष्टी अनुकूल आहेत, पण त्यांत भगवंताच्या कृपेचा हात नसेल तर सर्व व्यर्थ आहे. याच्या उलट, भगवंताची कृपा आहे, पण इतर गोष्टींचा अभाव आहे, तरी काम भागतें. म्हणून सर्व बाबतींत भगवंताच्या कृपेची गरज आहे आणि ती मिळविण्याकरितां, त्याचें स्मरण हाच एक मार्ग आहे. समजा, एखादी कुरूप मुलगी आहे, पुष्कळ ठिकाणीं तिला दाखविली पण ती नापसंत झाली; नंतर एकानें तिला पाहिली आणि एकदम पसंत आहे म्हणून सांगितलें. ती पसंत झाली कीं सौभाग्याचे सर्व गुण जसे तिच्यामध्यें येतात, त्याप्रमाणें ज्याच्यावर भगवंताची कृपा झाली त्याचें काम पूर्ण झालें, मग त्यानें किती पाप आणि पुण्य केलें आहे हें कोण पाहतो! भगवंताची कृपा सर्वांवर, अर्थात् आपल्यावरहि आहेच. कृपा आपल्यावर आहे अशी आपली खात्री झाली कीं ती प्रगट होते. कृपा म्हणजे भगवंताशीं एकरूपताच. "मी पिईन तर आईचेंच दूध पिईन" असें म्हणून वासरूं गाईला ढुसण्या मारतें आणि गाय त्याला पाजते, त्याचप्रमाणें आपण भगवंताशीं अनन्यतेनें वागलें आणि त्याचें नामच मागितलें तर तो कृपा करतोच करतो. आपल्याला हव्या त्या गोष्टी देण्यामध्यें भगवंताची खरी कृपा नसून, असेल त्या परिस्थितीमध्यें आपलें समाधान टिकणें ही त्याची खरी कृपा होय. "भगवंता! तूं माझ्यावर कृपा कर," असें सांगणें म्हणजे "मी कृपेला लायक नाहीं, त्या माझ्यावर तूं कृपा कर," असें म्हणण्यासारखेंच आहे. जो लायक नाहीं त्याच्यावर कृपा कशी होईल? ज्याप्रमाणें डोंगरावर आपण शब्द काढला तर त्याला उत्तर म्हणून आपलाच शब्द प्रतिध्वनिरूपानें येतो. त्याप्रमाणें भगवंताच्या प्रार्थनेचा प्रतिध्वनि त्याच्या कृपारूपानें येतो. भगवंताच्या कृपेनेंच त्याचें नाम आपल्या मुखांत येतें. त्या नामांत राहणारा पुरुष खरोखर फार थोर असला पाहिजे. पुष्कळ केलेलें देखील शंकेनें व्यर्थ जातें. आपण नाम सोडणार नाहीं हें नक्की ठरलें कीं, आपली वृत्ति निःशंक होतेच होते. नाम हें अत्यंत सोपें असल्यामुळें सर्वव्यापक असून सर्वांना साध्य दयाजवळचें असल्यानें फार सोपें साधन आहे. तें सोपें असल्यामुळें सर्वव्यापक असून सर्वांना साध्य असें आहे. जे भगवंताचे आहेत ते सिंहासारखे आहेत; ते अहेतुक नाम घेतात. सिंह जसा गवत खाणार नाहीं तसे संत विषयासाठीं नाम घेणार नाहींत. भगवंताची कृपा आपल्यावर आहेच असें म्हणावें. ती काम करीत असतेच. आपण आपल्या शंकेनें ती झाकून टाकूं नये.

---

३११. सतत विवेक अखंड चित्तीं। रामनामीं मनोवृत्ती॥
नामरूप करी वृत्ती। हेचि तुम्हां परमप्राप्ती॥

# राम कर्ता हें जाणून निष्कामबुद्धीनें साधकानें साधन करावें

**७ नोव्हेंबर**

भगवंतापासून जो निराळा राहात नाहीं तो मुक्तच. मी भगवंताचा म्हटलें कीं तिथें बद्धपणा संपला, मी नसून तो आहे हें जाणणें म्हणजे मुक्तता प्राप्त करून घेणें. देहांत असून देहातीत राहतो तो मुक्त. राम कर्ता हें जाणतो तो मुक्त. बद्धाचें आवरण काढून टाकलें कीं, आपण मुक्तच आहोंत, 'माझें, माझें' असें म्हणून बद्धावस्था आपण लावून घेतों. माझ्या मनावर कशाचाहि परिणाम झाला नाहीं आणि समाधान कायम राहिलें, कीं मुक्तावस्था. माझ्यासारखा पापी मीच असें आपण मनानेंच ठरवतों आणि दुःख करीत बसतों. मी एक भगवंताचा झालों, आतां नाहीं कोणाचा, असें म्हणावें आणि जगांत नटासारखें वागावें. वास्तविक आपण मायेकडून पछाडलों गेलों आहोंत. भगवंताजवळ माया ही आपल्या छायेप्रमाणें आहे. आपण मायेचा जो नियंता भगवंत त्याचें होऊन राहावें. मग माया खरी नाहीं हें समजतें. मायेला ओळखणें म्हणजे विवेक. भगवंत ठेवील त्यांत समाधान मानणें हें वैराग्य

पापपुण्य हे मनाचे धर्म आहेत. मी आतां नाम घेतों, माझीं सर्व पापें त्यामुळें नाहींशीं झालीं आहेत, अशी दृढ भावना झाली कीं तो निष्पाप झाला म्हणून समजावें. चारचौघे करतात म्हणून साधन करून नाहीं चालणार. साधनांत दृढ भाव पाहिजे. जोंपर्यंत विषय गोड लागतात तोंपर्यंत देहबुद्धि गेली नाहीं; जसें, मिरच्या गोड लागतात तोंपर्यंत विष उतरलें नाहीं असें म्हणतात. साधन करायचें तें योग्य मार्गानें झालें पाहिजे. तें अगदीं निष्काम असावें. बुद्धिभेद करणारे लोक जगांत नेहमीं असणारच; पण साधकानें आपला बुद्धिभेद होत नाहीं इकडे जागृत असावें. कांहीं पुरुष किंवा स्त्रिया यांना आपला स्वतःचा असा कांहीं प्रपंच राहिलेला नसतो, तरीहि हे लोक उगीचच जगाचे दोष काढीत बसतात, दुसऱ्याच्या घरीं जाऊन उठाठेवी करतात, हें फार मोठें पाप आहे, साधकानें तें कटाक्षानें टाळावें. ज्या लोकांना आपल्यामध्यें दोष आहेत हें कळतच नाहीं ते लोक अगदीं खालचे समजावेत, ज्यांना आपला दोष कळतो ते दुसऱ्या प्रतीचे समजावेत. आपण प्रयत्न करून सुद्धां भगवंताच्या आड येणारा दोष जात नाहीं म्हणून तळमळ असणारे लोक हे सर्वांत चांगले; साधकानें तसें बनलें पाहिजे. परमार्थमार्गामध्यें अर्ध्यापर्यंत गेल्यावर मग पुढें जाणारे साधक फार थोडे असतात. खरें म्हटलें म्हणजे साधन आणि वाचन असलें कीं साधक कधीं मागें पडायचा नाहीं. ब्रह्मचारी साधकानें प्रपंचातल्या उठाठेवी करूं नयेत. कारण तशानें प्रपंचाचें प्रेम त्याला लागेल. त्यानें प्रपंचापासून चार पावलें दूर राहावें, नाहीं तर तोच हवा असें वाटूं लागतें. जगांत किती पोथ्या आणि किती मतें आहेत! एवढें पाहायला वेळ कुठें आहे? म्हणून साधकानें गीता, ज्ञानेश्वरी, गाथा, भागवत किंवा दासबोध असा एक ग्रंथ प्रमाण मानून त्याप्रमाणें साधन करावें. मुंगी डोंगरावर चढण्याचा प्रयत्न करते आणि कालांतरानें का होईना पण वर पोंचल्याशिवाय राहात नाहीं, हें ध्यानांत धरून आपण प्रयत्नास लागूं या.

३१२. आतां मी रामाचा, राम माझा। हें जाणावें पूर्ण ॥
रामनाम अखंड चित्तीं। समाधान संतोष शांती ॥

# भगवंताचें कीर्तनांत काय पाहायचें ?
## हेचि दान दे गा देवा तुझा विसर न व्हावा ॥

८ नोव्हेंबर

( एका कीर्तनानंतरचें निरूपण:— ) बुवा, आज तुमचें कीर्तन चांगलें झालें. परंतु कीर्ततांन काय पाहायचें असतें ! तुम्हाला कीर्तनांत पेटी वाजविणारा चांगला मिळाला, तबलेवालाहि चांगला होता; तुम्ही स्वतः गाणारेहि असल्यामुळें, एकंदरींत रंग चांगला आला आणि ऐकणाऱ्याचेंहि मन रमलें. श्रोते रंगले असे पाहून तुम्हां स्वतःलाहि आनंद झाला. पण हा आनंद आतां आहे काय ! कीर्तन संपल्यावर तो आनंद आहे का ? नाहीं. तो कां बरे नाहीं ? तर कीर्तन चालू असतांना जो आनंद झाला तो कीर्तनांतल्या उपकरणांमुळें झाला; आणि ती बंद पडल्यावर आनंदहि थांबला. म्हणून म्हणतों, जो दुसऱ्या बाह्य कारणांमुळें आनंद झाला; तो टिकाऊ नसतो, हें खरें ना ? म्हणजे काय, कीं विषयाचा आनंद खरा नसतो. तर खरा आनंद कशांत मिळेल हें पाहावें. कीर्तन करायचें तें, मी आणि देव एवढेंच आहोंत हीं भावना ठेवून करावें. आपल्या कीर्तनानें केवळ लोकरंजन व्हावें ही भावना नसावी, म्हणजे जो आनंद होईल तो खरा आनंद होईल; आणि तो मिळविण्याचा प्रयत्न करावा. तो मिळायला वेळ लागेल हें खरें, पण देवाला शरण गेलें तर तो मिळेल. तेव्हां तसें कीर्तन करण्याचा प्रयत्न करा. मी आज तुम्हाला खरें सांगतों कीं, आज रामराय प्रसन्न होऊन तुम्ही मागाल तें द्यायला तयार आहे; तर तुम्ही आज त्याच्याजवळून काय मागायचें असेल ते मागून घ्या. परंतु मागायच्या अगोदर तुम्हीं काय मागावें हें तुम्हाला सांगतों, म्हणजे तें मागितल्यानें तुमचें कायमचेंच कल्याण होईल. ब्रह्मानंदबुवांनीं काय मागितलें तें पहा. मीं एकदां त्याला विचारलें कीं " तूं कांहीं तरी माग " पण तो बोलेना, मागेना; पण पुनः मागायला सांगितल्यावर तो म्हणाला, " मी काय मागावें ? पण जर द्यायचेंच असेल तर हें द्या, कीं मला कांहीं मागण्याची इच्छाच होऊं नये, हेंच द्या ! " आणि त्याला तें मिळाल्यामुळें काय समाधान होतें तें तुम्हाला माहीत आहेच. त्यानें जें एवढें कार्य केलें तें त्यामुळेंच होय. तर तुम्हीहि तसेंच मागून घ्यावें. आपल्यांत एक चाल आहे कीं, वेळ नसल्यास श्राद्ध चटावर करतात. तसेंच वेळ नसल्यास भजन चटावर करावें. पण चटावर भजन केलें म्हणजे रामराया फळही चटावर देतो ! तेव्हां रामनामाचा एवढा जयघोष करा कीं, हें गांव क्षेत्रच व्हावें, आणि कुणीहि इथें आला कीं त्याला हें क्षेत्रच आहे असें वाटलें पाहिजे. कीर्तनांत जो विषय सांगितला जातो त्याचें सार ध्यानांत आणून त्याप्रमाणें आपण वागण्याचा प्रयत्न करावा. कीर्तनाचा हेतु हाच असतो, " हेचि दान देगा देवा तुझा विसर न व्हावा ॥ "

३१२. संत-सहवास ज्याला पाहीं । जो देहबुद्धि टाकून राही ॥
रामरूप झालें मन । त्याला जग दिसे शून्य ॥

# भगवंताच्या आड येणाऱ्या वस्तूंची हिंसा करणें ही अहिंसाच आहे

९ नोव्हेंबर

ही जी सृष्टि भगवंतानें उत्पन्न केली आहे तिची नक्कल म्हणजे चित्रकला होय. चित्रकारानें रंगविलेलें चित्र खोटें असून जें खऱ्यासारखें भासतें त्याला उत्तम चित्र असें म्हणतात. भगवंताचें होऊन जी कला येईल ती कला खरी. भगवंतानें आपल्याकडून जे करवून घेतलें ती कला समजावी. जें कर्म भगवंताकडे न्यायला मदत करतें ती कलाच होय. या कलेमध्यें मनाला गुंतविणें आणि उद्योगात राहणें ही भगवत्सेवाच आहे. मन म्हणजे कल्पनांचें मूर्त स्वरूप. मन चंचल आहे तोंपर्यंत देहालासुद्धा स्वस्थता नाहीं. चलबिचल होते म्हणूनच अभ्यास करायला पाहिजे. मनाची विश्रांति हीच खरी विश्रांति होय. मनाला शिक्षण देणें याचें नांव अभ्यास करणें.

सृष्टीमध्यें सर्व ठिकाणीं वैचित्र्य आढळतें. प्राण्यांच्या कितीतरी जाती आहेत. माणसेंसुद्धा एकसारखी एक कुठें असतात ? पण सर्वांमध्यें भगवंत मात्र सारखाच ओंवलेला आहे. जगामधले प्राणी एकमेकांला मारक असूनदेखील कसे जगतात हें पाहिलें म्हणजे आश्चर्य वाटतें. जगामध्यें माणूस आणि वाघ दोघेहि राहतात, परंतु दोघांनाहि एकमेकाची भीति असते, म्हणून एक दुसऱ्याला सहसा मारीत नाहीं. ज्याच्यामुळें दुसऱ्याच्या हिताचा घात होतो अशी कृति करणें हें हिंसेचें लक्षण समजावें. भगवंताच्या आड येणाऱ्या वस्तूंची हिंसा करणें ही अहिंसाच होय. पण आपल्या स्वार्थाकरितां आणि वडेजावाकरितां लोकांचें मन दुखविणें ही हिंसाच समजावी. **दुसऱ्याचें मन दुखविणें म्हणजे भगवंताचें मन दुखविणें होय.** आपल्या मनांत आलेली गोष्ट आपल्या हातूनसुद्धा होत नाहीं तर मग इतरांनीं आपल्या मनासारखें वागावें असें म्हणणें हें कांहीं बरोबर नाहीं. आपल्याकडे बायका चातुर्मासामध्यें नियम करतात; उदाहरणार्थ, रोज एक वात लावायची, उजव्या हातानें पाणी प्यायचें, वगैरे. वास्तविक हे कसले नियम ! तुम्ही एक वात लावली काय आणि दोन वाती लावल्या काय, शेवटीं दिवा लावावा लागतोच ! त्यापेक्षां 'मी कुणाचें अंतःकरण दुखवणार नाहीं' असा नियम करावा. प्रथम चार महिने करावा, आणि मग वर्षभर पाळावा, आणि नंतर जन्मभर ठेवावा. कांही बायका चातुर्मासांत मीठ सोडतात. असें अळणी खाणारी बाई जेवायला बसली असतांना मीठ वाढायला आलेल्या बाईला दुरूनच नको नको म्हणते, कारण न जाणो, चुकून मीठ किंवा मिठाचा पदार्थ पानांत पडायचा. हें जसें ती सांभाळतें, त्याचप्रमाणें आपण कुणाचें अंतःकरण न दुखवण्याचा नियम केला कीं, आपण किती बेतानें बोलूं, आणि कोणी आलें तर आपण किती काळजीपूर्वक वागूं ! खरोखर, मनुष्य बोलतो तसा वागूं लागला तर किती काम होईल ! भगवंत माझ्यांत आहे तसाच दुसऱ्यांतहि आहे. भगवंत चोहोंकडे आहे असें आपण म्हणतो, पण त्याप्रमाणें वागत नाहीं, याला काय करावें ! भगवंताचें होऊन त्याच्या नामांत राहावें हाच एक उत्तम मार्ग आहे.

---

**३१४. लक्ष ठेवावें संताकडे । देह लावावा प्रपंचाकडे ॥**
**नाम घ्यावें श्वासोच्छ्वास । भगवंत संतुष्ट होईल खास ॥**

# शेजार असतां रामाचा । दुःखाची काळजीची काय वार्ता?

**१० नोव्हेंबर**

[ एका गृहस्थाचा वयांत आलेला एकुलता एक मुलगा वारला. त्या वेळीं त्यांना पाठविलेलें पत्र :– ] मुलगा गेल्याचें कळलें. सर्वांस अत्यंत दुःख झालें. व्यावहारिक उपाय जे करायचे ते तुम्हीं केले, तरी पण यश नाहीं आलें. आईचें अंतःकरण काय असतें याची सत्य कल्पना मला आहे, तरी पण विचारी, विवेकी माणसें विचारानेंच समाधान राखीत असतात. मुलाच्या आईनें आतां कष्टी न व्हावें हें मी अंतःकरणाची जाणीव ठेवून सांगतो, हें लक्षात ठेवून वागावें. प्रपंचातील हानी । याहून नाहीं दुसरी । हें जरी आहे सत्य । तरी करावा थोडासा विचार ॥ ज्याला म्हणावें मी 'माझें' । त्यावर माझी सत्ता न गाजे ॥ स्वतःचा नाहीं भरंवसा हें अनुभवास येई । परि वियोगाचें दुःख अनिवार होई ॥ तुम्ही विचारी सुज्ञ आहांत । थोडासा करावा विचार ॥ सर्व सत्ता रामरायाचे हातीं । तेथें आपल्या मानवाची काय गती ॥ विचारानें दुःख सारावें । सर्वांचें समाधान राखावें । सर्व केलें रामार्पण । हा नव्हे शब्दाचा खेळ जाण । अर्पण केल्याची खूण । न लागावी काळजी तळमळ जाण ॥ तो म्हणा रामाचा । राम काळजी घेईल साचा ॥ परमात्म्याचें रक्षण । कोणतेहि स्थळीं, कोणतेहि काळीं, असतें हा भरंवसा । याचा अनुभव प्रत्येकास आहे खासा ॥ त्याचे आईस सांगावेत माझे आशीर्वाद ॥ ठेवा रामावर पूर्ण विश्वास । न करावे यावर उपासतापास ॥ उपास हा शब्द अलिकडील जाण ॥ त्याच्यापुढें एक पाऊल टाकून तेथें ( म्हणजे उपासनेंत ) राहावें आपण । तेथें आहे निर्धास्तपण । उपासापुढील ठाण । उपासना मुख्य जाण ॥ उपासनेंत राहावें आपण । हेंच रामाचें सान्निध्य जाण ॥ शेजार असतां रामाचा । दुःखाची काळजीची काय वार्ता ॥ जैसा सूर्य प्रकाशतां काळोखाचा नाश होईल तत्त्वतां ॥ एवढें आतां ऐकावें माझें । राम उतरील सर्व ओझें ॥ तुम्हास काय सांगावें ॥ तुम्ही सुज्ञ विचारी भले । याहून मी जास्त काय लिहावें ॥ रामरायाचें स्मरणांत राहावें ॥ स्मरतां रामाला । तो देईल समाधानाला ॥ मृत्यूचा मोबदला । रामरायावांचून दुसरा नाहीं ॥ तरी शोक आवरावा म्हणजे मला बरें वाटेल ॥ देवाकडे करावी विनंति । देहदुःख अति फार । होई रामाचा विसर । आतां या नामाचें अखंड स्मरण । देवा ! देह केला तुला अर्पण ॥ परमात्मा दयाळू फार । आपलें हिताचें करील हा ठेवावा निर्धार ॥ मी आहें तुमच्यापाशीं हा ठेवावा विश्वास । न सोडावा आतां धीर ॥ सदा घ्या भगवंताचें नाम । जेणें कृपा करील रघुनंदन ॥ राम कृपाळू दीनांचा नाथ । तो सर्व कांहीं पाहात ॥ आपले प्रारब्धानें आलेलें कर्म । तें त्यास न विसरतां करावें जाण ॥ सुखानें घ्या नामस्मरण । कृपा करील रघुनंदन ॥ हा करावा उपाय । तोच समाधानाला नेईल खास ॥

३१५. राम कर्ता जाणून चित्तीं । जगांत संत ऐसें वर्तती ॥
आपण वर्तावें ऐशा रीती । जेणें दुसऱ्यास मार्गदर्शक होती ॥

# परमेश्वराच्या भक्तीचा राजमार्ग

**११ नोव्हेंबर**

[ ज्ञान आधीं कीं भक्ति आधीं यावरील निरूपण :– ] परमात्म्याची ज्यानें ओळख होते तें ज्ञान. अन्य ज्ञान तें केवळ शब्दांचें अवडंबरच होय. परमात्मा नुसत्या ज्ञानानें ओळखतां येणार नाहीं, भक्ति केल्यानेंच तो ओळखतां येईल. भक्ति केल्यावर ज्ञान आपोआपच मागें येतें; जसें गाय आली म्हणजे तिच्या मागोमाग तिचें वासरूं येतें, त्याला निराळें बोलवावें लागत नाहीं. आतां भक्ति कशी करावी हें पाहिलें पाहिजे. जो देवापासून विभक्त राहात नाहीं तो भक्त. नुसते देहाला कष्ट दिल्यानें वैराग्य प्राप्त होत नाहीं, तर ज्या स्थितींत आपल्याला देव ठेवील त्या स्थितींतच आनंदानें राहणें म्हणजे वैरागी होणें. सुखांत ठेवलें तर आसक्ति शिवाय राहिलें म्हणजे झालें. वैराग्य प्राप्त व्हायला प्रपंच सोडावा लागत नाहीं. साधुसंत प्रपंच सोडून राहात नाहींत, किंबहुना, ते आपल्यापेक्षाहि प्रपंच उत्तम करतात; पण मनांतून त्यांना त्यांत आसक्ति नसते. मनानें आंतून जो आसक्तिरहित झाला त्यालाच खरें वैराग्य आलें असें होतें. अंगाला राख फासून राहिलें म्हणजे वैराग्य येत नाहीं; तर देह प्रारब्धावर, भगवंताच्या भरंवशावर, टाकून राहणें हेंच वैराग्य होय. कशाचीहि हाव न धरतां, जी स्थिति प्राप्त होईल तींतच आनंदानें राहणें म्हणजे परमेश्वराची इच्छा मानणें होय; आणि तसें राहिलें म्हणजे आपोआपच भक्त होतो. तसें व्हायला राजमार्ग म्हणजे नामस्मरण करणें. नामस्मरणावर विश्वास ठेवावा, आणि तें विश्वासानें घेत जावें. गुरूनें जे नामस्मरण करायला सांगितलें असेल तेंच करीत राहावें, आणि त्यांतच त्याला पाहावें, म्हणजे दिसेल तें गुरुरूपच दिसूं लागतें. असें झालें म्हणजे सर्व ठिकाणीं गुरु दिसूं लागतो; चांगल्या दिवाणखान्यात असलों म्हणजे गुरु दिसतो आणि वाईट ठिकाणीं असलों तर तो दिसत नाहीं असें नाहीं. सर्व ठिकाणीं गुरुरूप दिसूं लागल्यावर जगांत वाईट असें कांहींच राहात नाहीं, कारण मग वाईटाला जागाच राहात नाहीं. नामस्मरण हेंच साधन आहे, आणि साध्यहि तेंच आहे. दुसऱ्या कोणींहि कांहींहि सांगितलें तरी त्यावर विश्वास ठेवूं नये. नामस्मरण हेंच सत्य; त्यावर इतका विश्वास ठेवा कीं त्याशिवाय जगांत दुसरें कांहीं नाहीं. एवढा विश्वास अंगीं बाणल्यावर देव कांहीं लांब नाहीं, तुमच्याजवळच आहे. प्रपंचावर जी आसक्ति करतां ती तिथून काढून परमार्थावर ठेवा, म्हणजे परमार्थ कठीण नाहीं. गुरूला अनन्य शरण जाणें म्हणजेच आपला मीपणा नाहींसा करणें होय. मीपणा समूळ गेल्याशिवाय अनन्य शरण जातां येणार नाहीं. मीपणा हा गुरूनें सांगितलेलें नामस्मरण करीत राहिल्यानें जातो. म्हणून सतत नामस्मरण करीत असावें म्हणजे गुरुकृपा होईल.

---

३१६. आपल्या इच्छेनुसार सर्व गोष्टी घडत नाहींत ही भगवंताची कृपाच आहे.

# देहबुद्धिनुसार वागणारा बद्ध, भगवंताच्या इच्छेनुसार वागणारा मुक्त

१२ नोव्हेंबर

बद्ध हे जगाचे असतात. मुक्त जगाचे नसून एका भगवंताचे असतात. संताची चौकशी करताना, आपण त्याची उपासना कोणती, गुरु कोण, हें पाहतों, त्याच्या आईबापाची नाहीं चौकशी करीत. संतांना देहाची आठवण नसते; ते आपला देहाभिमान, मीपण, भगवंताला देतात. मुक्त हा मालकाला जाणतो; बद्ध शिपायाला ओळखतो, पण मालक पाहिला तर त्याला मालक म्हणत नाहीं. विषयाचें प्रेम कमी होणें म्हणजे मुक्तदशेच्या मार्गाला लागणें. परमात्म्यापेक्षां विषयाची गोडी ज्याला जास्त तो बद्ध. 'मी भगवंताचा ' म्हटलें कीं तिथें बद्धपणा संपला. आपण बद्ध आहोंत हें तरी, आपणच बद्ध आहोंत अशी भावना करून घेतली आहे म्हणून. आपण, मूळ तेंच रूप स्वयंसिद्ध असताना, सर्व इंद्रियें मिळून होणारा देह मी आहें असें म्हणतों, आणि त्यामुळें देहाला जें सुखदुःख होतें तें आपल्याला झालें असें म्हणतों. आत्मा स्वतः त्यापासून अलिप्त असतो, परंतु आत्मा आणि देह वेगळा नाहीं असेंच आपण म्हणत असतों; म्हणून मी तोच देह, आणि हा देह तोच आत्मा अशी आपली भावना दृढ झालेली असते. परंतु आपण बोलण्यात मात्र ' माझा हात दुखावला ' किंवा ' माझ्या पोटात दुखतें ' असें म्हणतोंच कीं नाहीं ! म्हणजे प्रत्येक अवयव ' माझा ' म्हणणारा कुणी-तरी वेगळा आहे हें खरें; आपल्याला तें बरोबर समजत नाहीं इतकेंच. मीपणा हा आपल्यात इतका बाणलेला असतो. आपलें मन विषयाच्या आनंदात रंगतें म्हणून तिथें आपण आपलेपणानें वागतों. परंतु विषयच जिथें खोटे, तिथें मन रंगूनहि, आपल्याला ते नाहींसे झाले म्हणजे दुःख हें होणारच. आपण दुसऱ्यावर अवलंबून राहिलों म्हणूनहि सुखदुःख होतें. म्हणून आपण ह्या सर्वांपासून निराळे आहोंत असें समजून वागावें. हें होण्यासाठीं परमेश्वराची भक्ति करायला पाहिजे. भक्तीला जर काहीं आड येत असेल तर आपली देहबुद्धीच होय; आणि ती गेल्याशिवाय भक्ति होणारच नाहीं. तरी आपण परमेश्वराचे आहोंत असें समजून वागावें; जें जें होईल तें तें त्याची इच्छा म्हणून झालें असें समजून वागूं लागलों, म्हणजे आपली देहबुद्धि हळूहळू कमी होत जाईल. याकरितां काहीं तप, याग, वगैरे करावें लागत नाहीं, संसार सोडून वनातहि जावें लागत नाहीं, आणि विशेष आटाआटीहि करावी लागत नाहीं. जें घडतें तें मीं केलें हा मीपणा टाकून, मी देवाचा आहें असें म्हणून, आणि जें होईल त्यात आनंद मानून राहावें, म्हणजे मीपणा सुटत जाईल. हें मीं केलें नाहीं, परमात्म्याच्या इच्छेनें झालें, असें मानलें म्हणजे मीपणा राहिला कुठें ! जन्माच्या अगोदर " मी तोच आहें " असेंच प्राणी म्हणत असतो; परंतु जन्मल्याबरोबर बाहेर विषयाचा वारा लागल्या-बरोबर मी तो नाहीं आणि " मी जो हा देह दिसतो तो आहे," असें म्हणूं लागतो, आणि म्हणूनच आपण आपल्याला बद्ध म्हणूं लागतों. मी तसा नाहीं असें मानणें ह्यालाच मुक्त म्हणतात, आणि असें व्हायला भक्तीशिवाय दुसरा सोपा उपाय नाहीं. सर्व सृष्टि रामरूप दिसणें हेंच भक्तीचें फळ आहे.

३१७ रामापरतें न मानावें हित । हें सर्व संतांचें मनोगत ॥
त्याचा आदर्श ठेवावा पुढें । कधीं न होईल वाकडें ॥

# सृष्टींतील परमेश्वर जाणण्याचा मार्ग

**१३ नोव्हेंबर**

जो कोणी एखादें कृत्य करतो त्यांत तो करणारा असतो। म्हणजे काय, तर करणारा निराळा राहूनहि त्या कृत्यांत तो अंशरूपानें असतो; जसें न्यायाधीश निकाल देतो, तेव्हां 'अमक्या न्यायाधीशानें निकाल दिला' असें आपण म्हणतों. म्हणजे काय कीं, तो न्यायाधीश जरी वेगळा असला तरी तो दिलेल्या निकालामध्यें असतोंच; त्याचप्रमाणें, परमात्म्यानें हें जें सर्व जग उत्पन्न केलें त्या प्रत्येकांत तो अंशरूपानें आहे. हें जरी खरें असलें, तरी त्या सर्वांवेगळाच तो असतो. म्हणूनच सर्व चराचरांमध्यें ईश्वर पाहावा असें सांगतात, त्याचेंहि कारण हेंच आहे. या सर्व चराचर सृष्टीमध्यें ईश्वर पाहायला आपली तितकी प्रबळ इच्छा व्हावी लागते, देव आहे ही पुष्कळांची नुसती भावनाच असते, पण ती बरोबर जाणली जात नाहीं, आणि ती बरोबर जाणण्याची इच्छा होणें हेंच खरें व्हायला पाहिजे असतें। अशी ज्याला इच्छा झाली त्याचें अर्धें काम झालें असें म्हणावें. तशी इच्छा झाल्यावर, देव पाहण्यासाठीं काय मार्ग आहेत हें तो पाहूं लागतो. त्याला पुष्कळ निरनिराळे मार्ग सांगणारे भेटतील. कुणी सांगतील कीं सन्यास घेतला म्हणजे तावडतोब ईश्वराची प्राप्ति होईल; कुणी सांगतील कीं ब्रह्मचारी राहिलें म्हणजे देव भेटेल; कुणी सांगतील गृहस्थाश्रम वेदानें श्रेष्ठ सांगितला आहे, तसें वागलें म्हणजे देव आपल्या घरीं चालत येईल. कुणी याग, कुणी हठयोग, तर कुणी जपतप साधनें सांगतील. तरी अशा मतामतांच्या गोंधळात आपण काय करावें, तर ज्यांनीं तो मार्ग चोखाळला आहे, त्यांनीं काय केलें तें पाहावें. असा मार्ग कोणीं चोखाळला ? तर जे संत लोक आजपर्यंत झाले त्यांनीं. या सर्वांनीं देवाची प्राप्ति करून घेतली आहे। म्हणून ते काय सांगतात तें पाहावें. आपण घराच्या बाहेर जायला निघालो म्हणजे वाट चालूं लागतों। जिथें चार वाटा फुटतात तिथें पाट्या लावलेल्या असतात, आणि जिकडे जायचें तें त्यावर लिहिलेलें असतें. समजा, आपल्याला पंढरपूरला जायचें आहे; आतां केवळ एखादा रस्ता सावलीचा आहे म्हणून त्याच रस्त्यानें जाऊं लागलों तर आपण पंढरपूरला पोहोंचूं का ? पंढरपुराचा मार्ग उन्हाचा म्हणून आपण तो सोडून देऊन सावलीच्या रस्त्यानें जावें, तसें आपलें झालें आहे. आपण विषयांत आनंद मानून त्यांतच रंगून गेलों आहोंत, आणि त्यामुळें देवाकडे जाणारा रस्ता चुकलों आहोंत म्हणूनच, संत सांगत असतात त्या वाटेनेंच जाण्याचा निश्चय करावा। आणि तो मार्ग जरी कठीण असला तरी तो देवाकडे जातो हें लक्षांत ठेवावें. आपण संसारातसुद्धा पुढें फळ निश्चित दिसत नसतानाहि प्रेम करतोंच कीं नाहीं ! जसें, हल्लीं शिकून झालें तरी पाहिजे तशी नोकरी मिळत नाहीं हें माहीत असतांना सुद्धा, आपण शिकणें सोडलें आहे का ! थोडक्यांत, **मनानें स्वस्थ बसणें हा परमार्थ, आणि विनाकारण धडपड करणें हा प्रपंच होय.**

---

३१८. माझे भेटीं सदा राहावें । मुखानें रामनाम घ्यावें ॥
जो नामांत राहिला । तो अखंड माझ्या दर्शनांत बसला ॥

# परमात्म्यास ओळखण्यास, प्रपंच त्याचा आहे हें जाणून करावा

१४ नोव्हेंबर

हें जें सर्व जग दिसतें, त्याला कुणी तरी नियंता आहे असें तुम्हाला वाटतें का ? एखाद्या नास्तिकाला विचारलें कीं, "हें जग कुणीं निर्माण केलें ?" तर तो काय सांगेल, तर पंचभौतिक तत्त्वापासूनच त्याची उत्पत्ति झाली आहे. पण हीं तत्त्वें तरी कुणीं निर्माण केलीं ? त्यावर तो सांगेल, "तें मात्र कांहीं कळत नाहीं." म्हणजे जें कळत नाहीं त्याला कुणीतरी कर्ता असलाच पाहिजे. म्हणून देव नाहीं हें कोणालाहि म्हणता येणार नाहीं. आपण जिथें सध्या वस्ती नाहीं तिथेंहि मंदिरें बांधलेलीं पाहतों, आणि तीं कोणीं बांधलीं याचा तपास करूं लागलों असतांना बांधणारा कोण हें जरी समजलें नाहीं तरी, ज्याअर्थीं तीं आहेत, त्या अर्थीं त्यांना कोणी तरी बांधणारा आहेच. म्हणून काय कीं, जगाचा कुणी तरी कर्ता हा असलाच पाहिजे. तो कोण हें आपल्याला समजत नाहीं इतकेंच. तरी पण तो करणारा त्या प्रत्येक कृत्यांत स्वतः अंशरूपानें असतो. तुम्ही नाथभागवत वाचतां; हें श्रीनाथमहाराजांनीं लिहिलें आहे ना ? नाथमहाराज हल्लीं आहेत का ? नाहींत; तरी पण त्यांनीं जें भागवतांत सांगितलें, त्यांत ते अंशरूपानें हल्लीं देखील आहेतच. सर्वांभूतीं भगवंत पाहावा हें सांगतात त्याचेंहि कारण हेंच आहे. जेव्हां सर्वजण मंदबुद्धि होतात तेव्हांच अवतार होत असतो, आणि देवाला अवतार घेऊन तरी सर्वांस हेंच शिकवायचें असतें, आणि तें कार्य झाल्यावर अवतारसमाप्ति होत असते. आपण देवाची ओळख करून घ्यावी मग कसें वागावें ? मुलें खेळ खेळत असलीं म्हणजे कशीं वागतात ? तीं सर्व आपण संसारांत वागतों त्याप्रमाणें खेळ थाटतात. खेळांत लग्न लावतात, त्याचा सर्व सोहळा करतात. बाहुलीचे सर्व संस्कार तीं करतात. त्यांच्या खेळांत बाळंतपण होतें, मुलें होतात. सर्व कांहीं करतात, पण त्यांना कोणी घरांत हांक मारली म्हणजे खेळ टाकून तसेच धांवत जातात. त्या वेळेस मूल तिथें रडेल वगैरेची काळजी त्यांना राहात नाहीं. तसेंच आपण संसारांत वागावें. जर सर्वच देवानें केलें आहे तर त्याचें पालनहि तोच करतो आणि संहारहि करणारा तोच असतो, तर मग आपल्याला तरी त्यानें दिलेल्या संसारांत कांहीं बरें-वाईट झालें म्हणून सुखदुःख मानण्याचा काय अधिकार आहे ? समजा, आपण एक घर भाड्यानें घेतलें आहे. त्याचें आपण बरींच वर्षें भाडें भरतों आहोंत; पुढें जर आपण तें घर माझेंच आहे असें म्हणूं लागलों तर तो मालक ऐकेल का ? तो कांहींहि उपायानें आपल्याला घरांतून काढून लावील कीं नाहीं ! तसेंच आपलें प्रपंचांत झालें आहे. जो प्रपंच आपल्याला त्यानें भाड्यानें दिला आहे तो आपण आपलाच म्हणून धरून बसलों. परंतु त्याला वाटेल तेव्हां हरप्रयत्नानें आपल्याला काढून लावता येणें शक्य असतांना आपण तो आपला म्हणून कसें म्हणावें ? तर तो त्याचा आहे असें समजून वागावें, आणि जेव्हां तो आपल्याला न्यायला येईल तेव्हां जाण्याची आपली तयारी ठेवावी. म्हणजे संसारांत सुख-दुःखें बाधत नाहींत. जेथें वासना संपली तेथें भगवंताची कृपा झालीच.

३१९. जेथें रामाचें नाम । तेथें माझा ठाम ॥
जेथें नामाचें स्मरण । तें माझें वसतिस्थान ॥

# भगवंताच्या स्मरणांत संसार केल्यास काळजीचें कारण उरत नाहीं

**१५ नोव्हेंबर**

आनंद पाहायला आपल्याला दुसरें कुठें जावें लागतें का ? नाहीं. जो स्वतःच आनंदरूप आहे, त्यानें आपण होऊन 'मी दुःखी आहें' असें मानून घेतलें आहे. एकजण आपलें तोंड आरशांत पाहायला गेला, पण त्याला तें दिसलें नाहीं. त्यावर दुसरा एकजण म्हणाला, "मी दाखवितों." असें म्हणून आरशावर मळ बसला होता तो पुसून त्यानें आंत पाहायला सांगितलें, तेव्हां तोंड स्वच्छ दिसलें. त्याचप्रमाणें साधु लोक करीत असतात. ते आपल्याला सांगत असतात कीं, तूंच ब्रह्मरूप आहेस; म्हणजे तूं स्वतःसिद्ध आणि आनंदरूप आहेस. परंतु आपण काय करतों कीं, हा प्रपंच माझा आहे असें समजतों, आणि त्यामुळें त्यांतलें सर्व सुखदुःख आपण आपल्यावर लादून घेतों. ज्यानें तो उत्पन्न केला त्याला तो रक्षण करण्याची शक्ति असते, आणि तो तें आपल्या इच्छेप्रमाणें करीतहि असतो; पण तिथें आपल्यावर कर्तेपणा ओढून घेऊन आपण सर्व काळजी करीत बसतो. वास्तविक आपल्या हातीं काय आहे ? परमात्म्याला काय करायचें तें तो करीत असतो. आपण मात्र काळजी करून शीण करून घेत असतों. म्हणूनच, काळजी सोडून देऊन आपण भगवंताला शरण होऊन राहावें. आपण त्याचें होऊन राहिलें म्हणजे आपल्याला सुखदुःख होत नाहीं, आणि मग आपल्याला त्या आनंदाचा लाभ मिळतो. काळजी ही मोठी विलक्षण असते. एका माणसाला आपल्या मुलाला चांगली नोकरी लागावी याची काळजी होती. पुढें त्याच्या मनाप्रमाणें नोकरी लागल्यावर त्या मुलाच्या लग्नाची काळजी सुरू झाली. कांहीं दिवसांनीं लग्न झालें; मग पुढें सून चांगली वागत नाहीं म्हणून काळजी लागली. नंतर तिला मूल होईना म्हणून त्याला काळजी लागली. कांहीं दिवसांनीं तिला मूल झालें; त्या मुलाला फिट येऊं लागली म्हणून त्याला काळजी लागली. शेवटीं आणखी कांहीं दिवसांनीं मुलाची फिट बरी झाली आणि त्या म्हाताऱ्यालाच फिट्स् येऊं लागल्या, आणि काळजी करतां करतांच तो मरून गेला. काळजी ही आपल्याला भगवंतापासून खरेंच काळाच्या स्वाधीन करते. आपण काळाच्या स्वाधीन झालों कीं आपली बुद्धि भ्रष्ट होते. खरें म्हणजे काळजीचें मूळ माझेपणांत आणि कर्तेपणांत आहे, आणि खुद्द कर्तेपणाचें मूळ भगवंताच्या विस्मरणांत आहे. व्यवहारी माणसें मोठीं हुशार असतात. भगवंताला साक्षी ठेवून काळजी करतात ! हा तर त्याच्याहिपेक्षां मोठा गुन्हा आहे. "काळजी लागणें स्वाभाविक आहे" ही कल्पनाच आधीं आपण मनांतून काढून टाकली पाहिजे. आपली काळजी कां सुटत नाहीं ? या प्रश्नाचें उत्तर अगदीं सोपें आहे. काळजीनें आपल्याला धरण्याच्या ऐवजीं आपणच काळजीला घट्ट धरून ठेवतों, मग ती सुटणार कशी ? ज्यानें भगवंत आपलासा करून घेतला त्याला काळजीचें कारण उरत नाहीं. भगवंताचें स्मरण करीत गेल्यानें आईचा आणि मुलीचा मृत्यु बरोबरच घडून येतो; म्हणजेच वासना आणि काळजी दोघीजणी एकदम मरतात. काळजी सोडायची म्हटली तर आजच सुटेल, नाहीं तर ती केव्हांच सुटणार नाहीं.

---

३२०. नामांत ठेवा मन । हेंच माझें दर्शन ॥
नेहमीं रामाचा ध्यास । हाच माझा सहवास ॥

# क्षेत्रांत आल्याची खूण म्हणून तुम्ही अभिमान येथें सोडावा व त्याबद्दल देवाची कृपा घेऊन जावी

११ नोव्हेंबर

[ गोंदवल्यास पुण्यतिथीचा उत्सव पुरा झाल्यानंतरचें निरूपण :–] आज, आतां उत्सव पुरा झाला; आतां तुम्ही सर्वजण परत जाल, तर क्षेत्रांत आल्याची कांहीं खूण घेऊन जा. ती खूण म्हणजे काय ? क्षेत्राच्या ठिकाणीं कांहीं तरी अवगुण सोडावा; आपल्याला जी कांहीं प्रिय वस्तु असते ती सोडावी. तर इथें घेऊन, विषयांपैकीं एखादा विषय तरी तुम्ही सोडाल का ? इथें साक्षात् परमात्मा आले आहेत, त्यांचें तुम्हां सर्वांना दर्शन झालें आहे; तर मला वाटतें याहून तुम्हीं कांहीं तरी जास्त करणें आवश्यक आहे. एक गोष्ट इथें द्यावी आणि एक गोष्ट इथून घेऊन जावी. अभिमान इथें सोडावा, आणि त्याच्या बदली देवाची कृपा घेऊन जावी. अभिमान तुम्हांस देतां येईल का ? अभिमान ही उचलून देण्यासारखी वस्तू आहे का ? अभिमान जाणें म्हणजेच देवाची कृपा होणें आहे. अभिमान सोडूं म्हणून सुटत नाहीं. मागें एकदां असें झालें कीं, एकजण तीन वर्षेंपर्यंत एके ठिकाणीं बसून सारखें साधन करीत होता आणि मी एके ठिकाणीं सारखें बसून साधन केलें असें त्याला वाटत असे. एकदां त्याचे गुरु तिथून जात होते. त्याला साधनाचा अभिमान झाला आहे असें त्यांना ताबडतोब समजलें. म्हणून ते त्याच्या-जवळ जाऊन म्हणाले कीं, " तूं इथें काय करतो आहेस ? " तर तो म्हणाला, " मी इथें एके ठिकाणीं बसून तीन वर्षें साधन करतों आहें. " ते म्हणाले, " वा ! वा ! फार चांगलें ! तूं आणखी तीनच दिवस इथें सारखें बसून साधन कर, म्हणजे तूं आत्तापर्यंत केलेल्याचें श्रेय मिळेल." तो तसें करूं लागला. त्याला वाटलें कीं, तीन वर्षें साधन केलें, तर आतां तीन दिवस करणें फारसें काय अवघड आहे, तें तर सहज करीन ! पण गंमत अशी कीं, त्याला गुरूनें सांगितल्यावर तिथें पांच मिनिटेंसुद्धां बसवलें नाहीं; त्याला आंतून कोणीतरी फेकून देतें आहे असें वाटूं लागलें, खालून मुंग्या आल्याशा वाटूं लागल्या, आणि आजूबाजूनें सारखी भीति वाटूं लागली. तेव्हां आपली चूक त्याच्या ध्यानांत आली, आणि तो गुरूला शरण गेला. तो म्हणाला, " मी आजपर्यंत अभिमानानें साधन केलें, पण आपण करून घेतल्याशिवाय हें कांहीं सुरळीत घडणें शक्य नव्हतें. आपणच माझ्याकडून सर्व करून घेतलेंत आणि आपण शक्ति दिली म्हणूनच माझ्याकडून हें साधन झालें, नाहींतर होणें शक्य नाहीं. म्हणून, तर मी आतां आपल्याला शरण आलों आहे." याप्रमाणें शरण गेल्यावर त्याला गुरुकृपा झाली. सात्त्विक अभिमानहि उपयोगी नाहीं. एक वेळ प्रपंचाचा अभिमान पत्करतो, कारण तो लवकर जाण्याचा संभव असतो; पण सात्त्विक अभिमान सुटायला फार वेळ लागतो. परमार्थामध्यें मिळविण्या-पेक्षां मिळवलेलें टिकवणें हेंच फार कठीण जातें.

३२१. नामांत ठेवावें प्रेम । तेथें माझी वसति जाण ॥
तुम्ही सुज्ञ माझे प्राण । नाम करा तेवढें जतन ॥

# भगवंताला कशाचीही गरज नाही, फक्त आपल्या निष्ठेची गरज आहे

**१७ नोव्हेंबर**

तुम्हीं परमेश्वरापाशीं काय मागावें हें मी तुम्हाला सांगूं का? तुम्ही त्रास घेऊन इतक्या लांब गोंदवल्याला जे आलांत ते विषयच मागण्यासाठीं आलां आहांत का? ते मागितलेंत तर तो देणार नाहीं असें नाहीं. आपल्याप्रमाणें तो मर्यादित स्वरूपाचा दाता नाहीं. आपण दान केलें तर तितकें आपल्यापैकीं कमी होतें, पण त्यानें कितीहि दिलें तरी तें कमी होणें शक्य नाहीं. पण विषय मागून मिळाले तर आपलें खरें कल्याण होईल का? त्यानें तुम्हाला खरें समाधान होईल का? नाहीं, कारण देहभोग आज एक गेला तरी दुसरा पुनः येणारच. म्हणून देहभोग येतील ते येऊं देत. देवाच्या मनात ज्या स्थितींत ठेवायचें असेल त्या स्थितींत मला समाधान दे, हेंच त्याच्यापाशीं मागावें. त्याची करुणा भाकून 'मला तूं निर्विषय कर. आणि कांहीं मागावें अशी इच्छाच होऊं नये हेंच देणें मला दे,' असें तुम्हीं अनन्य शरण जाऊन मागावें, म्हणजे त्यांतच तुमचें कल्याण आहे. भगवंताकडे एकदां दृष्टि लागली कीं बाकीच्याचा त्याग आपोआप होतो. भगवंताला कशाचीहि गरज नाहीं, फक्त आपल्या निष्ठेची आहे. अत्यंत आवडीच्या गोष्टीबद्दल जें प्रेम आपल्याला वाटतें, तेंच भगवंताबद्दल वाटावें. सात्त्विक गुणापलीकडे गेल्याशिवाय देवाची भेट होत नाहीं. म्हणून देवाला अनन्य शरण गेल्याशिवाय कांहीं होत नाहीं. जोंपर्यंत अभिमान आहे तोंपर्यंत आपल्याला शरण जातां येणार नाहीं. म्हणून अभिमान सोडून त्याच्याजवळ करुणा भाका, म्हणजे तो दयाघन परमात्मा तुमच्यावर कृपा करायला वेळ लावणार नाहीं. जगांत जें ज्याला आवडतें तेंच आपण केलें तर त्याला तें गोड वाटतें. भगवंताला प्रेमाशिवाय दुसऱ्या कशाचीहि गरज नाहीं. निःस्वार्थबुद्धीच्या प्रेमानेंच भगवंताला बद्ध करतां येतें. प्रेमानें जग जिंकतां येतें. प्रेम ही भगवंताची वस्तु आहे। आणि प्रेम करायला आपण आपल्या घरापासून सुरुवात करावी. सर्वांशीं अत्यंत प्रेमानें निष्कपट प्रेमानें वागावें. आपलें बोलणें अगदीं गोड असावें. **आपल्या बोलण्यामध्यें, नव्हे, पाहण्यामध्येंसुद्धां प्रेम असावें**. प्रेम करायला गरिबी आड येत नाहीं, किंवा श्रीमंती असेल तर फार द्यावें लागत नाहीं. नाम हें प्रेमरूपच आहे, आणि खरा प्रेमाचा व्यवहार म्हणजे देणें-घेणें हा होय. म्हणून, आपण नाम घेतलें कीं भगवंताचें प्रेम येईलच. देवाला देतां येईल असें एक नामच आहे, तें देऊन आपल्याला तो समाधानांत ठेवतो. अत्यंत गुह्यांतलें जें गुह्य आहे तें मी तुम्हाला सांगतों–नामाचें प्रेम हेंच तें गुह्य होय.

---

**३२२. ज्यानें ज्यानें इच्छा धरावी म्हावें माझें । त्यानें नाम कधीं न सोडावें वाचे ॥**
**एवढें देईल जो नामदान । त्याला अर्पण करून देईन प्राण ॥**

# भगवंतावर जो निष्ठा ठेवील त्याच्यावर जगाची निष्ठा बसेल

१८ नोव्हेंबर

फार चिकित्सा करीत बसणें हें मानवी देहबुद्धीचें लक्षण आहे. दुकानात गिऱ्हाईक आलें आणि मालाची फार चिकित्सा करूं लागलें कीं, " हें गिऱ्हाईक काहीं विकत घेणार नाहीं " असें दुकानदार मनात समजतो. परमार्थांतहि अति चिकित्सा करणाऱ्या माणसाचें तसेंच आहे. गुरूंना कसें मारावें या चिकित्सेंत अर्जुन पडला. भगवंतानीं अर्जुनाला आपलें रूप दाखविलें, त्यांत पुढें होणाऱ्या सर्व गोष्टी अर्जुनाला दिसूं लागल्या. देहबुद्धीच्या, अभिमानाच्या आहारीं जाऊन मायेंत सापडल्यामुळें झालेला गोंधळ या विश्वरूप-दर्शनामुळें नाहींसा झाला.

मायेचें मूळ लक्षण म्हणजे " मी कर्ता आहें " असें वाटणें. अभिमानाशिवाय कार्य तरी कसें होईल असें आपण म्हणतों, आणि पापाचरण करायलाहि मागेंपुढें पाहात नाहीं. देहबुद्धीनें केलेला धर्म उपयोगी पडत नाहीं. अभिमानानें पुण्यकर्में जरी केलीं तरी तींहि पुढल्या जन्माला कारण होतात. सर्व काहीं देवाला अर्पण केलें ही आपली आठवण काहीं जात नाहीं. दुःखात असताना, आपण आपलें जीवन प्रारब्धाच्या, ग्रहाच्या, संचिताच्या किंवा भविष्याच्या हातीं आहे असें म्हणतों; परंतु तें भगवंताच्या हातीं आहे ही श्रद्धा उडून आपण त्याला विसरतों. आपण आपल्या शंकेचें समाधान करूं शकत नाहीं. त्यासाठीं आपण कुठेंतरी विश्वास ठेवला पाहिजे. आपण आजपर्यंत जगलों याला काय कारण सांगता येईल ? आपण मेलों नाहीं म्हणून जगलों इतकेंच ! " मी कसा जगलों " याचें कारण कुणालाहि सांगता येणार नाहीं. म्हणून राखणारा भगवंत आहे ही श्रद्धा असावी. जो भगवंतावर निष्ठा ठेवील त्याच्यावर जगाची निष्ठा बसेल. लोक देवाला बाजूला करतात आणि अशा निष्ठावान मनुष्याला भजतात.

ही सृष्टि भगवंतानें उत्पन्न केली. सृष्टीमध्यें भगवंत सर्व ठिकाणीं भरलेला आहे. तो आनंदमय आहे, आपण त्याचे अंश आहोंत, मग आपण दुःखी कां ? याचें उत्तर असें कीं, " देव आहे " असें खऱ्या अर्थानें आपण वागत नाहीं, जेथें भगवंत आहे तेथें आपण त्याला पाहात नाहीं. श्रद्धेनें साधन करीत नाहीं. श्रद्धेशिवाय कधीं कोणाला परमार्थ साधायचा नाहीं. श्रद्धा ही फार बळकट आणि मोठी शक्ति आहे. ज्याचें भगवंतावर खरें प्रेम आणि खरी श्रद्धा आहे त्यांना सत्यअसत्याची गरज नाहीं. श्रद्धेनें जें काम होईल तें कृतीनें होणें कठीण जातें. विद्या, बुद्धि, कला, इत्यादि गोष्टी बिळासारख्या आहेत, त्यांच्यामधून श्रद्धा झिरपून जाते. विद्वानांचीं मतें आपापसांत जमत नाहींत आणि त्यामुळें आपली श्रद्धा डळमळते आणि मग आपल्याला आणखी वाचन केल्याशिवाय चैनच पडत नाहीं. आपल्या स्वभावामध्यें भगवंताच्या श्रद्धेपासून उत्पन्न झालेला धीमेपणा म्हणजे धीर पाहिजे. आपण आपल्या स्वतःवर जेवढी निष्ठा ठेवतों तेवढी जरी भगवंतावर ठेवली तरी आपलें काम होईल. नामांत भगवंत आहे ही श्रद्धा ठेवावी आणि अखंड भगवंताच्या नामांत राहण्याचा प्रयत्न करावा, हाच परमार्थाचा सोपा मार्ग आहे.

---

३२२. तुम्ही शक्य तितकें राहावें नामांत । हेंच माझें सांगणें तुम्हांस ॥
नामापरतें न मानी सुख । तेथेंच माझें राहणें देख ॥

# भगवंताजवळ काय मागावें ?

**१९ नोव्हेंबर**

परमात्मा कसा असतो म्हणून विचारलें तर काय सांगतां येईल ? तो तर नाम, रूप आणि गुण यांच्या अतीत आहे। म्हणून आपल्या भावनेनें जसा पाहावा तसा तो आहे असें सांगतां येईल. म्हणजेच सर्व कांहीं आपल्या भावनेवर आहे. आपण त्याच्याजवळ कांहींहि मागितलें तरी तो द्यायला तयार असतो. आपण विषय मागितले तर तो तेहि देत नाहीं असें नाहीं, पण त्याबरोबरच त्याचें फळ म्हणून सुख-दुःखेंहि आपल्याला भोगावीं लागतात. म्हणून कांहीं मागायचें झालें तर तें विचार करून मागावें. एक गृहस्थ दमून आल्यावर एका झाडाखालीं बसला. तें झाड कल्पवृक्षाचें होतें. तो सहज म्हणाला, " इथें आतां मला प्यायला पाणी मिळालें तर फार चांगलें होईल." असें म्हणतांच त्याला पाणी मिळालें. पुढें " आतां कांहीं खायला मिळालें तर बरें," असें म्हणतांच त्याला खायला मिळालें. त्यावर, त्याला विश्रांति घ्यावीशी वाटली, आणि तसें म्हणतांच त्याची निजण्याचीहि सोय झाली पुढें त्याला वाटलें कीं, आतां इतकें सर्व मिळालें, तेव्हां इथें माझी बायकामुलें असतीं तर मजा आली असती; असें म्हणतांच तीं तिथे आलीं. एवढें झाल्यावर त्याला वाटलें, " आपण जी इच्छा केली तें सर्व मिळालें, तर आतां इथें मला मरण आलें तर–"असें म्हणतांच तो मरण पावला ! म्हणून काय कीं, विषय मागत गेलें तर त्यापासून विषयच वाढत जातात. तेव्हां ज्यामुळें आपलें कल्याण होईल असें मागावें. एका भिकाऱ्याला राजा म्हणाला कीं, " तुला काय मागायचें असेल तें माग. " त्यानें आपल्याला पांघरायला घोंगडी मागितली ! मागितलें असतें तर अर्धें राज्यहि द्यायला जो राजा तयार होता, त्याच्यापाशीं त्यानें यःकश्चित् घोंगडी मागितली ! म्हणून समर्थ हे द्यायला भेटल्यावर त्यांच्याजवळ काय मागायचें हें नीट विचार करून मागावें. म्हणूनच भगवंतापाशीं त्याच्या भक्तीची याचना करावी; ती मागितल्यानें आपणांस समाधान मिळतें, आणि दुसरें कांहीं मागण्याची इच्छा होत नाहीं. भगवंताचे अवतार तरी केव्हां झाले आहेत, तर भक्ताकरितांच देवाला अवतार घ्यावे लागले आहेत. अवतार घेतल्यावर नुसतें भक्तांचेंच काम होतें असें नाहीं, तर त्यामुळें इतरांनाहि देव आहे ही भावना निर्माण होते. म्हणूनच आपण त्याला शरण जाऊन त्याचें होऊन राहावें, म्हणजे आपल्याला मग इतर कोणत्याहि बाबतींत काळजी करण्याचें कारण उरत नाहीं. भगवंत हा अत्यंत दयाळू आहे. लोखंडानें परिसाला मारलें तरी त्याचें सोनेंच बनतें त्याप्रमाणें, भगवंतानें भरताला भाऊ म्हणून तारला, बिभीषण शरण आला म्हणून त्याला तारला, आणि रावणाला शत्रु म्हणूनहि तारला, पण त्यानें कुणालाच सोडलें नाहीं. जो दुःख देतो तोच सुख देतो. ज्याला शिक्षा देतां येते त्यालाच ती कमी करतां येते. अशा भगवंत जोडायला ' नामा ' शिवाय दुसरा कोणताच सोपा उपाय नाहीं. " भगवंताच्या नामाशिवाय मला कांहीं कळत नाहीं, असें ज्याला कळलें त्यालाच सर्व कळलें.

---

३२४. जेथें नाम । तेथें माझें धाम ।।
जेथें नामाचें प्रेम । तेथेंच मी सतत जाण ।।

# मनुष्यजन्माचें सार्थक । मी रामरूप व्हावें सत्य

२० नोव्हेंबर

श्रीराम जगज्जीवन । तोच परमात्मा जाण ॥ आत्मा तो वेगळेपणानें नसे । श्रीराम परमात्मा-व्यतिरिक्त नसे ॥ त्या परमात्म्याचें ठिकाण । आत्मज्ञान्यास सांपडे खूण ॥ जीव करी आत्म्याचें शोधन । तात्काळ तुटे भवबंधन । प्राप्त होय ब्रह्मज्ञान ॥ मी कोणाचा कोण ? । मी आलों कोणाकडून ? । तूं आहेसी अजन्म आत्माचि निधान । आत्म्यासी नाहीं जन्ममरण । हें सत्य आहे जाण ॥ आत्म्यास नसे जन्म-मरण । तरी तो देहांत आला कैसा कोण ? ॥ आत्मा निर्गुण निराकारी । त्यास नाहीं जन्ममृत्यूची भरी । तो सत्तामात्र वसे शरीरीं ॥ आत्मा नाहीं कर्ता हर्ता । तो कल्पनेच्या परता ॥ तूं आहेस आत्मा । सर्व व्यापूनी वेगळा तो परमात्मा ॥ सर्व पोथ्यांचें सार । सर्व साधुसंतांचा विचार । परमात्मा एकच सत्य जाण ॥ रामापरतें सत्य नाहीं । श्रुतिस्मृति सांगतात हेंच पाहीं ॥ रामसत्तेविण न हाले पान । हें सर्व जाणती थोर लहान ॥ श्रीरामरूप ब्रह्मस्वरूप निर्गुण सगुण सुंदर । तयासी माझे अनंत नमस्कार रामाविणें सत्य कांही । सत्य जाण दुजें नाहीं ॥ दुःखाचा हर्ता व सुखाचा कर्ता । परमात्म्यावाचून नाहीं कोणी परता ॥ रामापरतें हित । सत्य सत्य नाहीं त्रिभुवनांत ॥ आजवर जें जें कांहीं केलें । तें भगवच्चिंतनानें दूर झालें ॥ विषय मला मारी ठार । हा जेव्हां झाला निर्धार । तेव्हांच तो होईल दूर ॥ सर्व कांहीं पूर्ववत् चालावें । तरी पण मन रामाला लावावें ॥ वैभव संपत्ती मनास वाटेल तशी स्थिति । हीं भगवत्कृपेची नाहीं गति ॥ न व्हावें कधीं उदास । रामावर ठेवावा विश्वास ॥ थोडेंसें वाचावें पोथीपुराण । त्याचें करावें मनन ॥ स्वार्थरहित प्रेम । हीच परमात्म्याची खूण । जसा सूर्याला अंधार नाहीं । तसें परमात्म्याशीं असत्य अन्याय नाहीं ॥ परमात्मा न्यायरूप आहे । म्हणजे परमात्मा सत्य आहे ॥ रामाविण सत्य सत्य कांहीं । सत्यत्वाला उरलें नाहीं ॥ आपलें आधीं आला । आपलें संगत राहिला । आपलें मागें उरला । त्याची संगत धरतो भला ॥ रामाचा आधार जन्माआधीं आला । पण माझे-मीपणानें सोडून गेला ॥ सर्व स्थिति-लय-कर्ता । एकच प्रभु माझा राम त्राता ॥ राम सर्वव्यापी भरला । तो माझेपासून दूर नाहीं जाहला ॥ परमात्मा सर्व ठिकाणीं भरला । त्याचेविण रिता ठाव नाहीं उरला ॥ सर्व जीव पराधीन । सर्व परमात्म्याचे आधीन ॥ म्हणून जें जें घडेल कांहीं तें तें त्याचे सत्तेनेंच पाहीं ॥ जगाची उत्पत्ति स्थिति लय । हे परमात्म्याचे हातीं । मनीं न वाढूं द्यावी खंती । मायेच्या आधीन झाला । सत्य सत्य तोच वाया गेला ॥ माया ज्यास सत्य वाटतें । तें ज्ञान फार खोटें ॥ आपण मायेआधीन झाला । हा मुख्य जीवदशेचा घाला ॥ चातुर्य बुद्धि देहभाव वासना कल्पना । ही मायाच अवघी जाणा ॥ माया बहुत जुनाट । तिनें बहुतांस भोगविलें कष्ट ॥ मुख्य देहबुद्धि अविद्यात्मक । अविद्या पराक्रमी साधी फार । तिची शक्ति फार मोठी । आत्मदर्शन न होऊं देई भेटी ॥ तिनें लोकांस घालून भ्रम । करवी वृथा साधनाचे श्रम ॥ माया भ्रमाचीच मूळ भ्रांति । समाधान न धरिती ॥ वासनारूपी स्फुरण । त्या मार्गानें मी आलों जाण ॥ वासना दृढ होऊन मी बद्धमार्गानें जातों । आणि जन्ममरणास पात्र होतों ॥ म्हणून जें जें दिसतें तें तें नासतें । हा बोध घेऊन चित्तीं । सज्जन लोक जगीं वर्तती ॥

३२५. नामाव्यतिरिक्त कांहीं । मातें न मानावें कोणींही ॥
जेथें नाम तेथें मी । हा भरंवसा बाळगून असावें तुम्ही ॥

# खरें सुख वस्तूंत अगर कल्पनेंत नसून तें भगवंतापाशींच आहे

२१ नोव्हेंबर

मनुष्याच्या ठिकाणीं जेवढी विशालता येईल तेवढे भेदभाव कमी होतात. एखादा मनुष्य तालुक्याच्या ठिकाणीं गेला, आणि त्याला तुम्ही कुठले असें विचारलें, तर तो आपल्या खेडेगावचे नांव सांगेल. जिल्ह्याच्या ठिकाणीं गेला तर तो तालुक्याचें नांव सांगेल, इलाख्याच्या ठिकाणीं गेला तर जिल्ह्याचें नांव सांगेल, तसें, दुसऱ्या प्रांतात गेला तर आपल्या इलाख्याचें नांव सांगेल, आणि परदेशात गेला तर आपल्या देशाचें नांव सांगेल. तसें, मनुष्य कोणत्याहि धर्माचा असला तरी सर्व धर्मांचें मूळ एकच असल्यामुळें, त्या मुळाशीं जो गेला त्याला सर्व धर्म सारखेंच. तरी पण एवढी विशाल दृष्टि येईपर्यंत, जो ज्या धर्मांत जन्माला आला त्या धर्माचें आचरण करणें हेंच हिताचें असतें.

सुख मिळविण्याच्या आपल्या सर्व कल्पना आज खोट्या ठरल्या आहेत. आपण प्रथम अशी कल्पना केली कीं, श्रीमंतीमध्यें सुख आहे, आणि त्याप्रमाणें रगड पैसा मिळविला तरी आपल्याला जर सुख मिळालें नाहीं, तर आपली कल्पना खोटी होती असें म्हणायला काय हरकत आहे ? एकच वस्तु एकाला सुखरूप वाटते तर दुसऱ्याला दुःखरूप वाटते; म्हणजे ती वस्तु मुळांत दोन्ही नाहीं. सुखरूप नाहीं किंवा दुःखरूपहि नाहीं. जी वस्तु आज आपल्याला सुखाची वाटते ती उद्यां तशी वाटेलच असें नाहीं. **आपली बुद्धि स्थिर नसल्यामुळें आपली कल्पनाहि स्थिर नाहीं**, म्हणून त्याच वस्तूमध्यें सुख आहे ही कल्पनादेखील खोटीच असली पाहिजे; ती तेवढी खरी आहे असें आपण कां म्हणावें ? जगातलीं आपलीं नातीं आपण कल्पनेनेंच लावतों, तीं नाहीं म्हणायला किंवा विसरायला आपणच तयार होतों. आपल्यावर संकट आलें कीं, आपल्याला पूर्वीच्या गोष्टी, नातीं, वगैरे गोड लागत नाहींत. त्या वेळीं आपल्याला चैन पडत नाहीं. हा सर्व कल्पनेचाच खेळ आहे. एका काट्यानें दुसरा कांटा काढावा आणि नंतर दोन्ही टाकून द्यावे, त्याप्रमाणें एका कल्पनेनें दुसरी कल्पना मारावी, आणि शेवटी दोन्ही कल्पना नाहींशा कराव्या. कल्पना करायचीच तर ती भगवंताविषयीं करूं या. भगवंत हा दाता आहे, त्राता आहे, सुख देणारा, आहे, अशी कल्पना आपण करूं या. त्यांत खरें हित आहे, आणि त्यानेंच संसार खरा सुखाचा होईल. कल्पनेचें खरेंखोटेंपण हें अनुभवानें कळतें; म्हणून अनुभवानंतर कल्पना थांबली पाहिजे. अशा रीतीनें कल्पना थांबल्यावर आणि वृत्ति स्थिर झाल्यावर तिला स्थिर वस्तूवर चिकटवून ठेवली पाहिजे. भगवंत ही अशी एकच स्थिर वस्तु आहे. "अमुक एक वस्तु मजपाशी आहे म्हणून मी सुखी आहें," या वृत्तीमध्यें राम नसून, कांहीं नसताना वृत्तीचें समाधान टिकलें पाहिजे, आणि वृत्ति भगवंतापाशीं स्थिर झाली पाहिजे, हेंच परमार्थाचें खरें मर्म आहे.

---

**३२६. जगातील आपलें समाधान अगर असमाधान, ज्या वृत्तीनें आपण जगाकडे पाहतो त्यावर अवलंबून आहे.**

# देवानें वाईट केलें ही खोटी समजूत मनांतून काढून टाका: देव अत्यंत मायाळू आहे.

२२ नोव्हेंबर

तुम्ही फार कष्ट करून इथें येतां, किती दगदग, किती त्रास तुम्हांला सोसावा लागतो ! बरें, येथें आल्यावर हाल काय कमी होतात ! परंतु इथें कशासाठीं आपण येतों, आपल्याला काय हवें आहे, हें आपल्याला कळतें का ! आपल्याला देव खरोखरच हवासा वाटतो कां ! त्याच्यावांचून आपलें नडतें का ! किंवा त्याची कधीं नड लागली आहे का ! याचा विचारच आपण फारसा करीत नाहीं. आपल्यावर कांहीं संकट आलें, किंबहुना आपलें कांहीं वाईट झालें, कीं आपण म्हणतो, देवानें असें कसें केलें ! असें म्हणणें यासारखें दुसरें पाप नाहीं. एक वेळ देवावर विश्वास न ठेवणारा माणूस यापेक्षा परवडला, कारण तो ' देवानें वाईट केलें ' असे तरी म्हणणार नाहीं. देव खरोखर अत्यंत मायाळू आहे. त्याला कुणाचेंहि दुःख सहन होत नाहीं. कोणत्या आईला आपल्या मुलाला दुःख कष्ट झालेले आवडेल ! म्हणून, देवानें माझें वाईट केलें ही खोटी समजूत प्रथम मनांतून काढून टाका.

द्रौपदीला जेव्हां वस्त्रहरणासाठीं दुर्योधनानें भरसभेंत खेचलें, तेव्हां, तिला वाटत होतें कीं, पांडवांना हें सहन होणार नाहीं, ते माझी विटंबना होऊं देणार नाहींत. ते दुर्योधनाची खांडोळी करतील. तिला पांडवांबद्दल विश्वास वाटत होता. दुर्योधनानें जेव्हां तिच्या पदराला हात घातला तेव्हां तिनें आशेनें धर्माकडे पाहिलें. धर्माला वाटलें, आतां विरोध केला तर आपलें सत्य उघडें पडेल, म्हणून त्यानें लाजेनें मान खालीं घातली. तीच स्थिति इतर पांडवांची झाली. हें कसलें अहंपणानें लडबडलेलें सत्य ! तेंच एक सत्य होय, कीं जें कर्म अहंपणा टाकून परोपकार बुद्धीनें केलें जातें. पुढें तिनें भीष्माचार्यांकडे आशेनें पाहिलें, परंतु त्यांनीहि मान खालीं घातली. तेव्हां मात्र तिनें जगाची आशा सोडली, आणि कळकळीनें परमात्मा श्रीकृष्णाला हाक मारली, आणि त्यानें अनेक वस्त्रें पुरवून तिची अब्रू रक्षण केली. पुढें तिला एकदां श्रीकृष्ण भेटला असतांना तिनें त्याला विचारलें की, "आधींच तूं माझ्या बचावासाठीं कां नाहीं धांवलास ! तो दुष्ट मला केंस धरून खेंचून नेत असतानाच कां नाहीं धांवलास !" तेव्हां श्रीकृष्ण म्हणाला, "त्याला माझा काय दोष ! मी तुझ्या रक्षणासाठीं आतुर होतों. परंतु तुला पांडवांची आणि इतरांची आशा होती, ते रक्षण करतील असे तुला वाटत होतें। मला दरवाजा खुला नव्हता, मग मी कसा येऊं ! तूं जगताची आशा सोडलीस आणि मला बोलावलेस, त्याबरोबर मी तुझ्या भेटीस धांवलों." जगाची आशा, आसक्ती सोडल्याशिवाय परमेश्वरास आपली हाक कशी पोंचेल ! ज्या गोष्टीवर आपलें प्रेम असतें त्याच गोष्टीची आपल्याला नड लागते. आपल्याला देवाची नड लागली आहे का ! देवाचें प्रेम लागायला त्याच्या अखंड सहवासात राहण्याची अत्यंत जरूरी आहे, आणि हा सहवास जर कशानें साधत असेल तर तो एक त्याचें नाम घेतल्यानेंच साधेल. भगवंताचें नाम घेऊन त्याचें प्रेम मिळवा, हेंच माझें सांगणें

१२७. मूल जसें आईच्या अंगावर नाचतें त्याप्रमाणें भगवंतापाशी मूल होऊन त्याचें प्रेम लुटावें.

# जो बुद्धीच्या पलीकडे आहे तो श्रद्धायुक्त अंतःकरणानें जाणतां येतो

२३ नोव्हेंबर

मनुष्याचा स्वभावच असा असतो कीं, आपल्याला कल्पनेंत जेवढें येतें तेवढेंच आपण सत्य मानतों. पण आपली कल्पनाच किती संकुचित असते याचा कोणी विचार करीत नाहीं. जो कल्पनेच्या पलीकडे आहे, जिथें कल्पना थांबते, ज्याला कल्पना बांधू शकत नाहीं, त्याला कल्पनेनें कसें ओळखतां येईल ? जो ज्ञानाच्या पलीकडे राहिला आहे त्याला माझ्या तोकड्या ज्ञानानें कसें अजमावतां येणार ? माझ्या बुद्धीच्या पलीकडे तो आहे, तेव्हां त्याच्या इच्छेनेंच त्याचें खरें ज्ञान होणार आहे. अविद्या ती हीच की, आपल्या कल्पनेनें होणारें ज्ञान हेंच खरें मानणें. याकरितां श्रद्धा आणि कल्पना यांतला फरक ओळखावा। खरी श्रद्धा हीच कीं जी कल्पनेच्या पलीकडे राहते. प्रल्हादाइतकें आपण नामाला सत्यत्व देत नाहीं. कल्पनेची मजल प्रल्हादानें नाहीं चालविली. कल्पनेच्याहि पलीकडल्या गोष्टी जर आपल्या यःकश्चित् संसारातसुद्धां घडतात तर भगवंत त्या कल्पनेच्या पलीकडे राहिला असें मानायला काय हरकत आहे ? सूर्यप्रकाश जसा सर्व ठिकाणीं भरलेला असतो, त्याप्रमाणें देवळांत, घरांत, तीर्थक्षेत्रांत, सर्व ठिकाणीं परमात्मा भरलेला आहे. परमात्मा फक्त विद्वानांचा किंवा श्रीमंतांचा नसून तो सर्वांचा आहे. भगवंत सर्वांचा आहे, म्हणूनच सर्वांना तो सुसाध्य असला पाहिजे. एखादा मोठा गणिती हिशोब लवकर करूं शकतो, परंतु खेडेगांवांतले अडाणी लोक गणित न शिकताहि हिशोब बरोबर करतात, आणि त्यांचा व्यवहार बरोबर चालतो. तसें, विद्वानाला कदाचित् भगवंत लवकर प्राप्त होईल, पण अडाणी माणसालादेखील तो प्राप्त होऊं शकेलच एक्स-रेच्या फोटोमध्यें जसें शरीराच्या आंतलें स्पष्ट दिसतें, एखादा बारीक ठिपका असेल तरी तो दिसतो, त्याप्रमाणें भगवंताची दृष्टीच अशी आहे कीं, त्याला आपलें अंतःकरण स्पष्ट दिसतें. तें जसें असेल त्याप्रमाणें भगवंत आपल्याला जवळ किंवा दूर करतो. मनुष्य जन्माला आला कीं सगळीं नातीं त्याला आपोआप येतात, त्याचप्रमाणें परमात्मा आनंदरूप आहे असें म्हटलें कीं बाकीचे सर्व गुण त्यामध्यें आले असें समजावें. जसा मारुतीमध्यें देवअंश होता तो आपल्यामध्येंहि आहे. त्यानें तो फुलविला, पण आपण झांकून तो विझवून टाकला, याला काय करावें ! मामलेदाराला बरोबर असलेल्या शिपायाची भीति वाटत नाहीं, चोराला मात्र त्याच्याबरोबर असलेल्या शिपायाची भीति वाटते। त्याचप्रमाणें भगवंत आपल्या पाठीमागें आहे ही जाणीव ज्याला असते त्याला उपाधीची भीती वाटत नाहीं. कारण ती त्याच्याच इच्छेनें आली आहे अशी त्याची खात्री असते. आपण आपलें मागील घडलेलें सर्व भगवंताला अर्पण करावें. मग पुढची जबाबदारी त्याच्यावर पडते.

---

१२८. भगवंताचे होण्यामधील सुलभता विलक्षण असते.

# संकटांना न घाबरतां उत्कट भावनेनें भगवंताची उपासना करावी

**२४ नोव्हेंबर**

विस्तव माहीत नसला तरी तो हाताला चुकूनहि लागला तरी हात भाजतो।
किंवा लोखंडाचा घण, हा परीस आहे हें माहीत नसूनहि त्यावर मारला
तरी त्याचें सोनें व्हायचें राहात नाहीं। त्याप्रमाणें ज्ञानाशिवाय नुसतें
भक्तीनें जरी भगवंताकडे गेलें तरी काम होतें. परंतु दुसऱ्या विषयांची आसक्ति जोंवर आपल्याला सुटत
नाहीं तोंवर मनापासूनची भगवद्भक्ति होत नाहीं. जिथें उत्कट भावना आहे तिथें सगुण मूर्तीला मनुष्य-
धर्म प्राप्त होतील, परंतु उपासकाची किंवा भक्ताची भावना नेहमीं तितकी उत्कट राहीलच असा नेम
नाहीं. म्हणून अशा उपासकाला मूर्तींमधील चैतन्याचा अनुभव येऊन देखील परमार्थिकदृष्ट्या फायदा
होईलच असें निश्चित नाहीं; उपासक देहाला विसरला कीं, उपास्यमूर्तीमध्यें त्याला जिवंतपणा
अनुभवाला येऊं लागेल. शिवाय, जे इतर लोक थोडे तन्मय झाले आहेत त्यांनादेखील तें
अनुभवाला येईल.

एक मुलानें काहीं खोडी केली म्हणून शेजारच्या बाईनें त्याला एक चापट मारली,
त्याबरोबर त्या मुलानें मोठें भोकाड पसरलें आणि त्या बाईला शिव्या दिल्या. तें ऐकून त्याची आई
बाहेर आली आणि तिनें त्याला चांगला झोडपला, परंतु आईच्या हातचा इतका मार खाऊनसुद्धा तो
मुलगा फार ओरडला नाहीं, आणि त्यानें आईला उलट शिव्या पण दिल्या नाहींत. हें जसें खरें,
त्याप्रमाणें आपल्यावर येणारी संकटें हीं भगवंतानें आणलीं आहेत अशी निष्ठा असेल तर आपल्याला
त्यांचा त्रास होईल, पण त्यांनीं आपली शांति बिघडणार नाहीं. भगवंताचा विसर आपल्याला पडला
कीं आपली शांति बिघडते. ज्या दातांनीं हत्ती मोठाले प्राणी मारतो त्याच दातांनीं तो आपल्या
पिल्लांना इजा न करतां उचलतो हें लक्षात असूं द्यावें. आपण निःपक्षपाती बुद्धीनें विचार केला तर
भगवंताचा मार्ग आपल्याला सापडेल. भगवंत हा सर्वांना साध्य आहे, फक्त काहीं न करणाऱ्याला तो
साध्य नाहीं आपल्याला जेवढें समजलें आहे तेवढें आपण आधीं करावें. मग पुढली माहिती
आपोआप मिळते. त्यामध्यें समाधान असावें, उगीच जास्त चिकित्सा करणें हें मीपणाचें आणि देह-
बुद्धीचें लक्षण आहे. ज्याला भगवंताचें सान्निध्य लाभलें त्यालाच निर्भयता आणि निर्वासना येईल.
प्रत्येक माणसाला आधार लागतो, पण आपण अपूर्णांचा आधार धरल्यामुळें आपल्याला निर्भयता येत
नाहीं। यासाठीं भगवंताचा आधार धरावा. बुद्धीनें निश्चय करावा आणि मन भगवंताकडे लावावें, कीं
इंद्रियें तिकडे बळजबरीनें जातीलच. भगवंतामध्यें जे मिसळतात ते परत येत नाहींत.

३२९. भगवंताकडे एकदा दृष्टि लागली कीं बाकीच्याचा त्याग आपोआप होतो.

# विषयांना शरण न जातां भगवंतास शरण जावें

२५ नोव्हेंबर

भगवंताचें अस्तित्व जिथें पाहावें तिथें आहे. भगवंताचें वर्म ओळखायला, मी कसें वागावें हें प्रथम पाहावें. भगवंत आहे कीं नाहीं हें जाणण्याकरितां आपल्याला बुद्धि दिली आहे. भगवंत निश्चित आहे हे कांहींना अनुमानानें कळलें. आपण त्यांचें आप्तवाक्य प्रमाण मानलें. भगवंताचें अस्तित्व जर निश्चित आहे तर त्याची ओळख तरी कशी करून घ्यावी ? खरोखर जन्ममरणापासून मुक्त होण्याचा जो मार्ग आपल्याला दाखवितो तो खरा आप्त. भगवंताला सर्वांत अधिक काय आवडतें हें संतांनीं सांगून टाकलें. तें म्हणजे " आपण विषय, वासना, इत्यादि सर्व कांहीं सोडून भगवंताला शरण जावें. " आपण नेहमींच विषयांना शरण जातों, मग भगवंताला शरण जायला भिण्याचें काय कारण ? भगवंताला जो शरण गेला त्याला जगाची भीतीच नाहीं उरत. सर्व चमत्कार करता येतात, पण भगवंताला शरण जाणें फार कठीण आहे. बीजगणितामध्यें उदाहरण सोडवितांना एक अज्ञात " क्ष " घ्यावा लागतो. उदाहरणाचें उत्तर येईपर्यंत त्या ' क्ष ' ची खरी किंमत काय आहे हें आपल्याला कळत नाहीं, पण तो घेतल्याशिवाय चालत नाहीं; त्याप्रमाणें जीवनाचें कोडें सोडविण्यासाठीं आज अज्ञात असा भगवंत आपल्याला गृहीत धरलाच पाहिजे. त्या भगवंताचें खरें स्वरूप जीवनाचें कोडें सुटेल त्या वेळीं आपल्याला कळेल.

आपण जिना चढतों तें जिन्यासाठीं नसून वरच्या मजल्यावर जाण्यासाठीं असतें. वरच्या मजल्यावर जाणें हें साध्य असून जिना हें त्याचें साधन आहे त्याप्रमाणें तीर्थयात्रा, व्रतें, नेमधर्म हीं साधनें असून परमेश्वरप्राप्ति हें आपलें साध्य आहे, पण परमेश्वरप्राप्ति बाजूलाच राहिली आणि आपण साधनालाच घट्ट धरून बसलों आहोंत, याला काय करावें ? मूळ भगवंत हा निर्गुण, निराकार आणि अव्यंग आहे, पण मनुष्य त्याला आपल्या कल्पनेमध्यें आणतो. आपल्या ठिकाणीं असणारे गुण पूर्णत्वानें त्या भगवंताच्या ठिकाणीं आहेत अशी आपण कल्पना करतो. याचा अर्थ असा कीं, आपण प्रथम भगवंताला जडामध्यें पाहतो, आणि मग त्याच्या नामाकडे जातों. भगवंतानें केलेली ही सृष्टि आहे तशीच सर्व जरूर आहे, तिच्यामध्यें बदल करायला नको; बदल आपल्यामध्यें करायला हवा. सृष्टि आपण घ्यावी कशी हें आपल्याला माहिती पाहिजे. आपलें सगळें जीवन जर भगवंताच्या हातामध्यें आहे, तर मग जीवनातल्या सर्व घडामोडी त्याच्याच हातांत आहेत यांत शंका कोणती ! झाडाच्या मुळांना पाणी घातलें की त्याच्या सर्व भागांना तें पोचतें, तसें, भगवंताचा विसर पडूं न दिला म्हणजे सर्व कांहीं बरोबर होतें. भगवंत हवासा वाटणें यामध्येंच सर्व मर्म आहे. कर्तेपणानें जे मरून गेले, तेच भगवंताचे होऊन राहिले.

---

३३०. जो झाला रामभक्त । तेथेंच माझा जीव गुंतत ।।
मला रामभक्ताविण कांहीं । सत्य सत्य जगीं कोणी नाहीं ।।

# घर हें मंदिराप्रमाणें आहे, तेथें वागतांना भगवंताचें अस्तित्व ध्यानांत ठेवून वागावें

**२६ नोव्हेंबर**

व्यावहारिक दृष्ट्या जास्त शिकलेला मनुष्य असमाधानी असायचाच. खऱ्या शिक्षणानें वृत्ति रुंदावली पाहिजे. आकुंचित वृत्तीच्या माणसाला समाधान मिळणें शक्य नाहीं. राम आपल्याला जरूरीपुरतें कुठेंहि देतो, म्हणून भगवंत देईल त्यात समाधानानें राहायला शिकावें. शक्य तों कोर्टाची पायरी चढण्याची वेळ येऊं नये. भांडण आपापसांतच मिटविण्याचा प्रयत्न करावा. सध्यांचा न्यायसुद्धा विचित्र आहे. खरें म्हटलें म्हणजे ज्याच्यावर अन्याय झाला आहे त्याला सरकारमध्यें न्याय मिळण्यासाठीं कांहींच खर्च येऊं नये; परंतु सध्या फिर्यादीलाच खर्च करावा लागतो, आणि आरोपी मात्र फुकट पिंजऱ्यात येतो ! पण या गोष्टींना इलाज नाहीं. ज्या काळामध्यें आणि परिस्थितीमध्यें आपण राहतो त्यासारखें वागणें जरूर आहे. घरात देवाची उपासना करावी. खरें म्हणजे ज्या गावात मारुति नाहीं त्या गावांत राहूंच नये. मारुति गांवात नसेल तर निदान आपल्या घरीं तरी ठेवावा. घर हें मंदिराप्रमाणें असावें. मंदिरात आल्यावर भगवंताचें अस्तित्व भासलें पाहिजे. मंदिरात येणाऱ्या लोकांना वेळेला भीक मागूनहि आपण खायला घालावें, पण आपण स्वतः मात्र आहे त्यात समाधान मानून राहिलें पाहिजे. आपल्याकडे जो येईल त्याला आपल्यातील अर्धे द्यावें. अशा रीतीनें जो मंदिरात राहील, त्याला भगवंताचा आशीर्वाद आहेच. जें हक्काचें आणि खात्रीनें येणारें असतें त्याला उत्पन्न असें म्हणतात. मंदिराला उत्पन्न असूं नये; त्यामुळें भगवंताच्या निष्ठेला उणीव येते. परान्न म्हणजे दुसऱ्यानें मिळविलेलें अन्न. आपण घरीं जें अन्न खातों तें देखील परान्नच आहे, कारण अन्नदाता परमात्माच आहे. त्याचें स्मरण ठेवून अन्न खावें. चवीला बळी न पडतां जरूर असेल तेव्हां आणि तेवढेंच खाणें याचें नांव सात्त्विक आहार होय. मुख्य म्हणजे प्रत्येक गोष्टींत भगवंताची आठवण राहिली पाहिजे, मग तें खाणें, पिणें, गाणें, बजावणें, हिंडणें कांहींहि असो. गायनामध्यें ठरलेल्या सुरांत शब्द म्हणायचे असतात, त्यामध्यें भगवंताची आठवण राहणें कठीण असतें. गायन हें करमणुकीकरितां असलें तरी भगवंताला अशा प्रेमानें आळवावें कीं त्याच्या डोळ्यात पाणी यावें. भगवंताच्या प्रेमाचा रंग पांढरा आहे. आपला रंग कुठलाहि का असेना, भगवंताच्या प्रेमाच्या रंगांत तो सहज मिसळून गेला पाहिजे. रावणानें शत्रु म्हणून, भरतानें भाऊ म्हणून, सीतामाईनें पति म्हणून, बिभीषणानें मित्र म्हणून, हनुमंतानें दास म्हणून, भगवंताला आपलासा करून घेतलाच. भगवंताच्या नामांत राहिल्यावर भगवंताला आपलेंसें करून घेण्याकरितां निराळें कांहीं करण्याची जरुरी नसते. भगवंताचें प्रेम एकदा चिकटलें कीं, त्याच्या आड दुसरें कांहीं येऊं शकत नाहीं. जसें आई व मुलाचें प्रेम असतें तसें भगवंताचें प्रेम लावावें.

३३१. नामापरतें न माना सुख । हाच माझा आशीर्वाद ॥
माना माझे बोल सत्य । कृपा करील खास भगवंत ॥

# भगवंताच्या निर्गुण स्वरूपाची ओळख करून घेऊन सगुणोपासनेंत राहावें

२७ नोव्हेंबर

समजा, आपल्याला एका गांवाला जायचें आहे. त्या गावाला जाणारी आगगाडी ही पहिल्यानें खरी धरून आपण तिची संगति करतों. आपलें गांव आलें कीं आपण गाडी सोडतों. हें जसें खरें, त्याचप्रमाणें, निर्गुण हें आपलें साध्य असलें तरी आज आपल्याला सगुणच खरें मानून त्याची संगति केली पाहिजे. निर्गुणाशिवाय सगुण खरें नाहीं ही गोष्ट खरी, पण सगुण खरें धरून चालल्याशिवाय निर्गुणापर्यंत पोंचता येणार नाहीं हेंहि तितकेंच खरें. **म्हणून सगुणोपासनेंत स्वतःचा विसर पडला कीं, एकीकडे "मी" नाहींसा होतों आणि दुसरीकडे देव नाहींसा होतो, आणि शेवटीं परमात्मा शिल्लक उरतो.** परंतु ताप आलेल्या माणसाला ज्याप्रमाणें सर्व कडूच लागतें, त्याप्रमाणें आमची वृत्ति विषयाकार झालेली, तिला सगुण, निर्गुण, दोन्ही कुठें गोड लागतात ? म्हणूनच आपण निर्गुणाची ओळख करून सगुणात राहावें. स्वतःचा विसर जर रामाच्या पूजनात पडूं लागला तर निर्गुण आणखी कोणतें दुसरें राहिलें ? सगुणाशिवाय निर्गुण उपासना करतो म्हणतो त्याला त्याचें वर्मच नाहीं कळलें. वस्तुतः तो सगुण उपासनाच करीत असतो, पण त्याचें त्यालाच नाहीं कळत. स्थलात आणि कालात जे देवाला आणतात त्यांनीं त्याला सगुणात नाहीं आणलें या म्हणण्यात काय अर्थ आहे ?

परमार्थाविषयीं आपल्या कांहीं विचित्र कल्पना असतात, अगदीं अडाणीपणा पत्करला, पण हें विपरीत ज्ञान नको. सूर्य हा आपल्या आधीं होता, तो आज आहे, आणि तो पुढेंहि राहणार आहे तो नेहमींचाच असल्यामुळें त्याचें अस्तित्व आपल्या ध्यानात येत नाहीं, त्याच्याकडे आपण दुर्लक्ष करतों. भगवंताच्या बाबतींत आपलें असेंच घडतें. एखादा नास्तिक जर म्हणाला कीं, "देव नाहींच; तो कुठें आहे हें दाखवा," तर त्याला असें उत्तर देऊन अडविता येईल कीं, "देव कुठें नाहीं तें दाखवा." पण हा उत्तम मार्ग नव्हे. देव नाहीं असें म्हणायलासुद्धा त्या स्वरूपाचें कांहींतरी आहे, ही जाणीव असतेच; फक्त तो त्याला निरनिराळी नावें देतो. निसर्ग, शक्ति, सत्ता, अशीं नावें देऊन तो त्याचें अस्तित्व मान्य करतो, पण देव नाहीं असें म्हणतो. जें आहे असें त्याला वाटतें तोच देव समजावा. खरोखर, मनुष्याला जितकें ज्ञान असतें तितकें लिहिता येत नाहीं; जितकें लिहिलेलें असतें तितकें वाचणाऱ्याला समजत नाहीं; त्याला जितकें समजलेलें असतें तितकें सांगता येत नाहीं; आणि ऐकणाऱ्याला, तो जितकें सांगतो तितकें कळत नाहीं. म्हणून मूळ वस्तूचें वर्णन स्वतः अनुभव घेऊनच समजावें. भूतकाळ आणि भविष्यकाळ हे जर आपल्या हातात नाहींत, तर वर्तमानकाळ तरी आपल्या हातात कसा असेल ? म्हणून परमात्मा कर्ता आहे असें समजून आपण आजचें कर्तव्य करीत राहावें. साधन व वाचन असलें कीं, साधक कधीं मागें पडायचा नाहीं.

---

३३२. जो भगवंतावर निष्ठा ठेवील त्याच्यावर जगाची निष्ठा बसेल.

# भगवंतास पाहण्यास स्वांतर शुद्ध करावें

२८ नोव्हेंबर

" अंते मतिः सा गतिः " असें आपल्यांत एक वचन आहे. जन्माचें खरें कारण शोधून पाहिलें तर आपल्याला हेंच आढळेल कीं, वासनेमुळें जन्माच्या फेऱ्यांत आपण सापडलो. जन्माच्या पाठीमागें मरण हें ठेवलेलेंच असतें. जन्म–मरणाचा शोध सतत चाललेला आहे, वासना आधीं का जन्म आधीं या वादात पडणें म्हणजे बीज आधीं का झाड आधीं यासारख्या जगाच्या अंतापर्यंत कधीं न सुटणाऱ्या प्रश्नाबद्दल काथ्याकूट करणें होय. आपल्याला नडतें कुठें तें पाहावें. विषयांतच आम्हीं गुंतून राहतों तें सोडावें. असत्यांतूनच सत्य कसें जाणता येईल तें पाहावें. इथून कुणीतरी गेलें असें सावलीवरून आपण म्हणतो. त्याप्रमाणें ही जगत्‌रूप सावलीच आहे, तिला असणारें खऱ्याचें अधिष्ठान जो ईश्वर त्याला आपण जाणून घेण्याचा प्रयत्न करूं या. आपल्या डोळ्यांवर विषयाची धुंदी असल्यामुळें सर्व ठिकाणीं भरलेला भगवंत आपल्याला नाहीं पाहता येत. त्याला पाहण्यासाठीं दृष्टि निराळी करावी लागते. आपण आपलें अंतरंग साफ केलें तर तशी दृष्टि येते. आपण कोणा स्त्रीकडे पाहूं लागलो तर आपली जशी वृत्ति असेल तशी ती दिसतें. कामी असेल त्याला ती तशी दिसूं लागेल, आणि सात्त्विक असेल त्याला ती मातुःश्रीच दिसूं लागेल. म्हणून काय कीं, जोंपर्यंत आपलें अंतःकरण शुद्ध नाहीं तोंपर्यंत आपल्याला सर्वत्र भगवंत दिसणार नाहीं. भगवंत सर्व ठिकाणीं पाहतांना, तो आपल्यांतहि आहे हें पाहिलें पाहिजे. जोंपर्यंत भगवंत आपल्यांत आहे हें दिसून येत नाहीं. तोंपर्यंत तो इतरांत असलेला आपल्याला दिसणार नाहीं. म्हणून भगवंत सदासर्वकाळ आपल्यांत आहे हें पाहूं लागलें पाहिजे. याकरितां सद्‌गुरु सांगेल तसें वागावें, त्यामुळें आपला अभिमान नाहींसा होतो. **संतांचा थोडासा कटाक्ष जो कर्ममार्गावर आहे तो याचकरितां कीं कर्म करण्यानें अभिमान येतो, आणि त्या उलट गुरुआज्ञेत वागल्यानें तोच अभिमान नाहींसा होतो.** इथें अशी शंका वाटेल कीं, गुरु तरी नामस्मरण करायलाच सांगतात, म्हणजे कर्म आलेंच ना! वैद्यानें एका रोग्याला सांगितलें कीं तूं कांहीं खाऊं नकोस. त्याला वैद्यानें औषधाच्या तीन पुड्या दिल्या, आणि या तीन वेळा घे म्हणून सांगितलें. त्यावर तो रोगी म्हणाला, " तुम्ही कांहीं खाऊं नका म्हणतां, आणि या पुड्या घ्या म्हणून सांगतां हें कसें ! " त्यावर वैद्यानें सांगितलें कीं, " पूर्वी जें जें अजीर्ण झालें आहे त्याचा नाश करण्यासाठीं या पुड्या उपयोगी आहेत. " त्याप्रमाणें गुरु आपल्याला नामस्मरण करायला सांगतात तें पूर्वीचा विषयाचा अनुभव नष्ट करण्यास्तव. जो आपली विषयवासना कमी करून आपल्यामध्यें नामाचें प्रेम उत्पन्न करील तोच खरा सद्‌गुरु होय. चांगल्या संताच्या पदरांत पडावें की तो आपली लाज राखतो.

---

३३२. मासें ज्यानें न्हावें । त्यानें राम जोडून घ्यावें ॥
शेवटीं मागणें तुम्हां एकच पाहीं । नामावांचून दूर कधीं न राहीं ॥

# भगवंताचा आधार नसतांना श्रीमंत, सत्तावान्, वैभववान् माणसें सुखी असतात, हा केवळ भ्रम आहे

**२९ नोव्हेंबर**

कोणत्याहि कर्माची सुरुवात हेतूपासून म्हणजे वासनेपासून होत असते. जन्म हा देखील वासनेंतून निर्माण होतो. गंगेचा उगम अत्यंत पवित्र आणि लहान असला तरी स्वच्छ असतो, त्याप्रमाणें आपला जन्म वासनेंत झाला असला तरी सुरुवातीला मूळ स्वरूप निर्मळ असतें. याच वेळीं आई लहान मुलाला शिकविते, "देवा. चांगली बुद्धि दे" पुढें या निर्मळ मनावर निरनिराळ्या बऱ्यावाईट वासनांचे पगडे बसूं लागतात. गंगेचें पाणी जसें पुढें पुढें वाहात गेल्यानें गढूळ होतें, आणि तें स्वच्छ करण्यासाठीं आपण ज्याप्रमाणें तुरटी लावतों, त्याप्रमाणें वासनेचा गढूळपणा घालविण्यासाठीं 'राम कर्ता' ही भावना दृढ करायला पाहिजे. **भगवंताच्या नामाची तुरटी फिरल्यानें वासनेचा साका खालीं राहून शुद्ध अंतःकरण प्रकट होईल.** गेल्या जन्मांत मीं जीं कांहीं पापें केलीं असतील तीं आता भोगतों आहे असें नुसतें म्हणून जगण्यात अर्थ नाहीं; त्यामुळें आपण पुढच्या जन्माची तयारीच करीत असतों. जर पुढचा जन्म चुकवायचा असेल तर या जन्मींच त्यासाठीं कार्य करायला पाहिजे, म्हणजेच ती वासना नष्ट केली पाहिजे. एकदा एक बाई देवळाच्या दारात मांडीवर एक गोजिरवाणें मूल घेऊन बसली होती. मूल फारच बाळसेदार आणि सुरेख दिसत होतें, परंतु त्याला मांडीवर घेऊन बसलेली त्याची आई रडत होती. तिच्याकडे पाहून एक बाई म्हणाली कीं, "इतकें सुंदर मूल देवानें दिलें असतांना तूं रडतेस काय?" तेव्हा ती बाई म्हणाली, "काय सांगूं! हें बाळसें नाहीं, मुलाच्या सर्व अंगावर सूज आली आहे!" तसें आपलें प्रापंचिक सुख आहे. तें दिसण्यात वरवर बाळसेदार दिसतें, परंतु ती सूज आहे, तें कांहीं खरें बाळसें नाहीं. म्हणूनच आपल्याला प्रपंचात सुख लाभत नाहीं. सत्तावान्, श्रीमंत, वैभववान् माणसें सुखीं असतात हा नुसता भ्रम आहे. जोपर्यंत यांना भगवंताचा आधार नसतो तोपर्यंत या सर्व गोष्टी कुचकामाच्या आहेत; आपलें वय जसजसें वाढत जातें, तसतसे आपले व्याप वाढतात आणि परमेश्वराकडे दुर्लक्ष होतें, वासना कमी होण्याऐवजी वाढत जाते, आणि तीच पुढल्या जन्माची अधिष्ठात्री ठरते. तेव्हा यांतून कांहींतरी मार्ग वेळेलाच काढणें आवश्यक आहे. हा मार्ग अगदीं सरळ आणि सोपा आहे. संतांनीं तो अनेक वेळा दाखवून दिला आहे. त्या मार्गानें पावलें टाका, भगवंत पुढला मार्ग दाखवायला उत्सुक आहे. तुम्ही थोडीतरी गोडी दाखवा, निश्चय दाखवा, तळमळ दाखवा, पुढची जबाबदारी भगवंताकडे आहे. तुम्हाला हें सर्व पटलें असें म्हणता, परंतु पटलें असून करीत मात्र नाहीं, बरें, पटलें नाहीं म्हणावें तर का पटलें नाहीं तेंहि सांगत नाहीं, याला काय करावें? मनुष्याच्या ठिकाणीं इतर प्राणिमात्रांपेक्षा जर कांहीं जास्त असेल तर तें म्हणजे चांगलेंवाईट कळण्याची बुद्धि. तेव्हा तुमच्या बुद्धीला पटूनहि जर तुम्ही तसें वागला नाहीं किंवा नुसता प्रयत्नहि केला नाहीं, तर तो दोष सर्वस्वी तुमचाच! म्हणून मला पुनः सांगावेसें वाटतें कीं, वेळेलाच जागे होऊन योग्य रस्त्याला लागा. भगवंताच्या नामांत राहून सर्व काय तें करा हेंच माझें शेवटचें सांगणें आहे.

---

३३४. मी तुम्हाला सोडून दूर । ऐसे न वाटूं द्यावें पळभर ॥
होईल तेवढें घ्यावें नाम । सदा राखावें समाधान ॥

# जी स्थिति रामानें दिली । ती म्हणावी आपण भली

**३० नोव्हेंबर**

मंगलांत मंगल शुद्धांत शुद्ध जाण । एक परमात्म्याचें अनुसंधान ॥ हें बीज लावलें ज्यांनीं । धन्य धन्य झाले जनीं ॥ अचूक प्रयत्न तोच जाण । प्रयत्नांत न चुकतें अनुसंधान ॥ सत्य करावें भगवंताचें अनुसंधान । जेणें दूर होईल मीपण ॥ बाह्यवेषानें कसाहि नटला । जगाला भुलविता झाला । तरी जोंवर नाहीं चित्त स्थिर । कसा पावेल रघुवीर ? म्हणून शक्य तों राखावें अनुसंधान । चित्तांत परमात्मा सांठवून जाण ॥ मीपणाचा नाश । भगवंताचे अनुसंधानाशिवाय घडत नाहीं । हा ठेवावा विश्वास । श्रीराम कृपा करील खास ॥ मी माझें म्हणून सर्व कांहीं करीत जावें । परी भगवंतापासून चित्त दूर न करावें ॥ मारुतिरायाचें घ्यावें दर्शन । अभिषेकानें घालावें स्नान । त्याच्याच कृपेनें राखावें अनुसंधान ॥ लोभ्याचें चित्तीं धन । तैसें राखावें अनुसंधान ॥ शक्य तों भगवंताचें राखावें अनुसंधान । जो आनंदाचें निधान । दूर गेला प्राणी । परत येण्याची वेळ ठेवी मनीं । तैसें राहणें आहे जगांत ॥ मी परमात्म्याचा होण्याचा ठेवावा हेतू । म्हणून न सोडावें अनुसंधान । कशापेक्षांहि जास्ती करावें जतन ॥ शक्य तों राखावें अनुसंधान । त्यांत अणुमात्र नसे विघ्न जाण ॥ कोणाचेंच न दुखवावें अंतःकरण । व्यवहार करीत असावा जतन । व्यवहारांतील मान अपमान । हे टाकावे गिळून । अखंड राखावें रामाचें अनुसंधान । जेणें सदाचरणाकडे लागेल वळण ॥ माझें नातेंगोतें राम । हा भाव ठेवून जावें रामास शरण । हें ऐका माझें वचन । मनानें व्हावें रामार्पण ॥ अनन्य व्हावें भगवंतीं । जो कृपेची साक्षात् मूर्ती ॥ रामा आतां करणें नाहीं उरलें जाण । तुला आलों मी अनन्य शरण । ऐसी ठेवा मनाचीं ठेवण । कृपा करील रघुनंदन ॥ आतां याहून दुजें लिहिणें कांहीं । सत्य सत्य उरलें नाहीं । आनंदरूप परमात्मा जाण । त्यास व्हावें अनन्य शरण ॥ आपलें कर्तेपण टाकावें । म्हणजे रामाला शरण जातां येतें ॥ ज्यानें धरलें भगवंताचे पाय । तोच त्याला झाला उपाय ॥ मी आतां झालों रामाचा । त्याला अर्पावी सर्व चिंता ॥ मी ज्याचा झालों त्याला माझी काळजी । हा ठेवावा भाव चित्तीं ॥ माझें हित तो जाणें । हें जाणून स्वस्थचि राहणें । विषयवासना सुटण्यास उपाय जाण । आपण जावें रामास शरण ॥ जें जें करणें आपले हातीं । तें करून न झाली शांति । आतां शरण जावें रघुपति ॥ जावें रघुनाथास शरण । तोच दुःख करील निवारण ॥ एक राम माझा धनी । त्याहून दुजें आपलें न आणी मनीं ॥ अभिमानरहित जावें रामाला शरण । त्यानेंच राम होईल आपला जाण ॥ आतां जगांत माझें नाहीं कोणी । एका प्रभूरामावांचूनी । निर्धार ठेवा मनीं । शरण जावें राघवचरणीं । जें जें केलें आजवर आपण । तें तें रामास करावें अर्पण ॥ जें जें होतें तें राम करी । तेंच स्वभावें होय हितकारी । म्हणून जी स्थिति रामानें दिली । ती मानावी आपण भली ॥ गंगेच्या प्रवाहांत पडलें । गंगा नेईल तिकडे गेलें । गंगा जाते योग्य ठिकाणीं । याचें जाणें सहजासहजीं ॥ तैसें असावें भगवंताचें स्मरणांत । राम ठेवील त्यांत मानावें हित ॥ सर्व जगत ज्यानें जाणलें मिथ्या । हें जाणून शरण जावें रघुनाथा ॥ कारण परमात्म्याला जाणें शरण । याहून दुजा मार्ग न उरला जाण ॥ धन्य तो व्यावहारिक जाण । जेणें केलें रामास स्वतःला अर्पण ॥

---

३३५. रामापरतें सत्य नाहीं । श्रुतिस्मृति सांगतात हेंच पाहीं ॥
रामसत्तेवीण न हाले पान । हें सर्व जाणती थोर लहान ॥

# जगाला न सुधारतां प्रत्येकानें प्रथम स्वतःलाच सुधारावें व नामांत राहावें

**१ डिसेंबर**

भगवंत असण्याची जी स्थिति तिचें नाव भक्ति, आणि " हा सर्व विस्तार माझा नाहीं," या बुद्धीनें त्यामध्यें राहणें याचें नांव वैराग्य. " प्रयत्नांतीं परमेश्वर " या म्हणीचा अर्थ असा आहे कीं, प्रयत्न करणें हें आपलें कर्तव्य आहे, परंतु त्यांत यश देणें न देणें हें देवाच्या इच्छेवर सोंपवून आपण मनानें शांत राहावें. फलाची आशा न करता सत्कार्य करणें हें भक्तीचें लक्षण आहे, आणि कर्तव्याच्या आड येणारी प्रत्येक गोष्ट बाजूला सारणें हें वैराग्याचें लक्षण आहे. देहसुखाची अनासक्ति किंवा ' हवें-नको ' पण टाकणें म्हणजेच वैराग्य. आसक्ति न ठेवतां कर्तव्याच्या गोष्टी करणें ही तपश्चर्याच आहे. देहाची आसक्ति विषय मिळावा म्हणून केली तर काय उपयोग ? इतकी तपश्चर्या केली पण तिच्यामुळें अभिमानाची वृद्धि झाली, मग हातीं काय आलें ? खटपटीशिवाय दत्तक मुलाला सर्व मिळतें तर वारसाला शाबीत करावें लागतें; त्याप्रमाणें विषयाकरितां नाहीं खटपट करावी लागत, निर्विषयासाठीं करावी लागते. कांहींच न करणें सर्वांत कठीण आहे, हें एक भक्तालाच साधतें. जगांतले सर्व लोक सुखासाठीं प्रयत्न करीत आहेत. शास्त्राचें पुष्कळ संशोधन होऊन इतकी सुधारणा झाली, त्यामुळे देहसुख पुष्कळ वाढलें, पण मानव सुखी झाला नाहीं. आजारी माणसाचा ताप जोंपर्यंत निवत नाहीं तोंपर्यंत त्यांचा रोग बरा झाला नाहीं; त्याचप्रमाणें मानव दुःखी झाला नाहीं तोंपर्यंत खरी सुधारणा झाली नाहीं असें समजावें. सध्यां जगाला सुधारण्याचा आणि जगावर उपकार करण्याचा काळ राहिलेला नाहीं, प्रत्येकानें आपल्याला तेवढें सांभाळावें. भगवंताचें अनुसंधान चुकूं देऊं नये. मग मात्र त्याला धोका नाहीं. जिथें आपणच दिवस गोड करून घ्यायचा आहे तिथें रोजच दसरा कां न करावा ! मनापासून एखादी गोष्ट हवी असें वाटणें म्हणजे त्या वस्तूचा संग होय. मागणें मागावें ही बुद्धीच न राहावी. मी भगवंताचाच झालों असें म्हणावें आणि त्याच्या जवळ काहीं मागावें, हा विलगपणाच झाला ! भगवंताजवळ कांहीं मागावें लागलें तर मग ' भगवंत सर्व कांहीं जाणतो ' या म्हणण्यांत काय अर्थ ? मला आज मिळालें ते त्याच्या इच्छेनें मिळालें नसेल असें आपल्याला वाटतें. मला हवें असें वाटतें तें प्रथम दूर करावें. भगवंताला प्रसन्न करून घेऊन नाशिवंत वस्तु मागितली तर काय उपयोग ? देणें-घेणें यांत पूर्तता कधींच आली नाहीं. नामावर प्रल्हादानें जशी निष्ठा ठेवली तशी आपण ठेवावी. त्यानें नाम श्रद्धेनें घेतलें आणि निर्विषय होण्याकरितां घेतलें. आपण तें विषयासाठीं घेऊं नये. देह असावा आणि त्याचें दुखणें नको असें म्हणून कसें चालेल ? खरें म्हणजे जाणीवेंत किंवा आसक्तींत सुखदुःख आहे. गाढ निद्रा लागली आणि दुसऱ्याला कांहीं झालें, तर मला कुठें त्याचें कांहीं वाटतें ! नामापरतें दुसरें कांही नाहीं हें समजावें. जगांत भगवंतावांचून सत्य वस्तु नाहीं; ही ज्याची निष्ठा तोच खरा योगी, ज्ञानी, आणि परमार्थी समजावा.

---

३३६. दुःखाचा हर्ता व सुखाचा कर्ता । परमात्म्यावांचून नाहीं कोणी परता ॥
रामाविण सत्य कांहीं । सत्य सत्य आण दुजें नाहीं ॥

# आपण देवाचेच आहोंत असें वाटण्यास त्याचें अखंड नाम घ्यावें

**२ डिसेंबर**

देवाच्या आड काय बरें असतें ? आपल्याला देवाची प्राप्ति होत नाहीं याला वास्तविक आपणच कारण असतों. आपण लोकांना त्याबद्दल दोष देत असतों, पण इतर लोक त्याच्या आड येत नसून आपण स्वतःच आड येत असतों, हें थोडा विचार केला असतांना समजून येईल. आपल्याला नामस्मरण करण्यात कोण बरें व्यत्यय आणतो ? ज्याला आपण आपलें म्हणायला पाहिजे होतें, त्याला न म्हणता आपण दुसऱ्याच कुणाला तरी आपलें म्हणत असतो. आपला मुलगा, बायको, भाऊ या सर्वांना आपलें म्हणत असतो. हे सर्वजण कांहीं मर्यादेपर्यंत आपले असतात; परंतु देवाला जर आपण आपलें म्हटलें तर तो सदासर्वकाळ आपलाच असतो आणि आपल्याला तो मदत करायला तयार असतो. तुम्हां सर्वांना द्रौपदीची गोष्ट माहीत आहे ना ? तिला जेव्हां दुर्योधनानें सभेंत आणली तेव्हां जोंपर्यंत तिला आपले भ्रतार आहेत ते माझे रक्षण करतील असें वाटत होतें, तोंपर्यंत श्रीकृष्णाला तिच्याकरितां कांहीं करता आलें नाहीं; परंतु त्या कोणाकडून कांहीं होणें शक्य नाहीं असें जेव्हां तिला दिसलें तेव्हा तिनें श्रीकृष्णाचा धांवा केला. आणि आतां तुझ्याशिवाय मला कुणी नाहीं असें अनन्यतेनें तिला वाटलें, तेव्हांच श्रीकृष्ण तिच्याकरितां धांवून आले. म्हणजे काय कीं, आपण ज्याला आपलें म्हणत असतों तें खरें आपलें नसून आपण परमात्म्याला आपलें म्हणावें. 'मी त्याचा आहें' अशी सदासर्वकाळ आठवण ठेवावी, आणि जें जें घडत असतें तें तें सर्व त्याच्याच इच्छेनें होत असतें ही भावना ठेवावी. अशी भावना होण्याकरितां आपण त्याची उपासना करायला पाहिजे. उपासना करणें म्हणजे तरी काय ! आपण देवाचे आहोंत, आपण नेहमीं त्याच्या सान्निध्यात आहोंत, असें वाटणें. असें वाटण्याकरितां त्याच्या नामस्मरणांत राहणें जरूर आहे. आपण त्याच्या नामस्मरणांत राहिलें म्हणजे तो सदासर्वकाळ आपल्याजवळ राहतो. तुम्हीं कुणाचें नाव घेतलें म्हणजे त्याची मूर्ति जशी तुमच्या ध्यानांत येते, त्याप्रमाणें देवाचें नांव घेतलेंत म्हणजे तो तुमच्याजवळ असतो. देव कसा आहे हें विचारलें तर कसें सांगता येईल ? तर तो नामांत आहे हें प्रत्यक्ष श्रीकृष्णानींच सांगितलें आहे. नाम हेंच त्याचें रूप, म्हणून नामस्मरण केलें म्हणजे देवाला तुमच्याजवळ येणेंच भाग पडतें. हें नामस्मरण कसें करावें ? समर्थांनीं सांगितलें कीं, कांहींच न करोनि प्राणी । रामनाम जपे वाणी ।। तेणें संतुष्ट चक्रपाणी । भक्तालागीं सांभाळी ।। आपण नाम घेतांना कांहींच करीत नाहीं का ? तर आपण त्या वेळीं संसाराची काळजी करीत असतोंच कीं नाहीं ! म्हणजेच आपण त्या वेळीं आपला मीपणा ठेवून नामस्मरण करीत असतो ! म्हणून मीपणारहित जो नामस्मरण करील त्यालाच देव सांभाळीत असतो, आणि असा जो स्वस्थ राहील त्याचा योगक्षेम देव चालवीत असतो.

---

३३७. प्रयत्नेवीण राहों नये । फळाची आशा ठेवूं नये ।।
भगवंताला विसरूं नये । कर्तव्यदृष्टीनें कार्य करण्यास चुकूं नये ।।

# नामांत मन रंगून देहाचा पूर्ण विसर पडतो त्यावेळीं भगवंताचें दर्शन घडतें

**३ डिसेंबर**

बाळांनो ! ज्याच्यावर कुणाची सत्ता चालत नाहीं, जो कधीं कुणापासून लांच घेत नाहीं, जो गेलेला कधीं परत येत नाहीं, जो जात असतांना कुणाला कळत नाहीं, जो किती गेला आणि किती उरला हें कुणाला सांगतां येत नाहीं, आणि जो भगवंताशिवाय कुणाला भीत नाहीं, असा काळ आजपर्यंत कुणालाहि चुकला नाहीं. ज्या काळाच्या सत्तेनें वस्तु आकार धरते, त्याच काळाच्या सत्तेनें ती अकस्मात् मोडली जाते. सर्व दृश्य वस्तूंना हा नियम लागू आहे. मग आपला देह त्यांतून कसा सुटेल ? पण ज्यानें भगवंत घट्ट धरून ठेवला, त्याचा देह राहिला किंवा गेला, तरी त्याच्या अवस्थेमध्यें फरक नाहीं पडला. भगवंत आकारानें नाहींसा झाला, परंतु नामरूपानें जगांत शिल्लक उरला. म्हणून यापुढें कुणी सांगणारा भेटो वा न भेटो, तुम्हीं सर्वांनीं नाम घेतल्याशिवाय राहूं नये. **जो भगवंताचें नाम घेईल त्याचें राम कल्याण करील, हें माझें सांगणें खरें माना.** प्रपंच लक्ष देऊन करा, परंतु त्यामध्यें भगवंताला विसरूं नका, हाच माझा अट्टाहास आहे. त्याच्या स्मरणात सर्वांनीं आनंदात दिवस घालवा. नाम हें रामबाणाप्रमाणेंच आहे. रामबाण म्हणजे बरोबर काम करणारा बाण, आपल्या लक्ष्यावर अचूक जाणारा तो बाण पुनः परत येऊन भात्यामध्यें बसत असे. रामनाम हें रामाच्या जवळ राहणारें आणि अचूक रामाकडे नेणारें एकमेव साधन आहे. खरोखर नामस्मरणाचा अभ्यास एका दृष्टीनें फार सोपा आहे. त्याला कोणतीहि उपाधि लागत नाहीं, त्याला काळवेळ नाहीं, त्याला स्थलाचें आणि देहाच्या अवस्थेचें बंधन नाहीं. जोंपर्यंत जीवाला शुद्धि आहे, तोंपर्यंत नाम घेतां येतें. पण दुसऱ्या दृष्टीनें नामस्मरणाचा अभ्यास कठीण आहे. नामाला स्वतःची अशी चव नाहीं, म्हणून जरा नामस्मरण केलें कीं त्याचा कंटाळा येतो. उपाधि असल्याशिवाय आपल्या मनाला चैन पडत नाहीं, उपाधिमध्यें मन रमतें. यासाठीं नामांत रंगणें ही मोठी भाग्याची गोष्ट आहे. ज्याचें मन नामांत रंगूं लागलें त्याला स्वतःचा विसर पडूं लागला असें समजावें, ज्याचें चित्त पूर्णपणें नामांत रंगलें तो स्वतःला पूर्णपणें विसरतो, आणि त्याला भगवंताचें दर्शन घडतें. नामाची चटक लागली पाहिजे. ती चटक एकदां लागली म्हणजे जगामधली सर्व ऐश्वर्यें तुच्छ वाटतील. हा बाजार मी मांडून बसलों आहे तो त्यासाठींच आहे. प्रत्येकाला नामाची चटक लागावी म्हणून माझा प्रयत्न सारखा चालूं आहे. कुणी तरी त्याचा अनुभव घ्यायला तयार व्हा. राम त्याच्या पाठीमागें उभा आहे याची खात्री बाळगा आणि सर्वांनीं मनापासून नाम घ्या, हाच माझा सर्वांना आशीर्वाद.

---

३३८. प्रेमानें वागावें सर्वांशीं । सुख राहे निःस्वार्थापाशीं ॥
ज्या घरांत राहते शांति । त्या घरांत भगवंताची वसति ॥

# गोंदवल्याचें महत्त्व कशांत असेल तर तें नामाच्या प्रेमांत आहे; तेथें नामाचें पीक भरघोस आहे

**४ डिसेंबर**

ज्याप्रमाणें एखादा बाप बँकेत पैसा ठेवतो आणि त्याचें व्याज आपल्या मुलाला आपल्या पश्चात् मिळण्याची व्यवस्था करतो, त्याचप्रमाणें ज्यांची बुद्धि भ्रष्ट झाली आहे त्यांना निदान अंतःकाळीं तरी, सद्‌बुद्धीचें व्याज मिळण्यासाठीं भरपूर भांडवल मी गोंदवल्याला ठेवलें आहे. आपला मनुष्य कितीहि भ्रष्ट बुद्धीचा झाला तरी गोंदवल्याला आला कीं त्याच्या बुद्धीमध्यें पालट झालाच पाहिजे. निदान अंतःकाळीं तरी तो तिथें येऊन चांगला होऊन मरेल. अभिमान म्हणून नव्हे, परंतु **गोंदवल्याचें महत्त्व कशांत असेल तर तें नामाच्या प्रेमांत आहे.** आपण पाहतो, प्रत्येक गावाला निरनिराळीं नांवें असतात. तसें पाहिलें तर सर्व गांवें सारखींच. घरेंदारें, भिंती, शाळा, धर्मशाळा, चावड्या, या प्रत्येक गावांत असतात, परंतु प्रत्येक गावाचें महत्त्व कांही वेगळेंच असतें. गोंदवल्यास पैशाचें उत्पन्न नाहीं, परंतु तिथें नामाचें पीक भरघोस आहे. मी नेहमीं हेंच सांगतो कीं, " जिथें जें उगवेल तेंच तुम्हीं पेरा." इथला कोणताहि भक्त कुठेंहि जरी दिसला तरी त्याच्या वागण्यावरून कळून आलें पाहिजे कीं, हा गोंदवल्याचा भक्त असला पाहिजे. त्याचें तोंड सारखें हलतें आहे, तो कांहींतरी म्हणतो आहे, रामाचा जप चालू आहे, त्याअर्थीं हा अमक्या गुरूचा शिष्य असला पाहिजे असें कळून यायला हवें. म्हणतात ना; कीं आपल्या वडिलांचें महत्त्व सांगूं नये, तें मुलाच्या कृतीवरून कळलें पाहिजे. म्हणून आतां एकच करा, रामाला हात जोडून मनापासून सांगा, "रामा ! तुझें प्रेम दे, आम्हीं अखंड नामांत राहूं. प्रारब्धाचे भोग मी आनंदानें भोगेन. आणि तूं ठेवशील त्यांत आनंद मानीन. तुझें गोड नाम मी माझ्या हृदयांत सतत जतन करून ठेवीन हा माझा निश्चय आहे." राम खात्रीनें कृपा केल्यावांचून राहणार नाहीं. खरोखर या नामामध्यें आपला प्रपंच आपल्या कल्पनेपेक्षां कितीतरी सुखाचा होईल. लढाई करणें हें अर्जुनाचें कर्तव्य असल्यानें " तूं माझें स्मरण ठेवून लढाई कर." असें भगवंतानीं सांगितलें. आज नोकरी किंवा प्रपंच करणें हें आपलें कर्तव्य आहे, तेंच आपण भगवंताच्या स्मरणांत करूं. नीतिधर्माचें आचरण आणि प्रारब्धानें आलेलीं कामें भगवंताच्या स्मरणांत करणें, हेंच सर्व धर्मांचें, शास्त्राचें सार आहे. आपण साखर खाल्ली तर आपल्याला गोड लागते, त्याचप्रमाणें आपण गोड शब्द बोललों, कीं आपल्याला गोड शब्द ऐकायला मिळतात. आपल्या सर्व गोष्टी जर भगवंताच्या नामांत झाल्या, तर भगवंताचें प्रेम आपल्याला कां बरें मिळणार नाहीं ! आपण भगवंताचें नाम घ्यायला सुरवात करूं या, तेंच नाम भगवंताची प्राप्ति करून द्यायला समर्थ आहे याची खात्री बाळगा. प्रपंचाचा अनुभव कष्टमय आहे, पण भगवंताचा अनुभव खासच आनंदमय आहे.

---

३३९. अगदीं व्यवहाराच्या मार्गानें जावें । त्यांत रामाचें अधिष्ठान राखावें ॥
ज्याला प्रपंच नाहीं करतां आला । त्याचा परमार्थ खोटा पडला ॥

# भगवंताचें नाम सहजपणें येणें याचें नांव " अजपाजप "

५ डिसेंबर

एक चांगला गृहस्थ होता. त्याला कसलेंहि व्यसन नव्हतें. त्या गावात एक दिवस एक साधु आला. या सद्गृहस्थाला भविष्याचा नाद होता. त्याला कोणीं सांगितलें कीं, हे आलेले बुवा भविष्य अति उत्तम सांगतात. तो त्यांना भेटायला गेला, परंतु ते गांजा ओढीत होते, त्याला कांहीं तो वास सहन झाला नाहीं. तरीहि भविष्य ऐकण्यासाठीं म्हणून तो एका कोपऱ्यात बसून राहिला. असे बरेंच दिवस गेले. होता होतां त्याला बुवा फार आवडूं लागले; त्याप्रमाणें तो रोज तिथें जात असे. एक दिवस बुवांनीं सांगितलें म्हणून त्यानें चिलमींत निखारा ठेवला; दुसरें दिवशीं फडकें ओलें करून दिलें. पुढें त्याला एकदा बुवांनीं सांगितलें म्हणून त्यानें एक झुरका घेऊन पाहिला; आणि हळूहळू संवयीनें तो इतका तरबेज झाला कीं त्यानें गांजा ओढण्यांत गुरुलाहि मागें टाकलें ! असा हा संगतीचा परिणाम फार मोठा होत असतो. मोठमोठे सरकारी ऑफिसर असतात, त्यांचा एक खास माणूस असतो; त्याला साहेबाच्या सर्व आवडीनिवडी माहीत असतात. तो जसा साहेबांना काय आवडतें हें जाणून तसें करतो, त्याप्रमाणें परमार्थांत भगवंताला जें जें प्रिय असतें तें तें ओळखून त्याप्रमाणें आपण वागण्याचा प्रयत्न करावा. श्रीरामप्रभूला काय आवडतें नि काय नाहीं याची मारुतिरायांना पूर्ण माहिती होती, म्हणूनच त्यांना आवडणारें " नाम " घेऊन त्यांनीं श्रीरामप्रभूला आपलासा करून घेतला. हे नाम तुम्हीं अत्यंत श्रद्धेनें घ्या; भगवंताला आपलासा करून घेणें तुम्हांलाहि अगदीं शक्य आहे. ज्याप्रमाणें ( टेलिफोनच्या ) नळींत कितीहि हळू आणि दूर, विलायतेतसुद्धां बोललेलें आपल्याला ऐकूं येतें. तसेच, नाम कोणत्याहि गांवीं घ्या, कोणत्याहि वेळीं घ्या, कितीहि हळूं घ्या, पण तें श्रद्धेच्या नळींतून घ्या म्हणजे तें भगवंतापर्यंत खात्रीनें पोहोंचूं शकेल. परमेश्वराच्या प्राप्तीसाठीं प्राणायाम, योगासनें, इत्यादि सांगितलेलीं आहेत परंतु त्याहून जास्त महत्त्वाचें म्हणजे भगवंताची सहजभक्ति. भगवंताचें नाम सहजपणें येणें याचेंच नांव " अजपाजप " होय. हा भक्तीचा प्रकार अत्यंत श्रेष्ठ आहे, यांत मीपणाचा शेवट आहे. मीपणा जाणें हीच भगवंताशीं खरी अनन्यता होय. भगवंताची पूर्ण कृपा म्हणजे भगवंताशीं एकरूपताच होय. परमार्थ म्हणजे आपली " सहजावस्था " झाली पाहिजे; आणि तशी व्हायला अंतरंगाची ओळख करून घ्यायला पाहिजे, म्हणजेच अंतर्मुख बनायला पाहिजे. भगवंताच्या नसतेपणानें उठलेले वारे म्हणजे काळजी होय. " आणखी कांहीं नको " हें पूर्णत्वापासून आलें तरच खरें समाधान होईल. समाधान हा पूर्णत्वाचा स्वभाव आहे. मनुष्याच्या सर्व दुःखांवर, आजारांवर आनंद आणि समाधान हें खरें औषध आहे. जो सदाचरणांत आणि भगवंताच्या नामांत राहतो त्याला हें औषध सहजीं लाभत असतें. या औषधाचा परिणाम नकळत आणि सहजीं होत जाऊन तो शेवटपर्यंत टिकून राहतो. आपला प्राण हें जसें आपलें सर्वस्व आहे, त्याप्रमाणेंच आनंदमय राहण्याकरितां भगवंत हवा. भगवंताकडून येणारी शांति हेंच समाधान होय. मन आणि भगवंत यांना जोडणारी साखळी म्हणजे ' नाम. ' या नामांतच आपलें सर्वस्व गुंतवलें तर आपल्याला भगवंतापर्यंत सहजीं जातां येईल.

३४०. कर्तेपणाचा अभिमान । हेंच भगवंताच्या आड मुख्य जाण ॥
माझें, मीपण हेंच दुःखाला कारण । रामाचें होण्यानें होईल निवारण ॥

श्रीराम

# सर्व धर्मांचें सार एकच–भगवंताचें नाम घेणें

६ डिसेंबर

धर्म कशाला म्हणता येईल ? ज्यानें फळ चांगलें मिळतें, म्हणजे जो भगवंताजवळ नेतो, ज्यानें राम जोडतो, तो धर्म. गाडी वेगाच्या बाहेर जाऊं नये म्हणून ब्रेकदाब असतो, त्याप्रमाणें हा गृहस्थाश्रम आहे. बाकीचे तिन्ही आश्रम एका गृहस्थाश्रमात पाळले जातात. म्हणजे असें नाहीं कीं इतर आश्रमांनीं भगवंतास भेटता येणार नाहीं. गृहस्थाश्रम दिसायला भगवंतापासून दूर असा दिसतो, पण त्याच्या मर्यादेप्रमाणें वागलें तर खरोखरीच सर्व आश्रम त्यात येतात. संन्यासाशिवाय भगवत्प्राप्ति नाहीं म्हटलें म्हणजे मुंडन करण्यातच भगवंतप्राप्ति आहे असें नाहीं होत. भगवंताचें प्रेम मनापासून यायला पाहिजे. बाहेरच्या वेषाला तितकेसें महत्त्व नाहीं. " मीं केलें," हें विसरायला प्रथम शिकलें पाहिजे, म्हणजे मग " राम कर्ता " ही भावना ठेवता येईल. वेदानीं धर्माची रूपरेषा सांगितली, शास्त्रानें मार्ग दाखवून दिला. संतांहि शास्त्राला सोडून कधींच वागत नाहींत; पण कर्मठाला तसें वाटत नाहीं याला काय करायचें ? आजवर संत वेदाच्या उलट कधींच गेले नाहींत. " राम राम " म्हणावें म्हणून संत तुमच्या पाठीस लागतात, यात त्यांचे का कांहीं साधणार आहे ? यात आपलेंच कल्याण आहे. आपण निर्विषय होण्याकरितां संत आपल्याला हें सांगत असतात. संतसमागम देहानें साधत नसेल तर मनानें तरी जरूर करावा, माझ्या मनाचे विकार जात नाहींत असें चांगल्या लोकांनासुद्धां वाटतें. जें जायला पाहिजे त्याचा विचार तरी कशाला करावा ? मनाच्या पापाचें प्रायश्चित्त नाम करतें; देह तिकडे जाऊं देऊं नये म्हणजे झालें. एका मनुष्याला बारा वर्षे अनुष्ठानात राहायला सांगितलें. मध्येंच त्याला न्यायला काळ आला. त्याला त्याचें नाहीं भय वाटलें. तर गुरुआज्ञा मोडते म्हणून वाईट वाटलें, ही खरी निष्ठा. ज्याला देह बाजूला ठेवून राहतां येते तिथें काळाची नाहीं गति चालत. ज्यानें विषय बळावला तिथें गुरुआज्ञा पाळली असें कसें म्हणावें ? याकरितां एकच करा. अखंड गुरुआज्ञेत राहा आणि नामाला विसरूं नका. ज्याच्याजवळ पास आहे त्यालाच म्हणजे आमंत्रितांना आंत सोडतात; त्याप्रमाणें आपण नाम घेतलें म्हणजे आपल्याला अनुकूल, आपल्या हिताचें, तेवढेंच आंत येईल. पण गंमत अशी कीं, आपण जें औषध घेत आहोंत तें आपण पोटांत जाऊंच देत नाहीं ! चुकून जेवढें औषध पोटांत जाईल तेवढाच काय तो परिणाम होतो, भजन, पूजन, नामस्मरण, इत्यादि आपण करतों. पण तें आपल्या मनापर्यंत पोंचत नाहीं. थोडक्यात म्हणजे, नामाबद्दल शंका घ्यायच्याच असल्या तरी नाम चालूं ठेवून त्या घ्याव्यात, म्हणजे तें नामच शंकांचें निरसन करील. भगवंत सगुणात आल्यापासून नाम चालूं झालें. मना हा शब्द उलटा केला कीं नाम हा शब्द तयार होतो. याचा अर्थ असा कीं **नाम घेणें म्हणजे मनाची विषयाकडे असलेली ओढ उलटी फिरविणें नाम=न मम. प्रपंच माझा नाहीं म्हणून करणें म्हणजेच नाम घेणें. भगवंताचें नाम घेणें हें** मौनच आहे, **नामांत राहणारा पुरुष खरोखर फार थोर असला पाहिजे.**

---

३४१. दुःखाचें मूळ कारण । स्मरणातून गेला रघुनंदन ॥
जगातील ऐश्वर्य मानाची प्राप्ती । रामरायाविण समाधानाला न देती ॥

# प्रपंचाची जितकी काळजी घेतों तितकी नामाची घेतों का?

**७ डिसेंबर**

साधरण प्रापंचिकाची ओढ विषयाकडे असते. आज सुख कशात आहे एवढेंच तो बघतो। आणि विषयांत तो इतका तल्लीन होतो कीं, जगालाहि तो तुच्छ मानतो. विषय हे शेवटीं दुःखालाच कारणीभूत होतात हें तो विसरतो. विषय आणि मी एक होतो तेव्हां सुख होतेंसें वाटतें, पण वास्तविक आजवर कुणालाहि शाश्वत विषयानें सुख आणि समाधान मिळालेलें नाहीं. असें सुख आणि समाधान मिळविण्यासाठीं, आपली वृत्ति भगवंताच्या ठिकाणी स्थिर ठेवणें हा एकच उपाय आहे. मी जितकी प्रपंचाची काळजी घेतो तितकी नामाची घेतो का, याचा प्रत्येकानें विचार करावा. साशंक वृत्तीच्या ठिकाणीं समाधान सहसा नसतेंच. हिरण्यकश्यपूच्या हृदयांतील नारायण प्रल्हादाला दिसला, पण हिरण्यकश्यपूला स्वतःला काहीं दिसला नाहीं. वृत्ति नेहमीं एकाकार व्हावी, पण ती विषयांत न होता नामांत व्हावी हेंच सर्व संतांचें सांगणें आहे. शंभर माणसें असून त्या सर्वांचें जर एकमत असेल तर, किंवा त्या सर्वांचें लक्ष जर एकीकडेच असेल तर ती एकच आहेत. जिथें एकपणा आहे तिथें शांति असते. सर्वत्र सामसूम असणें ही काहीं शांति नव्हे. खरें पाहिलें असता जें ज्ञान आपल्याला सांगितलें असतांना कळतें, त्याचें बीज आपल्या ठिकाणीं असतें म्हणूनच तें आपल्याला कळतें. खरी अडचण असेल तर ती ही कीं, पुष्कळ लोकांच्या ठिकाणीं तें ज्ञान नंतर जागृत राहात नाहीं; तें उडून जातें. नाहींतर त्या बीजाचा वृक्ष झाल्याशिवाय राहाणार नाहीं. ज्याप्रमाणें फार उकाडा झाला कीं, पाऊस पडतो त्याचप्रमाणें खरी तळमळ उत्पन्न झाली कीं ज्ञान प्रकट होतें. तळमळ आणि ज्ञान हीं एकाच दोरीचीं दोन टोकें आहेत. खरोखर या जगांत कुणाच्या बुद्धीला पचवितां आल्या नाहींत, कुणाच्या दृष्टीला पाहतां येत नाहींत, कुणाला कल्पनेमध्येंहि आणतां येत नाहींत, अशा कितीतरी वस्तु आहेत. मुलाला आपल्या बापाचें बारसें पाहाणें जसें शक्य नाहीं, तसें, 'मी कोण आहे' हें बुद्धीनें ओळखणें शक्य नाहीं. खरी सत्य वस्तु आपल्या कल्पना, बुद्धी आणि तर्क यांच्यापलीकडे आहे. सत्याचा शोध करायचा असेल तर सत्य ज्यानें झाकले आहे ती वस्तु दूर करा म्हणजे सत्य दिसेल. सत्य हें आपल्याला उत्पन्न करतां येत नाहीं, पण उपाधि मात्र उत्पन्न करतां येते. उदाहरणार्थ, भीति, कल्पना, इत्यादि आपणच उत्पन्न करतों. नदीच्या पुलावर उभें राहिलें असतां; पायाला पाण्याचा स्पर्श न लागतां देखील, वाहणाऱ्या पाण्याची मजा अनुभवतां येते, त्याचप्रमाणें भगवंताचें सत्यत्व ज्याच्या अंतःकरणाला पटलें, तो विषया-मध्यें राहूनदेखील, होणाऱ्या सुखदुःखाच्या गोष्टीकडे गंमत म्हणून बघेल आणि त्यापासून स्वतः अलिप्त राहील. या झालेल्या गोष्टी विसरून जाण्यांतच खरा आनंद आहे, पण तें विसरणें औषधानीं वगैरे कृत्रिमपणें न आणतां, भगवंताच्या स्मरणांत राहून आणलें पाहिजे. अंतःकाळीं अगदी शेवटीं सुटणारी वस्तु म्हणजे भगवंताचें नाम पाहिजे. नामांत शेवटचा श्वास गेला पाहिजे.

---

३४२. संतति संपत्ति लौकिकाची प्राप्ती । सर्व वैभव जरी आलें हातीं ॥
तरी रामाविण आहे फजिती । म्हणून अखंड असावें भगवंताचें स्मरण ॥

# ज्याला देवाची पूर्णपणें आठवण असते त्यालाच जगाचा, दुःखाचा विसर पडतो

८ डिसेंबर

देहाला सांभाळणें जरूर आहे. भगवंतप्राप्तीकरितां तें करावें, विषयाकारितां नाहीं करूं. बाहेरचा लौकिक सांभाळला पण होतें नव्हतें तें घालविलें, यांत काय मिळविलें ? हा वेडेपणाच म्हणायचा. आतल्या खोबऱ्याचें रक्षण करण्याकरितां करवंटीची जरूरी आहे. बाह्यांगाचीच जपणूक करणें हेंच कांहीं मनुष्याचें अंतिम उद्दिष्ट नाहीं. बाह्यांगाचें सुख हें कांहीं खरें नाहीं. " मी, माझें " यापासून आपण द्वैताला सुरुवात करतों, कल्पनेनें जेवढें समजेल तेवढें पाहूं लागतों. परंतु शेवटपर्यंत 'मी कोण' याचा आपल्याला पत्ता लागत नाहीं. तिघेजण दारू पिणें वाईट असें एकमेकांना म्हणत होते, पण तिघांची गांठ जर गुत्यांतच पडली तर कुणी कुणाला नांवें ठेवावीं ! आपली चूक झाली असें समजलें म्हणजे ती दुरुस्त करण्याचा मार्ग पहावा. जिथून आपली वाट चुकली तिथें परत यावें लागतें. आपली वाट 'मी देही' असें म्हणूं लागलों इथें चुकली; असत्याला सत्य मानलें ही आपली चूक झाली. अंतरंगांतले मित्र पहावेत, त्याप्रमाणें शत्रूचाहि सुगावा काढावा. विषयामध्यें सुख आहे ही आपण कल्पना केली. त्याचा अनुभव आपण अनेक वेळां घेतला, तरी अजून आपली ही कल्पना खरी का खोटी हें आपल्याला कळत नाहीं, हें मात्र और आहे. खरोखर प्रपंच हा टिपऱ्याच्या खेळाप्रमाणे आहे. टिपऱ्याच्या खेळांत एकाला टिपरी दिली कीं, तो लगेच पुढच्या गड्यापाशीं जातो त्याप्रमाणें हा प्रपंच स्थिर नसून सारखा बदलणारा आहे. आपलें जन्म आणि मरण एक प्रकारें रोज घडत असतें. आपण निजलों, झोंपी गेलों, कीं मरण समजावें; आणि उठलों, जागें झालों, कीं आपला जन्म झाला असें समजावें. एखाद्या तुरुंगांत पुष्कळ कैदी असतात. कुणी कांहीं, कुणी कांहीं केलेलें असतें; हें खरें, तरी जें करूं नये तें प्रत्येकानें केलेलें असतें ही गोष्ट निश्चित आहे. त्याप्रमाणें जगांत जे लोक दुःख भोगतात त्यांनीं मागील जन्मीं अमुक एक कर्म केलें हें जरी समजलें नाहीं तरी; जें करूं नये तें त्यानें केलें आहे ही गोष्ट निश्चित. परंतु त्यामध्यें भगवंतानें एक मोठी सोय ठेवली आहे, ती ही कीं जो देहाला विसरेल त्याला त्या दुःखाची जाणीव होणार नाहीं. ज्याला देवाची पूर्णपणें आठवण असते त्यालाच जगाचा, दुःखाचा विसर पडतो. जो स्वतःला पूर्णपणें विसरतो त्यालाच भगवंताची प्राप्ति होते, स्वतःला पूर्णपणें विसरायला भगवंताच्या नामांत रंगून जाणें हा एकच उपाय आहे. जेवढ्या उत्कटतेनें नाम घेऊं तितके अधिकाधिक आपण नामांत गुंतले जाऊं, मग देहाची आठवण कशाला राहील ! आपण नाम घ्यावें तें आपणच आपल्या कानांनीं ऐकावें आणि तें घेतां घेतां शेवटीं त्यांत स्वतःला विसरून जावें, हाच आनंदाचा मार्ग आहे.

---

३४३. मनुष्याला सुखी होण्याला । एकच उपाय आहे खरा ॥
सुख आहे एक रामापायीं । दुजा ठाव कोठें नाहीं ॥

# भगवंताच्या मार्गांत असणाऱ्यानें नामरूपी अंकुशाच्या योगानें अभिमानाला हुसकून लावावें

**९ डिसेंबर**

खरें पाहिलें असता या देहबुद्धीचा चोर व्हायला कारण म्हणजे आमचा अभिमान होय. अभिमानानें सद्गुण जाऊं लागले तर काय उपयोग ? ज्ञानी आणि अज्ञानी यांच्यांत मुख्य फरक म्हणजे, ज्ञानी अभिमान टाकतात तर अज्ञानी लोक तो वाढवतात. अभिमानासारखा मोठा शत्रु नाहीं. अंतरंगातल्या या शत्रूचा आपण शोध घ्यावा आणि त्याचा योग्य बंदोबस्त करावा. नुसत्या सत्कर्मांनें अभिमान जात नसतो. सापाला दूध घातलें तरी त्याचें विषच होतें. अभिमानाला कोणतेंहि कृत्य घाला, तो वाढतच जातो. आतां याकरितां सत्कर्में करण्याचें सोडावें असें नाहीं, परंतु अभिमान न बाळगतां तीं करावींत. 'मी कर्ता' ही भावना सोडावी. ज्या विषाचा ताप येतो, तेंच विष आम्ही ताप घालविण्याकरितां टोचतों, त्याप्रमाणें अभिमान वाढविण्याकरितां जीं कृत्यें कारणीभूत होतात, तींच तो मारण्याकरितां उपयोगांत आणावीं. अभिमान हा बारशाला आपल्याबरोबर येतो. आणि बाराव्या-पर्यंत आपल्याजवळच राहण्याचा प्रयत्न करतो. म्हणून नामरूपी अंकुशाच्या योगानें त्याला वेळींच हुसकून लावणें आवश्यक आहे. आपल्या विहिरीमध्यें खारट पाणी आहे, म्हणजे आपल्या अंतःकरणामध्यें निंदेची घाण आहे. समजा, वरचें खारट पाणी काढून टाकलें आणि जास्त खोल खणलें, तर एखादे वेळीं गोड्या पाण्याचा झरा लागण्याचा संभव आहे, मग त्या विहिरीचें पाणी गोड होईल. म्हणजे आपण जर अभिमान टाकला, निंदा बंद केली, आणि अंतर्मुख होऊन भगवंताला शोधला, तर त्याच्या प्रेमाचा झरा लागून आपलें अंतःकरण त्या प्रेमानें भरून जाईल. आपल्याकडे अशी म्हण आहे कीं, जें आडांत आहे तेंच पोहऱ्यांत येतें." विहिरीमध्यें जर खारट पाणी असेल तर तेंच पोहऱ्यामध्यें येणार हें जसें खरें, त्याचप्रमाणें आपल्या मनांत जें असतें तेंच बोलण्याच्या रूपानें बाहेर पडतें. बोलण्यावरून माणसाच्या अंतःकरणाची परीक्षा होते. ज्याला निंदा आवडते त्याच्या पोटांत घाण असलीच पाहिजे. कांहीं लोक दुसऱ्याचा उत्कर्ष सहन न झाल्यामुळें त्याची निंदा करतात. दुसऱ्याचें चांगलें त्यांना पाहवत नाहीं. कांहीं लोक दोष आपल्यावर येऊं नये म्हणून दुसऱ्याची निंदा करतात. कांहीं लोकांची दृष्टीच अशी वाईट असते कीं, दुसऱ्यामध्यें दोष असो या नसो, त्यांना दुसऱ्यांत दोष दिसायचाच. भगवंताच्या मार्गांत जाणाऱ्यानें दुसऱ्याच्या ठिकाणीं दिसणाऱ्या दोषांचें बीज आपल्यामध्यें आहे हें ध्यानांत ठेवून वागावें. त्यानें दुसऱ्याची निंदा करूं नये, आणि आपल्या सामर्थ्याचा वा गुणाचा अभिमानहि बाळगूं नये. लोकांनीं जें करूं नये असें आपल्याला वाटतें तें आपण स्वतः करूं नये. प्रपंचाचा सहवास बरवरचा असावा; त्याचा वास आंत नसावा, आंत भगवंताचाच वास असावा. त्यामुळें आंतल्या सर्व दोषांचें उच्चाटन होऊन मनाला शाश्वत शांतीचा आस्वाद घेतां येईल.

---

३४४. संसारीं दुःख झालें फार । त्याला उपाय एकच सार ।।
भगवंतापायीं ठेवावें मन । विषय सोडून द्यावे आपण ।।

# राम ठेवील त्यांत समाधान राखावे। हाच सुखी होण्याचा मार्ग जाण

१० डिसेंबर

प्रपंचीं राहून समाधान । हेंच मोठें ज्ञानाचें ज्ञान ।। भगवंतानें काय दिलें तें पाहावें । त्यांत समाधान राखावें ।। भगवंताचा हात जेथें । समाधान सुख राहातें तेथें ।। राम ठेवील त्यांत समाधान राखावें । हाच सुखी होण्याचा मार्ग जाण ।। रामापायी अनन्य झाला । समाधान चालत येई घराला ।। ज्याचे अंतःकरणांत समाधान । तेथें भगवंताच्या प्रेमाची उत्पत्ती जाण ।। चित्तीं राखावें समाधान । आनंदानें संसार करावा जाण ।। समाधान भगवंताचें ध्यानीं । जपून राहावें लागे हें जाणी ।। समाधानाचें करावें जतन । तें नसावें कशावर अवलंबून ।। लाभ-हानींत न गुंतवतां मन । राखतां येईल समाधान ।। कोणी देईल समाधान हें वाटणें । म्हणजे मृगजलानें तृषेची तृप्ती करणें ।। आपलें समाधान होण्याचें कारण । रामाहून दुसऱ्याचे झालों आपण ॥ समाधानाला अडवणूक जाण ।। माझा मीच आपण ।। देहाचे भोग ठेवावे देहाचे माथीं । समाधानांत राखावी वृत्ती ।। उपाधिरहित रामास पाहावें । मध्यंतरी चित्त कोठें न गुंतवावें ।। चित्त गुंततां मध्यस्थळीं । परमात्म्याची प्राप्ती दुरावली ॥ भगवंताचें स्मरण । तसेंच भगवंताचें आगमन । पुण्याईशिवाय घडत नाहीं जाण ॥ श्रीराम सर्वव्यापी हा टेंवून विश्वास । समाधान राखावें खास ॥ दाता एक रघुनंदन । हा भाव ठेवावा मनांत । त्यास दैन्यपण न नेईल जगांत ॥ धर्माचें रक्षण । ठेवतां परमात्म्याचें स्मरण ॥ राम आपल्या दासावरी । नित्य कृपा करी ।। राम परमात्मा कृपा करतो । सर्व चुकींची क्षमा करतो ।। पुन्हां वाईट न वागावें । याबद्दल जबाबदारीनें वर्तावें ॥ अंतीं घेतां माझें स्मरण । मी उद्धरीन त्यास आपण । हें खुद्द भगवंताचें वचन । तेथें नसावें शंकेचें कारण ।। रघुनाथावांचून सुखी झाली । असा नाहीं कोणीं पाहिला ऐकिला ।। मीपणाचा सोडावा अभिमान । तोच एक भगवंताचा झाला जाण ।। रामाची झाली भेट । खालच्यांचें नाहीं महत्त्व तेथें । तैसें जगन्नियंत्या प्रभूस करावें आपलें ।। आजवर रामानें सांभाळ केला । तो आजहि नाहीं निजलेला । पण त्याची जागृती; असे आमचे हातीं ।। काळावर ज्याची सत्ता । त्याचे चरणीं ठेवावा माथा । मग धोका नाहीं ही मानावी सत्यता ।। राम ज्याच्या हृदयीं करी वास । तेथें ऋद्धिसिद्धि पडल्या ओस ।। निःस्वार्थापाशीं भगवंत । हा जाणावा सिद्धांत ।। राम कर्ता हा ठेवावा भाव । कर्मीपणाला नाहीं ठाव ।। कर्तव्य करावें निःस्वार्थबुद्धीनें । राम खूष होईल त्यानें । ज्याला नाहीं दुसरा उपाय । तेथें मागावें भगवंताचे साहाय्य ॥ परमात्मा ज्याचा साह्यकारी । त्यास धोका नाहीं तिळभरी । ज्यास नाहीं मोबदला जाण । त्याला एकच भगवंत प्रमाण ।। दीनदयाळू परमात्मा राम खास । न ठाव द्यावा विकल्पास ।। त्याच्याशीं वागावें सत्य । कृपा करील भगवंत ।। रामाचा उत्सव व्हावा आनंदांत । सर्वांना गर्क करावें रामनामांत ।। उत्सवांत न दुजें करणें कांहीं । रामच सत्य हें प्रत्यया येई ।। उत्सव तोच साजरा झाला ।। रामच सत्य सत्य वाटला भला ।। विषयाविरहित मारावी हाक । तुमचेसमोर माझा दाशरथी राम ।। देह आहे परतंत्र । मन राखावें भगवंताशीं स्वतंत्र ।। रामानें करावें सर्वांचें कल्याण । दुष्टास सुबुद्धि देऊन जाण ।। भगवंताचें देणें । हें त्याचें इच्छेनें घडणें ।। अखंड करा नामस्मरण ।। जेणें कृपा करील रघुनंदन ॥

---

३४५. राम स्मरावा चित्तीं । म्हणजेच दुःखाची जाणीव होईल कमती ।।
भगवंताचा धरावा आधार । सुखानें करावा संसार ॥

# "रामनाम" या सिद्धमंत्रांत भगवंताला आपल्याकडे खेचून आणण्याची शक्ति आहे

**११ डिसेंबर**

परमार्थ साधण्यासाठीं मोठी उदारवृत्ति अवश्य आहे. जो पंत असेल तोच संत बनेल. गरीब माणूसदेखील-अगदीं भिक्षेकरीसुद्धा-पंत असूं शकतो. भिक्षा घालतांना प्रत्येकजण आपल्यासाठीं थोडेंतरी राखून ठेवीत असतो. ज्यानें शंभर रुपयांचें दान केलें त्यानें स्वतःजवळ हजार किंवा जास्त रुपयें ठेवूनच दिले. प्रापंचिक माणसानें घरामध्यें असलेलें सर्वच्या सर्व देऊन टाकूं नये ही गोष्ट खरी, परंतु प्रसंग आला तर सर्व देण्याची मनाची तयारी पाहिजे हेंहि खरें. **थोर मनाच्या माणसालाच परमार्थ साधतो** खरोखर भगवंताला सर्व देण्यापेक्षां 'स्व' द्यायला शिका. 'स्व' दिल्यावर सर्व न दिलें तरी चालतें; कारण तें आपलें-आपल्या मालकीचें राहातच नाहीं. उलट सर्व देऊन जर 'स्व' द्यायचा राहिला तर सर्व दिल्याचें समाधान मिळत नाहीं. भगवंताला 'स्व' देणें म्हणजे 'मी त्याचा आहे' हीं जाणीव रात्रंदिवस मनामध्यें ठेवणें होय. वेदांती त्याला "ब्रह्म" असें म्हणतात. त्यालाच भक्त "नाम" असें म्हणतात.

वैदिक कर्मानें चित्तशुद्धि होते हें मी मान्य करतों, वेदाची आज्ञा मला शिरसावंद्य आहे; परंतु ज्या भगवंताची प्राप्ति व्हावी म्हणून चित्तशुद्धि करायची, त्या भगवंताचें अधिष्ठान जर वैदिक कर्मांना नसेल तर कर्ममार्गाचें पर्यवसान कर्मठपणामध्यें होतें. शिवाय, सध्याच्या काळीं बाह्य परिस्थितींमध्यें फरक पडल्याकारणानें वैदिक कर्मे जशीं व्हायला हवींत तशीं होत नाहींत. म्हणून आपण कर्ममार्गानें जात असतां कर्माची पूर्तता होण्यासाठीं आज भगवंताच्या नामाची अत्यंत गरज आहे. कर्ममार्ग मनापासून करणाऱ्या माणसामध्यें, नुसतें कर्म करणें हेंच सर्वस्व आहे अशी जी कर्मठपणाची भावना उत्पन्न होते, त्याबद्दल माझा आक्षेप आहे. एरवीं, कर्ममार्गी माणसाच्या शिस्तीबद्दल आणि संयमाबद्दल मला आदरच आहे. **एक रामनाम घेतलें म्हणजे सर्व धर्मबंधनें माफ होतात हा समज खरा नाहीं.** परंतु कर्मानें चित्त शुद्ध होत असतांना नामानें भगवंताच्या अस्तित्वाची जाणीव जागृत राहते. इतकेंच नव्हे तर पूर्ण चित्तशुद्धि होऊन कर्म गळून गेल्यावर फक्त नामच शिल्लक राहतें, आणि भगवंताशीं एकरूप झालों की तें त्यामध्यें मुरून जातें. **रामनाम हा नुसता मंत्रच आहे असें नव्हें, तर तो सिद्धमंत्र आहे.** तो भगवंतापर्यंत नेतों; नव्हे, तो भगवंताला आपल्याकडे खेंचून आणतों. हा माझा प्रत्यक्ष अनुभव आहे. वाटेल त्यानें नामाच्या या सामर्थ्याचें प्रत्यंतर पाहावें. रामनाम हा देहबुद्धि जाळणारा अग्नि आहे. रामनाम हें ओंकाराचेंच स्वरूप आहे. तें सर्व कर्मांचा आणि साधनांचा प्राण आहे. श्रीशंकरापासून तो श्रीसमर्थांच्यापर्यंत जे जे महासिद्ध होऊन गेले त्या सर्वांनीं रामनाम कंठीं धारण केलें. रामनामाचा साडेतीन कोटी जप करील त्याला त्याच्या देवतेचा अनुभव आल्याशिवाय राहणार नाहीं. रामनामाचा आधार घेऊन आपण सर्वांनीं राम जोडावा. नाम देत असतां जें घडेल तें चांगलें आणि आपल्या कल्याणाचें आहे असा भरवंसा ठेवावा. 'नामाकरितां नाम' घ्या कीं त्यांत राम आहे हें नक्की कळेलच.

---

३४६. प्रपंच करावा सर्वांनीं जपून । पण रामाचें स्मरण राखून ॥
सर्वस्वीं व्हावें भगवंताचें । मी माझें सोडोनि साचें ॥

# ज्याला नामाची चटक लागली त्याच्यावर रामानें कृपा केली हें निश्चित समजावें

**१२ डिसेंबर**

गृहस्थाश्रमी माणसानें असा नियम ठेवावा कीं, जो कोणी कांहीं मागायला येईल त्याला "नाहीं" म्हणूं नये; आपल्याजवळ जें असेल त्यामधलें थोडें तरी त्याला द्यावें. अन्न द्यायला कधींहि मागेंपुढें पाहूं नये. पैसा देतांना मात्र आपली परिस्थिति पाहून आणि त्याचा हेतु पाहून तो मागेल त्याच्यापेक्षां जरा कमीच द्यावें, पण "नाहीं" म्हणणें चांगलें नाहीं, भिकाऱ्याला कधींहि वेडेंवाकडें बोलूं नये. आपली नोकरी हीहि एक प्रकारची भीकच आहे ! भिक्षा मागणें हें वैराग्याला कमीपणाचें नाहीं, पण भिक्षा ही स्वार्थासाठीं नसावी. आपलें पोट भरल्यानंतर राहिलेला अन्नाचा प्रत्येक कण दुसऱ्याला द्यावा. वैराग्याचें तेज कधीं लपून राहात नाहीं. अत्तरें वगैरे लावून तेज आणणें निराळें आणि वैराग्याचें तेज निराळें. खरे संत त्यांच्याकडे येणाऱ्या लोकांची विषमबुद्धि, म्हणजे प्रापंचिक वासना गिळतात, ती पचवितात, आणि त्यांना भगवंताची बुद्धि देतात. लोकांची विषयबुद्धि पचवून आपली निष्ठा टिकविणें हें मोठ्या शक्तीचें काम आहे. ज्याच्याजवळ ती शक्ति पूर्णपणें आहे त्यानेंच लोकांना उपदेश करण्याच्या भानगडीत पडावें, नाहींतर त्याची फजिति होऊन तो सर्वस्वीं नागविला जाईल. अशा वेळीं गुरूच्या आज्ञेच्या बाहेर जाऊं नये, म्हणजे ते सांभाळून नेतात.

जगाचा स्वभाव कळणें ही ज्ञानाची पहिली पायरी आहे. जें खोटें आहे तें खरें मानणें, खऱ्याचें ज्याला ज्ञान नाहीं, तें अज्ञान, ती अविद्या होय. जो आपल्या वृत्ति आवरतो तो खरा बळकट होय. खरोखर, मनुष्याची पारमार्थिक योग्यता काय आहे हें साध्या माणसाला कळणें शक्य नसतें. साधूंनाच अंतरंग समजतें. म्हणून, तशी दृष्टि आल्याशिवाय आपण कुणालाहि नांवे ठेवूं नयेत. ज्या अवस्थेचें स्थित्यंतर नाहीं ती अवस्था खरी समजावी. अंतकाळीं मनुष्य मनाच्या कशा अवस्थेंत जातो यावरून त्याच्या पारमार्थिक अवस्थेची कल्पना येऊं शकते. योगानें जें साधतें तें नामानें साधतें यांत संशय नाहीं. साधा मनुष्य सुद्धा नामाच्या योगानें मोठ्या योग्यतेला चढतो; अर्थात् तें कळायला आपण स्वतः नामामध्यें मुरलें पाहिजे. नामामध्ये फार सामर्थ्य आहे. कुणी त्याचा अनुभव घेऊन पाहात नाहीं त्याला काय करावें ! ज्याला नामाची चटक लागली त्याच्यावर रामानें कृपा केली असें निश्चित समजावें. परंतु नामाची चटक लागण्यासाठीं, सतत नाम घेणें हाच उपाय आहे. तसें पाहिलें तर प्रपंची माणसें अत्यंत स्वार्थी असल्याचें आपल्याला दिसून येतें. त्यांचा स्वार्थ यत्किंचित न बिघडतां त्यांना परमार्थ पाहिजे असतो. हें कसें शक्य आहे ? अत्यंत निःस्वार्थी बनणें याचेंच नांव परमार्थ. तो साधण्यासाठीं थोडा तरी स्वार्थ सोडायला आपण तयार व्हावें. साधुसंतांच्याकडे जाऊन हेंच शिकायचें असतें. प्रपंचावर सर्वस्वीं पाणी सोडा असें कुणींच सांगत नाहीं, आणि असें सांगितलें तरी कुणी ऐकत नाहीं. पण निदान प्रपंच म्हणजे आपला स्वार्थीपणा, हेंच आपलें सर्वस्व मानूं नका. असें संत सांगतात तें कांहीं गैर नाहीं. स्वार्थ कमी व्हायला वासना कमी झाली पाहिजे. वासना कमी होण्यासाठीं भगवंताची कांस धरली पाहिजे. भगवंताची कांस धरण्यासाठीं त्याचें अनुसंधान ठेवलें पाहिजे. आणि त्याचें अनुसंधान टिकण्यासाठीं त्याचें नाम घेतलें पाहिजे, म्हणून तुम्हीं नाम घेत जावें, ज्याला नामाचें प्रेम लागलें त्याला भगवंताचें दर्शन घडलें.

---

३५७. सर्व कर्ता राम हें बाणलें चित्तीं । मग दुःखाची नाहीं संगती ।।
राम ज्यानें सखा केला । त्याला कोणत्याहि काळांत नाहीं धोका ।।

# भगवंताची सेवा शुद्ध हेतूनें नाम घेतल्यास होऊं शकतें

**१३ डिसेंबर**

देह म्हटला कीं हृदय आणि इतर अवयव हे त्याचे भाग होत। पण समजा, देहाचे इतर सर्व अवयव शाबूत आहेत, आणि हृदय तेवढें बंद पडलें, तर सर्व इंद्रियें शाबूत असूनहि त्याचा उपयोग नाहीं। याउलट, हृदय चालूं असून इतर अवयव जरी काम करायला समर्थ नसले, तरी उपचार करून पुनः पूर्ववत् व्यवहार चालू होण्याचा संभव असतो. फार काय, पण एखादा अवयव काढून टाकावा लागला तरी, हृदय शाबूत असेल तर काम भागतें; पण जर का हृदयच बंद पडलें तर मात्र सर्व कांहीं संपलेंच. नाम हें हृदयासारखें आहे, इतर साधनें हीं बाकीच्या अवयवांसारखीं आहेत; म्हणून नाम नसेल तर इतर साधनें फलदायीं होऊं शकणार नाहींत. "आतां या जन्मांत एवढें पुरें" हा न्याय फक्त भगवंताच्या स्मरणाला तुम्ही लागूं करतां, पण पैसे मिळविण्यांत किंवा विषय भोगण्यांत मात्र तो लागूं करींत नाही ! याचें कारण, भगवंताचें स्मरण केलें नाहीं तरी चालतें असें वाटतें. वास्तविक प्रपंचांत जिला प्रीति असें म्हणतात ती या भगवंताकडे लागली कीं भक्ति बनते. प्रपंचांतला लोभ भगवंताची आवड बनते, अशा रीतीनें आपले विकार भगवंताकडे लावतां येतात.

एक प्रवासी होता. गाडीमध्यें त्याला जागा चांगली मिळाली म्हणून आपल्या स्टेशनावर न उतरतां, गाडी शेवटी थांबते तिथपर्यंत तो गेला, त्याच गाडीनें तो पुनः परत आपल्या गांवी आला! त्याचप्रमाणें आपला जन्ममरणाचा प्रवास चालला आहे. तुम्हीं त्या प्रवाश्याप्रमाणें परत येऊं नका. प्रवासामध्यें केळीं, संत्रीं, वगैरें फळें घ्या, म्हणजे इथें घरेंबिरें बांधा, पण आपलें स्टेशन विसरूं नका. भगवंत हा आपलें स्टेशन आहे. अलीकडे शास्त्रीपंडितसुद्धां सर्वजण भगवंताच्या उलट बोलूं लागले आहेत. म्हणून आपण आधीं आपल्या साधनाचा निश्चितपणा करावा. आणि नंतर पोथीपुराणें ऐकावींत. पोथ्यापुराणांच्यामध्यें दोष नाहीं; पण सांगणारा आपलें कांहींतरी त्याच्यामध्यें घालून सांगतो आणि तें बाधक ठरतें. आपण जसें करतो तसे बोलण्यासाठीं, आपण आपलें बोलणें कमी केलें पाहिजे. बोलणें कमी करायला, मन गुंतवून ठेवणें जरूर आहे. पुष्कळ लोक जे पोथी ऐकायला जातात ते लोकांनी बरें म्हणावें यासाठी, किंवा करमत नाहीं म्हणून, किंवा इतर उद्योग नाहीं, यासाठीं जातात, असें करणें योग्य नाहीं. भगवंताची सेवा शुद्ध भावनेनेंच होऊं शकते. ह्या भावनेचें मूळ प्रत्येकाच्या हृदयांत असतें. हीच शुद्ध भावना आपल्याला तारते, मंदिर आणि समाधि तारत नाहीं. देहाच्या सहवासानें जशी देहाची एकरूपता झाली त्याप्रमाणें, भगवंताचा विसर पडूं न देतां त्याचें स्मरण सारखें ठेवलें तर त्याच्याशी एकरूपता का होणार नाहीं !

---

३४८. भगवंताचें स्मरण सांभाळून । कोणताही करावा व्यवसाय जपून ॥
ज्यानें केलें सर्वच रामास अर्पण । तेथें मीपणास नाहीं ठावठिकाण ॥

# नाम घेतांना मनांत एक परमेश्वरच पाहिजे; तेंच खरें नामस्मरण

१४ डिसेंबर

खरोखर, भगवंताला आपल्या प्रेमाशिवाय दुसऱ्या कशाचीहि गरज नाहीं. तें प्रेम आतून यायला पाहिजे परंतु आपल्या अनुभवावरून पाहिलें तर, परमेश्वराबद्दल खरें प्रेम उत्पन्न होत नाहीं आपल्याला. परमेश्वराला प्रेमानें हाक मारताच येत नाहीं. मग ती त्याला ऐकूं कशी जाणार ? सहवासानें प्रेम वाढते. आगगाडीच्या चार तासांच्या सहवासानें जर प्रेम उत्पन्न होते तर नामस्मरणानें प्रेम कां उत्पन्न होणार नाहीं ? बायकोमुलांच्या प्रेमाकरितां, आपण केवढा त्याग करतों; मग परमेश्वराच्या शाश्वत सुखाकरितां क्षुद्र वासनांचा त्याग आपण कां करूं नये ? नाम घेत असतांना मनांत एक परमेश्वरच पाहिजे; दुसरी कोणतीच वृत्ति उठतां कामा नये; तेंच खरें नामस्मरण.

विकार हे कांहीं मुळांत टाकाऊ नाहींत. ते भगवंतानेंच दिले आहेत, म्हणून त्यांना जीवनांत योग्य स्थान असेलच असेल. किंबहुना, व्यवहारामध्यें विकारांची जरूरी आहे. मात्र विकारांना आपण सत्ता गाजवून वापरायला शिकलें पाहिजे, विकारांनीं आपल्यावर सत्ता गाजवितां कामा नये.

अनंत जन्मांचा देहाशीं सहवास असतो, म्हणून देहावर प्रेम जडून देहबुद्धि येते. नामाचा सहवासहि पुष्कळ म्हणजे सतत करावा; म्हणजे विषयावरची आणि देहाची आसक्ति कमी होऊन नामावर प्रेम जडतें. समजा, राजगिरा आणि भुईमुगाचे दाणे मिसळले आहेत; ते वेगळे करायचे असतील तर त्यांतलें एक काढलें कीं दुसरें आपोआप शिल्लक राहतें; शिवाय त्यामध्यें बाहेर काढायला जें सोपें आहे तें आपण काढतों; त्याप्रमाणें, घ्यायला सोपें असलेलें भगवंताचें नाम आपण घेत गेल्यानें विषय आपोआप बाजूला पडेल. दाणे निवडून काढतांना थोडासा राजगिरा जरी लागला तरी आपण तो झाडून टाकतो त्याप्रमाणें भगवंताच्या अनुसंधानामध्यें नको असला तरी थोडा विषय येणारच, पण तो हवेपणानें भोगला नाहीं तर तो आपल्याला बाधक होणार नाहीं. सर्व संतांचें सांगणें एकच आहे, आणि तें असें कीं, " तूं भगवंताचें अनुसंधान म्हणजे स्मरण ठेव, त्यानें तुला सत्याचें ज्ञान होईल. " भगवंताचें अनुसंधान याचा अर्थ असा कीं, बाकीच्या गोष्टींकडे दुर्लक्ष झालें तरी चालेल पण परमात्म्याचें विस्मरण होतां कामा नये. भगवंताचें अनुसंधान कोण कसें ठेवील याचा नेम नाहीं. कोणी पूजा करून तें ठेवील, कोणी भजन करून तें ठेवील, कोणी नामस्मरण करून तें ठेवील, कोणी मानसपूजा करून ठेवील, तर कोणी चित्रकलेमध्येंसुद्धा ठेवील. भगवंताचें अनुसंधान हें आपलें ध्येय ठेवावें, आणि त्याला अनुसरून बाकीच्या गोष्टी आपण करूं या. कर्तव्याची जाणीव आणि भगवंताचें अखंड अनुसंधान हेंच सर्व पोथ्यांचें सार आहे.

३४९. मनानें होऊन जावें भगवंताचें । त्यानें खास केलें सार्थक जन्माचें ॥
म्हणून असावी समाधानवृत्ति । अखंड राखावी भगवंताची स्मृति ॥

# भगवंतास देहांत पाहूं नका, नामांत पहा

**१५ डिसेंबर**

श्रीकृष्ण परमात्म्यानासुद्धा देह ठेवावा लागलाच ना? सर्व निराकार असलें, तरी साकार झाल्यावर त्याला सर्व काहीं आलें कीं नाहीं : रूप आलें; गुण आले, सर्व काहीं आलें, आणि मग व्यवहारामध्यें सर्व करणें आलें; तसेंच तें साकारांत आलें म्हणून त्यांना जाणें हेंहि आलेंच. श्रीकृष्ण व्यवहाराप्रमाणें वागले. वास्तविक पाहतां ते आलेहि नाहींत आणि गेलेहि नाहींत, त्यांना येणें-जाणें नाहींच; ते कायमच आहेत. साकाराचें रूप पाहावेंसें वाटतें, पण तेंच सर्व काहीं नव्हे हें समजून चाललें पाहिजे. भगवंताला पाहायचें असेल तर त्याला देहांत पाहून चालणार नाहीं असें श्रीकृष्णांनीं उद्धवाला सांगितलें, आणि त्याला ज्ञानानें समजावलें. उद्धवाला हें ज्ञान झाल्यावर मग त्याला 'आतां जाऊन गोपींचें समाधान कर' असें सांगितलें. त्याप्रमाणें गोकुळांत जाऊन तो गोपींना सांगूं लागला की, "तुम्ही श्रीकृष्णाला देहांत पाहून प्रेम केलें हें योग्य झालें नाहीं; तुमची चूक झाली." अशा रीतीनें देहाबद्दल त्यानें तिरस्कार उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला. त्यावर गोपींनी त्याला म्हटलें कीं, "तूं आपला वेदांत जिथें कुणी नाहीं तिथें जाऊन सांग; आम्हाला जें श्रीकृष्णाला देहांत पाहून मिळालें तें आमचें आम्हालाच ठाऊक, तें तुला मिळणें शक्य नाहीं." गोपींनीं श्रीकृष्णावर जें प्रेम केलें तें देहाला विसरून केलें. त्याच्यापुढें त्यांनीं सर्वस्व तुच्छ मानलें; आणि त्यामुळेंच श्रीकृष्णालाहि गोपींवर तसेंच प्रेम करणें भाग पडलें. गोपी त्याला अनन्यशरण होऊन राहिल्या. तसें प्रेम करावें.

माझें दर्शन व्हावें असें तुम्हांला वाटतें याचें कारण तुम्हीं मला देहांत पाहिलें होतें म्हणून. परंतु तसें जरी दर्शन झालें तरी पुढें विस्मरण होणारच; मग असें विस्मरण होणारें दर्शन काय उपयोगाचें? मी देहांत होतों तेव्हां मला देहांत पाहूं नका म्हणून मी सांगत असतांनाहि तें कोणीं खरें मानलें नाहीं. जो नाम घेतो तो खरा स्मरणांत राहतो आणि त्यालाच खरें दर्शन होतें, आणि तें रोज सतेज होत असतें. देहाचें दर्शन हें विसरणारें असतें, म्हणून नाम घेत राहा म्हणजे खऱ्या दर्शनांत राहाल. सगुणमूर्ति नेहमींच आपल्याजवळ राहणें शक्य नसतें. पण तिची खूण भगवंताच्या नामांत आहे. म्हणून आपण नाम घेतल्यावर भगवंत आपल्याजवळ आल्यासारखा आहे. भगवंत सगुणामध्यें असतांना रावणाची किंवा दुर्योधनाची बुद्धि पालटूं शकले नाहींत. सगुण अवतारानें वासना किंवा बुद्धि पालटण्याचें कार्य होऊं शकत नाहीं. सद्‌बुद्धि उत्पन्न करण्याचें सामर्थ्य फक्त भगवंताच्या नामांतच आहे. व्यवहारामध्येंसुद्धा आपण बघतो कीं रूप गेलें तरी नाम शिल्लक राहतें. म्हणूनच राम, कृष्ण इत्यादि सर्वजण शेवटीं नाहींसे होऊन, केवळ नाम तेवढें शिल्लक राहिलें. **नाम हें स्थिर आहे, रूप हें सारखें बदलणारें आहे. कलियुगांत सगुण अवतार नसला तरी "नामावतार" आहे आणि तोच खरा तारक आहे.** नामाकरितां नाम घ्या कीं त्यांत राम आहे हें कळेल.

---

३५०. रामाचें अखंड स्मरण । हेंच जन्माचें मुख्य कारण ॥
म्हणून त्याचें भाग्य थोर जाणा । ज्यानें जोडला रामराणा ॥

# परमेश्वर आपलासा होण्यास नामाच्या योगानें त्याच्यापाशीं आपलेपणा निर्माण करावा

११ डिसेंबर

गंगेचा किंवा इतर कोणत्याहि नदीचा उगम जर आपण पाहिला तर एक एक थेंब स्वच्छ पाणी तेथून खालीं पडत असलेलें आपल्याला दिसेल. तसेंच पूर्वपुण्याईमुळें आयुष्यांत परमार्थाचा उगमहि असाच लहान पण अगदीं स्वच्छ असतो. परंतु पुढें त्या स्वच्छ झऱ्याचें नदींत रूपांतर होतें, आणि अनेक ठिकाणांहून वाहात आल्यानें तिचें पाणीहि कांहींसें गढूळ बनतें. तसेंच आपलें जीवनहि व्यवहारांतल्या बऱ्यावाईट गोष्टींच्या सान्निध्यामुळें पुढें गढूळ बनत जातें. परंतु ज्याप्रमाणें तुरटी पाण्याला लावली असता पाणी स्वच्छ होऊन सर्व गाळ तळाशीं राहतो, त्याप्रमाणें कोणतेंहि काम करतांना नाम घेतलें तर त्या कर्माचे गुणदोष तळाशीं बसून वर निर्मळ जीवनाचा प्रत्यय येतो. कोणीहि दाढीवाला साधु येऊन सांगूं लागला कीं परमार्थ असा आहे, तसा आहे, तर तुम्ही खुशाल छातीवर हात ठेवून सांगा कीं, **नामाशिवाय परमार्थच नाहीं. कर्म करतांना नाम घेऊन समाधानांत राहणें हाच खरा परमार्थ.** नामाशिवाय परमार्थच नाहीं. नुसतें आपलेणाचें भगवंताचें प्रेम यायला, त्याच्याबद्दल आपलेणा वाटायला, नामासारखें साधन नाहीं. नुसतें आपलेणाचें प्रेम किती असतें पाहा ! एक मुलगा आईजवळ राहात होता. पुढें त्याचें लग्न झालें; त्यानें बायको आपली मानली. तिच्याबद्दल त्याला प्रेम उत्पन्न झालें. पुढें ती जरा कृश झाली. त्याला वाटलें, हीं शहाणी आहे, बोलत नाहीं, परंतु हिला आपल्या आईचा जाच असला पाहिजे. म्हणून तो वेगळा निघाला. आपलें म्हटल्यानें केवढें प्रेम उत्पन्न होतें पाहा ! तेव्हां परमेश्वर आपलासा होण्यासाठीं नामाच्या योगानें त्याच्यापाशीं आपलेपणा निर्माण केला पाहिजे. रामाचें प्रेम हें त्याच्या संगतीनेंच येऊं शकेल. नुसतें पुस्तक वाचून परमार्थ सांगणारे भेटतील, पण आचरणांत आणून सांगणारे विरळाच. किती किती म्हणून प्रपंच केला तरी तो अपुराच पडतो. एखादा म्हातारा माणूस आपण पाहिला तर त्याचा संसार खरें पाहू जातां सर्व झालेला असतो, मुलेंबाळें असतात. सर्व तऱ्हेनें तो सुखी असतो; परंतु मरणसमयीं म्हणतो, नातवाची मुंज पाहिली असती तर बरें झालें असतें ! माणूस वासनेंत कसा गुंतलेला असतो तें यावरून कळेल. संसार कितीहि केला तरी तो पुरा होऊं शकत नाहीं. तो अपूर्णच राहतो. मनुष्याच्या जीवाची तळमळ परमेश्वरप्राप्तीशिवाय शमूंच शकत नाहीं. त्याच्या जीवाला समाधान एका परमेश्वर भेटींतच मिळूं शकतें, आणि याकरितां आयुष्याच्या सुरुवातीपासूनच नामाची कास धरा. हेंच नाम मृत्यूसमयीं तुम्हाला परमेश्वराची भेट करवून देईल याची पूर्ण खात्री बाळगा. अत्यंत गुह्यांतलें गुह्य जें आहे तें मी तुम्हाला सांगतों. नामाचें प्रेम हेंच तें गुह्य होय.

३५१. ज्यानें जन्माला घातलें । ज्यानें आजवर रक्षण केलें ॥
तो माझा धनी हें ठेवून चित्तीं । भावें भजावा रघुपती ॥

# नामाच्या सहवासाने देहाचे व देहानें मांडलेल्या प्रपंचाचें प्रेम कमी होतें

**१७ डिसेंबर**

परमार्थाचा विषय तसा खरोखरच कठीण आहे, आणि सर्वांना नडणारा आहे. ज्याला हा विषय जाणून घ्यायचा असेल त्याला, मी कोण हें जाणण्यापेक्षा, मी कोण नव्हे हें जाणणें महत्त्वाचें आहे. आपण एखाद्या पाऊलवाटेनें जात असतांना ती वाट चुकली आणि भलत्या मार्गाला लागलों, तर त्यापुढला सर्व व्यवहार चुकत जाणार. एखादें गणित सोडवितांना एखाद्या आंकड्याची चूक झाली कीं त्यापुढलें सर्व गणित जसें चुकत जातें, किंवा एखाद्या रोगाचें निदान बरोबर झालें नाहीं तर मग त्या रोगावर केलेली औषधयोजना फुकट जाते; त्याप्रमाणें मनुष्याच्या सर्वसामान्य गुणधर्मांचें आकलन जर बरोबर झालें नाहीं, तर या गुणधर्मांवर आधारलेला परमार्थाचा मार्गहि जाणणें फार कठीण गोष्ट होईल. आपण आनंदी असावें, नेहमीं आनंदात राहावें, असें सर्वांनाच वाटतें. हा झाला पहिला गुणधर्म. या आनंदात चिरंतन असावें, निदान आनंदाच्या अपेक्षेंत तरी चिरंतन राहावें, असेंहि आपल्याला वाटतें. खरें म्हणजे मरण कुणालाच आवडत नाहीं; जगण्याची हाव किंवा चिरंतन राहण्याची आवड आपल्या सर्वांनाच असते. परमेश्वर आनंदरूप आहे, तो चिरंतन आहे; आपल्या ठिकाणीं तो अंशरूपानें असल्यानें आपल्यालाहि तसें राहणें साहजिकच आवडतें. पण आपली मुळांत वाट चुकली, आणि म्हणून त्यापुढलें सर्व व्यवहारहि चुकत गेले. एखाद्याच्या परसातलें झाड पडल्यावर तो 'माझें झाड पडलें' असें म्हणतो. परंतु त्याचा देह पडल्यावर 'त्याचें शरीर पडलें' असें नाहीं आपण म्हणत, 'तो' मेला असें म्हणतों. म्हणजे मुळांत चूक ही कीं, आपण स्वतःला देह समजूनच राहतों; माझाच देह समजून त्याच्यावर प्रेम करतों. ही पहिली चूक. नंतर या देहाचें गुणधर्म म्हणजे विकार आपल्याला चिकटल्यावर त्यांचीच जोपासना करतों ही दुसरी चूक एकदा हे विकार चिकटल्यावर त्यांची वाढ न थांबवितां ते नेतील तिकडे त्यांच्या पाठीमागें जाणें, आणि त्याकरितां वेळप्रसंगीं आपली बुद्धीहि गहाण टाकणें, ही तिसरी चूक. अशा रीतीनें चुकांनीं चुका वाढत जाऊन आयुष्याचें गणित मग साफ चुकतें. एखादें झाड तोडायचें असेल तर प्रथम त्याच्या फांद्या तोडाव्या लागतात आणि नंतर बुंधा तोडतात. त्याप्रमाणें नीतिधर्मानें वागणें म्हणजे देहाला लागलेल्या विकाराच्या फांद्या तोडल्याप्रमाणेंच आहे. दुसरी योजना म्हणजे सगुणभक्तीची. सगुणभक्ति करतांना माणूस क्षणभर कां होईना स्वतःला विसरतो, आणि "मी तुझा आहें" असें म्हणतो. या भगवंताचा सतत सहवास जर कशानें लाभत असेल तर त्याच्या नामानेंच. या नामाच्या सहवासांत राहिल्यानें देहावरचें प्रेम आपोआप नष्ट होईल, आणि मग देहानें मांडलेल्या प्रपंचावरचेंहि प्रेम कमी होईल. पुढें त्याला सर्वत्र परमेश्वरच दिसेल. तेव्हा आतापासून, मी राहीन तर नामांतच राहीन असा निश्चय करा मला खात्री आहे, राम तुमच्यावर कृपा करील.

---

३५२. शुद्ध असावें आचरण । तसेंच असावें अंतःकरण ॥
त्यांत भगवंताचें स्मरण । हेंच प्रपंच सुखी करण्याचें साधन ॥

# काळजीच करायची तर नामाची करा

१८ डिसेंबर

आपण असें पाहतों कीं, आज जें दुःखाचें वाटतें तेंच पुढें सुखाचें होतें,
आणि जें सुखाचें आहे असें आज वाटतें तेंच पुढें दुःखाला कारणीभूत
होतें. आईचें होण्यात जो आनंद आहे तो लौकिकापेक्षा कमी आहे असें
तोंडानें आपण म्हणत नाहीं, पण वागतों मात्र तसें. तुम्हाला जें सुखदुःख येतें तें आईपासून
येतें म्हटलें, तर दुःखाचें कारण काय ? जोपर्यंत आपल्याला परक्यानें दिलेलें दुःख आईनेंच दिलें
असें वाटत नाहीं, तोंपर्यंत आपण आईचे झालों नाहीं. आपण घाबरतों केव्हां, तर आपला आधार
सुटला म्हणजे. जें होतें तें रामाच्या इच्छेनें होतें असें समजावें. संकटें देवानें आणलीं तर तीं सोस-
ण्याची शक्तीहि तोच देतो. समर्थांचे होऊन असें भ्यावें का ! समर्थांचे जे झाले त्यांनीं परिस्थितीला
नाहीं डगमगूं. प्रत्यक्ष संकटाचें निवारण जर करता येतें तर मग भीति कशाची धरावी ! खेळातली
सोंगटी मेली म्हणजे त्याचें सुखदुःख कोणी करतो का ? तसें व्यवहारात आपण वागावें. "परि-
स्थितीचा परिणाम माझ्या मनावर घडूं देऊं नका, देवा," असें म्हणावें, 'परिस्थितीच बदल'
असें देवाला म्हणूं नये. परंतु मुळात जी भीति नाहीं तीं तुम्ही मनानें निर्माण करता, याला काय
म्हणावें ? ज्याप्रमाणें एखादे विष रक्तांत मिसळावें, त्याप्रमाणें काळजी आपल्या अंगात भिनली आहे.
त्याला वरून औषध लावलें तर उपयोग होत नाहीं. त्यासाठीं भगवंताच्या अनुसंधानाचें इंजेक्शनच
पाहिजे. **जे दुर्गुण भगवंताचा विसर पाडायला कारण होतात, त्या सर्वांचा संग्रह म्हणजे**
**काळजी होय.** काळजी हा फार मोठा रोग आहे. पोटात रोग वाढला आणि त्यानेंच पोट भरलें कीं
रोग्याला अन्न जात नाहीं, त्याचप्रमाणें ज्याला काळजी फार त्याच्या हृदयात आनंद जाऊंच शकत
नाहीं. या काळजीचे आईबाप तरी कोण ? देहबुद्धीमुळें आपल्याला काळजी लागते. देहबुद्धि म्हणजे
वासना. **वासना आणि अहंकार हे काळजीचे आईबाप आहेत. अशा और स्वभावाचे आई-**
**बाप असल्यावर 'पोर' असें विचित्र असायचेंच.** खरें म्हणजे एकच स्थिति कधींच कायम
राहात नाहीं, म्हणून आपल्याला भीति वाटते, आणि तिच्यातून काळजी उत्पन्न होते. **काळजी**
**जितकी आपल्याला मारते, तितकेंच नाम आपल्याला तारतें.** तरीसुद्धा आपण काळजीलाच
पकडून बसतो याला काय म्हणावें ! आपला जेवढा वेळ काळजींत गेला तेवढा वाया गेला असें
समजावें. काळजी करायचीच असेल तर अनुसंधान कसें टिकेल याची करा. नामाची काळजी घ्या,
म्हणजे काळजी करायचीच वेळ येणार नाहीं. वासनेचा क्षय भगवंताच्या नामामध्येंच आहे हें जाणून
अखंड नामात राहा, राम कृपा करील ही खात्री बाळगा.

---

**३५२.** 'राम राम' म्हणून राम कसा भेटेल अशी शंका न घेता, 'राम राम' जपावा.
'राम राम' म्हणण्याचा शेवट रामप्राप्तीत, म्हणजे स्वतःच्या विस्मरणात, म्हणजे देहबुद्धीतून
देहाच्या पलीकडे जाण्यात होत असतो.

# देहाशीं संबंधित आणि सूक्ष्माशीं निकट चिकटलेलें साधन म्हणजे भगवंताचें नाम

१९ डिसेंबर

सामान्य माणूस ज्यावेळीं भाषा बोलतो त्यावेळीं तो मनामध्यें अर्थ योजून शब्दरचना करीत असतो. मनातला अर्थ ज्या शब्दानें बरोबर व्यक्त होईल तो शब्द आपण वापरतो. परंतु भगवंताची उपासना करणारे जे ऋषि असतात त्यांचें मन अशा एका अवस्थेमध्यें राहतें कीं, त्या ठिकाणीं परमात्माच सर्व कांहीं करतो ही भावना स्पष्टपणें प्रकट होते. भगवंताशीं एकरूप होऊन जाण्याचीच ती अवस्था आहे. ऋषींचा मीपणा नष्ट झालेला असल्यानें, " मी करतों, मी बोलतों, मी काव्य रचतो " ही भावनाच त्यांना नसून " परमात्मा करतो, परमात्मा बोलतो, परमात्मा मंत्र रचतो " असा स्पष्ट आणि खरा अनुभव त्यांना येतो. या थोर अवस्थेमध्यें ऋषींच्या तोंडातून वेदमंत्र बाहेर पडलेले असल्यामुळें ते मानवाची कृति नाहींत. वेद हें खरें अपौरुषेयच आहेत. घराच्या छपराखालीं ज्याप्रमाणें सर्व लहानलहान खोल्या येतात, त्याप्रमाणें वेदांतात इतर शास्त्रें येतात. वेदांताच्या गोष्टी किंवा ज्ञान हे पक्वान्नांच्या ज्ञानासारखें आहे. जो मनुष्य वेदांताचा नुसताच अभ्यास करतो त्याला त्यापासून फारसा फायदा होत नाहीं. खरं म्हणजे विद्वान लोक हा वेदांत अत्यंत कठीण करून जगाला उगीच फसवतात. मग सामान्य माणसाला असें वाटतें कीं " अरे, हा वेदांत आपल्यासाठीं नाहीं। " वास्तविक वेदांत हा सर्वांसाठीं आहे, सर्व मनुष्यमात्रासाठीं आहे. वेदांताशिवाय मनुष्याला जगताच येत नाहीं. आपले आकुंचित मन विशाल करणें, आपण स्वार्थी आहोंत ते निःस्वार्थी बनणें हेंच खऱ्या वेदांताचें मर्म आहे. वेदांत हा रोजच्या आचरणात आणला पाहिजे.

भगवंताच्या प्राप्तीचे नियम आणि व्यवहारांतील वस्तु प्राप्त करून घेण्याचे नियम यांमध्यें फरक आहे. मनामध्यें वासना उत्पन्न झाली असता ती तृप्त करून घेण्यासाठीं देहाची आणि वस्तूंची हालचाल करणें, हा व्यवहार होय. सूक्ष्म वासना देहाच्या साहाय्यानें जड बनणें हें व्यवहाराचें खरें स्वरूप आहे. परंतु भगवंताचें याच्या उलट आहे. भगवंत हा अत्यंत सूक्ष्म असल्यामुळें त्याची प्राप्ति करून घेणें म्हणजे जडामधून सूक्ष्माकडे जाणें होय. तेव्हां भगवंताचें समाधान हेंहि जडामधून सूक्ष्माकडे पोंचविणारें असलें पाहिजे. जड देहाशीं संबंधित आणि सूक्ष्माशीं निकट चिकटलेलें असें साधन असेल तर तें नामच होय. जो नामांत राहिला त्याचा वासनाक्षय झाला. कुणाच्या पोटीं कोण जन्म घेतो हें सामान्य माणसांना कळणें शक्य नसतें, फक्त सत्पुरुषांनाच तें कळतें. पुष्कळवेळां चांगलें अधिकारी जीव एखाद्या लहानशा वासनेमुळें अडकून पडतात. मग तें अध्यात्मदृष्ट्या चांगल्या कुळामध्यें जन्माला येतात. तिथें त्यांची वासना तृप्त व्हायला वेळ लागत नाहीं. म्हणून लहानपणींच ते जग सोडून जातात. त्यांच्या मृत्यूचें दुःख करणेंहि बरोबर होणार नाहीं. वासना ही दुसऱ्या कोणत्याहि उपायांनीं तृप्त होण्यासारखी नसून आपण जर भगवंताजवळ " वास " ठेवला तरच ती नष्ट होते. वासना नष्ट झाली कीं बुद्धि भगवंतस्वरूपच होईल. जेथें वासना संपली तेथेंच भगवंताची कृपा झाली.

३५४. जो जिवंतपणीं वासनारहित राहिला त्याला सुखदुःख नाहीं.

# मुखीं रामाचें नाम । बाह्य प्रपंचाचें काम । ऐसा राम जोडा मनीं

२० डिसेंबर

प्रारब्धानुसार देहाची गति । तेथें न गुंतवावी आपली वृत्ति ॥ प्रारब्धानें देहाची स्थिति । आपण न पालटूं द्यावी वृत्ति ॥ देह प्रारब्धानें जातो । सुखदुःख भोगवितो ॥ जें जें कांहीं केलें । तें तें फळाला आलें । म्हणून देहाची गति । ते पालटणें नाहीं कोणाचे हातीं ॥ पांडव परमात्म्याचे सखे झाले । तरी वनवासांतून मुक्त नाहीं झाले ॥ सुदामा भगवंताचा भक्त झाला । पण दारिद्र्यांतच राहिला ॥ म्हणून देह प्रारब्धावर टाकावा । जें होईल तो आनंद मानावा ॥ भगवंताचा जो झाला । त्याला देह प्रारब्धावर टाकतां आला ॥ जैसें दुःख येतें प्रारब्धयोगें । सुख आहे त्याचें मागें ॥ दोहोंची न धरावी चाड । नामाची ठेवावी आवड ॥ देह सोंपवावा प्रारब्धावर । मन गुंतवावें रामावर ॥ चित्त ठेवावें भगवंतापायीं । प्रारब्ध आड येऊं शकत नाहीं ॥ देहाचे भोग देहाचे माथां । कष्ट न होती रघुनाथ स्मरतां ॥ संतति संपत्ति वैभवाची प्राप्ति । हे तों आहे प्रारब्धाचे हातीं । ऐसें शास्त्र सांगती । पण न येई हें चित्तीं ॥ देहाची गति प्रारब्धाचे हातीं । हा सिद्धान्त ठेवावा मनीं । काळ घालवावा रघुनाथ-चिंतनीं ॥ प्रारब्धानें आलेलें कर्म करीत जावें । त्याचें फळ भगवंताकडे सोंपवावें ॥ साधुसंत देवादिक । हे प्रारब्धांतून नाहीं सुटले देख । म्हणून देहाचा भोग न चुके कोणाला ॥ भोग प्रारब्धानें आला । त्याचा खेद न वाटावा चित्ताला । नामस्मरणें न राहील त्याची जाणीव त्याला ॥ जीवनांतील आघात प्रारब्धाचे आधीन । समाधान नसावें त्याचेवर अवलंबून । त्यांत रामाचें स्मरण देईल समाधान । दुष्टाची संगति प्रारब्धानें जरी आली । तरी रामकृपेखालीं दूर गेली ॥ देहाचे भोग प्रारब्धानें आले । पण रामकृपेनें दूर झाले ॥ देह प्रारब्धाधीन हें जरी सत्य । आपण न सोडावा भगवंत ॥ देह टाकावा प्रारब्धावर । चित्त गुंतवावें रामावर । मुखीं असावें एक नाम । याहून दुजें पुण्य नसे जाण ॥ नामीं ठेवावें चित्त । तेंच मानावें सत्य । हा निश्चय ठेवावा मनांत । मन होईल निभ्रांत ॥ कर्तव्यीं असावें तत्पर । मुखीं नाम निरंतर ॥ नामाचें प्रेम करावें जतन । जैसा कृपण राखी धन । कारण नामच आपल्याला तारण ॥ नामाची ठेवावी गस्त । रामापायीं लागेल मग भिस्त ॥ मुखीं रामाचें नाम । बाह्य प्रपंचाचें काम । ऐसा राम जोडा मनीं । दुःखाचा लेश न आणावा मनीं ॥ आजवर राहिला वासनेचा आधार । आतां नामावर प्रेम ठेवा पुरेपूर ॥ असती पुण्याच्या गांठी । तरच नाम येईल कंठीं ॥ निर्हेतुक घ्यावें नाम । रामाचें नांव ज्याला न होईल सहन । त्याची गति नाहीं उत्तम जाण ॥ देह जरी नाशिवंत । जेणें जोडेल आत्माराम ॥ नामविण जें जें साधन । तें तें कष्टास मात्र कारण ॥ नामांत कसलेंही सांगितलेलें नाम आहे सत्य । बुद्धि करावी स्थिर । नामीं असावें प्रेम अनिवार ॥ नामस्मरणीं निजध्यास । स्थूलाची न करावी आस । विचार आले । तरी ते नामानें दूर सारावे भले ॥ जगन्नियंत्या प्रभूस करावें आपलें । अखंड राखावें समाधान । हीच परमार्थाची खरी खूण जाण ॥ म्हणून परमार्थाला एकच बाकी कितीजण आले गेले । मनावर त्याचा होऊं न द्यावा परिणाम ॥ उपाय जाण । अखंड असावें अनुसंधान ॥

३५५. देह सोंपवावा प्रारब्धावर । मन गुंतवावें रामावर ॥

# भगवंताच्या रूपाचें ध्यान मनामध्यें आलें नाहीं तरी नाम सोडूं नये

**२१ डिसेंबर**

एक मुलगा घरांतून पळून गेला. त्याची आई म्हणाली, "तो कुठेंहि राहूं दे, पण खुशाल असूं दे." तसें तुम्ही कुठेंहि राहा पण नामांत असा. तुम्हाला नीति-अनीति, न्याय-अन्याय हें कळतें. नाम तेवढें बळजबरीनें घ्या. श्रद्धेनें घेतलें तर जास्त बरें. वृत्ति सांभाळून नामांत राहिलांत तर त्याहूनहि जास्त बरें! वनस्पतीच्या पाल्याचा रस काढण्यासाठीं कांहीं पाल्यांमध्यें मध घालावा लागतो. कांहींमध्यें दूध, तूप किंवा पाणी घालावें लागतें. तसें भगवंताचें प्रेम लागण्यासाठीं आणि नामांत गोडी उत्पन्न होण्यासाठीं त्या नामामध्यें थोडी श्रद्धा घाला. "मी ब्रह्म आहे" या अनुभवातसुद्धां मीपणा आहे. नाम त्याच्याहि पलीकडे आहे म्हणून भगवंताच्या नामाचें सतत स्मरण ठेवावें, त्यामुळें प्रपंच सोपा जातो. नामाची सत्ता फार बलवत्तर आहे. **जगांत असें कोणतेंहि पाप नाहीं कीं जें नामासमोर राहूं शकेल. नाम हें त्याच्या शत्रूलाहि मदत करतें तर तें आपल्याला मदत करीलच.** रूपाचें ध्यान मनामध्यें आलें नाहीं तरी नाम सोडूं नये, पुढें रूप आपोआप येऊं लागेल. सत्याला कांहीं तरी रूप दिल्याशिवाय आज आपल्याला त्याचें अनुसंधान ठेवतां येत नाहीं. नाम हें त्याचें रूप आहे. म्हणून नामाचें सतत अनुसंधान ठेवावें. भगवंताच्या नामांत मोबदल्याची अपेक्षा नाहीं, म्हणून तें अपूर्ण नाहीं. खेड्यांतलें लोक वयांत आल्याबरोबर आपलें लग्न करून टाकतात. ते गरीब असले तरी "उद्यांचें उद्यां बघूं" असें म्हणतात. पण शहरांतलें विद्वान् लोक मात्र लवकर लग्न करीत नाहींत; तसें साधारण अडाणी लोकांना नाम घ्यायला सांगितलें तर ते लगेच घेणें चालूं करतात, परंतु विद्वान् लोक मात्र "नामाचें प्रेम असेल तरच मी नाम घेईन" असें म्हणतात. विषयरूपी सापाचें विष उतरलेलें नसल्यानें भगवंताचें अमृतासारखें गोड नाम आपल्याला गोड लागत नाहीं. याकरितां या क्षणापासूनच नाम घ्यायला सुरुवात करावी.

ज्ञान श्रेष्ठ खरें, पण तें भक्तीशिवाय जगूं शकत नाहीं, कारण भगवंताहून कधीं विभक्त नसतो तो भक्त होय, आणि ज्ञानामध्यें भगवंताशीं एकरूपत्व असतें; म्हणून भक्तीमधून ज्ञान उत्पन्न होतें आणि तें भक्तीवरच जगतें. खरा भक्त ज्ञानीच असतो. भगवंतासाठीं भगवंत पाहिजे म्हणून भक्ति करणारा लाखांमध्यें एखादाच असतो. खरी भक्ति ती हीच समजावी. नामाकरितां आपण नाम घ्यावें. राम ठेवील त्यांत समाधान मानावें. प्रपंचासाठीं भगवंत हा साधन बनवूं नये, तो साध्य असावा. जो भगवंताच्या नामांत आपल्या आयुष्याचा व्यय करील, त्यानें जन्माला येऊन सर्व कांहीं साधलें आणि जन्माचें सार्थक करून घेतलें.

---

३५६. नामानें भगवंताची प्राप्ति होणार ही खात्री असावी. अशा नामालाच 'निष्ठेचें नाम' असें म्हणतात.

# प्रपंचांतील कोणत्याहि प्रसंगांत नामाला सोडूं नका

**२२ डिसेंबर**

आकाशाला भिऊन पळालें तरी कुठेंहि आकाश हें असणारच, त्याप्रमाणें कुठेंहि गेलें तरी देह, मन आणि त्याच्याबरोबर त्याचे भोगहि आपल्याबरोबर येणारच. म्हणून मनालाच, आपल्या वाट्याला आलेले कर्मांचे भोग समाधानानें भोगायला शिकवावें. जोंपर्यंत 'प्रयत्न केला असता तर बरें झालें असतें' असें वाटतें, तोंपर्यंत प्रयत्न हा अवश्य करावा. परमात्मा यश किंवा अपयश देणार असें समजून करावा. सर्व कर्तृत्व त्याच्याकडेच द्यावें. तुझी सेवा किती दिवस करूं, असें परमेश्वराला विचारणें म्हणजेच सेवेंत कमीपणा आलाच; तसेंच, त्याच्या नामाबद्दलहि मुदत कशी घालता येईल? विषय किती दिवस भोगूं असें नाही आपण म्हणत! मग नामाबद्दलच का असें विचारावें! आज भगवंत एका टोंकाला आणि आपण दुसऱ्या टोंकाला आहोंत. त्याच्या नामानें त्याला जवळ जवळ आणावा. आपल्याला जितका आपल्या देहाचा विसर पडेल तितका भगवंत आपल्याजवळ येईल. भगवंताच्या नामांतच सत्संगति आहे.

एक गृहस्थ गांवाला जाण्यासाठीं गाडींत बसला. गाडी निघायला वेळ होता, तोंपर्यंत त्यानें मुलाला इकडच्या तिकडच्या गोष्टी सांगितल्या "बागेला रोज पाणी घालीत जा. मागच्या दाराला कडी लावून निजत जा." वगैरे वगैरे सांगून झाले. पण गाडी सुटायची अगदीं वेळ झाल्यावर, त्यानें मुलाला शेवटीं सांगितलें कीं, "तिजोरीची किल्ली आपल्या जानव्याला ठेव;" कारण तिजोरीवर सर्व अवलंबून होतें. त्याप्रमाणें, मला अगदीं शेवटीं कोणती गोष्ट जर तुम्हाला सांगायची असेल तर ती ही कीं, प्रपंचामध्यें कसेहि प्रसंग येऊं द्या, तुम्ही नामाला सोडूं नका. भगवंताचें नाम म्हणजे आपली वृत्ति आणि भगवंत यांना जोडणारी सांखळीच आहे. म्हणून आपली वृत्ति सदैव नामांत गुंतवून ठेवावी. आपली वृत्ति स्थिर करण्याकरितां आणि उपाधि न लागण्याकरितां आपण भगवंताचें नाम घ्यावें. नाम नुसतें घेतल्यानें काम होईल; पण आपण तें समजून घेतल्यानें काम लवकर होईल. एखाद्या सत्पुरुषाची परीक्षा करायची असेल तर तो नामाबद्दल काय बोलतो हें पाहावें. बाईला मूल झालें कीं त्याच्यावर ती आपोआप प्रेम करते, तसें नाम मुखीं आलें कीं, सत्कर्में आपोआप होऊं लागतात. देहाशीं आपलें इतकें तादात्म्य झाले आहे कीं, आपण त्याच्यापासून वेगळे न राहिल्यामुळें आपल्याला त्याची आठवणसुद्धा राहिली नाहीं; असें नामाचें झालें पाहिजे. नाम घेतां घेतां त्याच्याशीं इतकें तादात्म्य व्हावें कीं, "मी नाम घेत आहें" हेंसुद्धा विसरून जावें.

मनाला रिकामें ठेवलें कीं, तें विषयाच्या मागें धावलेंच समजा. म्हणून आपलें मन नेहमीं गुंतवून ठेवावें. उठणें, बसणें, जप करणें, वाचन करणें, गप्पागोष्टी करणें, चेष्टा-विनोद करणें वगैरे सर्व क्रियांमध्यें भगवंताशीं संबंध व संदर्भ ठेवावा, हेंच अनुसंधान होय. भगवंताचें अनुसंधान हें आपलें ध्येय. त्याला अनुसरून बाकीच्या गोष्टी आपण करूं या. भगवंताचे अनुसंधान हा उंबरठ्यावरचा दिवा आहे, त्यानें भगवंत आणि प्रपंच दोन्हीकडे उजेड पडेल.

---

३५७. भगवंताला अशी प्रार्थना करावी कीं, देवा! प्रारब्धानें आलेले भोग येऊं देत, पण तुझें अनुसंधान मात्र चुकूं देऊं नकोस.

# प्रत्येक वस्तूचें बाह्य रूप तिच्या नामामुळें टिकतें, नाम हें रूपापेक्षां व्यापक आहे

**२३ डिसेंबर**

समजा, मीं तुम्हाला प्रश्न विचारला कीं, "आनंद म्हणजे काय? तर एखाद्या आनंदीं मुलाकडे बोट दाखवून तुम्ही म्हणाल कीं, 'हें पाहा, इथें आनंद आहे!' इतकेंच नव्हे, तर याप्रमाणें आनंदानें खेळणारीं मांजराचीं पिल्लें, उड्या मारणारीं लहान वासरें, हंसणाऱ्या स्त्रिया आणि पुरुष, आणि फुलांनीं बहरलेल्या लता, यांच्याकडे बोट दाखवून, इथें आनंद आहे" असें तुम्ही मला सांगाल. पण हें कांहीं माझ्या प्रश्नाचें खरें उत्तर नव्हे. 'आनंदी वस्तु' कोणत्या आहेत हा माझा प्रश्न नसून, 'आनंद' मला दाखवा असें मी विचारलें. आनंद हा वस्तूच्या बाहेर राहूं शकत नाहीं हें जरी खरें असलें, तरी वस्तु हा काहीं आनंद नव्हे. लहान मूल हेंच जर आनंद असेल तर मोठे स्त्रीपुरुष, किंवा मांजरीचीं पिलें आनंदयुक्त असूं शकणार नाहींत. अर्थात् आनंद हा एकच असला पाहिजे, कारण सर्व ठिकाणीं आढळणाऱ्या आनंदाला एकच शब्द आपण वापरतो. आनंद हा शब्द एकच असला तरी प्रत्येक वस्तूचा आनंद निरनिराळा असूं शकेल. जसें, जो जो माणूस दिसतो, तो तो निराळा असतो, एकाची ठेवण अगदीं पूर्णपणें दुसऱ्यासारखी कधींच आढळत नाहीं, तरी सर्वांना आपण माणसेंच म्हणतों. म्हणून, प्रत्येकजण निराळा असला तरी मनुष्यपणा हा सर्वांच्यामध्यें सारखाच असतो. प्रत्येक माणसांतला मनुष्यपणा हा आपल्या इंद्रियांना जरी दिसत नसला तरी मनानें ओळखतां येतो, आणि त्याचें अस्तित्व मनुष्य या शब्दानें सांगतां येतें. अनेक माणसांना पाहून मनुष्यपणाची आपण जी कल्पना करतो, ती केवळ आपल्याच मनाचा खेळ आहे, का "मनुष्यपणा" म्हणून कांहीं वस्तु खरोखर अस्तित्वांत आहे? जर तो आपल्या मनाचाच खेळ असेल, तर आपण त्याची कल्पना केली कीं मनुष्यपणा उत्पन्न होईल, आणि आपली कल्पना मोडली कीं नाहींसा होईल. परंतु तसें नसून आपण मरून गेलो तरी मनुष्यपणा आहे तसाच कायम राहतो; 'मनुष्यपणा', हा शब्द आहे, हें नांव आहे, म्हणून रूपाला अस्तित्व नामामुळेंच आहे. जसें प्रत्येक माणूस हा माणूसपणामुळें माणूस बनतो तसें प्रत्येक वस्तूचें बाह्य रूप तिच्यामुळें टिकते. माणसें अनेक असलीं तरी त्यांच्यामध्यें राहणारा मनुष्यपणा एकच असतो; म्हणून तर सर्व प्रकारच्या व्यक्तींना 'मनुष्य' हें एकच नाम लागूं पडतें. आनंदी वस्तु अनेक असल्या तरी त्यांच्यामध्यें राहणारा आनंद एकच असतो. म्हणजे, एकच नव्हे तर अनेक रूपें आलीं आणि गेलीं तरी नाम शिल्लक राहतें. आजपर्यंत या पृथ्वीच्या पाठीवर अगणित स्त्री पुरुष जन्माला आले, जगले आणि मृत्यु पावले, तरी 'मनुष्यपणा' आहे तसाच आहे. हा नियम सर्वत्र लावला तर असें दिसेल कीं, चांगल्या वस्तु आल्या आणि गेल्या, पण चांगलेपणा कायम आहे; सुंदर वस्तु आल्या आणि गेल्या, पण सौंदर्य कायम आहे; आनंदी वस्तु आल्या आणि गेल्या, पण आनंद कायम आहे; लाखों जीव आले आणि गेले, पण जीवन कायम आहे. रूपें अनेक असलीं तरी नाम हें एकच असतें, म्हणजे **नाम हें अनेकांत एकत्वानें राहणारें असतें**. त्याचा अर्थ, नाम हें रूपापेक्षां व्यापक असतें. व्यवहारांतसुद्धां आपण बघतों कीं, रूप गेलें तरी नाम शिल्लक राहते. म्हणून आपण नाम घेतल्यावर भगवंत आपल्याजवळ असल्यासारखाच आहे.

---

३५८. सत्कर्में फळाला केव्हां आलीं, तर जेव्हां भगवंताचें नाम मुखीं येईल तेव्हां. सत्कर्मांचा शेवट भगवंताचें नामांत प्रेम उत्पन्न होण्यांतच जरूर आहे.

# खरा 'मी कोण' हें जाणून खोट्या 'मी' ला बाहेर काढण्याचें सामर्थ्य नामांतच आहे

२४ डिसेंबर

जगामध्यें घडणारे सर्व अपमृत्यु टाळतां येण्यासारखे असतात. त्याला दोनतीन उपाय आहेत. एक उपाय असा कीं, मरणोन्मुख माणसावरून लहान मूल ओंवाळून टाकतात. तो मनुष्य जगतो खरा, पण मूल तडफडून मरतें. हा अघोरी उपाय आहे. दुसरा उपाय म्हणजे, मरणाऱ्या माणसासाठीं इतर कोणी अगदीं मनापासून मरायला तयार होणें. मुलासाठीं आई किंवा बाप, नवऱ्यासाठीं बायको, किंवा मालकासाठीं नोकर आपला प्राण देतात. हा उपाय आहे खरा; पण इतकें प्रेम सहसा आढळत नाहीं. तिसरा उपाय म्हणजे आपल्या देहासकट सर्वस्वाचें दान करणें हा होय. घरदार, पैसाअडका, मोडीकुंडी आणि आपला देहदेखील भगवंताला अर्पण केला तर अपमृत्यु टळतो. दानामध्यें मोठी शक्ति आहे, पण तें योग्य ठिकाणीं आणि योग्य हेतूनें झालें पाहिजे.

सत्पुरुषाजवळ राहून जर मनुष्य आज्ञापालन शिकला नाहीं तर तो कांहींच शिकला नाहीं. जो आज्ञापालन करील त्याला भोग भोगावे लागतील खरे, परंतु ते आपल्या सोयीनें भोगण्याची व्यवस्था होईल. प्रारब्धाचा जोर मोठा विलक्षण आहे. भोग येण्याचा समय आला म्हणजे तो बुद्धीवर परिणाम करतो. तिथें आपण सावध राहून सत्पुरुषांच्या सांगण्याप्रमाणेंच वागलों तर प्रारब्धाचा जोर मंदावल्यावांचून राहणार नाहीं. प्रारब्धानें बुद्धीमध्यें कांहींहि विचार उत्पन्न झाले तरी त्याप्रमाणें वागणें अथवा न वागणें हें आपल्या हातामध्यें आहे, आणि म्हणून तर मनुष्य हा श्रेष्ठ आहे. बुद्धीला आवरण्याची युक्ति साधायला आज्ञापालन हें सर्वोत्कृष्ट साधन समजावें. विकार हे कांहीं मुळांत टाकाऊ नाहींत. ते भगवंतानेंच दिले आहेत, म्हणून जीवनांत त्यांना योग्य स्थान असेलच असेल. किंबहुना, व्यवहारामध्यें विकारांची जरूर आहे. मात्र विकारांना आपण सत्ता गाजवून वापरायला शिकलें पाहिजे, विकारांनीं आपल्यावर सत्ता गाजवतां कामा नये. विकारांना आपण वापरावें, विकारांनीं आपल्याला वापरू नये. पहिल्यानें प्रपंचांतील वस्तु हवी म्हणून भगवंतावर प्रेम करायला लागावें. चिकाटीनें तें प्रेम वाढवावें, म्हणजे नंतर वस्तूचें महत्त्व निघून जातें आणि भगवंत तेवढा शिल्लक उरतो. भगवंताला एकदा धरला कीं वाटेल त्या परिस्थितीमध्यें त्याला सोडूं नये. हें त्याचें नाम घेतल्यानेंच साधतें, म्हणून नाम घेत जा असें मी सतत सांगत असतों. ज्ञानमार्ग असो किंवा भक्तिमार्ग असो, खरा 'मी' कोण आहे हें ओळखण्यासाठींच सर्व साधनें असतात. आज आपल्याजवळ खोट्या 'मी' चें प्राबल्य आहे. तें नाहींसें करणें जरूर आहे. खोटा 'मी' गेला म्हणजे खऱ्या 'मी' ला कुठून आणायची जरूरी नाहीं, तो प्रत्येकाच्या अंतःकरणामध्यें स्वतःसिद्ध आहेच. म्हणून खोट्या 'मी' ला मारण्यासाठीं भगवंताचें ( जगाचें नव्हे ) दास्यत्व पत्करणें फार अवश्य असतें. अनन्यतेशिवाय भगवंताची प्राप्ति नाहीं, त्यांतच भक्ति जन्म पावते. नामस्मरण हें भक्तिमार्गाचें मुख्य साधन आहे. तें तुम्ही निष्ठेनें आणि आनंदानें घ्या, हेंच माझें सांगणें आहे.

---

**३५९. कांहींहि केलें तरी शेवटीं नामाशिवाय गत्यंतर नाहीं. तर मग तें घेण्यात विलंब किंवा चालढकल करण्यात काय हंशील आहे !**

# शहाण्या विद्वानानें नाम घेत चिकित्सा करावी

२५ डिसेंबर

एका गावाहून दोन सरकारी बैलगाड्या निघाल्या. एका बैलगाडींत सोन्याचीं नाणीं असलेल्या पिशव्या होत्या. आणि दुसऱ्या गाडींत बांधकामाचे दगड होते. सबंध दिवसभर प्रवास केल्यावर त्या बैलगाड्या तालुक्याच्या ठिकाणीं पोंचल्या सोनें आणि दगड अधिकाऱ्याच्या हवाली केल्यावर गाडीवानांनीं गाड्या सोडल्या, आणि दोन्हीं गाड्यांच्या बैलांना कडबाच घातला. तसें भगवंताच्या दृष्टीनें नुसता विद्वान् आणि अडाणी, दोघेहि सारखेच, सुंदर विचारांचा भार डोक्यांत वागवला म्हणजे विद्वानाला भगवंत जवळ होतो असें मुळींच नव्हे. विद्वान् काय किंवा अडाणी काय, दोघांनाहि बुडविण्याइतका अभिमान प्रत्येकाजवळ असतो. विद्वानाला अभिमान जास्त मारक इतकेंच. विद्येला जगांत किंमत आहे, पण ती साधनरूप आहे. साध्यरूप नाहीं. विद्या ही भगवंताची दासी बनली पाहिजे. पुष्कळ वेळां विद्वान् लोक आपल्या आयुष्याचा व्यर्थ चिकित्सेने नाश करून घेतात, साधेभोळे अडाणी लोक भगवंताचें नाम घेऊन मजेनें तरून जातात, पण हे विद्वान् लोक, '' भगवंत कसा आहे, त्याचे गुण काय आहेत, त्याचा आणि आपला संबंध काय आहे; त्याचें नाम त्याच्यापर्यंत पोंचतें कीं नाहीं, नामाची सुरुवात केव्हांपासून झाली, नाम कोणत्या वाणीनें घ्यावें '' इत्यादि गोष्टींची चिकित्सा करीत बसतात; पण ती इतकी करतात कीं, शेवटीं आयुष्याचा अंतकाल येतो आणि नामाची चिकित्सा तेवढी पदरांत पडते, नाम घेण्याचा आनंद मिळत नाही. म्हणून शहाण्या विद्वानानें चिकित्सा केली तर नाम घेत करावी.

प्रत्येक भक्तानें साधनाचे कष्ट स्वतःच सोसले पाहिजेत. कितीहि मोठा गुरु असला तरी त्या बाबतींत तो कांहीं करूं शकत नाहीं; फार तर त्या कष्टांची त्याला जाणीव होऊं देणार नाहीं. आपलें मन आपणच आवरलें पाहिजे आणि आपल्या वृत्तीला आपणच वळविलें पाहिजे. साधन करीत असतांना येणाऱ्या अवस्था आपण शांतपणें सोसल्याच पाहिजेत. भगवंताकडे जायचीं साधनें पुष्कळ आहेत. इतर साधनें हीं काढ्याचीं औषधें आहेत. पण भगवंताचें नाम हें त्यांचें भस्म आहे. इतर साधनांचें कष्ट करून जें साधतें तेंच थोडें नाम घेतल्यानें साधतें, पण नामावर तशी श्रद्धा मात्र पाहिजे, प्रत्येक साधनाचें मर्म म्हणजे भगवंताचें स्मरण होय. त्याचा पूर्णपणें समावेश भगवंताच्या नामांत आहे. म्हणून ज्याला लवकर भगवंत गांठायचा आहे त्यानें एका नामाची कास धरावी. ज्याच्या अंगी मीपणा आहे त्यानें चूक केली तर भगवंत त्याचें प्रायश्चित्त देतो; पण ज्याच्या अंगीं मीपणा नाहीं त्याच्या हातून चूक घडली तर भगवंत ती सांभाळून घेतो. समजा आज आपल्या हातून चूक झाली–अगदीं जाणतेपणानें झाली, तरी आपण जर पश्चात्ताप पावून भगवंताला शरण गेलों तर खात्रीनें तो क्षमा करतो. आपण आपलें मागील घडलेलें सर्व भगवंताला अर्पण करावें, मग पुढची जबाबदारी त्याच्यावर पडते.

---

**३६०. भगवंताच्या नामाशिवाय मला कांहीं कळत नाहीं, '' असें ज्याला कळलें त्याला सर्व कळलें.**

# अभिमान नाहींसा करून मन स्वाधीन होण्यासाठीं नाम घ्या

२६ डिसेंबर

जगांत आजपर्यंत पुष्कळ लोकांनीं दानधर्म, स्वार्थत्याग केला, पण त्याच्यामध्यें कर्तेपणाची जाणीव राहिल्यानें खऱ्या अर्थानें त्यांना निःस्वार्थी बनतां आलें नाहीं. खरें म्हणजे आमचें मन आमच्या ताब्यांत आल्याशिवाय आम्हांला निःस्वार्थी बनतां येणार नाहीं. हें मन आपल्या ताब्यांत कां राहात नाहीं ? व्यवहारांतसुद्धां आपण म्हणतों कीं, मला अमक्याचा फार राग आला होता, परंतु मी मन आवरलें, त्या वेळीं मन माझ्या ताब्यांत होतें. असेंच आपण म्हणत नाहीं का ? तें मन कोणत्या साधनानें आम्हांला आवरतां येईल ? योग, याग इत्यादि साधनें त्यासाठींच सांगितलीं आहेत, पण हीं साधनें या काळांत आम्हांला करतां येण्यासारखीं आहेत का ? ह्या साधनांसाठीं लागणारी काळाची अनुकूलता आपण राहतो त्या परिस्थितींत आपल्याजवळ खास नाहीं. मला वाटतें, मन ताब्यांत यायला सध्यांच्या काळांत नामस्मरणाशिवाय दुसरें साधनच नाहीं; कारण आज एक नामच भगवंतानें अवताररूपानें आमच्यासाठीं शिल्लक ठेवलें आहे. तें मन स्वाधीन होण्यासाठीं सर्वांनीं मनापासून नाम घ्या. नाम घेत असतांना मनाचें स्थैर्य बिघडविणारे जे विकार आहेत त्यांना आवरण्याचा प्रयत्न करा. मनाला सर्वांत मोठा विकार कोणता बाधत असेल तर तो म्हणजे अभिमान. ह्या अभिमानासारखा आपला घात करणारा दुसरा शत्रु कोणी नसेल. तो अभिमान सोडायला आपण शिकलें पाहिजे. भगवंतानें आजपर्यंत एवढे अवतार घेतले ते सर्व अभिमान मारण्यासाठींच होते. हिरण्यकश्यपूच्या वेळीं भगवंतानें अवतार घेतला, देवासमोर उभे असतांनासुद्धां त्याचा हात नमस्काराकडे न जातां तलवारीकडे गेला ! यावरून त्याचा अभिमान किती तीव्र असेल याची कल्पना येईल. तो अभिमान नाहींसा करण्यासाठीं आपण कर्तेपणाची जाणीव सोडून नाम घेतलें पाहिजे.

मनाची स्थिरता बिघडवणारा दुसरा शत्रु म्हणजे राग. हा राग फार भयंकर असतो. मोठमोठ्या तपस्वी लोकांची तपश्चर्या यानें धुळीस मिळविली आहे. हा राग आवरण्यासाठीं, आपल्याला राग कशामुळें येतो हें नीट समजून घेतलें पाहिजे. व्यवहारांत आपल्याला नीतीचीं बंधनें घालून दिलीं आहेत, तीं सर्व आपण पाळलीं पाहिजेत. नीतीच्या बंधनांत राहणाऱ्या माणसाचे विकार आपोआप आवरले जातील. हीं बंधनें कशासाठीं घातली आहेत याचें मर्म समजून घेऊन वागलें तर राग आवरतां येईल, आणि राग आवरला म्हणजे त्याच्या पोटांत लपून बसलेले काम, लोभ, मोह इत्यादि विकारांनाहि पायबंद पडेल. याप्रमाणें नीतीच्या बंधनांत राहून तुम्ही आपलें मन भगवंताकडे विनम्र करा; भगवंताकडे जाऊं लागा, मन आपोआप तुमच्या मार्गी येईल, कारण तो त्याचा धर्म आहे. भगवंताला विसरूं नका. तुमचें मन तुम्हांला आपण होऊन साहाय्य करील याची खात्री बाळगा.

३६१. नामानें आनंदमय अशा भगवंताचें सान्निध्य लाभून त्याची कृपा व्हायला वेळ लागत नाहीं; किंबहुना ज्याच्यावर भगवंताची कृपा होते त्याच्याच मुखांत नाम येतें.

# सबबी न सांगतां निश्चयानें नामाचा सहवास धरल्यास परमेश्वराचें प्रेम येतेंच येतें

**२७ डिसेंबर**

चमत्कार करतां आले म्हणजे ब्रह्मज्ञान झालें असें नाहीं म्हणतां येणार. संताचें दर्शन झालें, पण त्याच्या आजूबाजूचे लोक पाहिले तर वाईट दिसतात. आपण दवाखाना पाहायला गेलो तर निरोगी लोक आपल्याला तिथें कसें दिसतील ? आमची प्रपंचाची नड संतांनीं दूर करावी हें म्हणणें चुकीचें नाहीं का ? ती दूर करण्याकरितां प्रापंचिकाकडे जावें, संताकडे नव्हे. आतां दुखणें बरें व्हावें म्हणून जरी 'राम राम' म्हटलें तरी सुद्धां तें वायां जात नाहीं हें निराळें. खरोखर, परमार्थ हा अनुमानाचा नाहीं, परमार्थांत हात धरून खात्रीपूर्वक सांगतां येईल. आपण नुसतें बोलतो, कृति कांहींच करीत नाहीं, म्हणून तो आपल्या आवाक्याबाहेर आहे असें आपल्याला वाटतें. न करायला सबबी पुष्कळ सांगतां येतात. अर्जुनाला भगवंतानीं युद्धाला उभा राहा म्हणून सांगितलें, अर्जुन सबबी सांगूं लागला. देवाला फार वाईट वाटलें. देहबुद्धीमुळें, अभिमानामुळें, भगवंताच्या आज्ञेला सबबी येतात. आज्ञेला सबब सांगणें हें मोठें पाप आहे. एखाद्या सावकाराला सांगितलें कीं तुझ्याजवळचें सर्व कांहीं देऊन टाक, तर तो कदाचित् देईलहि. पण मी दिलें ही आठवण नाहीं जाणार त्याची. द्यायला सांगितलें, तर जो सांगतो तो दाता असतो, हें तो विसरतो. अन्नछत्रांत जेवणाऱ्याचा राम नाहीं, आणि अन्नछत्र घालणाऱ्याचाच तेवढा आहे, असें नाहीं. आमच्या आड काय येतें तें पाहावें. चोर लपून कुठपर्यंत राहतो, मालकानें पाहिलें आहे हें कळेपर्यंत. व्यापाऱ्याला स्वप्न व्यापाराचेंच पडतें, त्याप्रमाणें आपण ज्याचा सहवास करावा त्याचें प्रेम येतें. भगवंताविषयींचें प्रेम कसें उत्पन्न होईल हें पाहावें. प्रल्हादाच्या वेळेस देवपण सवंग होतें असें आपण म्हणतों, पण त्यानें नाम किती अट्टाहासानें घेतलें हें विसरतो. सहवासानें, निश्चयानें, आपलेपणा विसरल्यानें परमेश्वराचें प्रेम येतें. पुष्कळ दिवस एका घरांत राहिल्यानें त्या घराविषयीं नाहीं का आपल्याला प्रेम आलें ? नापसंत नवऱ्याशीं जरी लग्न झालें तरी मुलगी निश्चयानें त्याच्यावर प्रेम करायला शिकते; म्हणजेच, प्रेम निश्चयानें येऊं शकतें. गांजा प्रथम ओढतांना जरी ओकारी आली, तरी संवयीनें पुढें त्याचेंच प्रेम येऊं लागतें. प्रयागला मुलगी आजारी पडली तर मनुष्य लगेच तिकडे जातो, आणि काशीस जायचें तर योग येत नाहीं असें म्हणतो ! व्यवहारांत सबबी सांगण्याची आम्हांला फार संवय झाली आहे. जग माझ्या इच्छेनें चालतें म्हणावें, तर मग मला दुःखाचें कारणच नाहीं. बरें, चालत नाहीं म्हणावें, तर हा आनंदीहि असतो ! आनंदाशिवाय जर मनुष्य जगूं शकत नाहीं, तर तो कायम टिकविण्याचा नाहीं का प्रयत्न करूं ? खोबऱ्याकरितां करवंटीचें रक्षण करायचें; पैका असेल तर तिजोरीला किंमत. देव मोडकातोडका असला तरी तो सर्व ठिकाणीं आहे हें ज्यानें ओळखलें त्याच्या देव्हाऱ्यांतला देव सुंदर नसला तरी चालतो. आपल्यांतला राम पाहावा म्हणजे जगांतला राम दिसतो, आपण जिवंतपणीं भगवंताचा अनुभव घेतला तर तो खरा ! नामस्मरणांत स्वतःला विसरलें कीं भगवंताचा अनुभव येतो.

---

३६२. वाईट किंवा विषयाच्या वासनेनें बुद्धि भ्रष्ट करणें हेंच कलीचें मुख्य लक्षण; त्याच्या मुळावर घाव घालण्याचें काम नाम घेतल्यानें होतें; म्हणून नामधारकाला कलीची बाधा नाहीं.

# वैदिक कर्मांच्या जोडीला भगवंताचें नाम घेतल्यास वेदांचा खरा अर्थ आपल्यास कळेल

२८ डिसेंबर

[ गायत्रीपुरश्चरण झाल्यावर विद्वान् वैदिक ब्रह्मवृंदासमोर झालेलें निरूपण, प्रथम रामरायाला व नंतर सर्व ब्रह्मवृंदास नमस्कार करून श्रीमहाराज म्हणाले:--] तुम्ही वेदविद्या जाणणारे सर्वजण मोठे ज्ञानी, भाग्यवान् आणि पूज्य आहात. इतकीं वर्षें वेदविद्या तुम्हीं जतन करून ठेवली हे तुमचे फार मोठे उपकार आहेत! तुमची योग्यता खरोखर मोठी आहे! त्याच्या उलट माझी स्थिति आहे. मी या माणदेशात राहणारा एक अज्ञ मनुष्य आहें. मला वेदविद्येचा गंध नाहीं. मला ग्रंथांचें ज्ञान नाहीं. मी रामरायाचा एक दीन दास आहें. त्याच्या नामावर माझें प्रेम आहे. माझें म्हणणें आपण प्रेमानें ऐकून घ्यावें अशी माझी विनंति आहे. वेदांनीं गायत्री अत्यंत पूज्य मानिली आहे, हें बरोबरच आहे. कारण गायत्रीच्या उपासनेमध्यें विलक्षण सामर्थ्य साठविलेलें आहे! गायत्रीची उपासना करणाऱ्या माणसाच्या अंगीं खरे वैराग्य आणि चांगलें पावित्र्य असावें लागतें. पूर्वीचे ऋषि जनपदापासून दूर अशा अरण्यामध्यें आश्रम बांधून राहात असत. कंदमुळें हाच त्यांचा आहार असे. इंद्रियसंयम हा त्यांचा मुख्य आचार असे. सत्य हेंच त्यांच्या वाणीचें भूषण असे. काम, क्रोध, आणि लोभ जिंकलेले विरागी ऋषि हीं गायत्रीची उपासना करायला खरीं योग्य माणसें होतीं. परंतु आतां काळ पालटला आहे. ज्या प्रकारचें जीवन ऋषिलोक जगत असत, त्यापैकीं आपल्याजवळ आतां कांहींच शिल्लक उरलें नाहीं. ऋषींचें राहणें, खाणें, पिणें, इंद्रियसंयम, सत्यनिष्ठा, यांपैकीं आपल्यापाशीं काय शिल्लक उरलें आहे? त्या काळीं ऋषींनीं पर्जन्यसूक्त म्हटलें असतां पाऊस पडत असे, आणि तेंच सूक्त आज म्हटलें तर साधा वारा-देखील सुटत नाहीं! ऋषींच्या अंगीं तपश्चर्येचें सामर्थ्य होतें, म्हणून त्यांच्या आशीर्वादाला जशी किंमत होती तशी त्यांच्या शापालादेखील होती. जीवनाबद्दल पूर्वीं असणारी निष्ठा आज बदलली आहे. कालमानानें विषय भोगणाऱ्या ऋषींचे वंशज अत्यंत विषयासक्त झालेले आहेत. त्यांना जगांतल्या वैभवाची इच्छा उत्पन्न झाली आहे. ते वेदपठण करतात खरे, पण त्याचा उपयोग पोट भरण्यासाठीं होतो. त्यांच्या आहार-विहारामध्यें फार बदल होऊन, वैदिक कर्में फक्त नाममात्र शिल्लक राहिलीं आहेत. संध्या न करणारीं माझीं माणसें जशीं दाखवितां येतील, तसे रोज स्नानसंध्या न करणारे, एकादशी न करणारे, कांदालसूण खाणारे, परस्त्री आणि परद्रव्याचा अपहार करणारे, अहोरात्र परनिंदा करणारे वैदिक विप्र दाखवितां येणार नाहींत का? माझ्या बोलण्याचा हेतू आपण नीट ध्यानांत आणावा अशी माझी विनंती आहे. सध्यां परिस्थिति अशी आहे कीं, वैदिक कर्मांवरची श्रद्धा लोकांमध्यें पूर्ववत् राहिली नाहीं, आणि वैदिक कर्में यथासांग घडणें कठीण होऊन बसलें आहे; अशा प्रसंगीं, आपल्याला शक्य आहे तितकें वैदिक कर्म करावें; परंतु चित्तशुद्धि होण्यासाठीं त्यावर पूर्णपणें विसंबून न राहतां त्या कर्मांच्या जोडीला भगवंताचें नाम घ्यावें हेंच माझें सांगणें आहे. सध्यांच्या परिस्थितींत संयमाचीं बंधनें सुटत चाललीं आहेत, म्हणून आपण कळवळून नाम घ्या, आपण नाम घेतल्यावर वेदाचा खरा अर्थ कळेल अशी माझी खात्री आहे.

---

३६३. साध्या माणसानें विशेष खोलामध्यें न शिरतां सांगितल्याप्रमाणें नाम घ्यावें. त्याचें कल्याण झाल्याशिवाय राहणार नाहीं.

# मीपणाचें विसर्जन करून सत्संगतींत म्हणजे नामांत राहावें

२९ डिसेंबर

भक्ति म्हणजे संलग्न होणें. विषयाकरितां आपण परमेश्वराची प्रार्थना वगैरे केली तर ती विषयाची भक्ति झाली, परमेश्वराची कशी होईल ? मीपणा आला कीं संकल्प उठतात आणि संकल्पात्मक विषय तेच मनात येतात. मीपणा ठेवून परमेश्वराची पुष्कळ सेवा केली तरी तींत कमीपणा आहे. सेवेंत जरा बिघडलें कीं माणसांना वाईट वाटतें. प्रपंचाचा त्याग करून, वैरागी होऊन मठ बांधला, पण मठाच्या बंधनात पडला ! देवाला दागिने घातले, तर तें त्याचें रूप आपल्याला चांगलें दिसावें म्हणून ! चांगल्या कृत्यांतसुद्धां मीपणा कसा लपून बसलेला असतो बघा : थोडक्यात म्हणजे मीपणाचें विसर्जन केलें पाहिजे. साधु कर्तेपण परमेश्वराला देतात. वास्तविक आपण कर्ते आहोंत कुठें ? आपण कर्ते म्हटलें, परंतु मग आपल्या इच्छेप्रमाणें गोष्टी घडतात कुठें ? पण नसलेलें कर्तेपण आपल्याकडे ओढून घेऊन माणूस सुखी किंवा दुःखी होतो. ज्याच्याकडे कर्तेपण आहे त्याला तें देऊन आपण सुखदुःखातीत राहावें. मी काहीं नाहीं, कोणीतरी बाहुली आहे असें समजावें, एक भगवंत तेवढा माझा असें म्हणावें, संताजवळ राहिल्यानें आसक्ति जरी पुरती सुटली नाहीं तरी नकळत कमी होत असते. म्हणून आपण नेहमीं सत्समागमात राहावें. संगत आणि अभ्यास यांचा आपल्या मनावर फार परिणाम होतो. आपण हातांत काठी घेतली तर उगीच कुणाला मारावेंसें वाटेल; ही झाली काठीची संगत. आपण हातांत माळ घेतली तर तिनें जपच करूं, माळेनें आपण काहीं कुणाला मारणार नाहीं. आपल्या पोशाखात, वागण्यात, बोलण्यात, सर्व ठिकाणीं संगत आपल्यावर परिणाम करते; म्हणून संतांचा सहवास नेहमीं ठेवावा. गाय जशी वासरामागून येते तसे संत नामामागून आलेच पाहिजेत. ते नाम घेणाऱ्याला धुंडाळीत येतील, आणि त्यांच्या मागोमाग भगवंत अर्थात् आलाच म्हणून समजा. संतांच्या संगतींत आपण गेलों कीं आपलें कर्तृत्व संपलें. दवाखान्यात गेलेला रोगी जसा डॉक्टरच्या स्वाधीन असतो, तसें आपण संतांच्या घरीं गेल्यावर त्यांच्या स्वाधीन होतों. सत्संगतीनें साधकाची वाढ होते. संतांना ओळखण्यासाठीं अनुसंधानाशिवाय दुसरें साधन नाहीं संतांना भक्तीचें व्यसन असतें; ते नेहमीं नामांत असतात भगवंताची वृत्ति किंवा प्रेम अव्यक्त असतें; पण नाम मात्र व्यक्त आहे. म्हणून नामांतच संतांचा समागम आहे. संत हे भगवंतावाचून दुसरीकडे राहिलेच नाहींत, म्हणूनच ते संत झाले. म्हणजे देवस्वरूप बनले. अंतःकरणातील सुप्त असलेलें भगवंताचें प्रेम जागृत होण्यासाठीं काहीं तरी निमित्त लागतें. तीर्थयात्रा आणि साधुसंतांची भेट हें तें निमित्त होय. प्रापंचिक लोकांना परमार्थाला लावायला संसारीं संतच खरा उपयोगी पडतो. भगवंताचें नाम सिद्ध करून देणें हाच संतांचा जगावर सर्वांत मोठा उपकार होय.

---

३६४. संसारातल्या अडचणी नामानें समजतात आणि दूर करता येतात. पण लोक नामाबद्दल ऐकूनच घेत नाहींत, त्याला काय करावें ! नाम घेण्यात स्वतःचीच आडकाठी असते,

# रामा मला एकच द्यावें । तुझें अनुसंधान टिकावें

३० डिसेंबर

सकाळीं लवकर उठावें । भगवंताचें स्मरण करावें । हातपाय स्वच्छ धुवावें ।। मानसपूजा करावी । हृदयांत ठेवावें रामाचें ठाणें । षोडशोपचारें करावें पूजन । गंधफूल करावें अर्पण । नैवेद्य करावा अर्पण । मनानें प्रसाद घ्यावा जाण ॥ शेवटीं करावी प्रार्थना एक । रामा, तुला मी शरण देख ।। जें जें म्हटलें मी माझें । तें तें रामा तुझें ॥ आतां न गुंतवा माझें मन । रामा, मी आलो तुला शरण ॥ रामावर निष्ठा ठेवतां । तो सर्व मनोरथ आपले इच्छेनें पार पाडता ॥ वासना न उठो दुजी कांहीं । नामामध्यें प्रेम भरपूर देई ।। सदा राखावें समाधान । जें तुझे कृपेवांचून नाहीं जाण ।। नीतिधर्माचें आचरण । तुझे कृपेनें व्हावें जतन ॥ न मागणें आतां कांहीं । मी तुझ्यासाठीं जिवंत पाहीं ।। आतां द्या नामाचें अखंड स्मरण । देह केला तुला अर्पण ।। रामा, जें जें कांहीं तूं करी । त्यांत समाधानाला द्यावें पुरी ।। आतां रामा, एकच करीं । तुझा विसर न पडो अंतरीं ।। तुझे नामाची आवडी । याहून दुजें मागणें नसावें उरीं । हेंचि द्यावें मला दान । दीन आलों तुज शरण ।। रामा, मला एकच द्यावें । तुझें अनुसंधान टिकावें ।। नको नको ब्रह्मज्ञान । काव्यशास्त्रव्युत्पत्तीचें ज्ञान ।। कामक्रोधाचे विकार । जाळताति वारंवार ॥ आतां तारी अथवा मारी । तुझी कांस कधीं न सोडी । सदाचरण हें सुखाचें मुख्य साधन । त्यांत भगवंताचें करावें स्मरण । जेणें लाभेल खरें समाधान ।। कर्तव्यांत राहावें आपण । फळाची अपेक्षा न ठेवतां जाण । कारण प्रयत्न करणें आपलें हातीं । यश देणें भगवंता-पाशीं ॥ म्हणून आपल्या कर्तव्याला न चुकावें । परमात्मा होईल आपला समजावें । आपलें न चुकवावें अनुसंधान । हेंच मुख्य कर्तव्य जाण ।। मी पडलों तुझ्या दारी ॥ आतां रामा, तुझा झालों । कर्तेपणांतून मुक्त झालों ।। माझें सर्व तें तुझें पाहीं । माझें मीपण हिरोन जाई ।। रामा, आतां एकचि करी । वृत्ति सदा राहो तुझेवरी ।। रामा, मी कोठें जावें ? । तुजवांचून कोठें राहावें ? ।। देहबुद्धीची भड फार ।। ती करावी रामा तुम्हीं दूर ।। आजवर विषय केला आपलासा । न ओळखतां पडलों त्याच्या फांसा ।। रामा, सर्व सत्ता तुझ्या हातीं । समाधान राहील अशी करावी वृत्ती ॥ तुमचेजवळ मागणे दुजें नाहीं । हृदयांत तुझा वास अखंड राही ।। आतां तुझ्यासाठीं माझे जीवन । तुला तनमन केलें अर्पण । तुमचे चिंतनीं लागावें मन । कृपा करा करा रघुनंदन ॥ ऐसें करावें रामाचें स्तवन । रक्षणकर्ता एक भगवंत मनीं आणून ।। ऐसें व्हावें अनन्यदीन । तात्काळ भेटेल रघुनंदन ।। ऐसी रामास मारा हांक । तो दूर नाहीं नाहीं खास ।। नामापरतें न माना दुजें साधन । जैसें पतिव्रतेस पति प्रमाण ।। नामापरतें न मानावें सत्य । ज्यानें राम होईल अंकित । हेच सर्व साधुसंतांचें बोल । कोणीहि न मानावें फोल ॥ नामावर निष्ठा ठेवावी पूर्ण । मनीं असो, नसो, करावें नामस्मरण ।। नामाच्या संगतीं । ज्या व्यवहाराची प्राप्ती । तोच व्यवहार जाई भगवत्सेवेप्रती ।। ज्ञान विवेक विरक्ती । नामस्मरणें सर्वांची प्राप्ती ।। नामाविण दुजें कांहीं । सत्य सत्य त्रिवाचा नाहीं ॥

---

३६५ आतां द्या नामाचें अखंड स्मरण । देह केला तुला अर्पण ।।

# आपण जपाची जी समाप्ति करतों ती केवळ अज्ञानामुळेंच, कारण नामाला समाप्ति नाहीं

**३१ डिसेंबर**

[तेरा कोटी रामनामाच्या जपाच्या समाप्तीच्या दिवशीं झालेले निरूपणः–]

खरें पाहिलें म्हणजे आपण जपाची जी समाप्ति करितों ती केवळ अज्ञानामुळें. कारण नाम हें चिरंतन आणि कालापलीकडचें आहे. त्याला समाप्ति नाहीं. तें सदैव अमर्यादित आहे. त्याचें माहात्म्य कळायला फार कठीण आहे. ज्ञानी माणसाला जशी लीनतेमुळें शोभा, तशी देवळाला उपासनेमुळें शोभा, देवळाची इमारत खूप मोठी बांधली, आणि देवाची मूर्ति जर आत नसेल, तर देवळाला काय शोभा येणार ! देवाला अत्यंत प्रिय जर काहीं असेल तर तें म्हणजे त्याचें नाम तें घेतल्यानें तो आपलासा होईल. देव नामाशिवाय राहूं शकत नाहीं. तुम्ही अखंड नाम घेत राहा; देव तुम्हाला खात्रीनें भेटेल याबद्दल शंका बाळगूं नका. नाम घेतल्यानें श्रद्धा दृढ होईल आणि नामाची गोडी लागेल. जसें पाणी गोठल्यावर बर्फ होतो, त्याचप्रमाणें नाम घेतल्यानें श्रद्धा घट्ट होते. श्रद्धेमुळें देवाला तुम्हाला भेटावेंच लागेल. **त्रिवेणीचा संगम जर कोणता असेल तर तो म्हणजे देव, भक्त आणि नाम.** जिथें देव असेल तिथें भक्त आणि नाम असतें; आणि जिथें भक्त असतो तिथें नाम आणि देव असतो. तुम्हीं लोकांनीं फार सेवा केली, तेंव्हा रामाजवळ असें काहीं मागा कीं, पुन्हा काहीं हवेंसें वाटणार नाहीं. आपण जर काहीं अगदींच क्षुल्लक मागितलें तर तो हंसेल कीं, मी एवढा मोठा दाता असतांना हे क्षुल्लक काय मागतात ! खरोखर, जपाची सांगता करून तुम्हीं, राजाला लाजवील असा सुंदर रीतीनें उत्सव साजरा केलांत, आणि आतां त्याच्याजवळ जर काहीं मागायचें असेल तर, "हे देवा ! माझें समाधान निरंतर टिकूं दे, आणि तुझ्या नामाचें प्रेम दे " हेंच मागणें मागा. भगवंताला पूर्ण शरण जाऊन सांगा, "भगवंत ! मी हा असा आहें, ह्यांत सुधारणा होणें माझ्या हातीं नाहीं. " आतां एकच करा कीं, " रामा ! मी तुझें नाम मरणापर्यंत घेईन तरच जगेन. " आणि स्त्रियांनीं एकच करावें, पति देवासमान मानून देहानें त्याचें व्हावें आणि मनानें देवाचें व्हावें. देहानें आपण किती म्हणून करणार ? त्याला काहीं सीमा आहेच ! उपाधिरहित राहण्याचें साधन म्हणजे उपधिरहित असलेले भगवंताचें नाम सतत घेणें. अशा प्रकारें परमार्थ आणि व्यवहार यांची उत्तम सांगड घालावी. एखाद्या शेताला लावलेलें कांटेरी कुंपण हें त्याच्या रक्षणाकरितां लावलेले असतें. पाऊस चांगला होऊन शेत जर कुंपणानेंच व्यापून गेलें तर पीक कसें येणार ? त्याप्रमाणें प्रपंच हा परमार्थाचा लाभ होण्यासाठीं करावा कुठेंहि गुंतून राहूं नये, कोणत्याहि उपाधींत सांपडूं नये; परमार्थाबद्दल नसत्या शंका घेऊं नयेत. आजच्या या दिवसापासून, आपण आपल्या मुलाला जितक्या आपलेपणानें हाक मारतों तितक्या आपलेपणानें देवाला हाक मारा, आणि आतांपर्यंत जितक्या आवडीनें भगवंताचें नाम घेतलें तितकेंच किंवा त्याच्यापेक्षाहि जास्त, आवडीनें आणि निष्ठेनें तें घ्या. मला खात्री आहे, राम तुमचें कल्याण करील.

---

३६६. अंतःकाळीं अगदीं शेवटीं सुटणारी वस्तु म्हणजे भगवंताचे नाम पाहिजे. नामांत शेवटचा श्वास गेला पाहिजे.

# श्रीब्रह्मानंदबुवांनीं नाम देहापेक्षांहि जास्त सांभाळलें

**श्रीब्रह्मानंदमहाराजांची पुण्यतिथि**

अखेरपर्यंत ज्यांनीं आपल्या वासना, इंद्रिये जिंकलीं आणि राम जोडला, त्यांची पुण्यतिथि करतात. ब्रह्मानंदबुवा मजकडे जेव्हां आले, तेव्हां संसार करायचा अशी त्यांची इच्छा होती, पण त्यांचा भाव शुद्ध होता माझी गांठ पडल्यावर त्यांची वासना पार मावळली. मीं जेव्हां पाहिलें तेव्हां त्यांच्या हृदयांत मला मीच दिसूं लागलों. आणि त्यांना माझ्या हृदयांत स्वतःचें रूप दिसूं लागलें, याला गुरुशिष्यसंबंध म्हणतात. मीं तुम्हांला जें नाम सांगितलें तेंच त्यांना सांगितलें. पण त्यांनीं तेंच सत्य मानून घेतलें, त्यामुळें त्यांना सर्व विषय असत्य वाटूं लागले. त्यांनीं गुरुआज्ञापालन हेंच साधन केलें. सद्गुरु आणि भगवंत यांत त्यांना फरक दिसला नाहीं. तुम्ही ब्रह्मानंदबुवाला नुसता बुवा म्हणतां, पण तो साधारण बुवा नव्हता, कारण त्यानें आधीं केलें आणि मग लोकांना सांगितलें. तो गेला असें तुम्ही समजतां का ? साधु कधीं मरतो का ? मरणारा चेला आणि रडणारा गुरु काय उपयोगाचा ? तो तिथें आला तो तुम्हांला कायमचा पाहण्यासाठींच आला. तो तुम्हांला सदासर्वकाळ मागें-पुढें पाहतो आहे, पण तुम्ही मात्र त्याला पाहात नाहीं. तसें करूं नका. त्याला पाहायचें असेल तर त्यानें तुम्हांला जें साधन सांगितलें आहे त्यांतच सदासर्वकाळ राहण्याचा प्रयत्न करा. तो आणि मी वेगळा असें समजतां का ? तसें होणें शक्य नाहीं. तो आणि मी आतां भिन्न असणेंच शक्य नाहीं. जेव्हां देह होता तेव्हांची गोष्ट वेगळी. तेव्हां देखील आम्ही देहानें वेगळे होतो इतकेंच. त्यानें जशी नामावर निष्ठा ठेवली तशी तुम्हीं ठेवा. त्यानें नाम देहापेक्षांहि जास्त सांभाळलें, तसें तुम्ही करा. निदान देहावर जितकें प्रेम ठेवतो तितकें तरी नामावर ठेवा, म्हणजें तुमचें कल्याण होईल. जो नामांत राहिला त्याच्यावर भगवंताची कृपा आहेच. संताजवळ जें साधन असतें तें आपल्याला लाभेल, किंवा त्याची आवड उत्पन्न झाली, म्हणजे संताची प्रचीति आली असें समजावें. ज्याला पुनर्जन्म नाहीं तोच संत बनतो. संत हे चालतेबोलते देव आहेत. संतांच्या अनेक लक्षणांपैकीं एक लक्षण असें सांगितलें आहे कीं, जो स्वतः देहबुद्धीनें मेला आणि सर्व जग व्यापून राहिला तो संत. ब्रह्मानंदबुवा असे संत होते. संतांच्या बाबतींत जें सहज होतें, तें आपण प्रयत्नानें आणि त्यांच्या कृपेनें साधायचें आहे आणि तें साधण्याकरितां तुम्ही रामरायाला अनन्य शरण जाऊन, ' तुझ्या नामाचें प्रेम येऊं दे ' अशी कळकळीची विनंती करा. हाच माझा आशीर्वाद.

---

३६७. केव्हांतरी पुष्कळ साधन करण्यापेक्षां अगदीं अल्प प्रमाणांत का होईना पण नित्यनेमानें, ठराविक वेळीं, आणि शक्य तर ठराविक स्थळीं, जर नामाचें साधन केलें तर तें जास्त परिणामकारक होतें.

# प्रत्येक माणसास आचरणांत आणतां येईल असेंच रामाचें चरित्र आहे

श्रीरामनवमी

आज रामनवमी आहे. आपण ती आनंदानें आणि उत्साहानें साजरी केली. आपल्या मुलाला मुलगा झाला तर आपल्याला नातू झाला म्हणून आनंद होतोच कीं नाहीं ! आज रामजन्म झाला, आतां पुढच्या रामजन्मापर्यंत आपला हा आनंद टिकेल असें आपल्याला मनापासून वाटतें का ! आपली भीति काळजी तळमळ दूर झाली का ! जर झाली नसेल तर हा रामजन्माचा आनंद, उत्साह त्या दिवसापुरताच आहे असें म्हणायला पाहिजे. मग आपण रामजन्म जरी महिनाभर साजरे करीत राहिलों तरी त्याचा काय उपयोग ! खऱ्या अर्थानें जर आपण रामजन्म साजरा केला नाहीं तर त्यामुळें मिळणारा आनंद कायम कसा राहील ? बँड-वाजंत्री लावून व्यावहारिकदृष्ट्या साजऱ्या केलेल्या इतर उत्सवसमारंभाचा आनंद जसा तेवढ्यापुरताच टिकतो, त्याप्रमाणेंच जर रामजन्माच्याहि उत्सवाचा आनंद राहिला तर आपल्या पदरांत काय पडलें ? उत्सवाकरितां केलेली खटपट आणि दगदग, इतकेंच ना ! म्हणून मी म्हणतों, रामजन्माचा उत्सव साजरा करितांना एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे की, तो व्यावहारिकदृष्ट्या साजरा करूं नये. श्रीमंतांप्रमाणें गरिबांना, लहानांना, त्याचप्रमाणें मोठ्यांना तो साजरा करतांना आपलेपणा वाटेल, तसेंच ज्यायोगानें रामनामाचें प्रेम उत्पन्न होईल, भक्तिभाव वाढेल आणि आपापसांत प्रेमभाव निर्माण होईल अशा रीतीनें उत्सव साजरा करावा. प्रत्येक माणसाला आचरणांत आणतां येईल असेंच रामाचें चरित्र आहे. दुष्टांचें रक्षण करणें हा खरा धर्म होय, आणि त्यासाठींच भगवंतानीं अवतार घेतला, हें तत्त्व आपण समजून घेतलें पाहिजे. आपला ' राम ' हा देवघरांत किंवा मंदिरांत नसून प्रत्येकाच्या हृदयांत आहे हें जाणून, त्याप्रमाणें व्यवहारांत वर्तन ठेवलें तरच रामजन्म साजरा करण्याचा खरा उपयोग झाला असें म्हणतां येईल. परंतु आपलें कसें होतें बघा. आपल्याला डोळे असून प्रकाश दिसूं शकत नाहीं, कारण त्यावर विकारांचा पडदा येतो. ज्याप्रमाणें डोळ्यांवर दृष्टि कमी करणारें आच्छादन येतें आणि डॉक्टर तें ऑपरेशन करून दूर करतात. परंतु ज्याप्रमाणें ऑपरेशन झाल्यावर डॉक्टरांनीं सांगितलेलें औषध, पथ्यपाणी, वगैरे चालूं ठेवायला लागतें, त्याप्रमाणें नीतिधर्माचें आचरण ठेवून साधुसंतांनीं सांगितलेलें नाम अत्यंत आवडीनें घेणें जरूर आहे. रामाचा बाण कधीं वायां जायचा नाहीं. मला खात्री आहे कीं, भगवंताचा " कोंब " कधीं मरायचा नाहीं. करड जमीन असेल तर त्याला वर यायला वेळ लागेल, पण जो दुसऱ्याला जिवंत करतो तो कोंब स्वतः कसा मरेल ! रामजन्माच्या निमित्तानें तुम्ही आपल्या अंतःकरणांत पेरलेल्या नामरूपी बीजाची वाढ कशी होईल इकडे लक्ष द्या. प्रत्येक वर्षाच्या रामजन्माबरोबर रामनामाच्या प्रेमाची वाढ होऊन त्यामुळें मिळणाऱ्या आनंदांत अधिकाधिक भर पडावी हेंच रामजन्माच्या उत्सवाचें खरें फळ होय. " राम कर्ता आहे " ही भावना दृढ होऊन मन रामनामांत जास्तींत जास्त रमणें हीच रामजन्म साजरा केल्याची फलश्रुति होय.

---

३१८. देह प्रारब्धावर सोडावा आणि मन भगवंताच्या स्मरणांत स्थिर ठेवावें याहून नामाचें साधन दुसरें काय !

श्रीराम

# माझ्या गुरूंनीं मला जग रामरूप बघायला सांगितलें

श्रीगुरुपौर्णिमा

मी देहानें जरी गेलो तरी नामात आहें. लोकांनीं मजवर देहाचा आरोप केला त्याप्रमाणें मी आरोपीप्रमाणें वागलों. मी आलोंच नाहीं तर जातों कुठें ! मिळविलें तितकें परमार्थात जमेच्याच बाजूला राहतें. प्रपंचात सुख व्हावें असें मलाहि वाटतें, पण यांतच सर्व सुख आहे असें नाहीं मानूं. पंढरपुरास जातांना मोठ्या धर्मशाळा लागल्या म्हणून आपण कांहीं तिथेंच राहात नाहीं. आईला लेंकरावर माया कर असें म्हणावें लागतें का ! देवाची कृपा नसेल तर आपण जगणेंच शक्य नाहीं. तोंडावाटें नाम येतें तोवर देवाची कृपा आहेच असें मानावें. म्हातारपणाच्या पलीकडे गेल्यावर मी तुम्हाला अजून सांगतोच आहे, यांचें कारण काय बरें असावें ! कोणी एकजण तरी तयार व्हा ! आजोबाला नातवाचें तोंड लवकर पाहावें, असें वाटतें, पण मुलगा म्हणतो कीं, मी अजून लहान आहें ! तसें माझें आहे.

मला जें पाहिजे होतें, तें सर्व एके ठिकाणीं, श्रीतुकामाईच्या ठिकाणीं, मला मिळालें. आजपर्यंत मी त्याची, माझ्या गुरूची, आज्ञा कधींहि मोडली नाहीं, प्रथम सद्गुरूंच्या शोधात असतांना मला रामकृष्ण भेटले होते. त्या वेळीं ते हयात होते. त्यांनीं मला श्रीतुकाराममहाराज ( श्रीतुकामाई ) यांच्याकडे जायला सांगितलें. श्रीतुकामाई फार थोर होते, ते अतिशय थोर होते, प्रत्यक्ष परमात्मस्वरूपच होते ते. माझें सर्व कार्य हें त्यांच्या कृपेचेंच फळ आहे. त्या काळच्या मोठमोठ्यांना तुकामाईची योग्यता कळली नाहीं. त्यांच्यासारखा दयाळू जगामध्यें कोण आहे ? त्यांना मनापासून शरण जावें. इतर संतांजवळ साधनाची थोडी तरी जरूरी लागेल, पण तुकामाईपाशीं शरणागतीवांचून अन्य मार्ग नाहीं. जो शरण जाईल त्याचें मात्र काम हमखास होईल. लहानपणीं माझी अवस्था अशी होती कीं, ज्याच्याजवळ जी विद्या होती ती त्यानें मला आपण होऊन बोलावून दिली. परंतु त्या ठिकाणी माझें समाधान झालें नाहीं. पहिल्यापासून मला समर्थांचें प्रेम फार आहे. आणि रामाच्या उपासनेची खरी आवड आहे. माझ्या गुरुपरंपरेतले प्रत्येक पुरुष अगदीं परमोच्चपदाला पोंचलेले होते. माझ्या गुरूंनीं मला एक विद्या दिली आहे। मला वाटेल तेव्हां वाटेल तिकडे जातां येतें. माझ्या गुरूंनीं मला जग रामरूप बघायला सांगितलें. तें तसें मीं बघितलें, आणि मला समाधान झालें. खूप खावें, खेळावें आणि खूप नाम घ्यावें हें मला आवडतें.

जन्मल्यापासून जाईपर्यंत मीं एका नामाशिवाय कशाचीहि आठवण ठेवली नाहीं, हेंच माझें चरित्र होय. ज्याच्या मुखीं नाम आहे, त्याच्या दारांत मी कुत्र्यासारखा लोळत पडतो. ज्याच्या हृदयीं नाम आहे तो मला भेटला असो वा नसो, मी त्याच्याजवळ असतोंच. मी रामाचा उपासक आहे, त्याचें नाव घ्या असें मी लोकांना सांगतों. तुम्ही आनंदानें प्रपंच करा, पण त्यामध्यें रामाला विसरूं नका, हेंच माझें सांगणें आहे.

३६९. नामाचा सहवास पुष्कळ करावा, म्हणजे विषयाची आसक्ति कमी होऊन नामावर प्रेम जडतें.

# " मला नामाशिवाय राहतां येत नाहीं, जिथें नाम तिथें मी "

**श्रीमहाराजांचा पुण्यतिथिमहोत्सव**

ईश्वराला साक्ष ठेवून मी असें सांगतो कीं, माझ्यापाशीं अनुग्रह घेणाऱ्या-मध्येंसुद्धां मी रामच पाहून वागलों. जर सर्व ठिकाणीं राम भरला आहे, तर शिष्यामध्यें तेवढा तो नाहीं का ? तो माझ्यापेक्षा लहान आहे, हीन आहे, दीन आहे, अज्ञानी आहे, हें पूर्ण जाणूनसुद्धां मीं त्याला रामरूप पाहिला. **मला वाईट मनुष्य असा दिसतच नाहीं,** नाहीं तर तो मनुष्य होऊन जन्माला आलाच नसता. माझें कोणी ऐकत नाहीं असें मला कधीं वाटत नाहीं. तसेंच, मी कुणाचें रक्षण करतों असें मला वाटत नाहीं. माझें मला रक्षण करतां आलें नाहीं, तें भगवंतानें केलें, तिथें मी जगाचें रक्षण काय करणार ! लहान मुलें आणि पेन्शन घेतलेली माणसें मला आवडतात. कारण तीं मोकळीं असतात; त्यांना बंधन नाहीं. विद्वानांच्या-बद्दल मला आदर आहे, पण प्रेम नाहीं. त्यांच्यामध्यें असणाऱ्या सरस्वतीबद्दल मला आदर आहे. श्रीमंतांच्याबद्दल मला तिटकारा आहे. कारण पैशाच्या आधारावर ते भगवंताला विसरतात. मला विद्वानांपेक्षा अडाणी आवडतो, आणि श्रीमंतापेक्षा गरीब आवडतो. तसेंच मला शहरांत राहण्यापेक्षां खेड्यात राहणें आवडतें. मला काय आवडतें, तें मीं सांगितलें. हा एकेकाचा स्वभाव असतो. सगळ्या साधूंना असेंच आवडेल असें काहीं नाहीं. एखाद्या मनुष्याला सांगितलें कीं, " तुझा डोळा घरी ठेवून तूं मजकडे ये. " तर तसें त्याला करतां येणार नाहीं, त्याचप्रमाणें मला नामाशिवाय राहतां येत नाहीं. जिथें नाम आहे तिथेंच मी आहे. माझ्याकडे येऊन शिकायचें असेल तर हेंच कीं आपण काळजी करायची नाहीं; परमात्मा सर्व करतो ही भावना ठेवायला शिकावें. मुलांना आणि मुलींना माझें सांगणें असें कीं, तुम्हीं आईबापाची आज्ञा पाळावी. जें करायचें तें मनापासून करावें. प्रामाणिकपणा सोडूं नये, आणि भगवंताला विसरूं नये. लहान रोपटें चांगलें खतपाणी घालून नीट सांभाळलें तर तें मोठे होऊन अनेकांना सावली आणि आश्रय देतें; तसें लहानपणीं चांगलें वागलें तर पुढें खरें मोठेपण येईल. मला भेटायला येणाऱ्या मनुष्याच्या मनांत काय येतें तें सर्व मला समजतें; पण व्यवहाराच्या उलट चमत्काराचा प्रकार दाखविणें बरें नाहीं, म्हणून तें मी कधीं प्रकट करीत नाहीं. मी तुम्हा सर्वांच्या कानानें ऐकतो. आपल्यापैकीं कुणीहि मनुष्य दुश्चित्त झाला कीं माझें मन अस्वस्थ होतें, आणि नंतर, ही अस्वस्थता कुठून आली त्याचा शोध करूं लागलों कीं त्या दुश्चित्त माणसाचा मला पत्ता लागतो. माझ्या माणसानें उगीच काळजी करूं नये. मीं त्याची हमी घेतली आहे, त्यानें माझ्यावर श्रद्धा ठेवावी. माझ्या स्वतःच्या अनुभवानें सांगतों कीं, भगवंताच्या इच्छेनें प्रपंच केला तर त्यामध्यें काहीं बिघडत नाहीं. मी सांगितलेलें तेवढें करीन असा निश्चय करा, कशाचीहि काळजी करूं नका; मीं तुमचा भार घेतला आहे. " **मी तुमच्याजवळ आहे** " **असें मी सांगतों त्या वेळी ती व्यक्ति नसून** " **परमात्मस्वरूप तुमच्याजवळ आहे** " असा त्याचा अर्थ असतो. तुम्ही भगवंताचे नाम घ्यावें, यापलीकडे सत्य सांगतो, मला कसलीहि अपेक्षा नाहीं. नामामध्यें जे स्वतःला विसरले त्यांनाच खरा मी कळलों.

---

२७०. जेथें नाम तेथें माझे प्राण । ही सांभाळावी खूण ।।

## 卐 श्रीमहाराजांच्या शिकवणुकीचे सार 卐

## " हाचि सुबोध गुरूंचा "

नाम सदा बोलावें, गावें, भावें जनासि सांगावें ।
हाचि सुबोध गुरूंचा, नामापरतें न सत्य मानावें ।। १ ।।
नामांत रंगुनीयां व्यवहारीं सर्व भोग सेवावे ।
हाचि सुबोध गुरूंचा, भोगासंगें कुठें न गुंतावें ।। २ ।।
आनंदांत असावें, आळस – भय द्वेष दूर त्यागावे ।
हाचि सुबोध गुरूंचा, अनुसंधान कधीं न चुकवावें ।। ३ ।।
गोड सदा बोलावें, नम्रपणें सर्वलोकप्रिय व्हावें ।
हाचि सुबोध गुरूंचा, भक्तीनें रघुपतीस आळवावें ।। ४ ।।
स्वांतर शुद्ध असावें, कपटाचरणा कधीं न वश व्हावें ।
हाचि सुबोध गुरूंचा, मन कोणाचें कधीं न दुखवावें ।। ५ ।।
' माझा राम सखा, मी रामाचा दास, ' नित्य बोलावें ।
हाचि सुबोध गुरूंचा, रामापाशीं अनन्य वागावें ।। ६ ।।
यत्न कसून करिन मी, यश दे, रामा, न दे, तुझी सत्ता ।
हाचि सुबोध गुरूंचा, मानावा राम सर्वदा कर्ता ।। ७ ।।
आचारसंयमानें युक्त असा नीतिधर्म पाळावा ।
हाचि सुबोध गुरूंचा, खेळाऐसा प्रपंच मानावा ।। ८ ।।
दाता राम सुखाचा, संसारा मान तूं प्रभूसेवा ।
हाचि सुबोध गुरूंचा, संतोष सर्वदा मनीं ठेवा ।। ९ ।।
स्वार्थ खरा साधावा रे, नित्य तुम्हीं नामगायनीं जागा ।
हाचि सुबोध गुरूंचा, मीपण जाळोनियां जगीं वागा ।। १० ।।
अभिमान शत्रु मोठा, सर्वांना जाचतो सुखाशेनें ।
हाचि सुबोध गुरूंचा, मारावा तो समूळ नामानें ।। ११ ।।
राज्याधिकार येवो किंवा जावो समस्त धन मान ।
हाचि सुबोध गुरूंचा, भंगावें ना कदा समाधान ।। १२ ।।
प्रेमांत राम रमतो, प्रेमाला मोल ना जगामाजीं ।
हाचि सुबोध गुरूंचा, गुरुरायाला तहान प्रेमाची ।। १३ ।।

।। जय जय रघुवीर समर्थ ।।

( प्रा. के. वि. बेलसरे यांच्या " श्रीगोंदवलेकरमहाराज यांचें चरित्र आणि वाङ्मय " या ग्रंथांतून )